

श्री गुरुदेव रानडे यांचे निंबाळ येथील राहते घर व त्याच्यासमोरील दहन कट्टा



श्री गुरुदेव रानडे आश्रमातील समाधी मंदिर (निंबाळ)



श्री गुरुदेवांच्या वापरातील वस्तूंचा संग्रह



श्री गुरुदेव रानडे



## उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे – ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७



॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी – दिनांक २६ जुले १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे – सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे –

१) गुजरवाडी – निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२)मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर – मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर – बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर – गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/– असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था – १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर – पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे – कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ – ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा – पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा – पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे – चिंचवड १०) मानव्य संस्था – (संस्थापिका – कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. वेणूताई दांडेकर – ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक – श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी "यांनी घडविला महाराष्ट्र" या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक - श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक - डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य - डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख - ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे - श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण - श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे - श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या -पारितोषिके देत आहे -

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/- ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/- खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वतः मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करुन घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नांवे अशी - श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



**उज्वल भवितव्यासाठी**

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी,

पुणे ४११ ०३७.

टेलिफोन क्रमांक : ४२१००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये

नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक -

ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१

कलम ८०ग खाली आयकर सवलत क्रमांक :

पी एन् टी/ ८० जी / ०२० / ९९ दिनांक ६-४-९९

दिनांक १-४-१९९९ ते ३१-३-२००२






ओंकार ट्रस्ट २००१ च्या **"श्रीगुरुदेव रानडे"** विशेषांक, संपादक सौ. रजनी गोपाल काळे, ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. येथे छापून, श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी, यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७ येथे प्रकाशित केला.


टीप : (१) सदरचा विशेषांक **फक्त खाजगी वितरणासाठी** आहे.

(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.


**मुखपृष्ठ संकल्पना**

श्री. अभय पुरंदरे

**व्यवस्थापकीय सहकार्य**

श्री. शाम देऊळकर

अनंत सर्व्हीसेस, पुणे ३८. फोन : ५४४७८०८

**अक्षरजुळणी**

प्रतिमा ऑफसेट, पुणे ४.

**छपाई**

प्रतिमा ऑफसेट, पुणे ४. फोन : ५४६०२१६

**प्रोसेसिंग**

**पिक्सेल ग्राफिक्स प्रा. लिमिटेड**, शनिवार पेठ, पुणे - यांच्या सौजन्याने.

# ओंकार ट्रस्टची वाटचाल

श्रीसमर्थरामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्त्वज्ञानापासून प्रेरित होऊन **'ओंकारट्रस्ट'** या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा दि. २६.७.१९९१ रोजी करण्यात आली. संस्था सार्वजनिक न्यास म्हणून नोंदविण्यात आली आहे.

**संस्थेचे मुख्य उद्देश :** १) संस्कार वर्ग व बालवाचनालय, २) दवाखाना व प्रसूतिगृह, ३) ध्यानधारणा व ४) अध्यात्मिक जनजागरण.

गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे १ एकर जागा घेतली असून या ग्रामीण भागात वैद्यकीय सेवा उपलब्ध नसल्याने **दररोज दवाखाना** चालू करण्यात आला आहे. तसेच ऑपरेशन थिएटरसह ६ खाटांचे **'रमाबाई हर्डिकर प्रसूतिगृह'** सुरू करण्यात आले आहे.

**डॉ. पारस शहा** यांचे नेतृत्वाखाली ७ **नेत्र चिकित्सा शिबीर** आयोजित केली असून गरजूंना मोफत चष्मे व औषधे देण्यात आली. दिनदयाळ हॉस्पिटल मार्फत एक **कॅन्सर चिकित्सा शिबीर** घेण्यात आले. संस्था ज्या ठिकाणी संस्कार वर्ग घेते त्या ठिकाणी दरवर्षी **वक्तृत्व, अक्षरसुधार प्रकल्प, निबंध, मैदानी खेळ, चित्रकला स्पर्धा** आयोजित केल्या जातात.

संस्था दर वर्षी थोर संतादिकांपैकी एका थोर व्यक्तिवर **'कल्याणी विशेषांक'** प्रसिद्ध करण्यात येतो.

सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तीला / संस्थेला १९९७ पासून दर वर्षी **"वसुंधरा पुरस्कार"** देण्यात येतो.

**२०००-२००१ मधील कार्यवृत्त :** कल्याणीच्या **'स्वामी स्वरूपानंद (पावस)'** विशेषांकाचे उद्घाटन **स्वामी चिन्मयानंद** यांचे शुभहस्ते करण्यात आले. सामाजिक कार्य करणाऱ्या **सौ. सिंधुताई श्रीहरी सपकाळ** यांना २००० चा **'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार'** प्रदान करण्यात आला. विद्या सहकारी बँकेचे अध्यक्ष **श्री. विद्याधर अनास्कर** कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी होते.

मराठी-इंग्रजी **हस्ताक्षर सुधार प्रकल्प** गेले ४ वर्ष सुरू असून यंदा **श्री. नानासाहेब लाभे** यांचे २ ठिकाणी वर्ग घेण्यात आले.

**मांगडे वाडी येथे चित्रकला स्पर्धा** घेण्यात आली.

नामवंत मान्यवरांच्या विचारधनाने भरलेले कल्याणीचे सन १९९२ पासून ९ अंक प्रकाशित करण्यात आले. **श्री गोंदवलेकर महाराज (१९९९)** या अंकाला साधकांकडून प्रचंड प्रतिसाद मिळाला.

**स. भ. श्री. सुनीलजी चिंचोलकर** व **सौ. सुनंदाताई शाळिग्राम** यांची प्रवचने आयोजित केली होती.

**स्वामी विवेकानंद, वीर सावरकर व प. पू. शारदा माताजी** यांचे **स्लाईड शो** निरनिराळ्या ठिकाणी विद्यार्थ्यांना दाखविण्यात आले. **श्री. ज्ञानेश पुरंदरे** यांनी मुलांसाठी संस्कारक्षम गोष्टी दोन ठिकाणी सांगितल्या.

चालू वर्षापासून इंजिनिअरींग, मेडिकल किंवा आर्किटेक्टला प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थीनीस **कै. नलिनी विष्णू जोगळेकर** या नावाची **रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती** देण्यात येते.

# एक नवी दिशा

नवरात्राचे प्रथम दिवशी ता. २८ सप्टेंबर २००० रोजी ओंकार ट्रस्टने २ अनाथ मुले व १ मुलगी दत्तक घेऊन त्यांचे निवासाची सोय गुजरवाडी येथील ट्रस्टचे जागेत करण्यात आलेली आहे. भविष्यात आणखी ७ मुले दत्तक घेऊन १० मुलांच्या संगोपन, संवर्धन व त्यांना शिक्षण देऊन भारताचे समर्थ नागरिक बनविण्याचे ट्रस्टचे ध्येय आहे. या मुलांवर स्वतःच्या मुलांप्रमाणे प्रेम करून त्यांचे संगोपन करण्याची जबाबदारी एका मातेवर सोपविली आहे. अनाथ-निराधार-असहाय्य मुला-मुलींना अनाथ न समजता त्यांना दत्तक घेऊन सर्वार्थाने त्यांचे पालकत्व स्वीकारून त्यांचे पालनपोषण व शैक्षणिक जबाबदारीच्या पूर्ततेसाठी खूप मोठ्या आर्थिक पाठींब्याची जरुरी आहे व यासाठी समाजातील अनेक सहृदय



चि. शुभम, चि. कांचन, चि. मयूर

दानशूर व्यक्ती निश्चितच पुढे येतील असा दुर्दम्य आत्मविश्वास ट्रस्टला आहे. या प्रकल्पास सर्वतोपरी तन-मन-धनाने सहाय्य करण्याचे आश्वासन पुण्यातील 'चिन्मय माहेर' (श्री. गजानन देशपांडे व सौ. सुधा देशपांडे) या खाजगी ट्रस्टने दिलेले आहे व एका मुलीची 'विवाहकरून देईपर्यंतची' सर्व जबाबदारी स्वीकारण्याचे आश्वासन दिले आहे. आणखीही काही व्यक्तींनी यास भरीव स्वरूपाची मदत करण्याची तयारी दर्शविली आहे.

Shri Gurudev Ranade Samadhi Trust
NIMBAL R.S. (Pin) 586 211
Tq. : Indi, Dist. Bijapur. ☎ : (08422) 53716

# विशेषांकास हार्दिक शुभेच्छा...
# नामसाधनेसाठी आश्रमात जरूर या...

*थोरतत्त्वज्ञ आणि साक्षात्कारी संत डॉ. रा. द. तथा श्रीगुरुदेव रानडे यांचे 'जीवन व कार्य' या अनुषंगाने विवेचक लेख आणि साधकांच्या आठवणी यासह मोठ्या आत्मीयतेने जो विशेषांक आपण प्रसिद्ध करीत आहात, त्याबद्दल सर्वप्रथम आम्ही आपले मनःपूर्वक अभिनंदन करीत आहोत. विशेषांक काढण्याची आपली बहुथोर परंपरा असून त्यायोगे आपण भक्तिप्रसाराचे जे बहुमोल कार्य करीत आहात, त्याचा आम्हाला आनंद होत आहे. 'कल्याणी' विशेषांकाद्वारे आपण भक्तिप्रसार कार्याप्रमाणेच संस्कार वर्ग, रुग्णालय इ. स्वरूपात जी समाजसेवा करीत आहात, त्याचेही आम्हाला विशेष कौतुक वाटते. भक्तिभाव व सेवाधर्म यांची सुरेख जुळणी 'ओंकार ट्रस्ट' च्या माध्यमातून आपण केली असून आपले हे कार्य नक्कीच अनुकरणीय आहे.*

*श्रीगुरुदेव ज्या जुन्या घरात रहात होते, त्या वेळीही त्यांनी आपल्या घराला 'आश्रम' असेच संबोधिले होते. तेथे साधक येत असत व भक्तिचर्चा होऊन साधनही घडून येत होते. त्यांच्या महानिर्वाणानंतर त्यांच्या जुन्या घराचे रूपांतर समाधी मंदिरात झाले आहे. 'नामस्मरण हाच परमार्थ' या त्यांच्या भक्तिसिद्धांताला अनुसरून निंबाळ येथे समाधी मंदिरात त्रिकाळ नेम, दासबोधवाचन, भजन तसेच विशेष उत्सव काळात प्रवचन असे कार्यक्रम होतात. नामसाधना करण्यासाठी अत्यंत अनुकूल व उपयुक्त अशी सर्व व्यवस्था विश्वस्त मंडळाने केली असून जिज्ञासू भाविकांनी आणि अनुग्रहित साधकांनी नामसाधनेसाठी जरूर यावे, असे विनम्रपणाने आम्ही आवाहन करीत आहोत.*

*आपण विशेषांक काढीत आहात ही तर आनंदाची गोष्ट आहेच. पण यंदा वैकुंठ चतुर्दशी २००० ते वैकुंठ चतुर्दशी २००१ हे वर्ष नामानुग्रह - शताब्दी वर्ष म्हणूनही साजरे होत आहे. हा दुग्धशर्करा योग नक्कीच घडून आला आहे. श्रीसद्गुरुकृपेने भक्तिमार्गी साधक व जिज्ञासू भाविक यांना या अंकातील विचार हे त्यांच्या साधनेला उपयुक्त ठरून ईश्वरप्राप्ती हे जे ध्येय आहे, ते साध्य करण्याकरिता उपकारक ठरोत, अशीच आम्ही श्रीगुरुदेवांच्या चरणी विनम्र प्रार्थना करीत आहोत. आपल्या विशेषांकास शुभेच्छा. नामस्मरणाने व्यक्तिगत, कौटुंबिक, सामाजिक, राष्ट्रीय, वैश्विक अशा सर्व पातळीवर सुख, आनंद, तृप्ती, समाधान, शांती प्रस्थापित होवो, हीच मनोकामना.*

**व्ही. बी. रामदुर्गकर**
सचिव, श्रीगुरुदेव रानडे आश्रम
विश्वस्त मंडळ, निंबाळ, (जिल्हा - विजापूर).

दि. : २१-१२-२०००



# संपादकीय

सत्‌गुरुंचे स्वरूप कसे असते याचे विवेचन करताना संतसाहित्यिकांनी त्यांना वेगवेगळ्या उपमा देऊन त्यांचे वर्णन केले आहे. वास्तविक पाहता सत्‌गुरु हे अनुपमेयच असतात म्हणूनच श्रीसमर्थांनी दासबोधामध्ये पंचमहाभूतातील परमश्रेष्ठ वस्तुंशी त्यांची तुलना केली आहे आणि या उपमा त्यांना कशा योग्य नाहीत हेपण सांगितले आहे. असे असले तरीसुद्धा सामान्यजनांना सत्‌संगतीचे महत्त्व कळणेसाठी थोर साहित्यिकांनी संत स्वरूपाचे वेगवेगळ्या पद्धतीने वर्णन केलेले आहे. काहीजण त्यांना कमळ पुष्पांची उपमा देतात. ही कमळे जीवभृंगांना परमामृत पाजून त्यांना तृप्त करीत असतात, असे म्हटले आहे. या उपमेचे उत्तम उदाहरण म्हणजे संतश्रेष्ठांच्या मालिकेतील विसाव्या शतकामध्ये विकसित झालेले प. पू. श्रीगुरुदेव रानडे यांचे जीवन पुष्प होय. अशा सत्‌पुरुषांच्या जीवन पुष्पांना कोमेजणे हे माहीत नसते. देह असेपर्यंत ही मंडळी प्रत्यक्षरीत्या साधकांना परमामृत पाजून त्यांचे जीवन तृप्त करीत असतात. आणि देह विसजर्नानंतर तेच कार्य आपल्या अनुयायांच्या करवी संप्रदायाच्या प्रचलित प्रथेनुसार अखंडपणे करून घेत असतात. याचा प्रत्यक्ष अनुभव म्हणजे निंबाळ येथील प. पू. गुरुदेवांचा आश्रम होय. श्रीगुरुदेवांच्या महानिर्याणानंतर त्यांच्या पत्नी श्रीमती सीताबाई तथा काकूसाहेब रानडे यांनी जवळ जवळ २५ वर्षे आश्रमाचे भक्तीकार्य चालविले. नंतर त्यांनी विश्वस्त मंडळ नेमून त्यांच्या हाती आश्रमाचा व्यवहार सोपविला. विश्वस्त मंडळींनी पण हा वसा पुढे चालू ठेवला आहे. तसेच त्यांच्या कन्या श्रीमती विजयाताई आपटे ह्यापण आश्रमातील भक्तीकार्याला पूरक व पोषक असे मार्गदर्शन करीत आहेत.

वेगवेगळ्या संप्रदायातील साधक मंडळी गुरुपदेशानुसार अशा पद्धतीचे कार्य सतत करीत असतात. व म्हणूनच भारतीय संस्कृतीची श्रेष्ठता अजून टिकून आहे. आपल्या संस्कृतीची हीच खरी शिदोरी आहे.

'आत्मज्ञानाचे परमाचार्य' व 'परमार्थाचे पाणिनी' म्हणून सार्थ नावाने संबोधल्या गेलेल्या प. पू. गुरुदेव रानडे यांच्या चरणी या वर्षीचे 'कल्याणी'चे साहित्यपुष्प समर्पित करताना ओंकार न्यासाला परमानंद होत आहे.

वैकुंठ चतुर्दशी २००० ते वैकुंठ चतुर्दशी २००१ हे 'नामानुग्रह शताब्दी महोत्सवी वर्ष' म्हणून साजरे होत असताना ही सेवा आमच्या कडून घडली गेली हा दुग्ध-शर्करा योग आहे असे आम्हाला वाटते.

एका महान, ऋषीतुल्य, तत्त्वज्ञानी परमाचार्यांच्या चरणी या वर्षीचे 'कल्याणी'चे साहित्य पुष्प विनम्र भावाने समर्पित करण्यात येत आहे.

विचारवंत लेखक हे आमच्या अंकाच्या यशाचे मुख्य मानकरी आहेत. त्यांचे बहुमोल लिखाण ते आम्हाला देतात. त्यामुळे सर्वांना आवडणारा असा अंक निघू शकतो याची आम्हाला पूर्ण जाणीव आहे. त्यांचे ऋण आम्ही फेडू शकणार नाही. तरीसुद्धा एक औपचारिक शिष्ठाचार म्हणून आम्ही त्यांचे आभार मानीत आहोत.

त्याचप्रमाणे अंक काढण्यासाठी आर्थिक सहाय्य करणाऱ्या जाहिरातदारांचे पण आम्ही ऋणी आहोत. लेखक, जाहिरातदार आणि अंक काढणेसाठी हस्ते परहस्ते मदत करणाऱ्या सर्व हितचिंतकांचे पुनश्चः आभार मानल्या शिवाय आम्हाला राहवत नाही.

वाचकांचा प्रतिसाद व हितचिंतकांच्या सदिच्छा या बळावर ओंकार न्यासाची वाटचाल प्रगतीपथाच्या दिशेने चालू आहे.

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

*— सौ. रजनी काळे*

# अनुक्रमणिका

गुरु सानिध्यासाठी आसुसलेले आपले मन
उघडे करून दाखविण्यासाठी पुढील
करुणाष्टक गुरुदेवांनी रचले. (१९१३)

"तापत्रये हा बहु गांजलो मी !
बुद्धि स्थिरावो न च शीघ्र नामी ॥
मने वोढिलो सर्वदा काम पाशी ।
गुरा कृपाधे धरि शीघ्र हाती ॥१॥
विपत्ती असो सर्वदा कुंति मागे ।
हरीचे जरी सर्वदा ध्यान लागे ।
सुटेना कदा भोगिल्यावीण भोग ॥
परी सर्वदा नाम इच्छी अभंग ॥२॥
मनीं प्रेरणा थोर आता करावी ।
सदा वस्तुने दृष्टि तुम्ही भरावी ॥
शरीरी सदा नेम हा वाढवावा ।
सदा बुद्धिला ज्ञानयोगीच ठेवा ॥३॥
सदा संतसंगी रमो चित्त माझे ।
सदा तत्पदी वास माझा असो दे ॥
कधी दाविसी आमुची पंढरी ही ।
भरे मानसी सर्वदा हिंचगेरी ॥४॥
संसार तापे बहु तापलो पहा ।
निवृत्तिमार्गे मज शीघ्र चालवा ॥
नसे दूसरा रक्षिता कोण माते ।
कृपा पूर्ण दासानुदासा असो दे ॥५॥

ACADEMY OF PHILOSOPHY AND RELIGION

Centres:
Bombay, Poona, Nimbal (M.S.M.)

POONA (D. C.)

5/25

My dear Vasudevrao,
I was very sorry to hear today from the S. K. Nimbal's letter today that Mama ultimately succumbed to his fatal disease. Please tell Vahini to take consolation in the fact that she served Mama in his old age more than any of the his daughters or other nearest relatives could have. I am very sorry Nimbal did not prove serviceable to Mama's health.
I have received a letter from the Chief of [illegible] today that he is coming to Nimbal at the end [illegible]. I am consequently writing to Yamunakka [illegible] the matter. More later.

Yours aff.
R D Ranade

(गुरु व शिष्य दोघांच्याही मोठेपणाची यथार्थ कल्पना आणून देणारा श्रीगुरुदेवांनी केलेला अभंग. श्रीसद्गुरु भाऊसाहेब महाराज यांच्या निर्याणानंतरच्या गुरुदेवांच्या भावना व्यक्त करणारा अभंग)
गुरुवार, माघ शु. ३ शके १८३५ (ता. २९ माहे, जानेवारी इ.स. १९१४)

संपलेसे वाटे अवतार कार्य । म्हणोनिया काय त्वरा केली ॥१॥

जातो म्हणोनियां सांगितलें आधीं । सर्व ही उपाधी त्यागियेली ॥२॥

शिष्य विनविती आपणांसी जाणें । मागे भक्ति कोणें चालवावी ॥३॥

तुम्हांसी हो त्याची काय असे चिंता । भक्ति चालविता देव असे ॥४॥

चिंता केली तरी होईल तें होतें । कदा चुकेना तें देवकाज ॥५॥

ऐसें वदोनियां वाणी बंद केली । आंत नामावली चाललीसे ॥६॥

नाम चालविले एकादश दिन । भोजन जीवन त्यागियलें ॥७॥

माघ शुद्ध तृतीया दिन गुरुवार । रात्र एक प्रहर झाली असे ॥८॥

शिष्य मिळोनियां करिती भजन । सप्रेम जीवन डोळा लोटे ॥९॥

भजनाचे अंती विठ्ठल गर्जना । अतिप्रेमें जाणा चाललीसे ॥१०॥

कापुराची ज्योती निमतां देखोनि । टाळी वाजवूनी देहसोडी ॥११॥

सोडी देह आमुचा धन्य गुरुनाथ । ज्योती मध्ये ज्योती गुप्त झाली ॥१२॥

---

NIMBAL (M. S. M.),
Dt. Bijapur.

श्री. गु. रा.

१० /१०/ ५८

कृ. सा. न. वि. वि.

आम्ही उद्दिक, पौर्णिमेला बंगलोरला जात आहोत. आपण सोमवारपर्यंत — फार तर मंगळवारपर्यंत — बंगलोरला यावे असे. [illegible] बरोबर [illegible] आहे. [illegible] [illegible] [illegible] [illegible]. [illegible] [illegible] [illegible] येणार आहेत काय?

क. लो. अ.

रा. द. रानडे.



जयदेव जयदेव जयसद्गुरु रामा ।
गुरुदेवा रामा ॥
आरती ओवाळू तुज आत्मारामा ॥ध्रु.॥

जंबुखंडी ग्रामी कर्नाटक देशी ।
रामेश्वर वरदाने अवतार घेशी ।
उमदीशानुग्रह तुज लाभे बाल्यदशी ।
साधन योगे कैवल्याचा प्रभू होशी ॥१॥

गुरुलिंगजंगमप्रभूचा तू नवअवतार ।
सद्गुरु उमदीशाचा शिष्योत्तम थोर ।
भक्तीपथाचा प्रेषित सिद्ध महोदार ।
साक्षात्काराचा तू महाभाष्यकार ॥२॥

निंबाळाश्रम तव हे मुक्तीचे तीर्थ ।
परमार्थाचे मंदिर अध्यात्मपीठ ।
नामाची नेमाची ही साधनपेठ ।
भक्तजनांना वाटे भूवरि वैकुंठ ॥३॥

भक्तीची फल्गुनदी पुनरपि प्रकटाया ।
जडजीवा ताराया अवतार घ्यावा ।
भक्तजनांचे वांछित पुरवा गुरुदेवा ।
लक्ष्मीसुत प्रार्थितसे धरूनि नम्रभावा ॥४॥





जय जय श्रीगुरुदेवा । वाढवि सद्भावा ।
भक्तजनांना दावा । अक्षयनिज ठेवा ॥धृ.॥
नवयुगिचा वर संत । अभिनव हृदयात ।
नवजीवन मुल्यांना । फुलविसी गा त्वरित ॥१॥

विज्ञानात्मज्ञान । पूरक जाणोन ।
तेणे करण्याकथिसी । जीवन परिपूर्ण ॥२॥

आत्मज्ञानाचार्या । साक्षाच्चित्सूर्या ।
आत्मप्रभा दावुनिया । धन्य करिसि आर्या ॥३॥

स्वानंदास्तव येत । भाविकजन आर्त ।
नामसुधा सेवुनिया । होती कृतार्थ ॥४॥

आरती मनोहर । मंगलमय थोर ।
ओवाळी प्रेमभरे । करी जयजयकार ॥५॥



आरति रामराया । स्मर्तु-गामी समर्था ।
सच्चिदानंदनाथा । परब्रह्म तत्वता ॥ आरती ॥
संसार दुःखहरा । अघनाशकारका ।
मृत्युभयहरण करा । नाम संजीवन दाता ॥ आरती ॥
अखंड चरण सेवा । दर्शनसुख समाधि ।
याचना माझी इतुकी । पुर्ण करा दयाघना ॥ आरती ॥



# श्रीगुरुदेवांची 'श्रुती'

**श्रीमती विजया आपटे**

*एम.ए. तत्त्वज्ञान. अलाहाबाद विश्वविद्यालय. श्रीगुरुदेवांच्या कन्या. श्रीमती शिवलिंगव्वा अक्का यांच्या शिष्या. विश्वस्त निंबाळ आश्रम.*

"कल्याणी" नामाभिधानाच्या विशेषांकाने श्रीगुरुदेव रा. द. रानडे ह्यांच्या 'नामानुग्रह शताब्दी' निमित्त त्यांचे पुण्यस्मरण म्हणून विशेषांक काढण्याचा घेतलेला निर्णय ऐकून मनाला फार आनंद झाला. मन भक्तिभावाने भरून गेले. आजपर्यंत कल्याणी मासिकातर्फे श्रीज्ञानेश्वरादी संत, तसेच श्री पूज्य गोंदवलेकर महाराज, पावसचे पूज्य स्वामी स्वरूपानंद, श्रीविवेकानंद इ. अनेक थोर संतांच्या स्मरणार्थ विशेषांक काढले आहेत. बुद्धी-भक्तीची पातळी उंचावणारे हे विशिष्ट कार्य, भक्ती आणि निष्ठा यांची बैठक असल्याशिवाय होणार नाही. सूर्याची प्रभा सहस्त्ररश्मींच्या सहाय्याने स्वतःच जगताला तेजोमय करते, तद्वतच त्या एका ईश्वराला अनेक संतांनी स्वतःच्या भक्ती प्रकाशाने, बुद्धी-भक्तीचे सहस्त्र साज चढविले आहेत ! ईश्वराची महत्ता जाणणारे कितीतरी थोर संत जगात झाले. त्यातले काही ज्ञात तर काही अज्ञातच राहिले. या थोर संतांनी कधी निसर्गाच्या सान्निध्यात, तर कधी बौद्धिक साम्राज्यात, कधी उच्च पारमार्थिक आनंदात; ऋषीमुनींप्रमाणे एकांतिक, भावनिक व सर्वस्व अर्पण करून, ईश्वराची आराधना केली ! अशा थोर संतांच्या मालिकेत माझ्या पूज्य वडिलांचे श्रीगुरुदेवांचे पुनःस्मरण होत आहे, हे पाहून मन भरून आले. जग अनंत आहे, असीम आहे ! या सर्व संतांनी आसेतु हिमाचल, ध्येयप्रेरित होऊन भक्तीचा प्रतिध्वनी उमटवला व ईशभावाचा सुगंध दरवळला ! खरं म्हणजे, पुण्यवंतांचे स्मरण पुण्यपावनच करू जाणोत. परंतु माझी एवढी पुण्याई नाही हे माहीत असले तरी मी 'श्रीगुरुदेवांची कन्या' आहे हे विसरू शकत नाही. म्हणून हे धाडस करीत आहे.

'श्रीगुरुदेव म्हणजेच श्रुति' – अशी माझी श्रद्धा आहे. अनादिकालापासून ईश्वरी सत्तेचे वर्णन श्रुति, स्मृति, उपनिषद आदि वाङ्मयातून सर्वज्ञात आहे.

१) 'श्रुति' म्हणजे 'वेद' !

२) 'वेद' म्हणजे 'यद् वेदितव्यम' – 'तद्विद्धि ! ते जाणून घ्या ! ईश्वराच्या श्रेष्ठत्वाचा अभ्यास वेद, उपनिषद, श्रुति, स्मृति, ब्रह्मसूत्रे, श्रीमद् भगवद्गीता इत्यादींच्या माध्यमातून अभ्यास केला गेला आहे. अजूनही होत आहे. असीम ज्ञानाच्या कसोटीला शेवटी देवच अवतरणार !

३) आपल्या सद्गुरुंच्या कडून जे पुण्यपावन 'नाम' श्रीगुरुदेवांनी 'श्रवण' केले (श्रुत) त्याचे सतत स्मरण व निदिध्यासन अखंडित केले ते 'नामस्मरण'

४) परिपूर्तीच्या अध्यासाने अपरिमित कष्ट व नेटाने व कष्टाने जे नामस्मरण केले त्याचे नाव 'नेम'

५) 'आठव तो ब्रह्म नाठव तो भवभ्रम' श्रीभाऊसाहेब महाराज म्हणत, त्याप्रमाणे ह्या भवभ्रमाच्या, तत्सम दुःखाच्या जाळ्यात अडकणे म्हणजे 'नर-जन्म'.

६) 'जन्माचे ते मूळ पाहिले शोधून, दुःखासी कारण जन्म घ्यावा' असे श्रीतुकाराम महाराज म्हणतात, तर श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

'तरी झडझडोनि वहिला निघ, इये भक्तिचिये वाटे लाग ! तेणे पावसी अव्यंग, 'निजधाम, माझे !'

भक्ताला आपले धाम - 'निजधाम' देण्याची हमी ही सद्गुरुंचीच कृपा ! श्रीसद्गुरुंच्या कृपेमुळेच श्रुती, स्मृती, भक्ती, नीती व ईश्वरासाठी कळवळ्याची प्रीती ही जीवनाची उच्चतम ध्येये प्राप्त होतात. अनेक युगात, अनेक संतांनी निरनिराळ्या भाषांतून, धर्मातून, ह्याच 'श्रुती'चे गुणगान केले आहे. 'धर्म' म्हणजे कालानुरूप बदलणे व स्वतःचे स्वत्व विसरणे किंवा स्वतःची धर्ममते दुसऱ्यावर लादणे नव्हे – तर 'धर्म' म्हणजे 'यत् धारयति तत् धर्मः !' जो स्वतःला स्थिर ठेवून दुसऱ्याला धैर्य देऊ शकेल तोच 'धर्म', तोच विश्वधर्म ! या सर्व इतर अनेकानेक विचारांचे निरनिराळ्या भाषांतून धर्मविचारांचे मंथन करून श्रीगुरुदेव म्हणतात, 'One World, one Humanity and one Religion is only possible if we believe in one God !' 'There is only one God.'

माझ्या मते त्या ईश्वराच्या अनेक 'नामांनी' अनेक धर्मातून, वेळोवेळी धावा केला असेल, तरीही वर वर्णिलेल्या 'श्रुतीचे' महत्त्व अनन्यसाधारण आहे. प्रत्यक्ष 'पुण्यात्म्याने' (श्रीभाऊसाहेब महाराज) ज्या 'पुण्यात्म्यास' (श्रीगुरुदेव) ते 'पुण्यपावन' नाम दिले – त्यामुळेच श्रीगुरुदेवांनी नामस्मरणाचे शास्त्र सिद्ध करून जगास विदित केले ! हीच श्रीगुरुदेवांची 'श्रुति'.

***'श्रवणी पेरिले, नयनी उगवले, नामारूपे जसे !***
***पाहता पाहता आत्मज्योत ही, अंगी भरले पिसे !!'***

इतकी त्या 'श्रुती'ची, श्रवणी पेरलेल्या नामाची, महती आहे. आकाशाला गवसणी घालणाऱ्या अशा अनेक बोधवचनांचे वाचन, मनन, निदिध्यासन ही एक तपश्चर्याच आहे. काहींना ती जमते, काही थोडे दूरवर जातात. काही आश्चर्यवत् होऊन थबकून उभेच राहतात ! परंतु श्रीगुरुदेव म्हणत असत, 'तप्त भूमीत बीज पेरलेले असावे. केव्हातरी ते अवश्य उगवते.' वाटच माहीत नसली तर मनुष्य भटकत राहील व देवमार्गाला लागणार नाही.

श्रुती, स्मृती, शांती, कृती, भक्ती व त्याग हेच अनेक संतवचनातून श्रीगुरुदेवांच्या 'श्रुती'चे थोडक्यात वर्णन करू शकतात. या सर्वांचा परिपाठ, परिचय, परिपाक, परिपूर्णता झाली म्हणजेच श्रीगुरुदेवांची श्रुती 'अनुभूती' होते.

'आत्मानुभव हा आतूनच निर्माण होतो' हे सांगताना श्रीगुरुदेव म्हणतात – परमेश्वर प्राप्तीचे अनेक मार्ग असतात. 'नाम' हे अनादी कालापासून चालू आहे. जाणीव-नेणीवेच्या स्थितीत ते कधी लुप्त, तर कधी प्रकट होते. ते भक्ताच्या प्रयत्नावर व गुरुकृपेवर अवलंबून आहे. श्रीगुरुदेव म्हणत, 'ध्यान (Meditation), जाणीव (Realisation of God's various forms), (Self Realisation) आत्मसाक्षात्कार is & Should be the Aim of Human life. हेच त्यांनी जन्मभर, सातत्याने, अविरतपणे करून आत्मोद्धार केला व जगदुद्धाराचा प्रयत्न केला. श्रीभाऊसाहेब महाराजांनी दिलेल्या पावन नामाची 'श्रुती' झाली आणि शिष्याने - श्रीगुरुदेवांनी – त्याची जगज्जेती 'फळश्रुती' केली !

थोडक्यात आत्मसाक्षात्काराची गूढ सूचना बौद्धिक व वैज्ञानिकरीत्या जगास पटविली.

शेवटी प्रार्थना इतकीच,

*'शुचीनाम् श्रीमताम् गेहे गुरुःकृपया प्राप्तम् – गुरोर्वीः सुप्रतिष्ठिताम् अस्तु – इति प्रार्थना'*

**श्रीमती विजया आपटे**
१५, प्रभात रस्ता, पुणे.

- ***कोणतेही कार्य करण्याची प्रवृत्ती निर्माण होण्याला त्या कार्यापासून जे साध्य करायचे त्याचे ज्ञान व प्रेम याची आवश्यकता आहे.***

---

- ***ईश्वर प्राप्तीचे प्रत्यक्ष साधन म्हणजे नामस्मरण ! असे सर्व संतांनी 'बाहू उभारून' सांगितले आहे. कारण साधनात साध्य सामावलेले असते.***

---

- ***'शरणागती' ही गीतेची उच्चतम शिकवण आहे. भक्तीचे 'मर्म' म्हणजे 'शरणागती' !***

*दि. १० नोव्हेंबर २००० या दिवशी 'वैकुंठ-चतुर्दशी'च्या पुण्यपावन दिनापासून २००१ मधील 'वैकुंठ-चतुर्दशी' पर्यंत संपूर्ण वर्ष*
***प. पू. श्रीगुरुदेव रा. द. रानडे यांचे 'नामानुग्रह शताब्दी वर्ष'*** *म्हणून संपन्न होत आहे. या वर्षात अनेक परमार्थपूरक कार्यक्रम होत आहेत. त्याचाच एक अल्पांश म्हणून माझ्या सद्गुरुंच्या चरणी पुढील 'नामपुष्प' सविनय समर्पित !*

---



# "नामपुष्प"



(राग : भैरवी)

चला, निंबाळासी जाऊ ।
गुरुदेव 'डोळा' पाहू ॥धृ.॥

गुरुदेव 'नाम' वंत ।
गुरुदेव ज्ञानवंत ।
गुरुदेव 'कृपा'वंत ।
गुरुदेवचि हो भगवंत ॥१॥

जन्मभूमी जंबूखंडी ।
कर्मभूमी अलाहाबाद ।
तपोभूमी तर निंबाळ ।
आम्ही सर्व त्यांचे 'बाळ' ॥२॥

धन्य धन्य हा सुदिन ।
वैकुंठचतुर्दशीचा पावन ।
भाऊराये अनुग्रहित ।
रामराय परमार्थप्रेषित ॥३॥

श्रीगुरुदेवा एक विनवणी ।
पायी ठेवोनिया डोई ।
नाम सदा राहो वदनी ।
'नाम-पुष्प' वाहीन चरणी ॥४॥

**प. श्री. आनिखिंडी**

# निंबरगी संप्रदायाची गुरू-शिष्य परंपरा

**सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे**

*बी.ए., बी.एड., पंडित, हिंगणे महिलाश्रम, कॅम्प एज्युकेशन सोसायटी शाळांमधून अध्यापन. निरनिराळ्या मासिकांतून कथा लेखन. १९८९ ते १९९९ सलग १० वर्षे दैनिक प्रभात मधून अनेक संतचरित्र व शिकवण यावर लेख. सुमारे ६००. विविध ठिकाणी प्रवचन सेवा. अद्यापही ट्यूशन्स व लेखन चालू.*

## निंबरगी महाराज

*गुरु गोविंद दोऊ खडे, काके लागूँ पाय ।*
*बलिहारि गुरु अपने, गोविंद दियो बताय*

साक्षात् सद्‌गुरु आणि प्रत्यक्ष परमेश्वर दोघेही एकाच वेळी साधकाच्या समोर उभे ठाकले तर कोणाचे चरण आधी वंदू? असा प्रश्न साधकाला पडला तर त्याचे अचूक आणि योग्य उत्तर श्री संतश्रेष्ठ कबीरदास देतात. 'अहो परमेश्वरापेक्षाही सद्‌गुरु अधिक श्रेष्ठ कारण परमेश्वराचा साक्षात्कार घडविण्याचे सामर्थ्य त्यांना असते. सद्‌गुरु स्वरूप अगाध अपार तया मी पामर काय वर्णू?' अशाच एका ब्रह्मा-विष्णू-महेश यांच्या शक्ती ज्या सद्‌गुरु मध्ये एकवटलेल्या आहेत अशा समर्थ सद्‌गुरुंचे जीवन आणि त्यांनी शिष्यांची केलेली अध्यात्मिक उन्नती याचा वृत्तांत फारच गोड अमृतोपम असा आहे.

कर्नाटक राज्यात विजापूर जिल्ह्यातील इंडी तालुका येथील देवर निंबरगी गावी श्री भीमण्णा आणि सौ. अंबाबाई यांच्या पोटी निंबरगी महाराज यांचा जन्म सन १७८९ ला झाला. श्री. नारायण भीमण्णा मिसलकर उर्फ निंबरगी महाराज यांनी निंबरगी येथे या संप्रदायाचे रोपटे लावले. अविरत नामस्मरण हाच या संप्रदायाचा कणा आहे.

श्रीनिंबरगी महाराज उंच, गोरे, धिप्पाड, सतेज असेच होते. लहानपणी खूप खेळकर होते. त्यांचा हूडपणा पाहून त्यांचे वडील त्यांना खूप रागावले तेव्हा त्यांनी उत्तर दिले -- बाबा माझा खेळ सामान्य मुलांच्या सारखा नाही. मी एक वेगळाच खेळ खेळणार आहे. वयाच्या पंचवीसाव्या वर्षी पुन्हा एकदा वडिलांच्या रागावण्याचे निमित्त होवून ते कोणासही न कळविता पंढरपूरला निघून गेले. विठुरायाच्या नामस्मरणी दंग झाले. स्थळकालाचे बंधन नाही स्मरण तुझे करीतो । विठ्ठला मी तव नामस्मरणी रंगतो । तीन दिवस अन्नपाणी वर्ज्य करून कडक उपोषण केले. तिसरे दिवशी त्यांना पांडुरंगाचा दृष्टान्त झाला. तू सिद्धगिरीस जा म्हणजे तुला तुझे सद्‌गुरु भेटतील आणि तुझे काम होईल. त्यांनी द्वितीय विवाह केला होता. त्यांना एक मुलगी होती. त्यांचा व्यवसाय होता निळाऱ्याचा. सूत रंगवणे, नीळेची भट्टी लावणे यात त्यांचा हातखंडा होता. हाताने काम मुखाने नाम हेच त्यांचे जीवित ध्येय. तू रामभजन कर 'प्राणी तेरी दो दिनकी जिंदगानी' हे ते ओळखून होते. पांडुरंगाच्या आदेशानुसार पत्नी व मुलगी यांना घेवून कोल्हापूरजवळील सिद्धगिरी येथे आले. सिद्धगिरीच्या एका गुहेच्या जवळून जात असताना त्यांना आतून शब्द ऐकू आले – 'वत्सा ये, मी तुझी केव्हापासून वाट पहात आहे..' ते श्रेष्ठ सद्‌गुरु म्हणजे नाथ परंपरेतील काडसिद्ध नावाचे सत्पुरुष ! त्या महापुरुषाने त्यांना नाममंत्र दिला आणि आज्ञा केली - 'श्वासाइतके हरिनाम घे.'

एकाग्रतेने शरीराला व मनाला बंधन घालून ठराविक वेळ, ठराविक ठिकाणी केलेले नामस्मरण याला या संप्रदायाचे लोक 'नेम' असे म्हणतात. पहिली सहा वर्षे नारायण यांच्या हातून विशेष साधना झाली नाही हे अंतर्ज्ञानाने जाणून प.पू. काडसिद्ध महाराज स्वतः कोल्हापूरहून निंबरगीला आले आणि त्यांच्या घरी येवून म्हणाले, 'अरे, व्हावे तसे नामस्मरण होतेय कोठे? मी दिलेल्या नामाचे स्मरण करतोयस ना?' समोर कापूर लावला आणि कर्पूरज्योत प्रज्वलित करून ते निघून गेले. त्या ज्योतीच्या प्रकाशाने सद्‌गुरुंच्या कृपाप्रसादाने निंबरगी महाराजांचे अंतःकरण प्रकाशमान झाले.

असतो मा सत्‌गमय । तमसो मा ज्योतिर्गमय हे सद्‌गुरु वचन पटले. ज्ञानाग्नि अति प्रदीप्त झाला. परमार्थ प्रथम, प्रपंच दुय्यम हे जीवित ध्येय निश्चितच झाले. त्यांची उन्मनी अवस्था कशी होती सांगू का ?

*उरले ठाव दिशांचे काही ।*
*मोह तयाचे नावही नाही ।*
*ज्ञानकिरण तो देतो ग्वाही ।*

जगत् सब है झूठ । जीवा उठ सख्या तू उठ । त्यांचे मन आत्मानंदात रत झाले. स्वानंदाचा वारा सुटला. शून्याचा गाभारा भरला. मन आनंदमयी अवस्थेत बेछूट नर्तन करू लागले. आत्मरवीची किरणे सर्वत्र पसरली. नयनावरची मायेची झापड उडाली. गुरुंचा घनगंभीर आवाज हृदय गाभारी घुमत होता. 'उठ झडकरी – या मायेची उघड झाकली मूठ । होईल सौख्याची लयलूट ।'

चारचौघांप्रमाणे सामान्य संसार मी करणार नाही. काहीतरी असामान्य असलेले अलौकिक, असाधारण अशी प्रभुकृपा मी मिळविणार! सांसारिक संकटांचा सामना करीत करीतच अंतरीचा ज्ञानदिवा तेवत होता. प्रकाशमान होत होता नव्हे नव्हे तो पुढे प्रदीप्त, प्रज्वलीत झाला. ते म्हणत 'हे देवा तू अक्षय निर्भय असा माझा स्वामी आहेस. असा तू माझ्या मागे-पुढे डाव्या-उजव्या बाजूस, वरती-खाली सर्वत्र आहे.' सर्वतो माम् पापहि पाहि समन्तात्-'तुजवीण ठाव न दिसे त्रिभुवनी' असा सर्वव्याप्त ईश्वराचा साक्षात्कार त्यांना झाला. आणि ते साधकाचे सिद्ध झाले. मुमुक्षुचे मुक्तपुरुष झाले. ही तपश्चर्या साधारणतः ३६ वर्षे झाली. सर्वसामान्यांना भक्तिमार्गाची वाटचाल शिकवू लागले. साधे, सोपे, सरळ, विवेचन, प्रवचन करू लागले. अनुभूति संपन्न सत्पुरुषाची वाणी आपोआप भक्तांच्या हृदयीचा ठाव घेवू लागली. त्यांची दोन अमृतमय वचने पहा. 'वाईट मार्गाने मिळविलेल्या द्रव्याने सुख मिळणारच नाही. आपल्या मनातून चिंतेचा अंकुर उपटून टाका. नामस्मरणरूपी अमृताचे पान मी किती, कधी कसा करू? याच प्रयत्नात सतत रहा'

*नाम तुझे नारायणा - फोडी पाषाणाला पान्हा ।*
*ऐसा नामाचा महिमा । तुका म्हणे झाली सीमा ।*

नामस्मरणाने पाषाण पाझरतो मग मानवाची काय कथा? दुर्लभ नरदेहाचे सार्थक करायचे असेल तर पांडुरंग श्रीरंग भजो रे मना बा । आणि म्हणून म्हणावेसे वाटते –

*'जया काडसिद्ध प्रभु तो मिळाला । जयांनी जगी साधनी बोध केला ।*
*परब्रह्म ऐसा महाराज माझा । नमस्कार त्या गुरुलिंगराजा ।*

निंबरगी महाराजांनी १८८५ मध्ये ९५ व्या वर्षी निंबरगी येथे देह ठेवला.

## रघुनाथप्रिय उर्फ साधुबुवा

आंध्रकडचे हे एक विरक्त आणि परमार्थात अधिकारी असलेले सत्पुरुष होते. तीर्थयात्रा करीत करीत ते उमदी गावाजवळील सोनगी येथे आले. तेथे त्यांची गुरुलिंग जंगम उर्फ निंबरगी महाराज यांची भेट झाली. 'यज्ञयाग, व्रते, अनुष्ठाने अशी खटपट तुम्ही कशासाठी करता? पुण्य मिळविण्यासाठीच ना ! पुण्य तुम्हाला डोळ्यांना दिसते का? पुण्याचा साठा किती झाला हे कळते का? नको यज्ञयाग नको कर्मकांड ।

रामनाम घ्यावे मुखाने अखंड । - हा बोध त्यांना दिला.' एकदा निंबरगी महाराज आपला मेंढ्यांचा कळप चरायला सोडून एका झाडाखाली ध्यानमग्न होवून गेले. सकाळ सरली. दुपार कलली. संध्याकाळ पुढे सरकली. रात्र झाली. श्रीसद्‌गुरुंची ही उन्मनी अवस्था रघुनाथप्रिय झाडावर बसून पाहात होते. पाहातच राहिले. स्वतःही उपोषित राहिले. फक्त कडुलिंबाचा पालाच खाल्ला. देहभानावर आल्यावर श्रीनिंबरगी सद्‌गुरु त्यांना म्हणाले, 'अरे, असे देहदंड सोसू नकोस. पाला खाल्ल्याने मोक्ष मिळाला तर मग तो उंटाला नसता का मिळाला?' हे सर्व पाहून रघुनाथबुवा सद्‌गुरुंना शरण गेले. गुरुंनी त्यांना नाममंत्र दिला. पुढे उमदीस येवून त्यांनी बारा वर्षे कडकपणे नामसाधन केले. म्हणू लागले –

*अनन्यता मज घडो स्वानंदरूपी ।*
*हे मागणे करी कृपा सदस्या स्वरूपी ।*

आणि सद्‌गुरु कृपेने उद्धरून गेले.

## भाऊसाहेब महाराज उमदीकर

भाऊसाहेब लहानपणापासूनच चिंतनशील, जिज्ञासू, विरक्त मनोवृत्तीचेच होते. लहानपणी गरगर फिरणाऱ्या भोवऱ्याकडे पाहून माणसाचे जीवन दैवाच्या आसावर असेच गरगरत नाही काय? असा विचार त्यांच्या मनात आला. रघुनाथप्रिय उर्फ साधुबुवा या आपल्या जिवलग मित्राच्या आग्रहावरून केवळ कुतूहलाने ते श्रीनिंबरगी महाराजांकडे आले. प्रथमदर्शनी सद्‌गुरुंनी काय जादू केली ईश्वर जाणे. त्यांच्याकडे आले आणि त्यांचेच झाले. सद्‌गुरुंच्या संगे शिष्य बी घडला । शिष्य बी घडला सद्‌गुरुची झाला – इतकी त्यांची आत्मिक उन्नती झाली. दिवसातून नऊ तास नामसाधना ते करीत असत. गुरु आज्ञाच होती ती !

परद्रव्य माती समान । परनारी मातेसमान ही तत्त्वे ते कसोशीने पाळीत. साधन वाढले भाव दृढ झाला. उच्च अनुभूति येवू लागली दिव्यानंद मिळू लागला.

गुरु-शिष्याची जोडी एकदा नेमास (जपास) बसली असता भुंग्याने भाऊरायाची मांडी पोखरून रक्तबंबाळ केली तरी त्यांनी 'नेम' सोडला नाही. केवढी सहनशीलता व असीम धैर्य ! सद्‌गुरु निंबरगी महाराज उद्‌गारले, 'भाऊराया, धन्य तुझी ! तुझ्यासारखा शिष्योत्तम मिळाला हेच माझे महत् भाग्य !'

आई, वडील, मोठे बंधू एकामागून एक मरण पावले. विजापूरात भीषण दुष्काळ पडला. चालून आलेली मामलेदारकीची नोकरी नामसाधनेत खंड नको म्हणून नाकारली. लोक म्हणू लागले - गुरुने काय चेटुक केले? हा भाऊराय अगदीच येडा झाला. पण एकटे श्रीसद्‌गुरु जाणत होते जनदृष्ट्या येडा तेवढा एकटाच तो शहाणा आहे. त्याला आत्मविश्वास होता - देवा सांगू सुखदुःख । देव निवारील दुःख, श्रीसद्‌गुरु निंबरगी महाराजांचे वय झाले. त्यांनी नामस्मरण भक्ती, प्रचार, प्रसाराची, कार्याची धुरा भाऊसाहेबांच्या हवाली केली. ती त्यांनी समर्थपणे पेलली. श्रीनिंबरगी वैकुंठवासी झाले. भाऊराय दुःखी झाले पण नामसाधना चालूच होती. अठरा वर्षे उभे राहून । तप केले निद्रा जिंकून । तेणेची तो पुण्यपावन सर्व जगासी ।

*देहबुद्धि उकरून । लावी रोप समाधान - हेच त्यांचे कार्य !*

## अंबुराव महाराज

इ.स. १८९२ च्या चैत्रशुद्ध पौर्णिमेला भाऊराव एका ओढ्याकाठी एका मोठ्या शिळेवर बसले होते, तंबाखू खात ! अंबुराव हा कोवळा तरुण पायी चालत निंबरगीच्या मारुतीच्या दर्शनाला येत होता. सद्‌गुरुंनी स्वतःहून हाक मारली. बाळा इकडे ये ! मी तुला नाम देतो ! घेतोस ना? अंबुराव घाबरून गेला. निंबरगी संप्रदायाची नियमावली कडक 'नेम' मला कसे जमेल? असे त्यांना वाटले. तो विचार जाणून भाऊराव म्हणाले, 'तू फक्त नाम घे, बाकी तुझ्या अडचणी मी दूर करेन. तुझी पथ्ये सांभाळून घेण्याची जबाबदारी माझी ! उमदीकर या सद्‌गुरुंकडून नाममंत्र घेतला आणि कडक नामसाधना करून भाऊरावांचे पट्टशिष्य ठरले. जसा समर्थांचा कल्याण ! अंबुराव सद्‌गुरुंचे बोल सांगतात. साधकाने भीम व्हावे. नामस्मरण रूपी अन्न भरपूर खाऊन कल्पनारूपी बकासुराचा नायनाट करावा. मृत्यूपूर्वी काही क्षण ते म्हणाले, 'आम्हाला काही इच्छाच नाही. वासना पूर्ण जळाल्या आहेत. आता आम्ही नारायण नारायण म्हणत स्वर्गात उडून जाणार !' हरिनाम सार । हरिनाम सार । तेणेची भवपार पावसील । स्वामी म्हणे अंती हरिनाम एक । तारील निःशंक तुजलागी ।

याची प्रत्यक्ष अनुभूती सद्‌गुरु कृपेने घेतलेला हा एक महान शिष्य होता.

## श्री गुरुदेव रानडे

हे एक थोर तत्त्वज्ञ, साक्षात्कारी संतश्रेष्ठ होते. संसारसागराच्या भ्रमभोवऱ्यात गरगरणाऱ्या सामान्य जीवाला नामामृताची अमोलिक संजीवनी देवून अपार मनःशांती देवू शकणारा हा महान सत्पुरुष होता. ही श्रीरामनामनौका भवसागरी तराया – जणू काय प्रत्यक्ष रामरायच यांच्या रूपाने देहधारी बनून भक्तांच्या जीवनौकेचे सुकाणु हाती धरून बसले होते. या महान अधिकारी पुरुषाची माता पार्वतीबाई अशीच श्रेष्ठ नामधारक

होती. शुद्ध बीजापोटी जन्मलेले हे रसाल फळ अमृतत्व देणारे असेच होते. पोहोताना पाठीला बांधलेला भोपळा फुटला आणि रामभाऊ बुडू लागला. त्याचा मित्र कल्लू याने आपला जीव धोक्यात घालून त्याला वाचवले आणि याच मित्राने भाऊसाहेब उमदीकरांकडे त्याला सहज म्हणून नेले आणि गुरुदेव रानड्यांच्या तारुण्याला गुरुकृपेचा परीस स्पर्श झाला - सागराच्या संगे नदी बी घडली । नदी बी घडली सागरची झाली. डेक्कन कॉलेज, अलाहाबाद युनिव्हर्सिटी येथे आदर्श अध्यापक म्हणून ते गाजले. याच काळात क्षयाची बाधा ! आजारपण देहाचे, प्रचिती मात्र आत्मानंदाची भाऊसाहेब उमदीकरांकडून नाममंत्र घेतला. आमुलाग्र जीवन बदलले. आजारपण सहन कर पण नेमाची वेळ चुकू नको हा आदेश - गुरु आज्ञा आमरण पाळली.

*सुटेना कधी भोग, भोगल्याविणा भोग ।*
*परी सर्वदा नाम इच्छी अभंग ।*
*सदा संतसंगी रमो चित्त माझे ।*
*सदा त्वत्पदी वास माझा असू दे ।*

आध्यात्मिक प्रगती जीवनाचे इति कर्तव्य ठरले. अध्यापन, साधकांना मंत्रदान, भक्तीमार्गाला पोषक ग्रंथलेखन असे तिहेरी कार्य त्यांनी केले.

*स्वानंदास्तव येत भाविक जन आर्त*
*नामसुधा सेवूनिया होती रे कृतार्थ*

हेच त्यांचे अखेरच्या श्वासापर्यन्त कार्य होते.

## शिवलिंगव्वाक्का

समर्थांची वेण्णा, आक्का, नामदेवांची जनाबाई तशी निंबरगी संप्रदायातील थोर नामधारक स्त्री संत म्हणून या प्रसिद्ध आहेत. अगदी लहानपणी खेळात रंगून गेलेल्या या बालिकेला सद्गुरु उमदीकर यांनी हाक मारून नाममंत्र दिला. 'मूल मंत्रा करे दुकोट्टा' असे आक्का अभिमानाने सांगत. मनाने निःसंग झालेल्या या मुलीला गुरुंनीच विवाह करण्याची आज्ञा दिली पण एकेक सांसारिक आपत्ती येवून तिचे संसारपाश तटातट तुटत होते. दोन पोटच्या मुलींचा अकाली मृत्यू. लगेच पतीनिधन या आघातांनी तिचे मन पिचून गेले पण ती नाममय झाली. राममय झाली. देहबुद्धी उकरून लावी रोप समाधान अशी सद्गुरुंची करूणा भाकू लागली. 'चारो ओर मेरे घोर अंधेरा' अशा स्थितीत गुरुकृपेचा नंदादीप त्यांना पुढची पाऊलवाट दाखवीत होता. 'रहिम गली है सौंकरी । दूजो न समाय । आप है तो हरि नाही । हरि है तो आपुही नाही ।' सद्गुरु चरणी अनन्य शरण होवून शिवलिंगव्वाक्का अखंड अविरत नामस्मरण म्हणजे नेम करू लागल्या. आपण किती प्रचंड नाम घेतो हे सांगण्यासाठी त्यांनी सद्गुरुंना पत्र पाठवले – 'हे सद्गुरो आजवर खांद्यावर घागर घेवून केळींना पाणी घालत होते. आता मात्र मोटेने केळींना पाणी देते आहे.' सद्गुरु भाऊसाहेब उमदीकरांनी जाणले नाम साधनेला मीपणाचे वलय आहे. त्यांनी तोंडी निरोप पाठविला. केळीला पाणी कितीही घाल. पण भोवती काटेरी झुडपे फोफावतील ! सावधान ! शिवलिंगक्कांच्या डोळ्यातून अश्रू झरू लागले. अहंकार वितळला अनन्य शरणागतीचा उदय झाला आणि त्यांनी सद्गुरुंची प्रार्थना केली - परमार्थाची वाटचाल मला एकटीला अवघड आहे. गुरुराया आपण मला हात धरून चालवा.

*प्रयत्न करीता आपुल्या पक्षी ।*
*सद्गुरु असती सदैव पाठीशी*

आणि आणि अखेरीस हा प्रत्यय त्यांना आला. 'तुझा ध्यास लागून राहिलेले तुझे भूल मी' – असे म्हणणारी शिवलिंगव्वाक्का शेवटी – शरणही आक्का आत्माराम पावली पूर्णविराम -

अध्यात्मसाधनेचे अत्युच्च शिखर त्यांनी गाठले.

परमपूज्य संतश्रेष्ठ निंबरगी महाराजांनी निंबरगी गावी लावलेले निंबरगी संप्रदायाचे इवलेसे रोप भराभर वाढले. आणि त्याचा वेलु गेला गगनावरी. त्या वेलावर विकसित झालेल्या संतसत्पुरुषांच्या जीवनातून येणारा नामस्मरण भक्तीचा सुगंध दरवळत राहिला. त्या अलौकिक 'नेम' उपासनेने मिळालेला दिव्य आनंद पाहून सामान्य प्रापंचिकांनाही मनातून वाटू लागते मलाही या नामस्मरण आनंदाची माधुरी चाखू दे । मलाही गुरुकृपा लाभू दे । आणि यासाठी आपण सद्गुरुंचीच प्रार्थना करू या –

*भवतारक या तुझ्या पादुका वंदीन मी माथा ।*
*करावी कृपा गुरुनाथा*
*वियोग नसावा तव चरणांच्या हाची देई वर ।*
*मस्तकी ठेवी अभय कर ।*

**सौ. विजया प्रल्हाद प्रभुणे**
१/१९, ब, श्रीमान् सोसा. परिसर, गजानन महाराज मंदिराच्या पुढे,
त्रिमूर्ती बंगला, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२. फोन : ५४१०६२७

# नामाने देवदर्शन घडविणाऱ्या निंबर्गी संप्रदायाचे स्वरूप

**श्री. एस. व्ही. कुलकर्णी**

*श्रेष्ठ साधक डॉ. एन. एस. परिपत्येदार व हितचिंतक श्री. दादा कामधेनुवाडीकर यांच्या प्रेमामुळे प. पू. गुरुदेवांकडून १९५३ साली अनुग्रह. सेवानिवृत्ती १९८१. नंतर निंबाळ आश्रमात सेवा - विश्वस्त समितीचे सदस्य.*

निंबर्गी संप्रदाय तसा नाथ संप्रदायच आहे. मत्स्येंद्रनाथ, गोरखनाथ, निवृत्तीनाथ, व ज्ञानदेव यांच्या पाठोपाठ रेणवनाथ, काडसिद्ध व निंबर्गी महाराज अशी ही श्रेष्ठ साधुसंत परंपरा होऊन गेली. श्रीनिंबर्गी महाराजांनी श्री. मरुळसिद्ध यांचेकडून अनुग्रह घेतला; व त्या सबीज नामाचे अनुसंधान बरीच वर्षे करून आत्मज्ञानाचा जिर्णोद्धार केला. त्यांचे एक शिष्य रघुनाथप्रिय साधुमहाराज उमदीस बारा वर्षे साधना करीत होते. त्यांनी श्री. भाऊसाहेब महाराज यांचे अंतःकरण निर्गुण उपासनेकडे वळविले. श्रीनिंबर्गी महाराज यांच्याच आज्ञेवरून त्यांनी श्रीभाऊसाहेब महाराज यांचेवर कृपा करून त्यांना अनुग्रहीत केले. समर्थ भाऊरावांनी प्रपंच चालवून परमार्थ साधला. लोकनिंदेस जुमानले नाही. गुरुवर दृढ विश्वास ठेवून खडतर साधना केली. पूर्ण अद्वैत बोध झाल्यावर गावोगावी हिंडून भक्ती वाढविली. विद्वत्ता व आत्मज्ञान; परा व अपरा विद्या, शब्दज्ञान आणि निःशब्दज्ञान यामध्ये जमीन अस्मानाचे अंतर असते. तसेच नुसत्या वेदपठणांनी आत्मज्ञान होत नाही; हे स्वतःचे आचरणावरून दाखवून दिले.

## तत्त्वज्ञ संत श्री गुरुदेव

श्री. भाऊसाहेब महाराज यांच्या शिष्यसमुदायात आंग्ल भाषा प्रवीण व उच्च पदवीधर असे श्री. रामभाऊ रानडे म्हणजे श्रीगुरुदेव साक्षात्कारी आधुनिक तत्त्वज्ञ संत होते. त्यांनी पौर्वात्य व पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास करून विपुल ग्रंथसंपदा निर्माण केली. ते अलाहाबाद विश्वविद्यालयात तत्त्वज्ञान शाखेचे प्रमुख प्राध्यापक होते. शेवटी उपकुलगुरू म्हणून निवृत्त झाले. विद्यापीठाने त्यांना 'डॉक्टर ऑफ लिटरेचर' ही बहुमानाची पदवी बहाल केली. बरेच वर्षे निंबाळ येथे वास्तव्य करून आश्रमाची स्थापना केली. जमखिंडी या जन्मगावी त्यांचा अमृतमहोत्सव सोहळा १९५६ साली त्यांच्या शिष्यांनी मोठ्या भक्तीप्रेमाने व थाटाने साजरा केला. आपले हातून जे परमार्थ कार्य व्हावयाचे होते, ते संपलेसे वाटून ६ जून १९५७ रोजी निंबाळ आश्रमी ध्यानमग्न स्थितीत शांत चित्ताने इहलोकीची यात्रा संपविली.

## निंबाळ पुण्यक्षेत्र

श्रीगुरुदेवांचे मनात आपले परमश्रेष्ठ सद्गुरु श्री. भाऊसाहेब महाराज यांच्या सन्निध इंचगिरी गावी वास्तव्य करावे असे होते. १९२० साली त्यांना 'निंबर्गी महाराज निंबाळास गेले आहेत' असा दृष्टांत झाला. नेमामधून उठल्यावर अशाच अर्थाचे पत्र हाती आले. तुमच्याकरिता निंबाळ येथे जागा तयार आहे, असे समजल्यावरून निंबाळ येथे जागा विकत घेतली. 'जेथे दृष्टी पडली रघुत्तमरायाची' या उक्तीप्रमाणे आपल्या वास्तव्याने व साधनेने निंबाळ भूमी पावन केली. पुढे चैतन्याच्या आविष्काराने साकारलेल्या अशा त्यांच्या पुण्यमय समाधी स्थापनेमुळे आता हे एक पुण्यक्षेत्र झाले आहे.

## नामस्मरण प्रक्रिया

अनुग्रह घेणारा दिवस भाग्योदयाचा व तो क्षण देखील आयुष्यामधील एक मौलिक म्हणून गणला जातो. या क्षणापासून जीवनामध्ये एक नवीन प्रक्रिया सुरू होते. नामस्मरण या शब्दातच नाम कसे घ्यावे, हे सूचित आहे. नाम हे स्मरावयाचे आहे. आणि स्मरण ही मानसिक क्रिया आहे. तेव्हा नामाचा मनोजप करावयाचा 'बिन ही मुखसे जप करो' असे कबीरांचे सांगणे आहे. तोंडाने नामाचा उच्चार न करता मनातल्या मनात नामजप करणे ही प्रक्रिया श्रीज्ञानदेवांनाही अभिप्रेत आहे. 'नाम गुरुकृपेचे फळ आहे' अशी खूणगांठ बांधावी. नामाक्षरामधील एकही अक्षर गाळू नये, अथवा मागेपुढे एखादे अक्षर वाढवू नये. एक श्वासही वाया न घालविता नामस्मरण परावाणीने करावयाचे. जास्त वेळपर्यंत स्थिरपणे बसता येईल अशा स्थिरसुखासनावर बसून, नासिकाग्र दृष्टी ठेऊन श्वास घेते वेळी जितकी नामे घेऊ, तितकीच श्वास सोडते वेळी घेऊन, श्वासोच्छ्वास समान करावयाचा. याने एक प्रकारचा लय साधतो, व एकाग्रतेस मदत होते. ताठ बसून नामस्मरण जास्त वेळ न करता आल्यास टेकून करावे. नासिकाग्र दृष्टी ठेवता आली नाही तर, डोळे मिटून नामस्मरण करावे, पण नामस्मरण सोडू नये. असे नामस्मरण करीत असता थोड्याच वेळात आपले लक्षात येईल की, मन नामावर जास्त वेळ स्थिर होत नाही व एका पाठोपाठ कल्पना उचंबळतात आणि नामाचा विसर पडतो. अखंड सतत नाम घेणे अशक्य होऊन मनामध्ये एक प्रकारची पोकळी निर्माण होते. मधेच आपण नामस्मरण करीत आहोत ही आठवण होऊन पुन्हा नाम घेणे सुरू करतो. अशा तऱ्हेने नाम-कल्पना, नाम्-कल्पना असा पाठशिवणीचा खेळ मनामध्ये सुरू होतो. समजा एका तासामधे आपण शंभर नामे घेतली; व त्याजबरोबर शंभर कल्पना आल्या, असे मानल्यास त्याचा परिणाम असा होतो की, कल्पना भिन्न भिन्न असल्यामुळे त्याचे संस्कार तेवढे बलवत्तर असत नाहीत. उलट नाम एकच असल्यामुळे त्याचे संस्कार जाणीवेमधे प्रभावीपणे दृढ होतात. म्हणून नामाचा एक उच्चार देखील वाया जात नाही. याला पाहिजे तर 'रेकरींग डिपॉझीट' असे म्हणता येईल. प्रयत्नपूर्वक केलेल्या नामस्मरणाच्या चिंतनामुळे मनाला आत्म्याकडून शक्ती मिळत जाते.

***निर्विकल्पेसी कल्पावे । कल्पना मोडे स्वभावे ॥***

असे श्रीभाऊसाहेब महाराज आपले प्रवचनामध्ये वारंवार सांगत असत. नामस्मरण प्रक्रियेने पाप नष्ट होते व पुण्य संचय होतो. श्रीअंबुराव बाबा सांगत की, 'आंधळ्याने दोरी वळावी' असे नामस्मरण करावे. कारण तो किती दोरी वळून झाली व अजून किती दोरी वळावयाची आहे, याचा विचार करीत नाही.

***केलेचि करावे भोजन । तैसे श्रवण मनन केलेचि करावे ॥***

कंटाळा, आळस येऊ न देता फक्त नामस्मरण करावे. नामस्मरणात उत्साह वाटावा म्हणून मधून मधून पारमार्थिक ग्रंथाचे वाचन व काही

अनुभवपर पदांची मदत घ्यावी. नामसाधन प्रत्येक वेळी एक अथवा दोन तास तसेच सवडीप्रमाणे प्रति दिनी दोन किंवा तीन वेळा करावयाचे. त्याचबरोबर त्रिकाल भजन, पोथी यांचाही परिपाठ ठेवावयाचा.

## साधनेचे महत्त्व

मन ही एक मोठी शक्ती आहे. तिचे कार्य घडते पण याचा काय परिणाम होणार याचेशी संबंध असत नाही. जसे अग्नी उष्णता देतो, पण त्याचा घर जाळण्यासाठी उपयोग केला की, उजेड मिळण्यासाठी उपयोग झाला, याचा अग्नीशी काही संबंध उरत नाही. या अशा मनाच्या शक्तीचा उपयोग करून घेऊन साधन मार्ग आक्रमावयाचा आहे. नामरूपात्मक विश्व किंवा जगत हा एक आभास आहे. अज्ञान मायेमुळे ते आपणास खरे भासते. या उलट ब्रह्म सत्य आहे, पण त्याचा खरेपणा आपणास जाणवत नाही. जीव ब्रह्मांश आहे. पण देह तादात्म्यामुळे त्यास देह सुखाची ओढ असते. वासनेतून विषयप्राप्ती, त्याचेसाठी कर्म, कर्मामुळे कधी सुखप्राप्ती, तर कधी दुःख वाट्यास येते. या भोगातून पुन्हा वासना, पुन्हा कर्म असे अखंड चक्र चालू रहाते. या विज्ञान प्रगत जगात मानव असंतुष्टच आहे. मी व माझे असे क्षेत्र करून तो त्यामध्ये रममाण झाला आहे. याचमुळे तो द्वेष, मत्सर व अहंकार इत्यादी दुर्गुणामध्ये पार बुडाला आहे. यातून मुक्त होण्याचा मार्ग एकच तो म्हणजे नामस्मरण करणे होय. असे सर्व ऋषीमुनींनी, अनेक साक्षात्कारी संतांनी व कित्येक महात्म्यांनी एक मुखाने सांगितले आहे.

## साधनेचा मार्ग

विश्वामध्ये दोनच गोष्टी आहेत. एक मायारूपी जग आणि दुसरे सत्-चित्-आनंद रूपी ब्रह्म. मनुष्याची इंद्रिये बहिर्मुख आहेत. ती साधनेने अंतर्मुख करावयाची. बाहेरची वाट बंद करण्यास नामसाधन एकच सोपा, शास्त्रशुद्ध व प्रभावी मार्ग आहे. प्रपंच व परमार्थ या मार्गामध्ये प्रयत्नशील करणाऱ्या प्रेरणा एकच आहेत. ज्ञान, सुख व स्वातंत्र्य यांनी पूर्णत्व आणावयाचे प्रयत्न अखंड चालू ठेवावेत. नामस्मरण हा ब्रह्मपद मिळवून देणारा मार्ग आहे. नामबीज म्हणजे प्रत्यक्ष ईश्वरच आहे. यमनियमन, संतसमागम आणि नवविधा भक्ती या साधनास बळकटी आणणाऱ्या गोष्टी होत.

## जाणीव म्हणजे आत्मा

बुद्धी, भावना व क्रियाशक्ती या अलग न करता येणाऱ्या शक्ती आहेत. त्यामध्ये जाणीव महत्त्वाची असून, ती मानवाचे जीवन घडविते. या चेतन शक्तीविना मानवास कोणतीही गोष्ट करता येणार नाही. पशुपक्षी व इतर प्राणी यांचे ठिकाणी भावना व सुख-दुःख असते. पण जाणीव असत नाही. संवेदना किंवा जाणीव यामुळे बाह्य विश्वाचे व स्वतःचे ज्ञान होते. सर्व जीवनाचे मूळ जाणीव आहे. याचे वैशिष्ट्य असे की, आत्म्याला दोन होण्याची शक्ती मिळते व चारी अवस्थेमध्ये आत्मा आत्म्यालाच प्रत्यक्ष दर्शन घडवितो. भोवतालच्या जगाचा अनुभव घेणे म्हणजे जागृती अवस्था. स्वप्नसृष्टीचा अनुभवणारी स्वप्नावस्था. सुषुप्तीमध्ये स्पष्ट असे काही अनुभव घेता येत नाहीत. जेथे आत्मज्ञान होते ती तुर्या अवस्था होय. तुर्या हेच जीवाचे नित्य अविनाशी व सत्य स्वरूप होय. मनुष्याचे जीवन ज्ञानामधून व्यक्त होते व जाणीव ही ज्ञानप्राप्ती करून देणारी शक्ती आहे. संचित, प्रारब्ध व क्रियमाण यानुसार मानवी जीवन घडत असले तरी, जाणीवेच्या अवस्था बदलणे मनुष्याच्या हाती आहे. संचित म्हणजे जीवावर अनेक जन्माचे झालेले संस्कार. प्रारब्ध म्हणजे आपण भोगतो किंवा उपभोगतो ते. क्रियमाण म्हणजे बदल घडविणारे कार्य. हे त्रिगुणात्मक विषयांचे स्वरूप. जाणीव व संस्कार मिळून जीव. मी व माझे या अभावात्मक संबंधामुळे जीवच सुखदुःख भोगतो असे वाटते.

## कर्माची निवड

कर्म अटळ आहे. विहीत कर्मे करावीच लागतात. ती टाळता येत नाहीत. पण कोणते कर्म करावे व कोणते कर्म करू नये, हे आपले हाती आहे. हितकारक व अहितकारक कर्मे अंतःशक्तीचे प्रेरणेमुळे होतात. मी कर्ता, मी भोक्ता ही भावना टाकून फळाची अपेक्षा न धरता; ती कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करावीत. याचा परिणाम असा होतो की, बुद्धी शुद्ध होते. मनाची गती खुंटते. विकारावर ताबा येतो. विषयांचा वीट येतो. वैराग्य अंगी बाणते. भक्तीप्रेम वाढते व नामस्मरण दीर्घकाल होण्यास मदत होते. वारा सुगंध बरोबर नेतो, पण थोड्या वेळाने तो निराळा होतो. देहासी तादात्म्य पावलेला जीव, देह सोडते वेळी निराळा होऊन फक्त आपले बरोबर लिंग देहावरील असलेले बरे-वाईट संस्कार घेऊन जातो. असे असले तरी मूलतः जीव मुक्तच आहे. 'जगी विषयो चिंतीता जीव झाला । अहंकार अज्ञान जन्मासी आला ।' सुखासाठी विषय चिंतन घडल्यामुळे अहंकार जन्मास येतो. तो आपले केंद्रस्थानी राहतो. तेथे ईश्वर प्राप्तीसाठी नामस्मरण आणावयाचे. सुखाची कल्पना ईश्वर प्राप्ती केली की, जीवन बदलते. मानसशास्त्र सांगते की, अशा अनुसंधानाने संचित व प्रारब्ध कर्माचा नाश होतो आणि विवेक जागृत होतो. म्हणजेच नामचिंतनामुळे वासना क्षय होतो.

*'या नरदेहाचि गुणे । सच्चितानंद पदवी घेणे ॥'*

ही निवड आपण केली पाहिजे. कठोपनिषधामध्ये सांगितलेप्रमाणे श्रेयस व प्रेयस दोन्हीही आपले समोर असतात. मंदबुद्धीचा प्रेयसामधे समाधानी असतो; तर बुद्धीमान आणि धैर्यशील श्रेयसाची निवड करतो.

## सत्संगती

परमपूज्य गुरुदेव सांगत की, 'सत्संगती शिवाय परमार्थात प्रगती होत नाही.'

*'संतांचे गांवी प्रेमाचा सुकाळ । नाही तळमळ दुःख लेश ।'*

अशी संतसंगतीची महती असल्यामुळे आपला जास्तीत जास्त काळ सत्संगात घालवावा. संतमेळा असेल तेथे जाऊन लाभ घ्यावा. थोर साधक, सज्जनवृंद, ज्यांना तेज, नाद व रूपादी अनुभव आहेत त्यांचे बरोबर नामस्मरण करावे. म्हणजे त्यांच्या अनुभवाच्या लहरी (Reverberation) आपले अंतःकरणावर आदळून आपले साधनेमधे प्रगती होते. दीर्घकाल अनुसंधानामुळे सद्गुरुवर म्हणजे देवावर विश्वास स्थिरावतो. माझे हित करणारा परमदयाळू देव मला आवश्यकतेप्रमाणे सुखदुःख देऊन, संकटकाली तोच रक्षणकर्ता होऊन, ते भोगण्याचे सामर्थ्यही देईल. या विवेकामुळे आपला भाव एकविध होतो.

## साक्षात्कार

परमपूज्य श्रीभाऊसाहेब मृत्यूची सतत आठवण ठेवा असे म्हणत. कारण ते साधनेस उपकारक होते. श्रीबाबांचे सांगणे असे की, मी नामस्मरण करतो अशी आठवण ठेवू नका अगर मी नामस्मरण करीत नाही असेही आठवू नका. उगाच नामावर नाम घेत बसा. श्रीपूज्य गुरुदेव एकदा

म्हणाले, 'हटयोग अथवा राजयोग यांची सुरुवात मनापासून होते, पण नामस्मरण साधनेची सुरुवात मुळी देवापासून होते.'

सर्व मोहमाया, रागद्वेष, मी व माझे असे दीर्घकाळ अंतःकरणाला जडून असलेले संस्कार, नामचिंतन काढून टाकते व तेथे आत्मा आपले शुद्ध स्वरूपामध्ये व मोठ्या ऐश्वर्यामध्ये आपले समोर प्रत्यक्ष अनुभवणे याचे नाव साक्षात्कार होय. यामुळे साधकाचे अष्ट सात्विक भाव उचंबळून तो आनंद सागरामध्ये बुडून जातो नव्हे तो आनंद स्वरूप होऊन राहतो. पातंजल योगसूत्राप्रमाणे नामस्मरण दीर्घकाल म्हणजे मरेपर्यंत निरंतर म्हणजे प्रत्येक श्वासामध्ये व प्रेमादराने म्हणजे अनन्य भक्तीने असा अर्थ श्रीगुरुदेव सांगत. देह आहे तोपर्यंत साधक व ब्रह्म यांमध्ये थोडेसे अंतर राहते. कारण तेथे देह, मन आणि बुद्धी यांच्या मर्यादा असतात. देह पडल्यावर साधक पूर्णतः एकरूप होतो म्हणून जीवन्मुक्तीपेक्षा विदेहमुक्ती श्रेष्ठ.

*'असतो मा सद्गमय : मला असत्याकडून सत्याकडे ने.'*

*'तमसो माज्योर्तिगमय : मला अज्ञान अंधकारापासून ज्ञानाकडे ने.'*

*'मृत्योर्मा अमृतंगमय : मला मृत्युतून अमृततत्वाकडे ने म्हणजेच दुःखातून आनंदाकडे ने.'*

'राजाधिराज सद्गुरु नाथ महाराज की जय ।'

*(यंदा नामानुग्रह शताब्दी साजरी होत आहे. त्यानिमित्ताने हे संकलन कै. ग. वि. तुळपुळे लिखीत 'नामसाधनेचे मानसशास्त्र' या ग्रंथाचे आधारे केले आहे ते भाविकांना व जिज्ञासूंना उपयुक्त ठरेल.)*

**श्री. एस. व्ही. कुलकर्णी**
आनंद अपार्टमेंट, १६४ रेल्वेलाईन्स, सोलापूर ४१३००१.

# साक्षात्कारी संत आणि तत्त्वज्ञ

**प्रा. भी. य. संभाजी**

*एम.ए., निवृत्त मराठी प्राध्यापक. भाषा व साहित्य विषयक विपूल स्फुट लेखन. बेळगांव येथील अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे उपाध्यक्ष. वेणूनाद स्मरणिकेचे प्रमुख संपादक व बेळगांव येथील विविध साहित्यिक, शैक्षणिक संस्थान कार्य.*

## गुरुवर्य रा. द. रानडे

आधुनिक काळातील एक श्रेष्ठ तत्त्वचिंतक कै. गुरुदेव रामचंद्र दत्तात्रय रानडे यांचे सखोल जीवनविषयक तत्त्वज्ञान, पौर्वात्य आणि पाश्चात्य अशा उभय तत्त्वज्ञानाचा संयोग आणि समन्वय साधण्याची त्यांची पद्धती, विविध स्वरूपी आणि विविध भाषांतील संतवाणींचा त्यांचा सखोल अभ्यास यांचा परिपाक म्हणूनच अंतिम सत्याकडे म्हणजेच देवाकडे जाण्याचा मार्ग 'Pathway to God' असे त्यांनी सांगितले. त्यांचे तत्त्वज्ञान आणि समन्वयवादी, सखोल जीवन चिंतन त्यांच्या विवेचनातून, लेखनांतून प्रकट झाले आहे. त्यामुळेच त्यांच्या या विचारांचा प्रभाव जाणवल्याने अनेक मान्यवर श्रेष्ठ अभ्यासकांनी त्यांच्या तत्त्वज्ञानाचा गौरव केला आहे. भारताचे माजी राष्ट्रपती आणि श्रेष्ठ तत्त्वज्ञानी व शिक्षणतज्ज्ञ म्हणून गाजलेले डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांनी डॉ. रा. द. रानडे यांच्यासंबंधी उद्गार काढले होते, 'आम्ही केवळ तत्त्वज्ञानाचा अभ्यास करतो डॉ. रा. द. रानडे हे ते तत्त्वज्ञान प्रत्यक्ष जगतात.'

गुरुदेव रा. द. रानडे यांचा जन्म ३ जुलै १८८६ रोजी जमखंडी (कर्नाटक) येथे झाला.

## गुरुप्राप्ती आणि अनुग्रह

रामभाऊ रानडे यांची प्रकृती लहानपणापासूनच क्षीण, दुर्बल. पण खंबीर, कुशाग्र बुद्धिमत्ता त्यांना लाभलेली होती. किशोरावस्थेतच त्यांना भाऊसाहेब उमदीकर यांच्यासारखा साक्षात्कारी गुरू लाभला. रामभाऊंनी त्यांच्याकडून दीक्षा घेतली. मनाच्या एकाग्रतेने चिंतन, नामस्मरण, नामधनात ते रमू लागले. गुरुपदेश त्यांनी मनस्वी अंगी बाणवला आणि याच मनोनिग्रहाची बौद्धिक सामर्थ्याला जोड मिळाली आणि रामभाऊंनी निश्चय केला की, आपण उत्तम संस्कृतपटू व्हावे. जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप आपण मॅट्रिकच्या परीक्षेत मिळवावी. त्यांची इच्छाशक्ती, गुरुकृपा, गुरुपद निष्ठा ठेवून त्यांनी नियमितपणे केलेले अनुष्ठान यांमुळे रामभाऊंना जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलरशिप मिळाली. योग्य गुरू लाभणे, गुरुपदेश घेणे आणि त्यावर निष्ठा ठेऊन अनुष्ठान करणे याचा लाभ काय असतो, हे गुरुदेवांना स्वानुभवाने कळले आणि या प्रमाणे गुरुप्राप्ती आणि गुरुचा अनुग्रह यांना त्यांनी आपल्या विवेचन-विचारांत पुढे विशेष महत्त्व दिले.

मुळातच कुशाग्र बुद्धिमत्तेचे असलेल्या रामभाऊंना त्यांच्या इच्छेप्रमाणे साध्य गाठता आले. नाना शंकरशेठ स्कॉलरशिप त्यांना मिळाली. एक ध्येय पूर्ण झाले. त्यांनी पुढे तत्त्वज्ञानात एम.ए.ची पदवी मिळवायची असे ठरविले. गुरूच्या अनुग्रहाचे अनुष्ठान करून आपल्या बुद्धिसामर्थ्याच्या जोरावर ते स्वतःच एक तत्त्वज्ञ किंवा श्रेष्ठ गुरुपदावर पोचले होते. तरी या लौकिक जीवनात व्यवहाराच्या कसोटीवर उतरावेच लागते. त्यासाठी विद्यापीठाची परीक्षा देऊन ती नियमाप्रमाणे उत्तीर्ण व्हावी लागते आणि मग कायदेशीर आपण पदवीधर होतो. मग त्या त्या पदवीने संपन्न होतो. गुरुदेव रामभाऊ रानडे यांच्यासारख्या श्रेष्ठ ज्ञानवंतालाही हा मार्ग अनुसरून पदवी संपादन करावी असे वाटले, तर तेही स्वाभाविकच होते नाही का? त्यांचे ज्ञान, त्यांचे शिक्षण हेही 'लौकिक पदवी' प्राप्त करावी याच्या कितीतरी पुढचे होते. ते एम.ए.ला असताना त्यांच्या एका उत्तरपत्रिकेवर एका परीक्षकाने अभिप्राय लिहून ठेवला होता, 'The examinee knows, more than the examiner.' आता परीक्षकाच्या या प्रामाणिक अभिप्रायाने वरील विवेचन हे पूर्णतः सिद्ध झाल्यासारखेच होते, होय ना !

## रत्नपारखीच रत्नांची खरी परीक्षा करतो

डॉ. राधाकृष्णन हे एक ख्यातनाम तत्त्ववेत्ते, त्यांनी गुरुदेव रानडे यांच्याबद्दल कौतुकाचे उद्गार काढावे हे, त्यांचे व्यक्तिमत्त्व किती महान होते हे सिद्ध करणारे असेच आहे. अशीच लोकमान्य टिळकांनी त्यांची योग्य पारख केली होती आणि त्यांनी गुरुदेव रानडे यांना राजकारणात येण्याचे आवाहन केले. त्यांच्यासारखा महान बुद्धिमान माणूस राजकारणात आला, तर ते उपकारक ठरेल असे त्यांना वाटले. पण गुरुदेव रा. द. रानडे यांनी नाकारले. त्यांना राजकारणाचे आकर्षण वाटले नाही. ते राजकारणापासून अगदी अलिप्त राहिले.

गुरुदेव रानडे डेक्कन एज्युकेशन सोसायटीमध्ये प्राध्यापक झाले. काही काळ नोकरी केली आणि तिचाही त्यांनी त्याग केला. निःस्पृहस्य तृणम् जगत् अशा वृत्तीने ते राहिले. त्यांच्या प्रकृतीची तक्रार नेहमीचीच होती. पोटाचा विकार तर सततचा होता. खाणेपिणे अगदीच अपूर्ण होते. बरेच वेळा ते चहावरच गुजराण करीत. दुखण्यांनी त्यांची पाठ सोडली नाही. ती. मातोश्री आणि पत्नी या निवर्तल्या होत्या. गुरुदेवांची देखभाल, सेवासुश्रुषा करणारे घरचे, नात्याचे असे कोणी राहिले नव्हते. पण निष्ठेने आणि मनाच्या एकाग्रतेने गुरुदेवांनी आपले चिंतन, मनन, लेखन चालू ठेवले.

इ.स. १९५६ साली गुरुदेवांचा अमृत महोत्सव सर्वत्र साजरा करण्यात आला. बेळगाव येथे हिंदवाडी या उपनगरात टेकडीच्या माथ्यावर त्यांच्या चाहत्यांनी 'गुरुदेव रानडे मंदिरा'ची उभारणी केली. तेथे गुरुदेवांचे भव्य तैलचित्र तयार करवून घेतले. त्या तैलचित्राचे अनावरण कै. देशभक्त गंगाधरराव देशपांडे यांच्या हस्ते झाले होते. ते या प्रसंगी गुरुदेवांबद्दल बोलताना म्हणाले होते, 'मी आता ८५ वर्षांचा झालो. पन्नास वर्षे राजकारणाच्या धकाधकीत गेली. आता देश स्वतंत्र झाला. माझे राजकीय ध्येय सफल झाले आहे. पण मला आत्मिक-आध्यात्मिक असे समाधान लाभले नव्हते. ते मला रामभाऊंच्या एका भेटीत आणि त्यांच्या अल्पकाल सहवासात लाभले. तीन वर्षांपूर्वी रामभाऊंच्या अखेरच्या अंतिम जीवन टप्प्यात रामभाऊंचा माझा संबंध आला. हे मी माझे भाग्य समजतो. त्यांच्यामुळे मला सात्विक समाधान लाभले. आता मी मृत्यूला समाधानाने सामोरे जाईन !''

माजी राष्ट्रपती कै. डॉ. राजेंद्र प्रसाद (इ.स. १९५४) म्हणाले होते, 'डॉ. रानडे यांचा विविध भाषांतील संत वाङ्मयाचा (संतबानी) सखोल

अभ्यास. वर्षानुवर्षाचा त्यांचा हा व्यासंग म्हणजे परंपरागत तत्त्वज्ञानाचा त्यांच्या ठिकाणी मुरलेला आत्मिक ज्ञानाचा ठेवा आहे.'

प्रसिद्ध विचारवंत डॉ. व्ही. के. गोकाक यांनी गुरुदेव रानडे यांच्याबद्दल लिहिताना म्हटले आहे,

'The frail body of Dr. Ranade houses a great soul. He was a great builder, teacher and scholer and a serene philospher and mystic. For several years he hardly lived on any other nourishment but tea. But he needed no other food.

For he on honeydew hath fed

And drunk the milk of Paradise.'

या उद्गारांचा मराठीत मतितार्थ देणे इथे अप्रस्तुत ठरणार नाही. तो असा –

'डॉ. रानडे यांच्या कृश आणि निःस्तेज वाटणाऱ्या देहामध्ये एक महान आत्मा वास करीत होता. ते एक महान रचनाकार, महान गुरु आणि विद्वान गृहस्थ होते. तसेच ते महान तत्त्वज्ञानी, साक्षात्कारी पुरुष होते. (ते चहाशिवाय अन्य काही पोषक अन्न घेत नव्हते, तर) ते अध्यात्माच्या मधुबिंदूंचे सेवन करीत आणि अमृताचेच पेयपान ते करीत असत. (अशा महात्म्यास अन्य पोषण द्रव्याची जरूरी ती कोणती?)'

जॉर्ज बर्च नावाचे एक अमेरिकन प्राध्यापक गुरुदेवांच्या भेटीसाठी मुद्दाम निंबाळला गेले होते. तेथे काही दिवस ते गुरुदेवांच्या सहवासात राहिले व परत गेले. गुरुदेवांबद्दलचा आपला अभिप्राय त्यांनी आपल्या लेखांत नोंदविला आहे. तो असा –

'प्रा. डॉ. रानडे मला भेटले. माझ्या कल्पनेत त्यांचे चित्र जसे मनात कल्पिले होते, त्यापेक्षा ते खूप वेगळेच वाटले. ते प्रकृतीने इतके क्षीण व नाजूक वाटले की, वाऱ्याच्या एखाद्या झुळकीनेही उडून जातील असे वाटावे. पण त्यांची आध्यात्मिक व बौद्धिक उमेद खूप दांडगी होती. इतकेच काय पण त्यांचा शारीरिक उत्साहही तसाच मोठा होता. ते भराभर चालायचे जणू त्यांच्या आनंदी स्वभावाचे ते निदर्शक वाटले.'

'प्रा. रानडे यांच्या पोशाखात तर भपकेबाजपणा नावालाही नव्हता. दिखावूपणा नव्हता. अगदी साधा माणूस. भोवतालच्या साधकांवर, शिष्यगणांवर त्यांचा प्रभाव इतका मोठा होता, की त्यांना ते देवासमान वाटायचे. स्वभाव अत्यंत विनम्र, मवाळ पण निंबाळला येणाऱ्या बाहेरील माणसांना सहज कळायचे की येथे गुरू कोण व शिष्य कोण? त्यांच्या शब्दांतून, विवेचनातून व कृतींतूनच त्यांचे मोठेपण सहज मनावर ठसायचे.'

'मला रानडे यांच्या आध्यात्मिक व बौद्धिक साधनेचे कौतुक वाटले. त्यांचे प्रेमळ व्यक्तित्वच असे होते की, मी त्यांना कधीही विसरणार नाही. ते श्रेष्ठ संत आहेत. एक थोर ज्ञानी भारतीय आहेत. आज अनेक विद्वान संशोधक भेटतात, पण डॉ. रानडे ही सत्याचा शोध घेणारी, श्रेष्ठ अनुभवी व्यक्ती आहे, हे त्यांच्या प्रथम दर्शनातच मनावर बिंबायचे. हे तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचे एक थोर विद्वान गृहस्थ आहेत; अनेक महान गुणांचा समन्वय ज्यांच्या ठिकाणी झाला आहे, असे ते एक तेजस्वी पुरुष आहेत असे मनोमन पटते. एका अद्वितीय, दुर्मिळ महापुरुषाची भेट घेतल्याचे समाधान लाभायचे.'

श्रेष्ठ तत्त्वज्ञ, शिक्षण तज्ज्ञ आणि भारताचे माजी राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन हे बेळगाव येथे गुरुदेव रानडे मंदिराच्या पायाभरणीच्या प्रसंगी प्रत्यक्ष उपस्थित होते. त्यांनी गुरुदेवांचे वर्णन 'प्रत्यक्ष तत्त्वज्ञान जगणारा महापुरुष' असे केले होते, तो उल्लेख प्रारंभी आलाच आहे.

## संस्था व अन्य कार्य

गुरुदेव डॉ. रानडे यांनी पौर्वात्य, विशेषतः प्राचीन भारतीय म्हणजे पौर्वात्य तत्त्वज्ञानाचा विशेष अभ्यास सुरू केला आणि त्याचबरोबर पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचेही त्यांनी चांगले सखोल मनन-चिंतन केले. तुलनात्मक तत्त्वविचार आणि सत्यशोधनाचा प्रयत्न त्यांनी केला आणि तो चालू राहावा यासाठी त्यांनी 'Academy of Philosophy And Religion' (धर्म आणि तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासासाठी संस्था) स्थापन केली. या संस्थेचे प्रमुख म्हणजे डायरेक्टर तेच झाले. प्रा. पी. के. गोडे व एन्. जी. दामले हे त्यांचे चिटणीस झाले. आणि संस्थाचालकपदी अन्य अभ्यासू मंडळी घेतली. 'A constructive study of Upanishadic Philosophy' हा ग्रंथ गुरुदेवांनी सिद्ध केला. याबरोबरच आणखीही काही ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केले ते गाजले. पण आर्थिक वा अन्य अडचणींमुळे ही संस्था पुढे बंद झाली.

गुरुदेवांचे विचार मनःसाधना, एकाग्रता आणि चिंतन यावर भर देणारे होते. अशा धारणेनेच त्यांनी याच मार्गातून सत्याचा शोध घेता येतो, देव भेटतो म्हणून सांगितले. 'Pathway to God' त्यांनी दाखवून दिला. त्यांनी सांगितलेल्या विचारांचा, संतवचनांचा मागोवा घेणारे असे हे याच नावाचे त्रैमासिक बेळगावच्या गुरुदेव मंदिराच्यावतीने प्रकाशित केले जाते. याच ठिकाणी गुरुदेवांनी पूर्वी संस्थेच्या नावाला तौलनिक - Comparative' हा शब्द अधिक जोडून 'Academy of Comparative Study of Religion And Philosophy' ही संस्था इथे स्थापन केली. आज निंबाळ, जमखंडी, निंबर्गी आणि अनेक ठिकाणी गुरुदेवांच्या शिष्यांनी त्यांच्या विचारांचे चिंतन व प्रसार करण्यासाठी केंद्रे चालू ठेवली आहेत.

गुरुदेव रानडे केवळ आध्यात्मिक आणि धार्मिक विचारात इतरांना गुंतवून ठेवण्यात भर देत नसत. त्यांच्या विचारांत, विवेचनात, शिक्षणात शैक्षणिक मूल्य अधिक असायचे. म्हणून धार्मिकता, गूढ आध्यात्मिक बोधवाद (किंवा mysticism) यावर त्यांचा भर नव्हता. आंधळी अशी पंथवादी अतिश्रद्धा किंवा अंधश्रद्धा निर्माण करणारी परंपरा त्यांना निर्माण करायची नव्हती. कर्मकांडाचे प्रस्थ निर्माण करणारा संप्रदाय त्यांना चालवायचा नव्हता. केवळ नामघोष करीत राहण्यापेक्षा नामस्मरण म्हणजे स्मरणचिंतनच महत्त्वाचे हे त्यांनी सांगितले. पूजाअर्चा, नैवेद्य, अभिषेक, उपासतापास यांचे प्रस्थ त्यांनी वाढवले नाही. या कर्मकांडाची संधा कोणाला दिली नाही. श्रीसमर्थ रामदास आणि त्यांचा दासबोध हे त्यांचे आवडीचे होते. म्हणूनच श्रीसमर्थ रामदासांचे रोखठोक जीवनविषयक काव्य त्यांना अधिक भावायचे. तसेच तुकाराम, ज्ञानेश्वर, एकनाथ, कबीर यांच्या काव्य ग्रंथांवर त्यांनी भाष्ये लिहिली आणि गीता व वेद यांवरही विवेचनात्मक लेखन केले. ते तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते, त्यामुळे त्यांची वृत्तीच मूलतः तत्त्वचिंतक व शोधक होती.

## संदेश

गुरुदेव आत्मचिंतनात मग्न असायचे. त्यामुळे आत्मिक सामर्थ्य आणि ऋद्धी-सिद्धी त्यांना प्राप्त झाल्या होत्या. पण कोणत्याही प्रकारचे चमत्कार घडवून प्रसिद्धी मिळविण्याकडे त्यांचा कल नव्हता. तरीही त्यांच्याबद्दल काही गोष्टी चमत्कार म्हणून सांगितल्या जातातच. त्या अशा –

निंबाळला घराशेजारी त्यांनी दोन खड्डे खोदून घेतले होते. ते सुमारे दीड पुरुष खोल होते. नेहमी प्रमाणे ते स्वतः एका खड्ड्यात ध्यानास बसत. दुसरे कोणी आले तर शेजारच्या खड्ड्यात बसायचे. एकदा गुरुदेव

धोतराची घडी घालून ध्यानास बसले. त्यानंतर तसेच उठून निघून गेले. त्यांच्या सेवकाने घडी उचलली; तर तीखाली सर्प निघाला.

औंधचे राजे श्रीमंत बाळासाहेब औंधकर यांच्या वडिलांच्या पुण्यतिथीच्या उत्सवप्रसंगी ते तेथे होते. त्या वेळी कुणी परदेशी मिशनरी तेथे आले आणि त्या वेळी गुरुदेवांनी सांगितले, की हे अमुक पाहुणे येणार हे मला माहीत होते. पण अशा सिद्धी परमार्थाला घातक ठरतात असेही त्यांनी सांगितले.

एका साधकाच्या पत्नी क्षयाने आजारी होत्या. त्या अत्यवस्थ होत्या. त्या वेळी तेथे गुरुदेवांची मूर्ती झळकताना दिसली. ती अर्धा तास होती. श्री. बाबासाहेब लिमये व शंकरराव मोकाशी यांनाही त्यांचे दर्शन घडले. त्या वेळी गुरुदेव अलाहाबादला होते. ही गोष्ट नंतर त्यांना शिष्याने सांगितल्यावर ते नुसते प्रसन्नचित्त मंदस्मित करीत आकाशाकडे हात जोडून म्हणाले, संत चमत्कार करीत नाहीत ते देवकृपेने होतात. इथे तुमची परमेश्वरावरील निष्ठा महत्त्वाची आहे.

गुरुदेव रानडे यांनी आपल्या 'कृपादृष्टीने किंवा आशीर्वादाने अनेक साधकांची दुःखे दूर केल्याचे सांगितले जाते. अशा चमत्कारांचा उपयोग आपला लौकिक महिमा वाढवण्यासाठी करू नये याबद्दल ते दक्ष असायचे.

## गुरुदेवांचे मौलिक विचार

मनुष्याने कोणते तरी उच्च ध्येय बाळगावे व त्या प्राप्तीसाठी झटावे. 'स्वरूपी' राहणे - नामस्मरण करणे हाच स्वधर्म, खरा धर्म होय.

आपले शुद्ध आचरण हेच आपले श्रेष्ठ बळ. तीच महान शक्ती. सर्व साधना आचरणाच्या शुद्धीसाठीच असतात. 'स्वरूप' संप्रदाय हा आपला खरा संप्रदाय.

*सकळ धर्मामधे धर्म । स्वरूपी राहणे हा स्वधर्म ॥*

हा श्रीसमर्थ रामदासांचा श्लोक ते सांगत असत.

विश्वातील त्या पूर्णत्वाकडे अखंड वाटचाल करीत राहणे हेच आपले जीवनध्येय असावे. अशाच प्रकारे एकाग्र, नामस्मरण, चिंतन हे साधन ठेऊन नियमाप्रमाणे वक्तशीर भावभक्ती करीत ती अंतःकरणात उमटवू देऊन नामस्मरणाची प्रचिती घेणे हेच खरे कार्य. ईशसेवा आणि जनसेवा ही एकरूप आहेत हे ध्यानात घ्यावे.

*'अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदे भरीन तिन्ही लोक ॥'*

ही ज्ञानेश्वरांची प्रतिज्ञा. तीच सर्व संतांचीही होती आणि साधकांची तशीच असावी असे गुरुदेवांनी सांगितले.

## गुरुदेव महान संत आणि तत्त्वज्ञ

गुरुदेवांचे जीवन अडचणीचे आणि लौकिक दृष्ट्या जरी दुःखाचे गेले तरीही स्वास्थ्याचा अभाव आणि झोप अगदी कमी. असे असतानाही चिंतन, वाचन, लेखन आणि संभाषण त्यांनी चालू ठेवले. 'उपनिषदकालीन प्राचीन महापुरुष' म्हणूनच त्यांचे वर्णन करता येईल. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, रामदास यांच्या परंपरेतले ते आधुनिक काळातले संत होते. असा हा क्षीण देहाचा पण थोर बुद्धिमान तितक्याच सामर्थ्यशाली विशाल मनाचा संयमी महापुरुष या जगातून निघून गेला. ६ जून १९५७ ला या जगाचा त्यांनी निरोप घेतला.

**प्रा. भी. य. संभाजी**
'चंदनवेल', प्लॉट नं. ४५, स्कीम १२/३, विद्यानगर पूर्व,
अनगोळ माळ, बेळगांव ५९०००६

# भारतातील एक उत्तम साधकाश्रम-श्रीगुरुदेव रानडे आश्रम, निंबाळ

**श्री. प्रभाकर विष्णू पाटणकर**

*बी.ए.,बी.कॉम. दुसऱ्या महायुद्धात १९४२ इमर्जन्सी कमिशन, हिंदी तोफखान्यात कमिशण्ड ऑफिसर, पोस्टिंग बलुचिस्तान मध्ये ४ वर्ष मिलिटरी नोकरी. २५ वर्षे विक्रीकर खात्यात सेवा. उपआयुक्त म्हणून निवृत्त. पदभ्रमण, गिर्यारोहण, पर्यटन प्रेमी, २० हजार फूट उंचीवरून एव्हरेस्ट शिखर पाहणारे पहिले महाराष्ट्रीयन. हिमालयाची झुंज व एव्हरेस्ट दर्शन पुस्तके प्रसिद्ध. थोरा-मोठ्या व्यक्तींच्या स्वाक्षऱ्यांचा संग्रह.*

निंबाळ हे गाव कर्नाटकातील विजापूर जिल्ह्यात आहे. निंबाळ हे रेल्वेस्टेशन सोलापूर हुबळी रेल्वे लाईनवर आहे. रेल्वेने सोलापूरहून दोन तासांचा प्रवास आहे. स्टेशनजवळ वस्ती फारच थोडी आहे. स्टेशनच्या पूर्वेस रूळ ओलांडून थोडे चालल्यावर जवळच आश्रमाची हद्द सुरू होते. रेल्वे मार्गावरील काही गाड्या निंबाळला थांबतात. प्रवाशांची चढ-उतार फारशी नसते. गाडीतून उतरताना समाधी मंदिराचे दर्शन होते. वातावरण अगदी रम्य व शांत आहे. स्टेशन, प्लॅटफॉर्म व जवळचा देखावा पन्नास-साठ वर्षांपूर्वी होता तसाच अद्यापी आहे. सोलापूर व विजापूर रस्त्यावर सोलापूरहून ६० किलोमीटर अंतरावर होर्ती हे गाव आहे. तेथून पूर्वेला ८ किलोमीटर अंतरावर निंबाळ स्टेशन आहे. पश्चिमेला काही अंतरावर निंबरगी संप्रदायाची महत्त्वाची तीर्थक्षेत्रे निंबरगी व इंचगेरी ही आहेत. निंबरगी गावामध्ये श्रीनिंबरगी महाराजांचे समाधी मंदिर आहे. त्यांचे प्रमुख शिष्य श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांचे समाधी मंदिर निंबरगीच्या अलीकडे इंचगेरी गावात आहे. इंचगेरीतच श्रीभाऊसाहेब महाराजांचे वास्तव्य सन १९०३ ते सन १९१४ पर्यंत होते. श्रीअंबुराव महाराज व श्रीगुरुदेव रानडे हे दोघेही श्रीभाऊसाहेब महाराजांचे शिष्य होते. श्रीगुरुदेवांचा जन्म १८८६मध्ये जमखिंडी येथे झाला. आणि तेथेच सन १९०१ साली वैकुंठ चतुर्दशीचे दिवशी त्यांना भाऊसाहेब महाराजांकडून नाम मिळाले. भाऊसाहेब महाराजांची शिष्यमंडळी श्रावण महिन्यात नेमासाठी (म्हणजे सामुदायिक नामस्मरणासाठी) इंचगेरी येथे गुरुगृही जाऊन रहात असत. श्रीगुरुदेव सन १९१९ ते १९२० मध्ये आजारी असताना ज्येष्ठ गुरुबंधू श्रीअंबुराव महाराज यांचे संगतीत इंचगेरीला काही दिवस राहिले होते. तेथे सन १९२१ मध्ये ते नेमाला बसले असताना गुरुपदाला आवश्यक असलेले अनुभव आले. या परिसरातच कोठेतरी आपण राहावे असे त्यांना वाटत होते. व्यवसायासाठी त्यांना पुणे, सांगली व नंतर अलाहाबाद येथे रहावे लागले. तेथून इंचगेरीजवळ येण्या-जाण्याच्या सोयीचे असे रहाण्याचे ठिकाण रेल्वे स्टेशनजवळ असावे, असे त्यांच्या मनात आले. निंबरगी महाराज निंबाळला गेले आहेत असा स्वप्नादेश झाल्यामुळे १९२२ मध्ये निंबाळ स्टेशन जवळील १०० एकर माळरानाची जमीन त्यांनी खरेदी केली व तेथे सन १९२५ मध्ये राहण्यासाठी घर बांधून घेतले. त्याच वर्षी नामधारक साधक बंधू भगीनींच्या संगतीत तेथे त्यांनी नाम सप्ताह केला. सन १९२७ मध्ये त्यांनी अलाहाबाद विश्व विद्यालयात तत्त्वज्ञान विभागाचे प्रमुख म्हणून पद स्विकारले म्हणून ते अलाहाबाद येथे रहाण्यासाठी गेले. परंतु वर्षातून ३ ते ४ महिने ते निंबाळला येऊन रहात असत. निंबाळला आपल्या घरात त्यांनी ग्रंथलेखन केले. स्वतःची नामसाधना केली व अनेक मुमुक्षुंना नाम साधनेच्या मार्गावर आणून सत्संग व नामसाधना करण्याची सोय केली. नामानुग्रह करण्याचा अधिकार प्राप्त झाला होता. तरी श्रीअंबुराव महाराज असेपर्यंत त्यांनी नाम देण्यास सुरुवात केली नाही. सन १९३३ मध्ये श्रीअंबुराव महाराजांचे निर्याण झाल्यावर श्रीगुरुदेव साधकांना नाम (अनुग्रह) देऊ लागले. ते काम सुद्धा त्यांनी दोघे गुरुबंधू श्री. काकासाहेब कारखानीस व श्री. काकासाहेब तुळपुळे यांचेमार्फत चालू केले. श्रीगुरुदेवांच्या निर्याणानंतर त्यांच्या पवित्र समाधीस गुरुस्थानी मानून नामानुग्रह घेण्याची प्रचलित पद्धत आहे. नाम साधन मार्गाचा मुख्य भर नामस्मरणावर असतो. तसाच तो या संप्रदायात आहे. नामस्मरणाला सहाय्य म्हणून पोथीवाचन (मुख्यत्वे श्रीसमर्थांचे दासबोध) व त्रिकाळ भजन केले जाते.

श्रीगुरुदेवांनी स्वतःच्या घराच्या मागेच ध्यानमंदिर बांधून घेतले होते. श्रीगुरुदेव हयात असताना तेथेच सामुदायिक नामस्मरणाचा व सामुदायिक भजनाचा नित्य कार्यक्रम होत असे. सन १९४२ मध्ये जुन्या घराच्या दक्षिणेस थोड्या अंतरावर श्रीगुरुदेवांनी नवीन घर बांधून घेतले. तेव्हापासून निंबाळला असताना ते या घरात राहू लागले. तेथे त्यांनी त्यांच्या एका खोलीत बसून नेम करणे, ग्रंथ लेखन करणे व अधून मधून बाहेर येऊन साधकांसमवेत बसून परमार्थावर चर्चा करणे चालू ठेवले. दिवसातील त्यांचा मुख्य कार्यक्रम म्हणजे नेम म्हणजेच नामसाधना या बाबतीत त्यांनी कधी हयगय केली नाही. ते आपल्या खोलीत एकटे बसून किंवा मोटारीतून होर्तीच्या रस्त्यावर जाऊन एकटे किंवा एखादा नामधारक बरोबर घेऊन नेम करीत. नेमासाठी बसायची किंवा नेमातून उठायची स्फूर्ती केव्हा होईल याला काही काळ वेळ नसे. घरी असताना त्यांना साधकावस्थेत सुखसंवाद करण्याची इच्छा झाली की घंटा वाजवली जात असे. निंबाळात त्या वेळी रहावयास आलेले गुरुबंधू व शिष्य मंडळी तेव्हा त्यांच्या समवेत एकत्र बसत. त्या कार्यक्रमाला सिटींग (Sitting) हे नाव असे. त्या वेळी श्रीभाऊसाहेब महाराजांच्या पत्रांचे किंवा संग्रहाला आलेल्या पारमार्थिक ग्रंथांचे वाचन ते कोणाकडून करून घेत असत व त्यात मधून मधून जरूर त्या प्रमाणे श्रीगुरुदेव काही सांगत असत. सिटींगमध्ये त्यांच्या सद्गुरुंच्या आठवणींचीही उजळणी होत असे. अशा दोन सिटींगला श्रीगुरुदेवांचे जवळ बसून श्रवण करण्याचे भाग्य मला रविवार दि. ८ जाने. ५६ या रोजी लाभले. भाषावार राज्यरचना होण्यापूर्वी कर्नाटकातील धारवाड, बेळगांव, विजापूर व कारवार हे जिल्हे मुंबई इलाख्यात होते. त्या वेळी मी पुणे येथे सरकारी नोकरीत असताना मला त्या चारही जिल्ह्यात फिरतीवर जावे लागे. असेच सन १९५६ मध्ये विजापूर येथे गेलो असताना तेथून निंबाळ संप्रदायातील दोन जेष्ठ

साधक श्री. गोपाळराव अंकलीकर व श्री. पांडुरंगराव बापट यांचे बरोबर निंबाळला जाण्याचा योग आला. तेव्हा श्रीगुरुदेव तेथे होते. तेव्हा त्यांचा श्रीरामभाऊ रानडे किंवा रानडेसाहेब या नावाने उल्लेख करीत असत. मी श्री. व्ही. व्ही. पाटणकर यांचा मुलगा हे कळून त्यांना फार आनंद झाला. सिटींगच्या वेळी त्यांनी मला जवळ बसवून घेतले. माझे वडील व गुरुदेव हे डेक्कन कॉलेजमध्ये सहाध्यायी होते. काही वेळ सिटींग झाल्यावर ते मोटारीतून बाहेर नेमाला गेले. आम्ही जमलेल्या साधकांनी ध्यान मंदिरात जाऊन सायंकाळचे भजन केले. श्रीगुरुदेव नेमाहून परत आल्यावर पुन्हा एकदा सिटींग झाले. बोलता बोलता श्रीगुरुदेवांनी सांगितले की ते आणि माझे वडील डेक्कन कॉलेजमध्ये वसतीगृहात एकाच वेळी रहात होते. एवढेच नव्हे तर त्यांनी स्वतःच्या आणि माझ्या वडिलांच्या खोलीचे नंबर सांगितले त्यावरून त्यांची स्मरणशक्ती किती प्रखर होती हे पहावयास मिळाले. त्यांचे विषयी त्या दिवशीच्या माझ्या डायरीत पुढील प्रमाणे लिहिले आहे. 'निंबाळला प्रो. रा. द. रानडे यांचे दर्शन घेतले. रानडे साहेब हे भक्ती मार्गी विद्वान संत आहेत. त्यांनी भक्ती मार्गावर इंग्रजी व मराठी बरीच पुस्तके लिहिली आहेत. त्यांच्या विद्वत्तेमुळे, तत्त्वज्ञानाच्या व्यासंगामुळे व ईश्वर भक्तीमुळे महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर त्यांना फार लोक मानतात.'

जुलै १९४६ मध्ये वयाची साठ वर्षे पूर्ण झाल्यानंतर श्रीगुरुदेवांनी अलाहाबाद विश्वविद्यालयाच्या 'व्हाईस चान्सलर' या पदावरून निवृत्ती घेतली. सन १९४३ मध्ये त्यांनी अलाहाबादला स्वतःसाठी बंगला बांधून घेतला होता. तेथे माझे वडील त्यांचेकडे दोन-तीन दिवस राहून आले होते. निवृत्त झाल्यावर श्रीगुरुदेव दरवर्षी अलाहाबादला जाऊन राहून येत असत. परंतु त्यांचे मुख्य वास्तव्य त्यांच्या आवडत्या पुण्यभूमीत निंबाळ येथे होत असे. त्यांची प्रकृती वयापरत्वे नाजूक झाली असतानाही सन १९५७ च्या मार्चमधे त्यांनी अलाहाबादला शेवटची भेट दिली. तेथून ते एप्रिल महिन्यात निंबाळ येथे परत आले. निंबाळला ते ६ जून १९५७ ला इंचेगिरीच्या रस्त्यावर मोटारीतून जाऊन नेम करून आले होते. त्याच दिवशी रात्री १०-३० वा. ते ज्योतीस्वरूप झाले.

श्रीगुरुदेवांच्या निर्याणानंतर त्यांच्या पत्नी श्रीमती काकूसाहेब यांनी श्रीगुरुदेव रानडे आश्रम स्थापन केला. त्यासाठी सन १९५८ मध्ये जुन्या घराच्या वास्तूचे रूपांतर मोठ्या समाधी मंदिरात करण्यात आले. ह्या मंदिरास लागून समोरच मोठा मंडप बांधण्यात आला. ही कामे निंबाळ संप्रदायातील भक्तांच्या उदार देणग्यांमुळे झाली. श्रीकाकूसाहेब रानडे समाधी मंदिर आश्रमाच्या तेवीस वर्षे एकमेव ट्रस्टी होत्या. त्यांनी निंबाळसारख्या निर्जन ठिकाणी वास्तव्य केले. त्यामुळे नामधारकांना, साधकांना नामसाधनेसाठी गुरुगृही येण्याची मोठी सोय झाली. २३ वर्षे गुरुभक्तांच्या सहाय्याने आश्रम चालवून सन १९७९ मधे नवा ट्रस्ट करवून देऊन आपल्या रहात्या घराखेरीज सर्व इमारती व आश्रमाची व्यवस्था त्यांनी नव्या ट्रस्टच्या विश्वस्त मंडळाच्या स्वाधीन केली. तेव्हापासून तो आश्रम ट्रस्टी मंडळी उत्तम चालवीत आहेत. तेथे साधकांना रहाण्यासाठी सर्व सोयींनी युक्त अशा इमारती बांधण्यात आल्या आहेत. पुरेशा पाण्याची सोय, वृक्ष लागवड, भव्य मंदिर, रस्ते इ. व्यवस्था झाल्या आहेत. या श्रीगुरुदेव रानडे समाधी ट्रस्टचे श्री. रामदुर्गकर सेक्रेटरी व श्रीमती विजयाताई आपटे या फाऊंडर ट्रस्टी ट्रस्टच्या सुरुवातीपासून अद्यापपर्यंत कार्यरत आहेत.

निंबाळ येथील आश्रमात येऊन राहणाऱ्या साधक भक्तांनी बहुतेक सर्व वेळ परमार्थ साधनात राहून आपली अध्यात्मिक प्रगती करून घ्यावी ह्या ध्येयाने तेथील नित्य कार्यक्रम व रहाण्याच्या, खाण्या-पिण्याच्या सोयी यांची योजना केलेली आहे. श्रीगुरुदेवांच्या शिष्य वर्गातील स्त्री-पुरुष सुशिक्षित आहेत. नवे भक्त समाधीवर नाम घेतात. येथे येणारे स्त्रीपुरुष साधक व भक्त बहुतेक निंबर्गी संप्रदायातील नामधारक असतात. इतर साधक बंधूंनाही पूर्व परवानगीने येथे रहाता येते. परंतु रहाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने आश्रमातील सर्व नित्यक्रमात भाग घेतलाच पाहिजे हा नियम पाळला जातो. संप्रदायातील व संप्रदाया बाहेरचे यांच्यात काही फरक केला जात नाही. माझी पत्नी व मी श्रीगोंदवलेकर महाराजांचे अनुग्रहीत आहोत. परंतु निंबरगी संप्रदायातील अनेक नामधारकाच्या बरोबर पुणे येथे व अन्य ठिकाणी आम्ही नामसाधना करीत आलो आहोत. गेल्या २५ वर्षात आम्ही अनेक वेळा निंबाळ येथे जाऊन थोडे दिवस राहून सर्व कार्यक्रमात भाग घेऊन सत्संग, श्रवण, नामसाधन (नेम) केले आहे.

निंबाळ आश्रम हा शहरापासून दूर ठिकाणी असल्यामुळे तेथे निव्वळ समाधी दर्शनास येऊन जाणाऱ्यांची वर्दळ नसते. वातावरण अगदी शांत नामसाधनेस अनुकूल असे असते. निंबरगी संप्रदायाच्या शिकवणीप्रमाणे ठरलेल्या वेळात सर्वांनी एकत्र बसून एकमेकांशी न बोलता डोळे मिटून मनामध्ये नामस्मरण करावयाचे असते. एकट्याने अगर एकत्र नामस्मरण करणे याला संप्रदायात 'नेम करणे' असे म्हणतात. नेमानंतर ठरलेला भजनाचा कार्यक्रम असतो. आश्रमात करमणुकीचे कार्यक्रम नसतात.

नित्य कार्यक्रम पुढील प्रमाणे असतात –

१) पहाटे साडेतीन ते साडेपाच – नेमध्यान

साडेपाच ते सहा – काकड आरती.

२) सकाळी आठ ते बारा – नेम

बारा ते साडेबारा – सकाळचे भजन

३) दुपारी अडीच ते चार – नेम

साडेचार ते पाच – दुपारचे भजन

४) सायंकाळी सात ते आठ – नेम

५) रात्री पाऊणे नऊ – रात्रीचे भजन

मध्यंतरीच्या काळात स्नान, चहापान, नाश्ता, भोजन व विश्रांती.

वर्षातून पुढील प्रमाणे सप्ताह असतात. संप्रदायात कोणत्याही उत्सवाला सप्ताह असे म्हणतात. सप्ताहात दुपारच्या भजनानंतर कुणाचे तरी ज्येष्ठ साधकाचे प्रवचन होते.

१) श्रीगुरुलिंगम जंगम महाराज, निंबरगी पुण्यतिथी सप्ताह – चैत्र शु. ११ ते १३ (३ दिवस)

२) श्रीभाऊसाहेब महाराज पुण्यतिथी सप्ताह – माघ शु. १ ते ३ (३ दिवस)

३) श्रीअंबुराव महाराज पुण्यतिथी सप्ताह – पौष शु. ४ ते ६ (३ दिवस)

४) श्रीगुरुदेव रानडे पुण्यतिथी सप्ताह – ज्येष्ठ शु. ६ ते १० (५ दिवस)

५) श्रावण महिनाभर सप्ताह

श्रावण महिनाभर सप्ताह असतो तेव्हा साधक भक्त आपापल्या सवडीनुसार तेथे येऊन नित्यक्रमात भाग घेऊन नामसाधनेचा अभ्यास व सत्संग दोन्ही करून परत जातात. नामसाधना कुणालाही आपल्या गावी, आपल्या घरी करता येणे शक्य असते. पण ते तितके पुरेसे व तितके एकाग्रतेने होत नाही. त्याची विविध कारणे सर्वांच्या अनुभवात आहेतच. सुस्थळी एकत्र साधना करण्याने जे पदरात पडते त्याला महत्त्व आहे. अशा एकत्र साधनेचे एक उदाहरण देण्यासारखे आहे. वसतिगृहात किंवा घरी राहून कॉलेजमध्ये शिक्षण घेणाऱ्या बहुतेकांना अनुभव येतो की एकट्याने पुरेसा अभ्यास होत नाही. टिवल्याबावल्या कराव्याशा वाटतात. अभ्यासातून उठायला एखाद्या सबबीची अथवा घटनेची वाट पाहिली जाते. पण कॉलेजच्या अभ्यासिकेत इतर विद्यार्थ्यांच्या बरोबर बसून अभ्यास केल्यास अभ्यास चांगला होतो. दुसरा कोणी एखादे वेळेस मनापासून वाचन करीत नसेल. परंतु समोर वही पुस्तक घेऊन अभ्यास करीत असलेल्या सहविद्यार्थ्यांकडे पाहून आपले लक्ष अभ्यासाकडे जास्त लागते. एकत्र आध्यात्मिक साधनेत तसेच होते. सभोवार स्वस्थ बसून डोळे मिटून मनात नाम घेत असलेल्या किंवा ध्यान करीत असलेल्या साधकाकडे पाहिल्यावर आपले चळलेले मन पुन्हा नामाकडे लागते. सभोवार बसलेल्यांपैकी कुणा एखाद्याचे एकाग्रतेने नामस्मरण होत असो वा नसो आपल्याला त्या दृश्याचे व वातावरणाचे एकाग्रतेने व उत्साहाने नामस्मरण करण्यास सहाय्य होते. मध्येच कंटाळा आला तरी निर्धार करून नेमाची वेळ संपेपर्यंत कसे का होईना नामसाधन होते. निंबाळ आश्रमात कष्टाच्या नामस्मरणाला प्राधान्य आहे. हा अभ्यास करणाऱ्या साधकाचे तेथे स्वागत होते. म्हणूनच अशा या आश्रमाबद्दल आदर वाटतो. प्रसिद्ध साहित्यिक श्री. विद्याधर गोखले यांनी निंबाळ आश्रमाचे जे वर्णन केले आहे ते येथे उद्धृत करावे असे वाटते. ते असे –

'निंबाळ येथील मोकळ्या माळावर उभा असलेला आश्रम येथे येणाऱ्या साधकांकडून साधन करवून घेतो. गुरुदेवांच्या प्रदीर्घ वास्तव्याने आणि नंतर समाधीने एक आगळेच पावित्र्य लाभलेला हा आश्रम ! गुरुदेवाप्रमाणेच साधेपणाची व सात्विकतेची श्रीमंती धारण करणारे ते समाधी मंदिर, गुरुदेव जेथे ध्यानाला बसत ती खोली गुरुदेवांच्या मार्गदर्शनाखाली खोदलेली ती निर्मळ पाण्याची विहीर, गुरुदेवांप्रमाणेच श्रांतजनांना छाया देणारी ती हिरवीगार आंबराई, सारेच कसे शांत आणि प्रसन्न ! 'स्मरणीय प्रसन्नंच सज्जनां मनोयथा' असे हे अध्यात्म तीर्थ येथे प्रतिदिन गुरुदेवांनी विस्तारशः मांडलेला विवेक - नीतीयुक्त, नामस्मरण प्रधान आणि आत्मसाक्षात्कार संपन्न भक्तियोग ज्येष्ठ साधकांच्या मार्गदर्शनाखाली शिस्तीत चालतो आणि श्रावण मासात नि अन्य सप्ताहात तर तेथे साधकांची मांदियाळी जमते. शुद्ध भक्तीभावाला उत्साहाचा पूर येतो'

असा हा निंबाळ आश्रम !

**श्री. प्रभाकर विष्णू पाटणकर**
स्नेह भवन, ४३/१०, एरंडवणा, पुणे ४११००४.

# श्रीगुरुदेव रानडे परमार्थ मंदिर - जमखंडी (इतिहास व वर्तमान)

**श्री. मनोहर नारायण खांडेकर**

*बी.ई. (मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल) शेल ऑईल (ओमान) मधून ज्येष्ठ अधिकारी पदावरून निवृत्त. श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून १९५५ साली नामानुग्रह. अध्यक्ष श्रीगुरुदेव रानडे परमार्थ मंदिर, जमखंडी.*

आधुनिक काळातील थोर साक्षात्कारी सत्पुरुषांपैकी श्रीगुरुदेव रानडे अग्रगण्य होत. प. पू. गुरुदेव रामचंद्र दत्तात्रय रानडे यांचा जन्म दि. ३।७।१८८६ रोजी जमखंडी येथे झाला. निंबरगी संप्रदायातील ज्येष्ठ संत श्रीनिंबरगी महाराज, त्यांचे प्रमुख शिष्य श्रीरघुनाथ प्रिय व श्रीभाऊसाहेब महाराज हे वर्षातून तीन-चार वेळा जमखंडीस येत. तेथे श्रीभाऊसाहेब महाराज नित्य भल्या पहाटे ३ वाजता उठून शेजारच्या डोंगरात एकटेच साधनास जात. 'जेथे दृष्टी पडली रघुत्तम रायाची' या न्यायाने जमखंडी व परिसरातील सर्व प्रदेश त्यांनी पावन केला. जमखंडीला श्रीभाऊसाहेब महाराज परमार्थाचे माहेरघर असे संबोधित. अशा या पावनभूमीत प. पू. श्रीश्रीगुरुदेवांचा जन्म झाला ही एक वैशिष्ट्यपूर्ण घटना होय.

श्रीगुरुदेवांच्या मातोश्री पार्वती बाईंना पहिल्या मुलीनंतर बारा वर्षे अपत्य झाले नाही. त्यामुळे त्या दुःखी होत्या. जमखंडीनजीक नंदिकेश्वर मंदिराजवळ वास्तव्य केलेल्या थोर तपस्वी श्रीमहालिंगय्या ऊर्फ शंभूलिंग स्वामी यांचेकडून त्यांनी अनुग्रह घेतला होता. त्यांनी अनन्यभावाने कष्टाचे साधन केले. एक हजार नामजप झाला की देवघराच्या भिंतीवर गंधाचे बोट त्या ओढीत. अशा गंधाच्या बोटांनी देवघराच्या चारही भिंती भरलेल्या होत्या. सहाजिकच परमेश्वर प्रसन्न झाला व त्यांना पुत्ररत्न प्राप्त झाले. हा बालक खरोखरच 'वरदपुत्र' होता, हे पुढील गोष्टींवरून सिद्ध होते. प्रसूतीसमयी त्यांच्या मातेला खूप वेदना होऊ लागल्या. त्यांची लवकर सुटका होईना. शस्त्रक्रिया करून मूल बाहेर काढणे हा एकच उपाय त्या वेळी डॉक्टरांनी सांगितला ज्यामध्ये मूल जगणे अशक्य होते. ह्याला मातोश्रींची अर्थातच मान्यता नव्हती. त्यांच्या घरातील कृष्णप्पा नावाच्या वृद्ध सेवकाने रातोरात रामतीर्थ येथील राजवाड्यात जाऊन तेथील सेवकांकडून महाराजांना ही बातमी कळविली. जमखंडीचे तेव्हाचे महाराज रामचंद्रराव पटवर्धन हे मोठे सत्शील व व्रतस्थ ईश्वरभक्त होते. त्यांनी दिलेल्या तीर्थाच्या प्राशनाने अडलेल्या माता प्रसूतीवेदनेतून त्वरित मुक्त होत. कृष्णप्पाकडची बातमी कळताच श्रीमंतांनी लगेच उठून स्नान करून श्रीरामेश्वराचे तीर्थ त्याच्याबरोबर पाठवले. हे तीर्थ प्राशन केल्यावर मातोश्री सुखरूप प्रसूत होऊन ३ जुलै १८८६ साली सकाळी १० वाजण्याच्या सुमारास श्रीगुरुदेवांचा जन्म झाला. श्रीरामेश्वराच्या कृपाप्रसादाने जन्मलेल्या या बालकाचे श्रीमंत राजेसाहेबांच्या सूचनेनुसार 'रामचंद्र' असे नाव ठेवण्यात आले.

जमखिंडीशी संबंधित अशी आणखी एक विलक्षण घटना श्रीगुरुदेव चार वर्षांचे असताना घडली. श्रीगुरुदेवांची माता आपल्या सेवकांसमवेत बाळ रामाला घेऊन आपले सद्गुरु श्रीमहालिंगय्या स्वामीजींच्या दर्शनाला आल्या होत्या. स्वामीजी नंदिकेश्वर मंदिराच्या देवालयासमोरील कट्ट्यावर बसले होते. श्रीगुरुदेवांनी स्वामी महाराजांना वाकून नमस्कार करताच, स्वामीजी एकदा त्या बालकाकडे पहायचे व दुसऱ्याच क्षणी आकाशाकडे पहायचे. स्वामीजींनी बाजूला हात जोडून उभ्या असलेल्या पार्वतीबाईंना उद्देशून पुढील उद्‌गार काढले 'हा आहे उगवता संत ! भक्तजनांच्या उद्धाराकरिता हा जन्माला आला आहे ! याला माझे वंदन असो.' ही भविष्यवाणी ऐकताच मातेच्या डोळ्यांतून धन्यतेचे अश्रू वाहू लागले. सद्गुरुंना अंतःकरणपूर्वक वंदन करून पार्वतीमाता घरी आल्या. बालक रामाला न्हाऊ घालून पाटावर बसवले. कपाळाला कुंकू लावले. गळ्यात माळा घातली आणि भक्तीभावाने त्याला वंदन करून आनंदाश्रू ढाळीत त्यांच्या चिमुकल्या पादपद्मांचे प्रक्षालन केले. श्रीगुरुदेवांना आईच्या या विचित्र वर्तनाने आश्चर्य वाटले व त्यांनी आईला विचारले, 'आई हे तू काय करीत आहेस?' तेव्हा माता पार्वतीबाई म्हणाल्या, 'बाळ, तू मोठा सत्पुरुष आहेस. माझ्या पूर्वजन्मीच्या पुण्याईमुळे माझ्या पोटी जन्माला आला आहेस म्हणून मी तुला वंदन केले.' हे ऐकून बालक श्रीगुरुदेवांना आणखीनच आश्चर्य वाटले असेल !

श्रीगुरुदेव उपजतच अत्यंत बुद्धिमान होते, तसेच ईश्वरनिष्ठही होते. श्रीगुरुदेवांच्या पूर्वसुकृताने वयाच्या १५ व्या वर्षीच १९०१ साली विजापूर जिल्ह्यातील उमदी येथे राहणारे प. पू. भाऊसाहेब महाराज यांच्याकडून त्यांना वैकुंठ चतुर्दशीच्या शुभ दिवशी नामानुग्रह मिळाला व श्रीगुरुदेवांच्या बौद्धिक सामर्थ्याला दैवी सामर्थ्याची जोड मिळाली. १९०२ साली ते मॅट्रिकच्या परीक्षेस बसणार होते. दिवसातील बहुतेक वेळ ते अभ्यासात घालवीत व सद्गुरुंच्या आज्ञेप्रमाणे नियमितपणे नामस्मरण करीत. रात्री १० ते ११ ही त्यांची ध्यानाची वेळ असे. आपले सद्गुरु खरोखरच समर्थ असतील तर आपणास या परीक्षेत नक्कीच उत्तम यश मिळेल असे त्यांनी मनोमन ठरवले होते. ठरलेल्या वेळेस मुंबईस जाऊन गुरुदेवांनी उत्तम प्रकारे परीक्षा दिली. काही दिवसांनंतर परीक्षेचा निकाल जाहीर झाला. प. पू. महाराजांच्या आशीर्वादाने गुरुदेवांना संपूर्ण मुंबई प्रांतातील विद्यार्थ्यांमध्ये दुसरा क्रमांक मिळाला. शिवाय संस्कृत विषयातील 'जगन्नाथ शंकर शेट' शिष्यवृत्तीसुद्धा त्यांना मिळाली. आपल्या प. पू. सद्गुरुंच्या सामर्थ्याचीही त्यांना पुरेपूर खात्री झाली. परशुरामभाऊ हायस्कूलच्या सर्व गुरुजनांना हे त्यांचे अभूतपूर्व यश पाहून खूप आनंद झाला. श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धनांनी या निमित्ताने जमखंडीत हत्तीवरून साखर वाटली.

पुढील शिक्षणासाठी ते पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये गेले. बी.ए.पर्यंतच्या सर्व परीक्षांमध्ये ते उत्कृष्ट रीतीने उत्तीर्ण होऊन त्यांनी निरनिराळी पारितोषिके व शिष्यवृत्त्या मिळविल्या. तसेच आपल्या बुद्धिमत्तेमुळे व सौजन्यामुळे आपल्या प्राध्यापकांचे व सहाध्यायींचे प्रेम संपादन केले. १९०८ साली डेक्कन कॉलेजमध्ये 'दक्षिणा फेलो' म्हणून त्यांची नेमणूक झाली. १९१४ साली तत्त्वज्ञान हा विषय घेऊन एम.ए.च्या परीक्षेस बसले व त्यात पहिल्या श्रेणीत उच्चांकाने उत्तीर्ण झाले व कुलपती सुवर्ण पदक व न्यायमूर्ती तेलंग यांचे सुवर्ण पदक अशी दोन सुवर्णपदके मिळविली. परीक्षकांनी आपल्या अहवालात त्यांच्यासंबंधी लिहिताना The examinee knows more than the examiners' असा अभिप्राय नमूद केला होता. आपल्या पारमार्थिक अनुभवांना तात्त्विक व बौद्धिक

आधार मिळावा म्हणून त्यांनी पौर्वात्य व पाश्चिमात्त्य तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास चालू केला.

दरम्यान १९०७ साली जमखंडी येथे एक महत्त्वपूर्ण घटना घडली. ती पुढीलप्रमाणे – जमखंडी येथे श्री. दादासाहेब आपटे यांचे घरी एकदा एक नामसप्ताह सुरू होता. त्या वेळी प. पू. भाऊसाहेब महाराज हे आपल्या काही प्रमुख शिष्य मंडळींसह उपस्थित होते. श्रीगुरुदेवही ह्या सप्ताहास हजर होते. एके दिवशी संध्याकाळी भजनाच्या वेळी दासबोध वाचण्याकरता प. पू. महाराजांनी श्रीगुरुदेवांना सांगितले. हे ऐकून तरुण गुरुदेव दचकले व त्यांच्या अंगाला कंप सुटला. ते मान खाली घालून बसले. प. पू. महाराजांनी 'का, उगाच काय बसलात?' असे विचारता, 'महाराज, मला सुरुवातीचे, नंतरचे काय म्हणतात ते माहीत नाही.' 'ते सगळे आम्ही बघून घेतो. तू पोथी तेवढी वाच.' अशी आज्ञा केली. श्रीगुरुदेव मग पाटावर बसले व श्रीसमर्थांच्या सांगण्याप्रमाणे पोथी वाचली. सर्वांना त्यांचे पोथीवाचन आवडले. सर्व मंडळी निघून गेल्यावर श्रीसमर्थांचे काही थोर शिष्य त्यांच्याबरोबर खोलीत गेले. त्यामध्ये प. पू. निंबरगी महाराजांचे नातू श्रीनागप्पा हेसुद्धा होते. त्यांनी श्रीभाऊसाहेब महाराजांना विचारले, 'पोथी वाचायला पुष्कळ अनुभवी साधक असताना, आज आपण या नव्या तरुणाला का आग्रह केलात?' तेव्हा किंचित गंभीर होऊन श्रीसमर्थ म्हणाले, 'हा तरुण तुमच्या आजोबांची कीर्ती सातासमुद्रापलीकडे नेणार आहे. त्यांच्यामधील अहंकार घालवण्याकरिता मी त्यांना पोथी वाचण्यास सांगितले. तुम्हा सर्वांना आश्चर्य वाटत असेल म्हणून मी हे सांगत आहे.' एवढे सांगून महाराज गप्प बसले. ही त्यांची भविष्यवाणी ऐकून सर्वांना धन्य वाटले. त्यानंतर सर्व साधकांच्या मनामध्ये प. पू. गुरुदेवांबद्दल आदरभाव उत्पन्न झाला.

प. पू. गुरुदेवांच्या वयाला ३ जुलै १९५६ रोजी ७० वर्षे पूर्ण होत असल्यामुळे जमखंडीकर मंडळींनी त्यानिमित्ताने त्यांचा सत्कार करण्याचे योजिले. जमखंडीकर मंडळींनी पुढाकार घ्यावा हे औचित्यास धरून होते. कारण श्रीगुरुदेवांचे जमखंडी हे जन्मस्थान तसेच परमार्थाचेही उगमस्थान होते. अशा प्रकारच्या समारंभास श्रीगुरुदेव तयार होतील की नाही अशी शंका सर्व साधकांच्या मनात होती; परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे या समारंभास हजर राहण्यास त्यांनी होकार दिला. होकाराचे कारण जमखंडी स्थानाबद्दल त्यांच्या मनात असलेले प्रेम व जमखंडी हे निंबरगी संप्रदायाचे माहेरघर, असे प. पू. भाऊसाहेब महाराज मोठ्या अभिमानाने म्हणत असत. तेव्हा या निमित्ताने तेथे जाऊन तेथील पूर्व परिचित स्थळांचे दर्शन घ्यावे अशी त्यांची इच्छा होती. श्रीगुरुदेवांनी संमती दिल्यावर जमखंडीची मंडळी मोठ्या उत्साहाने समारंभाच्या तयारीला लागली. श्रीमंत डॉ. राणीसाहेब लीलावती देवी पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखाली एक सत्कार समिती नेमण्यात येऊन सेवानिवृत्त न्यायाधीश श्री. भाऊराव आपटे यांना कार्याध्यक्ष निवडण्यात आले. २ जुलै रोजी श्रीगुरुदेवांच्या तैलचित्राचे अनावरण श्री. गंगाधरराव देशपांडे यांचे हस्ते करण्यात आले व हे चित्र परशुरामभाऊ हायस्कूलमध्ये लावण्यात आले. ३ जुलै रोजी अमृतमहोत्सवाचा कार्यक्रम मिरजेचे अधिपती श्री. तात्यासाहेब पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखाली परशुराम थिएटरमध्ये झाला. हा सोहळा पाहताना सर्वांच्या डोळ्यात आनंदाश्रू दाटले. या समारंभानंतर सुमारे तीन आठवडे श्रीगुरुदेवांचा मुक्काम जमखंडीत होता. या अवधीत त्यांनी स्वतः जमखंडीतील अनेक स्थळांना भेटी दिल्या व आपल्या पूर्व स्मृतींना उजाळा दिला. त्यांचे सद्गुरु श्रीभाऊसाहेब उमदीकर हे ज्या ज्या ठिकाणी ध्यानास अथवा पोथीस जात, ती सर्व ठिकाणे त्यांनी परत एकदा भावयुक्त अंतःकरणाने पाहिली. त्यांनी स्वतः जेथे अनुग्रह घेतला ती श्रीबसप्पा कटगी यांच्या घराण्यातील जागा पाहताना त्यांचे अंतःकरण सद्गुरुंच्या उपकाराने भरून आले. श्रीनिंबरगी यांचे घरी जाऊन त्यांचा रुद्रवीणा पाहताना, 'रुद्रवीणा इतका गोड, तर ब्रह्मवीणा किती गोड असेल' या प. पू. निंबरगी महाराजांच्या वचनाची आठवण होऊन त्यांचे मन पुनःप्रत्ययाने आनंदले. १९२० पासून त्यांचे बरोबर छायेप्रमाणे राहिलेल्या श्री. जगन्नाथराव लेले यांच्या घरी जाऊन त्यांनी ते पावन केले. भर सभामंडपात श्री. काकासाहेब कारखानीस यांच्याकडून आपले जुने पारमार्थिक अनुभव त्यांनी सर्वांना ऐकवले. रामतीर्थास खरे तीर्थत्व देऊन सर्व जमखंडी परिसरातील वातावरण भक्तीने भारावून टाकले व शेवटी या पावन भूमीचा त्यांनी निरोप घेतला. निंबाळला परतल्यावर श्रीराणीसाहेब जमखंडी यांना लिहिलेल्या आभारपत्रातील उतारा संक्षिप्तरूपाने दिला आहे. त्यावरून जमखंडीबद्दल प. पू. गुरुदेवांचे मनोगत समजून येईल. 'तीस वर्षांनंतर मी जमखंडीस आलो हे खरेच. जमखंडीविषयी मला काय वाटते हे निराळे सांगणे नकोच. महाराज जेथे अखंड ३०-३२ वर्षे येत होते, आपल्या चरणस्पर्शाने त्यांनी जी भूमी पुनीत केली व जिला परमार्थाचे माहेरघर बनवले, जेथे मी जन्मलो, वाढलो, शिकलो व अनुग्रहीत झालो, तेथे तीन आठवडे राहण्याची मंगल संधी तुम्ही मला आणून दिली, त्याबद्दल कोणी कोणाचे आभार मानावे? तुम्ही व आम्ही दोघांनी मिळून ईश्वराचेच आभार मानले पाहिजेत. माझे येथे काय किंवा तेथे काय जेथे म्हणून साधनाचा लाभ मिळेल व परमार्थास नित्य नवा रंग चढेल तेथे यापेक्षा जास्त आठवडे रहाण्यात मला आनंद वाटला असता. महाराजांच्या वेळेपासून जमखंडीच्या जनतेमध्ये परमार्थाविषयी व महाराजांविषयी जे प्रेम वसत आहे, त्यामुळेच रामतीर्थ गजबजून गेले होते.' – निंबाळ ता. १३-८-१९५६.

हाती घेतलेले देवकार्य संपलेसे वाटून दि. ६ जून १९५७ रोजी शांत चित्ताने, ध्यान मग्न स्थितीत प. पू. गुरुदेवांची आत्मज्योत परंज्योतीत विलीन झाली. प. पू. गुरुदेवांच्या स्मरणार्थ कै. भाऊराव आपटे - रिटायर्ड सिव्हील जज्ज, जमखंडी व जमखंडीतील अन्य ज्येष्ठ साधकांच्या पुढाकाराने 'परमार्थ मंदिर' या श्रीगुरुदेवांच्या आवडत्या नावाने या संस्थेची स्थापना झाली. संस्थेचे नाव 'श्रीगुरुदेव रानडे परमार्थ मंदिर जमखंडी' असे ठेवण्यात आले. १९६० साली ही संस्था स्थापन झाली. सुदैवाने श्रीगुरुदेवांच्या पूर्वकालीन राहत्या घरातच संस्थेच्या सांप्रदायिक कार्यक्रमास प्रारंभ झाला. हे घर संस्थेस प्रथम भाड्याने मिळाले व २६-५-१९७५ रोजी परमार्थ मंदिराच्या ट्रस्टच्या नावे खरेदी झाले. जमखंडीच्या सार्वजनिक व सांस्कृतिक जीवनाला इष्ट व आवश्यक असे पारमार्थिक व नैतिक वळण देणे हे या संस्थेच्या अनेक उद्दिष्टांपैकी एक उद्दिष्ट ठरविण्यात आले. १९६० पासून १९७५ पर्यंतच्या काळात ज्येष्ठ साधक पूज्य काकासाहेब तुळपुळे, पद्मश्री काकासाहेब कारखानीस, पूज्य प्रो. तात्यासाहेब दामले, पूज्य रामण्णा कुलकर्णी इ. मंडळींनी परमार्थ मंदिरास वारंवार भेटी देऊन सुश्राव्य व उद्बोधक प्रवचने दिली. तसेच नामसप्ताहांचे आयोजन केले. श्री. भाऊराव आपटे ह्यांनी संस्थेचे अध्यक्ष या नात्याने पंधरा वर्षेपर्यंत समर्थपणे परमार्थ मंदिराचे कार्य चालवले व मंदिराची

वास्तू खरेदी केल्यानंतर दुर्दैवाने तीनच महिन्यांत दि. २६-८-१९७५ रोजी त्यांचे निधन झाले. त्यांच्या नंतर श्री. श्रीशैलप्पा अथणी यांनी संस्थेचे अध्यक्षपद सांभाळले. ते अध्यक्ष असतानाच १९८४ साली प. पू. श्रीगुरुदेवांच्या घरातील काही भागांचे रूपांतर नेम, भजन, प्रवचन इ.साठी सुयोग्य अशा भव्य व प्रशस्त सभागृहात करण्यात आले. १९९१ साली अध्यक्षपदाची सूत्रे त्यांनी श्री. मोतीलाल लाहोटी यांच्याकडे सोपविली.

*परमार्थ मंदिरास कायदेशीर मान्यता मिळवण्याच्या दृष्टीने हा ट्रस्ट* असिस्टंट चॅरिटी कमिशनर, बेळगाव यांचेकडे नोंदला असून नोंदणी क्रमांक ए १७१६ (विजापूर) असा असल्याचे प्रमाणपत्र २३-८-१९७६ रोजी मिळाले. प. पू. गुरुदेवांच्या पारमार्थिक शिकवणुकीचे सार कै. प्रो. तात्यासाहेब दामले यांनी एका सूत्रात पुढीलप्रमाणे सांगितले आहे. 'विवेक (ज्ञान) मूलक, नीतीप्रधान, आत्मसाक्षात्कारपर्यवसायी, नामस्मरणात्मक भक्तियोग' या सूत्राप्रमाणे प. पू. गुरुदेवांच्या पारमार्थिक शिकवणुकीचा सर्वत्र प्रसार व्हावा अशी ट्रस्टींची धारणा आहे. तसेच 'एक जग, एक देव व एक मानवता' हे श्रीगुरुदेवांच्या उपदेशाचे सार व त्यांची शिकवण यांचा विश्वशांतीच्या प्रयत्नांना निश्चित हातभार लागल्याशिवाय राहणार नाही अशी विश्वस्तांची पूर्ण श्रद्धा आहे.

निंबाळ ही श्रीगुरुदेवांची प्रमुख कर्मभूमी असली तरी जमखंडी ही त्यांची जन्मभूमी, मॅट्रिकपर्यंत विद्याभूमी व नामानुग्रह भूमी अशा विविध प्रकारे महत्त्वाची आहे. श्रीगुरुदेव ज्या घरात राहात होते त्या घराला आता तीर्थाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. या घरातच ज्या खोलीत त्यांनी साधन केले, पद्मश्री काका कारखानीस यांच्यासमवेत रामकृष्ण, विवेकानंद यांचे वाङ्मय वाचले ती खोली विश्वस्तांनी तशीच ठेवली आहे. ज्या तुळशीवृंदावनाच्या कोनाड्यात श्रीगुरुदेवांनी मारुतीची स्थापना केली ते त्यांच्या मातोश्रींचे तुळशीवृंदावन उत्तम स्थितीत ठेवले आहे. तसेच श्रीगुरुदेवांच्या मातोश्रींचे देवघरही सुस्थितीत ठेवले आहे. या घराशी श्रीगुरुदेवांच्या अनेक स्मृती निगडीत झाल्या असल्याने त्याला एक वेगळेच महत्त्व व पावित्र्य प्राप्त झाले आहे. अशा या पवित्र व ऐतिहासिक घराचे रक्षण करणे हे प्रत्येक परमार्थप्रेमी साधकाचे आद्य कर्तव्य आहे.

कित्येक श्रेष्ठ व ज्येष्ठ साधकांनी सढळ हस्ते उदार देणग्या दिल्यामुळे परमार्थ मंदिराच्या वास्तूत मोठे सभागृह बांधले गेले. त्रिकाळ भजन, नामसाधन, आरती, पोथीवाचन वगैरे नित्य कार्यक्रम सुरू होतेच व दरवर्षी २९ जून ते ३ जुलै अखेर पाच दिवसांचा 'जयंती सप्ताह' उत्सव सुरू झाला व तो आजतागायत भक्तीने व उत्साहाने चालू आहे.

श्रीगुरुदेवांनी इ. स. १९०१ साली वैकुंठ चतुर्दशीच्या दिवशी जमखंडी येथे श्री. भाऊसाहेब महाराज उमदीकर यांचेकडून नामानुग्रह घेतला. या पवित्र घटनेला इ. स. २००१ च्या वैकुंठ चतुर्दशी दिवशी शंभर वर्षे पूर्ण होतात. म्हणून यंदा ह्या नामानुग्रह शताब्दी वर्षाची सुरुवात जमखंडी येथे झाली.

आधीचे दोन वैकुंठ चतुर्दशी सप्ताह २०.११.१९९९ ते २२.११.१९९९ व ८.११.२००० ते १०.११.२००० ह्या तारखांना जमखंडी येथे साजरे केले गेले. या वर्षीचा वैकुंठचतुर्दशी सप्ताह २७, २८, २९ नोव्हेंबर २००१ ह्या तारखांना होणार असून तो नामानुग्रह शताब्दी महोत्सवाचा सांगता समारंभ म्हणून साजरा केला जाणार आहे.

श्री. मोतीलाल लाहोटी यांच्या निधनानंतर १९९८ च्या ऑक्टोबर पासून श्री. म. ना. खांडेकर यांनी अध्यक्षपदाची जबाबदारी स्वीकारली आहे. १०.११.२००० या वैकुंठचतुर्दशीच्या शुभमुहूर्तावर परमार्थ मंदिर जमखंडी या संस्थेतर्फे एक इंटरनेट वेब साईट सुरू केली आहे. त्याचा पत्ता www gurudeoranade jamkhandi.homestead.com असा आहे. या वेबसाइटवर श्रीगुरुदेवांचे संक्षिप्त चरित्र, परमार्थ मंदिर जमखंडी बद्दल माहिती, श्रीगुरुदेवांनी लिहिलेल्या ग्रंथांची यादी, या वर्षीचे संस्थेचे कार्यक्रम व शेवटी फोटो लायब्ररी या संबंधात माहिती मिळेल. श्रीगुरुदेवांसंबंधी उपयुक्त माहिती या वेबसाइटमध्ये वारंवार समाविष्ट करण्याचा आमचा प्रयत्न राहील.

**श्री. मनोहर नारायण खांडेकर**
११,१२ आविष्कार, सहनिवास, ३, महंत रोड, विलेपार्ले (पूर्व),
मुंबई - ४०००५७.

# ॥ अनंत रूपे अनंत वेषे देखिले म्या त्यासी ॥

**एक नामधारक**

**पूज्य श्रीगुरुदेवांचे वास्तव्य जमखंडी, पुणे, अलाहाबाद व निंबाळ येथे होते. त्या वेळी त्यांचे दर्शन घेण्यास, त्यांना भेटण्यास, त्यांच्याबरोबर पारमार्थिक व बौद्धिक चर्चा करण्यास त्यांच्याकडून नामोपदेश घेण्यास त्यांचा पवित्र पारमार्थिक सहवास लाभावा म्हणून तसेच आपली पारमार्थिक उन्नती करून घेण्यासाठी अनेक राजकारणी, विद्वान, गुरुबंधु, साधक, विद्यार्थी, शिक्षणतज्ज्ञ, जीवनातील वेगवेगळ्या क्षेत्रात उत्तुंग शिखर गाठलेले धुरंधर, मित्र, कॉलेजचे सहकारी अशा अनेक व्यक्ती त्यांना भेटण्यास येत. त्या त्या व्यक्तीच्या योग्यतेनुसार, भावानुसार त्यांना गुरुदेवांचे जे वैशिष्ट्य जाणवले, जे बौद्धिक, ऐहिक व पारमार्थिक मोठेपण दिसले जी व जितकी योग्यता समजली, ती व तशी वेगवेगळ्या प्रसंगी आपल्या शब्दात त्यांनी व्यक्त करून, गुरुदेवांच्या बद्दलची आपली कृतज्ञता व त्यांचे उपकार स्मरले आहेत. ते त्यांच्याच शब्दात खाली देत आहोत –**

**तुलसीदास आपल्या चौपाई मध्यें म्हणतात –**

***'जिन्हकी रही भावना जैसी,***
***प्रभु मूरत देखी तिन तैसी'***

## श्री य. ग. लेले - शालेय मित्र, जमखंडी

बालपणापासून गुरुदेवांचा स्वभाव गरीब, सरळ व निष्कपटी होता. त्यांना एकांताची आवड फार. आपण बरे की आपला अभ्यास बरा असे ते वागत असत. ते निरोगी व अत्यंत चपळ होते. ते अत्यंत हुशार विद्यार्थी म्हणून ओळखले जात. १९०१ साली मॅट्रिकच्या परीक्षेत ते संपूर्ण मुंबई इलाख्यात दुसरे आले व त्यांनी पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती मिळविली. त्यामुळे शिक्षकांचीच नव्हे तर सर्व जमखंडीवासियांची हृदये आनंदानी भरून गेली. गुरुदेवांनी अगदी विनयाने सर्व शिक्षकांना भेटून त्यांना प्रणिपात केला व प्रसन्न मनाने त्यांचा आशिर्वाद घेतला.

## प्रा. दे. द. वाडेकर - फिलासॉफीचे प्रा., फर्ग्युसन कॉलेज, पुणे

प्रो. रानडे यांची फर्ग्युसन कॉलेजमधील खरी कामगिरी म्हणजे त्यांनी तत्त्वज्ञानाच्या अध्यापनात दाखविलेली व्यासंगाची गाढता आणि प्रज्ञेचे स्वातंत्र्य ही होय. त्यांची वर्गातील व्याख्याने अंतःस्फूर्तीने भरलेली व एखाद्या आत्मप्रत्ययी प्रेषिताप्रमाणे विद्यार्थ्यांना तात्त्विक चिंतनाकडे प्रवृत्त करणारी असत.

## श्री. एस. व्ही. पुणतांबेकर, राज्यशास्त्राचे प्रा., बनारस हिंदु युनिव्हर्सिटी

श्रीगुरुदेवांना लिहिलेल्या पत्रात ते लिहितात, 'तुमच्याइतका सरळ व प्रेमळ स्वभावाचा मला अद्याप तरी कोणी भेटलेला नाही. तुमच्यात जे शेकडो गुण मला दिसले ते दुसऱ्या कोणातही दिसले नाहीत. तुम्ही मला लिहिलेले पत्र मी एखाद्या अमोल रत्नाप्रमाणे जपून ठेवले आहे. तुम्ही आम्हाला जो अमोल उपदेश केलात तो मोल देऊनही कोठे मिळणार नाही. हिंदुस्थानात राहून तुम्ही एवढी कामगिरी केलीत. परदेशात गेला असतात तर जग हालवून सोडले असते.'

## डॉ. म. स. मोडक, रजिस्ट्रार, नागपूर विद्यापीठ (गुरुदेवांचे गीतेवरील पुस्तक प्रकाशनात फार मोठा वाटा.)

प्लेटो शिकवताना फळ्यावर सपासप जुनी ग्रीक भाषा लिहून तदन्तर्गत कल्पनांचे विवरण ते इतके सुरेख करीत की, ग्रीक तत्त्वज्ञानाचे विशेष स्वरूपाचे आकलन करण्यास विद्यार्थी सहज समर्थ होत. सांगोपांग सम्यक ज्ञानामुळे रामभाऊंच्या शिकविण्यात एक प्रकारचा आत्मविश्वास असे. सिझविक् यांचे प्रमाणभूत पाठ्यपुस्तक शिकविताना त्यांनी पुस्तकातला एक सबंध परिच्छेद विद्यार्थ्यांना तात्काळ खोडून टाकण्यास लावला. 'Strike out this paragraphs, sidgwick is wrong here' हे त्यांचे तडफेने उच्चारलेले उद्गार विद्यार्थी विसरणे शक्य नाही. विचार प्रवाह वेगवान असल्यामुळे वर्गात ते जलद बोलत. त्यामुळे संपूर्ण अवधानाची अत्यंत आवश्यकता असे. रामभाऊ केवळ तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक नसून, तत्त्वचिंतन अवगाहणारे व सत्यत्वाचा अनुभूतिप्रत मार्ग काढणारे एक थोर तत्त्वज्ञ होते.

## प्रि. बेन, डेक्कन कॉलेज, पुणे

गुरुदेवांना ते लिहितात, 'तुमच्या अध्ययनातील निष्ठा पाहून मला फार आनंद वाटतो. अशा बाबतीत तुम्ही मला वारंवार त्रास देत जाल, अशी आशा आहे.'

प्रो. रानडे यांच्या ग्रीक तत्त्वज्ञानावरील लेखाबद्दल ते लिहितात, 'या लेखातील तुमचे विचार जाणू शकतील असे दहा-पाच लोकसुद्धा हिंदुस्थानात नाहीत.'

## डॉ. ॲनी बेझंट

प्रो. वुडहाऊस यांनी गुरुदेवांना स्वतःबरोबर बनारसला नेले व तेथे ॲनी बेझंट यांची भेट करवली. त्यांना गुरुदेवांनी आपले अनुभव सांगितले व आपल्या गुरुंचा श्रीभाऊसाहेब महाराज यांचा फोटो दाखविला. त्यावर त्या म्हणाल्या, 'Ranade you are in safe hands.'

## लोकमान्य टिळक

लोकमान्य टिळकांना गुरुदेवांबद्दल आदर होता व त्यांच्या बुद्धिमत्तेचे श्रेष्ठत्वही त्यांनी जाणले होते. १९१५-१६ च्या सुमारास ते गुरुदेवांना म्हणाले, 'तुम्ही केसरीला येऊन मिळा. केसरीची सर्व जबाबदारी मी तुमच्यावर टाकू इच्छितो.'

सन १९१७ च्या भेटीत ते रानडेंना म्हणाले, 'तुम्हाला मुंबई युनिव्हर्सिटीने 'प्रोफेसर ऑफ हिंदु रिलिजन' नेमावे अशाबद्दल एक लाख रुपये जमवून मी त्यांच्या स्वाधीन करू शकतो.'

त्यानंतर त्यांना सरदारगृहामध्ये भेटण्यास गेले असता गीता रहस्याच्या इंग्रजी भाषांतराबद्दल त्यांना विचारले.

## Shri Aurbindo

'Perfect writer and Scholar' Prof. Rande possesses in a superlative degree the rare gift of easy and yet adequate exposition. He joins to a luminous clarity, lucidity and charm of expression on equal luminonsness and joint clarity of presentation and that perfect manner in both native to the Greek and French language and mind.

## Dr. Ganga Nath Jha, **Vice Chanceller, Allahabad University (1927)**

In his letter to Gurudev he writes : 'Personally I shall regard it as my greatest achievement as Vice-Chancellor if I, succeed in bringing to the university a person of your calibre and attainment. So please do not disappoint.'

## Dr. Shiv Narayan Lal Shrivastava, **Prof. of Philosophy, Jabalpur**

Who-ever has come in contact with Dr. R. D. Ranade can not forget him till the end of his life. He has an angelic personality, radiating joy and peace and spiritual light. An electric smile ever played on his lips and his eyes shone with a brightness reflecting his inner illumination.

## Prof. Dr. Mohamad Hafiz Syed, **Allahabad University**

'Your letter made a deep impression on my mind. You are a brahmin in the true sense of the word. You have wisdom more than wealth. I am proud of your friendship. May you be spared long to serve our mother-land.'

## Shri Mahadevbhai Desai, **Personal Secretary to Mahatma Gandhi.**

Acquaintance with you I take as a silver lining to the cloud that desended on me, last December in Nagapur. Shri Bhaurao Yadwadakar had you in reverence.

## Dr. Rajendra Prasad, **President of India**

In his speech at Rastrapati Bhavan 1954 – 'It is Prof. Ranade's special field of work in which he has studied not only the old Sanskrit Philosophy, but also the philosophy of the west and the Philosophy that has been taught by people who have practical experience in their own life. You all know how. Prof. Ranade has been devoting years of study to this field. So the philosophy which we have inherited form the past now lives in him. We had the pleasure of hearing a very elevating speech today.'

## Dr. S. Radhakrishan, **Vice-President of India**

Gurudev Ranade to best of his ability performed meditation throughout his life and was trying to see God face to face, to have direct encounter with reality. Ranade lived philosophy and was touched by the Grace of God.

He had remarkable linguistic equipment. Apart from his mastery over English, he knew Greek and German. He expressed his deepest convictions in words and ways intelligible to the ordinary man.

No real mystic, so as Ranade, usually gives expression to his own experience. Dickens says, 'Tell the truth but tell it silent.

## Dr. Ramanand Tiwari, **M.A., Ph.D., Prof. of Philosophy Bharatapur, Translated, 'Constructive Survey of Upanishid' in Hindi**

Gurudev Prof. Ranade was a mystic by faith and he was a mystic also in his life and conduct. One could experience the illuminatiing, inspiring and ennobling light he embodied in his slender but energetic person. Gurudev Ranade was a 'Phantom of divine delight' (ब्रम्हानंदाचे मूर्तिमंत स्वरूप) an embodiment of spiritual inspiration. He was a living flame of Philosophy.

## Dr. D. C. Pavate, **Vice-Chanceller, Karnatak University**

Dr. Ranade himself was one of the great mystics of modern times and grounded as he was in deep mystic experience he has expounded mystical philosophy as few have been able to do.

## श्री. स. कृ. देवधर

प्रो. रानडे स्वतः अतीव बुद्धिमान आणि ईश्वरनामाचा स्पर्श झालेले सत्पुरुष होते. गुरुदेव रानडे म्हणजे एक पुण्यात्मा ! त्यांच्या तोंडचे शब्द नेहमी कृतिशील असायचे.

## पं. देवीप्रसाद शुक्ल, हिंदीचे प्राध्यापक व अलाहाबाद येथील गुरुदेव अध्यात्म मंदिराचे कार्यवाह.

श्री. डॉ. कैलासनाथ काटजु यांनी पं. देविप्रसाद शुक्ल यांना विचारले, 'How is it that Dr. Ranade has not written his autobiography?' पं. शुक्ल म्हणाले, 'Who says that he has not written his autobiography' असे म्हणून 'Path Way to God in Hindi Literature' हे पुस्तक त्यांच्यापुढे ठेवले.

## प्रा. श्री. म. माटे, गुरुदेवांची योग्यता जाणणारे मराठीतील प्रभावी लेखक

आधुनिक विद्वानात श्री. रामभाऊ रानडे हे एकच असे पुरुष आहेत की त्यांना आधुनिक कल्पनाही माहीत आहेत आणि परमार्थ प्रवासातील टप्पे प्रत्यक्ष अनुभवाने गाठता आले आहेत.

## श्री. शंकरराव देव, समर्थ वाङ्मयाचे गाढे अभ्यासक

राष्ट्रपति भवनात श्रीगुरुदेवांच्या झालेल्या प्रवचनानंतरचे उद्‌गार, 'माझे कान व्याख्यान ऐकत असले तरी माझे डोळे त्यांच्या चेहऱ्यावर खिळले होते. व्याख्यानापेक्षा त्यांचा मोठा आनंद मी उपभोगीत होतो. कारण त्यांच्या चेहऱ्याकडे पाहताच हा साक्षात्कारी पुरुष आहे अशी प्रचिती येई. अशा पुरुषांचे चेहरे विशेषतः डोळे पाहताच हे पुरुष या जगात विचरत असले तरी वस्तूतः यांचे रहाणे निराळ्याच जगातील आहे असे सहज आपल्या अनुभवाला येत असे.'

## प्रा. शं. दा. पेंडसे, नागपूर (ज्ञानेश्वरीचा सखोल अभ्यास)

'निंबाळला मी दोन चमत्कार पाहिले. एक गुरुदेवांच्या विहिरीचा जिवंत झरा आणि दुसरा स्वतः गुरुदेव.'

### आचार्य वि. प्र. लिमये

'रामभाऊ रानडे म्हणजे चालते बोलते तत्त्वज्ञान आहे. स्पर्शाने, दृष्टीने, श्वासोच्छ्वासाने सर्वांचे कल्याण साधण्याची शक्ती असणाऱ्या विभूतीपैकी ते आहेत.'

### श्री. य. गो. जोशी, प्रसाद मासिकाचे संस्थापक व संपादक

'डॉ. रानडे यांच्यासारख्या आत्मानुभवी, तत्त्वज्ञानी सत्पुरुषांची आज समाजाला फार गरज आहे.'

## Shri. Patwardhan, Rajesaheb of Sangali

In Gurudev Ranade Saheb we can find the rarest mingling of a great world renowned scholar of philosophy and a masterly mystic who stands Beacon light for the suffering humanity. The unique and rare combination of an exceptional genius and a realised mystic is aptly described in our scriptures as' 'शाब्दे परेच निष्णात'

## Dr. Sampurnanand

'Gurudev has no second in the whole world of his time in depth of philosophyic insight, in the realization of higher values, especially spiritual. It is difficult to say whether he lives in philosophy or philosophy lives in him.'

### श्रीसद्‌गुरु भाऊसाहेब महाराज, गुरुदेवांचे गुरु

गुरुदेवांनी १९११ साली प्रसिद्ध झालेल्या नित्यनेमावलीला एक प्रदीर्घ व विद्वत्तापूर्ण प्रस्तावना महाराजांच्या आदेशावरून लिहिली. प्रस्तावना वाचून महाराज उद्‌गारले, 'पहा, सर्व काही करून आपण कसा नामानिराळा राहिला आहे.' प्रस्तावनेत गुरुदेवांनी प्रत्यक्ष काय पण अप्रत्यक्षही स्वतःचा उल्लेख केला नाही.

१९०७ साली इंचगेरी येथे आपल्या सद्‌गुरुंच्या सहवासात असता, निंबरगी महाराजांच्या नातवास श्रीमहाराज म्हणाले, 'हा रामराया तुझ्या आजोबांची कीर्ती सातासमुद्रा पलीकडे नेईल.'

### श्रीसद्‌गुरु अंबुराव महाराज, साक्षात्कारी गुरुबंधू

रात्रीचे भजन झाले की अन्य साधक मंडळी विश्रांती घेत व गुरुदेव व अंबुराव महाराजांच्या, महाराजांच्या संबंधी गोष्टी सुरू होत. दोघांनाही वेळेचे भान रहात नसे. पहाटे पहाटे अंबुरावमहाराज म्हणत, 'रामराया किती थोर तुझी गुरुभक्ती, महाराजांच्या गोष्टी कितीही ऐकल्या तरी तुला समाधान नाही.'

### श्री. नरसप्पा शापेटी (हे निंबर्गी महाराजांचे शेवटचे शिष्य)

हे निंबाळला श्रीगुरुदेवांच्या भेटीसाठी वारंवार येत. गुरुदेवांच्या घराच्या चौकात अक्षरशः आनंदाने नाचत व त्यांना म्हणत, 'बाबा, काय घर बांधले आहेस? जिकडे तिकडे नादच नाद भरून राहिला आहे.'

### साधक श्रेष्ठ श्री. काकासाहेब तुळपुळे, गुरुबंधू (गुरुदेवांच्या वाङ्मयाचे भाष्यकार, प्रवचनकार)

परमार्थ हे गुरुदेवांच्या जीवनाचे केंद्र होते. त्यांचे सर्व जीवन देवाला वाहिलेले, त्याच्या प्राप्तीचा प्रयत्न करणारे व त्याचा आनंद भोगणारे होते. गुरुदेव हे बाबांच्या प्रमाणे मूर्तिमंत, अनन्य, अव्यभिचारी भक्त होते. 'तुका म्हणे मज होतील बा शक्ति । त्याही हा श्रीमती अलंकारु ॥' हा उपदेश त्यांच्या अखंड आचरणात असे. त्या बरोबरच जे मिळाले ते देवाच्या कृपेने, त्याच्या इच्छेने, माझ्या अंतिम कल्याणासाठी अशी साक्षात शरणागति त्यांच्या जीवनात पदोपदी दिसत असे. शरणागति हे त्यांच्या दैनंदिन जीवनाच्या निरीक्षणाने काढलेले सार होय.

### श्री. य. श्री. ताम्हणकर, निष्ठावंत साधक

मी अलाहाबादला असताना एकदा रात्री गुरुदेव नेमात असता 'नारायण नारायण' असा गजर करू लागले. व तद्‌नंतर असे शब्द ऐकू येऊ लागले की ज्यांचा लौकिक अर्थ काही नाही. या वेळी त्यांचा आवाज इतक्या उच्च पातळीवर जाई की ऐकणाऱ्याच्या हृदयग्रंथी सुटून जात व अंतःकरण शुद्ध होई, आनंद होई. ते शब्द हे पराकोटीच्या आनंदाचे, समाधिस्थितीत असलेल्या योग्याच्या तोंडून आपोआप उमटणारे शब्द होते.

## Shri. M. S. Desphande, Ardent disciple

Shree Gurudev was an Emperor of both the kingdoms-Intellectual as well as spiritual. He was an intellectual stalwart as well as a spiritual genius. His life was God-centred - God inspired - God possessed and God-intoxicated. He has realised God, enjoyed the neetor of his bliss to the heart's content, and carried on the blessed task of distributing that bliss among the devotees till the very end of his life.

## Prof. George B. Burch, Prof. of Philosophy (Tnft's College, Metesford, USA)

Small, slight and frail, a mere Wisp of a man whom you could expect the slightest breeze to blow away, he was nevertheless vigorous not only spiritually and intellectually but also physically. His brisk, sprightly step was charrecteristic of his whole lively personality. Pomposity or unaction would be impossible in this animated person. Hypocrisy would be impossible in this humble man, who kept his perspective and sense of humour even though surrounded by disciples for whom he was divine. Gurudev Ranade's spirituality shone clearly through every look, word and act. He did not have to pretend to be a saint because he obviously was one.

***Glorious in the begining***
***Glorious in the middle and***
***Glorious in the consummation***
***was the saga of this unique life.***
***It is difficult to believe that***
***such a one walked on earth***
***in flesh and blood***

**– एक नामधारक**

# भगवद्गीता : साक्षात्काराचे तत्त्वज्ञान

**डॉ. भालचंद्र रघुनाथ मोडक**

*एम.ए. संस्कृत, पीएच.डी संस्कृत. ३४ वर्षे प्राध्यापक व विभाग प्रमुख म्हणून निवृत्त, धारवाड. १५ पुस्तके व ५० शोधनिबंध प्रकाशित. पेन्सिल्वानिया युनिव्हर्सिटीत ६ व्या जागतिक संस्कृत अधिवेशनात शोधनिबंध सादर. ७ विद्यार्थ्यांना पीएच.डी पदवी प्राप्त. कर्नाटक सरकारतर्फे Certificate of merit देवून गौरव १९८८. २००० मध्ये केन्द्र सरकारतर्फे विद्वत् सन्मान.*

भगवद् गीतेच्या तत्त्वज्ञानाचा उगम उपनिषदात झाला आहे. कर्मासंबंधी सिद्धांत गीतेने ईशोपनिषदातून घेतला आहे. 'कर्म हे कशाचेही साधन म्हणून करावयाचे नाही, तर केवळ कर्तव्य म्हणून लाभ-हानीचा विचार न करता करावयाचे.' हा कर्माचे स्वतंत्र माहात्म्य सांगणारा तात्त्विक सिद्धांत प्रथम गीतेनेच प्रतिपादिला आहे. भगवद्गीतेच्या अश्वत्थ या कल्पनेचे मूळ कठोपनिषदात सापडते. परंतु कठातील अश्वत्थ व गीतेतील अश्वत्थ यात अत्यंत महत्त्वाचा फरक आहे. कठातील अश्वत्थ सत्य आहे व त्याचा अर्थ ब्रह्म असा आहे. गीतेतील अश्वत्थ असत्य आहे आणि त्याचा अर्थ संसार असा आहे.

गीतेतील विश्वरूपाची कल्पना मुंडकोपनिषदात आढळते. छांदोग्य उपनिषदात सांगितलेले तप, दान, आर्जव, अहिंसा व सत्यवचन हे पाच गुण गीतेच्या सोळाव्या अध्यायात आले आहेत. गीतेच्या सहाव्या अध्यायात योगमार्गासंबंधी ज्या प्रक्रिया सांगितल्या आहेत त्यांचा उगम श्वेताश्वतर उपनिषदात आढळतो. गीतेने सांख्य व योग यांचे ऐक्य प्रतिपादिले आहे. गीता सांगते की त्याग व निष्कामता एकच आहे. सत्त्व, रज, तम या त्रिगुणांचा विचार गीतेत व सांख्य दर्शनात आढळतो. मोक्ष किंवा कैवल्य याचे विवेचन गीता, सांख्य व योग यांत आढळते.

गीता व ब्रह्मसूत्रे यामध्ये परस्परांचा उल्लेख आहे. गीतेपूर्वीच्या सर्व उपनिषदातील विचार गीतेने घेतले आहेत. म्हणून गीतेला 'सर्वशाखीय उपनिषदामृत' असे सार्थ नाव देता येईल. क्षर पुरुष म्हणजे प्रकृति, अक्षर पुरुष म्हणजे जीव आणि उत्तम पुरुष म्हणजे ईश्वर होय. जीव हा ईश्वराचा अंश आहे असे गीतेत सांगितले आहे. कर्मफलाची आसक्ती सोडली तर कर्मातीत होता येईल. सर्व कर्मे ईश्वरार्पण केल्याने नैष्कर्म्य प्राप्त होते.

ज्ञानेश्वर गीतेवरील श्रेष्ठ भाष्यकार होते. त्यांच्या ठिकाणी तत्त्वज्ञान, काव्य व आत्मानुभूति यांचा एक अद्‌भुत त्रिवेणी संगम झाला होता. त्यांनी केलेला गीतेचा तात्पर्यार्थ पूर्णपणे साक्षात्कारपर आहे. ज्ञानेश्वरांचे चित्सूर्याचे वर्णन अत्यंत भव्योदात्त आहे. भौतिक सूर्याचा उदय झाल्यावर पांचभौतिक विश्वाचा दृष्टीपुढे उदय होतो. चित्सूर्याचा उदय झाल्यावर विश्वाभास सर्वस्वी मावळतो. सर्व विश्वाचे आदिकारण, त्याचा कर्ता, नियामक म्हणून ईश्वर मानला पाहिजे हे विश्वप्रपंचावरून ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणारे प्रमाण ज्ञानेश्वरांनी उत्कृष्ट रीतीने मांडले आहे. मायानदीच्या महापुराचे ज्ञानेश्वरांनी केलेले वर्णन खरोखर अद्‌भुत आहे. ब्रह्मगिरीच्या कड्यावर उगम पावून ही मायानदी पुढे वहात जाऊ लागली म्हणजे तिच्यात पंचभुतांचे बुडबुडे उत्पन्न होतात. नंतर त्रिगुणांचा पाऊस पडून या नदीला पूर येतो. तो प्रवाह आणखी पुढे वाहू लागला म्हणजे त्यात द्वेषाचे भोवरे व मत्सराचे वळसे उत्पन्न होतात. नैतिक प्रमादांचे मोठमोठे मासे त्यात पोहत असतात. नदीच्या दोन्ही तीरावर वसलेली यमनियमांची खेडी या पुरात वाहून जातात. या नदीत विषयोपभोगाची बेटे आहेत. त्या बेटावर नदीच्या वासनारूपी लाटा आदळतात व त्यामुळे त्यावर राहणारे सर्व प्राणी पुरात बुडून जातात.

डॉ. भांडारकरांचे स्थान, गीता भक्तिपर आहे हा सिद्धान्त सांगणाऱ्या विद्वानांमध्ये अत्यंत महत्त्वाचे आहे. गीतेतील एकांतिक भक्तीचे मूळ महाभारताच्या शांतिपर्वातील नारायणीय धर्मात सापडते आणि पुढे भक्तिसंप्रदायाची जी वाढ झाली तिचा उगम गीतेतील ऐकांतिक भक्तीपासून झाला. हा सिद्धांत प्रथम भांडारकरांनी मांडला. गीतेवर ख्रिश्चन धर्मतत्त्वांचा प्रभाव पडलेला आहे, या मताचे खंडन करणाऱ्या विद्वानांमध्ये ते अग्रेसर आहेत.

कृष्णाने साक्षात्कारासाठी गंधमादत वन, पुष्कर सरोवर व बद्रीपर्वत या ठिकाणी दीर्घकाळ ध्यानसाधन केले होते असे महाभारत व पुराणे या वरून दिसून येते. निसर्गरम्य अशी महावने, सरोवरे व पर्वत या ठिकाणी कृष्णाने ध्यानसाधन केले. ईश्वराची भक्ती केली व त्यात पूर्ण यश येऊन त्याला साक्षात्कारही झाला. अशा ईश्वरसाक्षात्काराने आलेल्या सामर्थ्यामुळेच गीतेने त्याला योगेश्वर म्हटले आहे आणि तो योगेश्वर होता म्हणूनच त्याच्या साहाय्याने पांडवांना विजय मिळाला. ध्यानसाधनाने आलेल्या अध्यात्मिक सामर्थ्याच्या योगानेच जगातील ऐतिहासिक घडामोडीत मनुष्याचा चढता वाढता आध्यात्मिक प्रभाव पडू शकतो.

लोकमान्य टिळक यांनी पाश्चात्य नीतीशास्त्रज्ञांच्या सिद्धान्ताशी तुलना करून गीतेतील नैतिक सिद्धांतांचे विवेचन केले. त्यामुळे गीतार्थाच्या स्पष्टीकरणास फार साह्य झाले. टिळकांनी कर्मयोगपर अर्थ करून त्या ग्रंथाचा तात्पर्यार्थ लावण्याच्या कार्यात नवी भर टाकली. ज्ञान, भक्ती, योग ही सर्व कर्मयोगाचाच निर्देश करतात. मोक्षप्राप्तीचे हे तीनही मार्ग कर्मयोगाकडेच बोट दाखवितात. कर्मयोगाची सिद्धी हेच त्यांचे कार्य आहे, हे विधान करण्याच्या मुळाशी अशी तर्कप्रणाली आहे की ज्ञानयोगाला अभिप्रेत असलेले अद्वैत, भक्तियोगाला अभिप्रेत असलेले ईश्वर प्रेम व ध्यानयोगाला अभिप्रेत असलेली चित्ताची समता, या सर्व योजना शेवटी कर्मयोगाच्या सिद्धीसाठी आहेत. कर्मयोग हेच मनुष्याचे अंतिम साध्य आहे. सारांश अद्वैत, ईश्वरप्रेम व चित्तसाम्य या सर्वांचा उपयोग कर्मयोगाच्या सिद्धीसाठी आहे. ज्ञानानंतरही कर्म केले पाहिजे. ज्ञानकर्मसमुच्चय शक्य आहे, इतकेच नव्हे तर तो अगदी सत्य आहे असे टिळकांचे म्हणणे आहे. समाजसेवा किंवा सर्वभूतहित यापेक्षा आत्मकल्याण श्रेष्ठ आहे हा सिद्धान्त टिळकांनी मान्य केला आहे.

महात्मा गांधी यांचा अभिप्राय असा आहे की, गीतेला अनासक्तीचा सिद्धांत सांगावयाचा आहे. अनासक्ती शब्दाचा असंग, निवृत्ति किंवा त्याग असा अर्थ करता येईल. त्याग म्हणजे कर्मफल त्याग. महात्मा गांधी

यांच्या मताप्रमाणे अनासक्ती या सूर्याभोवती भक्ती, ज्ञान व कर्म हे ग्रह फिरत आहेत. अनासक्ती हे एक नाणे असून अहिंसा व सत्य ही त्याची वरची व खालची बाजू आहे. अनासक्ती या कल्पनेचे पृथःक्करण केले तर तिच्यात तीन विचार अंतर्भूत असलेले दिसतात. अ) निष्काम कर्म, आ) सर्व कर्मे ईश्वरार्पण करणे, इ) शरणागती. गांधींचे मत असे आहे की गीतेच्या रूपाने मानवाच्या अंतःकरणात सर्वदा सुरू असलेल्या नैतिक झगड्याचे चित्रण केले आहे. ज्यांना आपण अवतार म्हणतो, त्यांना अवतारपद देण्याचे कारण हे की त्यांनी मानवतेच्या हितासाठी काही थोर कार्ये केली आहेत.

ॲनी बेझंट बाईच्या मते, ज्ञान, भक्ती व कर्म हे तीन भिन्नभिन्न मानले जाणारे मार्ग वस्तूतः एकच आहेत. या सर्वांचा शेवट ईश्वरसाक्षात्कारातच होतो. प्रत्येक मनुष्य आपल्या विशिष्ट प्रकृतिधर्माप्रमाणे विशिष्ट मार्ग पसंत करतो. भावनाप्रधान माणसाला भक्तिमार्ग उत्तम, बुद्धिप्रधान मनुष्याला ज्ञानमार्ग योग्य व क्रियाप्रवण व्यक्तीला कर्ममार्ग उत्कृष्ट असतो.

श्री. के. एम. मुनशी यांचे मत असे आहे, 'इतिहासावरून असे दिसून येते की सर्व देशातील थोर, तेजस्वी पुरुषांनी आध्यात्मिक मार्ग आक्रमिला आहे. पुष्कळ वाटेतच पडले; काहींनी ध्येय गाठले. त्यांच्या जीवनाचा सूक्ष्म अभ्यास केला तर आध्यात्मिक पूर्णत्व प्राप्त करून घेण्याला त्यांनी कोणत्या साधनांचा अवलंब केला व ते पूर्णत्व कसे प्राप्त करून घेतले हे समजून येईल. या पुरुषांच्या जीवनाचा अभ्यास केल्यास दिसून येते की मानवी स्वभाव मूलतः एकजिनसी असून ज्ञान, कर्म, व भक्ती ही त्याची अविभाज्य अंगे आहेत. ती एकमेकांपासून अलग करता येत नाहीत.'

डॉ. वेलवलकर यांनी या त्रिरूप मार्गाला ज्ञान-भक्ति-कर्म-समुच्चय हे सुंदर योग्य नाव दिले आहे. ज्ञान, भक्ती, कर्म हे तीन भिन्न मार्ग आहेत अशी गीतेची शिकवण नसून, ही तीन मिळून झालेला एकरूप असा एकच मार्ग आहे असे गीता सांगते. हा त्यांचा निष्कर्ष वाचला म्हणजे समाधान वाटते.

डॉ. काटजू यांचे मत असे आहे की आपली सर्व कर्मे समाजाच्या व जगाच्या हितासाठी केलेली असावीत. समाज व जग म्हणजेच ईश्वर. त्यांनी प्रतिपादिलेल्या कर्मयोगाचा अर्थ विशेषकरून जगाची व समाजाची सेवा असा आहे.

श्री. दिवाटिया यांनी आत्मसाक्षात्कार या कल्पनेचा मुख्यतः सामाजिक दृष्टीने विचार केला आहे. मी म्हणजे एक संकुचित व्यक्ती या दृष्टीने स्वतःकडे न पाहता आपण समाजाशी एकरूप आहोत असा आपल्या जीवनाचा साक्षात्कार होणे म्हणजे आत्मप्राप्ती. मानवतेची सेवा हा ईश्वराच्या पूजेचा एक प्रकार आहे असे त्यांचे मत आहे.

श्री. सी. राजगोपालाचारी यांचा अभिप्राय असा आहे – 'सृष्टिनियम म्हणजे ईश्वरच असे आपण मानले पाहिजे, कारण वस्तुतः ईश्वराची इच्छा म्हणजेच सृष्टिनियम होत. आपण प्रत्यक्ष जे पाहतो किंवा सूक्ष्म संशोधनाने जे आपल्याला समजते त्याच्या रूपाने ईश्वरी इच्छाशक्तीचा आविष्कार होत असतो. सृष्टिनियमांच्या द्वारा विश्वावर त्याचीच सत्ता चालते.'

डॉ. राधाकृष्णन म्हणतात, 'भागवतात वसुदेवांचे शुद्ध सत्व असे वर्णन केलेले आढळते. देवकी ही दैवी प्रकृती होय. या दोहोंपासून ज्या वेळी आपल्या अंतःकरणात ईश्वर जन्माला येतो, तेव्हा आपल्या डोळ्यावरील पडदे दूर होतात व कारागृहाची द्वारे उघडतात. ईश्वर भूतमात्राच्या हृदयात वास करीत आहे. त्याच्या या गूढ मंदिरावरील दोषांचे पडदे दूर झाले म्हणजे दिव्य नाद ऐकू येतो. दिव्य प्रकाश दिसतो आणि आपण त्या दिव्यशक्तीने कार्य करतो.'

जर्मन तत्त्वज्ञ ऑटो यांचा अभिप्राय असा आहे – 'भक्ती म्हणजे ईश्वरावर खरे, अनन्य, हार्दिक प्रेम. भक्ती ही उत्कट भावना आहे. तिला आनंददायक, देहभावाचा विस्मरण पाडणारे, कलात्मक स्वरूप येऊ शकेल. भक्तीत एका प्रकारच्या अद्वैतपर विचारांना जागा आहे. गीतेतील ईश्वराचा विचार केला तर विश्वातील सर्व घटना आगाऊच निश्चित करून टाकणारा, हे त्याचे महत्त्वाचे लक्षण दिसते. ईश्वरापुढे मनुष्याची इच्छाशक्ती सर्वस्वी दुर्बल आहे. मनुष्य हा स्वतःच ईश्वराच्या कार्याचा क्षणिक आविष्कार आहे. मनुष्य केवळ निमित्तमात्र आहे. ईश्वराची इच्छा तीच आपली इच्छा असावी या भावनेत एक मोठा नैतिक सिद्धान्त सामावलेला आहे.'

श्री. अरविंदांच्या मते सत् हे उच्चतम तत्त्व असून त्यातून चित्-शक्ती हे तत्त्व निघते व चित्-शक्तीतून आनंदतत्त्व निर्माण होते. अध्यात्म ज्ञान प्रधान ध्येय हा त्यांच्या तत्त्वज्ञानातील एक अत्यंत महत्त्वाचा मुद्दा आहे. अति मानव या सिद्धान्ताला श्री. अरविंदांच्या तत्त्वज्ञानात फार महत्त्वाचे स्थान आहे. अमरत्वाच्या सिद्धांताचा ते एका नवीन दृष्टिकोनातून विचार करतात. जड देह हा आत्म्याच्या विकासाचा आविष्कार करण्याचे साधन आहे. जडतत्त्वात दिव्य जीवन निर्माण करणे म्हणजे अमरत्व. श्रीअरविंद सांगतात की गीता नीतिशास्त्रावरील ग्रंथ नाही. आध्यात्मिक जीवनावरील आहे. आपली कर्मे करण्यात केवळ ईश्वरप्राप्तीची कामना असावी. सर्व कर्मे ही ईश्वरासाठी केलेला यज्ञ होय असे समजावे. जगदीश्वराला सर्वस्वाने शरण जाणे हेच आपण आपले ध्येय ठेवावे. स्वतः ईश्वराचा साक्षात्कार करून घेऊन जो विश्वात ईश्वराच्या आदेशाचा प्रसार करतो, तो अवतार होय.

गुरुदेव रानडे आपला अभिप्राय असा व्यक्त करतात -- 'साक्षात्कारात साधकाच्या दृष्टीसमोर देवाचे रूप अवतरते. अशा प्रकारे साधकासमोर देवाचे रूप अवतरणे, उतरणे, म्हणजे अवतार. निरुक्तामध्ये यास्क मुनींनी असे म्हटले आहे की प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांसमोर अवतरलेले देवाचे रूप जो पाहतो, तो ऋषि.'

गुरुदेव रानडे यांनी गीतेत आढळणारे काही विरोधाभास गीतेतील श्लोकांच्या आधाराने दाखविले आहेत व त्यांचा समन्वय गीतेत आढळणाऱ्या श्लोकांच्या सहाय्यानेच पुढीलप्रमाणे केला आहे :

१) ईश्वर सगुण आहे की निर्गुण आहे ? ईश्वर गुणातीत आहे.
२) ईश्वर द्रष्टा आहे की कर्ता आहे ? ईश्वर मूळ प्रेरक आहे.
३) ईश्वर अंतर्यामी आहे की सर्वातीत आहे? ईश्वर दोन्हीही आहे.
४) जग सत्य आहे की असत्य आहे? जग क्षणभंगुर आहे.
५) विदेहमुक्ती की क्रममुक्ति ? जीवन्मुक्ति.

ईश्वराच्या चिंतनात व साक्षात्कारात साधकाचे मन आनंदाने भरून जाते. ही आत्मानंदमय अवस्था म्हणजे मुक्ती.

अहंकार व आसक्ती सोडून आपले कर्तव्य करा आणि चित्ताची समता राखून कुशलतेने आपले कर्तव्य करा याप्रमाणे गीतेचा कर्मयोगविषयक उपदेश आहे. आपले कर्तव्य केल्यावर मनुष्याला आपोआप आनंद होतो आणि मन आपोआप शुद्ध होते. गीतेची यज्ञासंबंधी शिकवण आहे ती अशी : आपल्या कर्माची फळे देवाला अर्पण करा व नंतर जे राहील त्याचे

सेवन तुम्ही करा.

ज्ञान (साक्षात्कार) ही एका विशिष्ट क्षणाला संपणारी अशी घटना नसून न संपणारी प्रवाही प्रक्रिया आहे. साक्षात्काराच्या पूर्णत्वाकडे आपली सतत वाटचाल सुरू असते. हे मान्य केल्यावर ज्ञान-कर्म-समुच्चयाचा प्रश्न उरत नाही. ज्ञानोत्तर कर्माचाही प्रश्न उरत नाही; कारण पूर्ण ज्ञानच होत नाही. मग त्याचा समुच्चय तरी कसा करावयाचा व ज्ञानानंतर काय करावयाचे हा प्रश्न तरी कसा उद्भवणार? पूर्ण साक्षात्काराच्या प्राप्तीसाठी आपले अखंड आध्यात्मिक साधन सुरू असताना आपली इतर कर्मे आपल्या इच्छेप्रमाणे करण्यास आपण मोकळे असतो.

ईश्वर साक्षात्काराच्या सत्यतेची प्रमाणे पाहू गेले तर गीतेत अशी तीन महत्त्वाची प्रमाणे सापडतात – अतीन्द्रियत्व, अंतःस्फुर्ती आणि अव्ययत्व अथवा अखंडत्व. ही लक्षणे म्हणजे मानसशास्त्र व ज्ञानशास्त्र यात गीतेने घातलेली महत्त्वाची भर होय असे निश्चित म्हटले पाहिजे. ईश्वराचे भव्योदात्त दर्शन म्हणजेच विश्वरूप दर्शन हे गीतेच्या मते परमोच्च ध्येय होय. गीतेतील विश्वरूप दर्शनाच्या वर्णनात त्याचे अलौकिक तेज व त्याच्या दर्शनाने वाटणारे आश्चर्य, महद्भय, आनंद इत्यादी अनुभव आढळतात. या अनुभवामुळे सर्व जगातील भव्योदात्तविषयक तत्त्वज्ञानाशी विश्वरूपाच्या वर्णनाचा दुवा जोडला जातो.

उपनिषदे व गीता यातील विचारात आणि पाश्चात्य तत्त्वज्ञानांच्या विचारात असणारे साम्य गुरुदेव रानडे यांनी ठिकठिकाणी दाखविले आहे.


**डॉ. भालचंद्र रघुनाथ मोडक**

३८, रानडे कॉलनी, हिंदवाडी, बेळगाव - ५९००११.

फोन - (०८३१) ४२५४३०


## सद्गुरु सखा

भाग्य माझे आले । फळासि म्हणून
लाभले चरण । सद्गुरुंचे ॥
अवगुणांची ती । रास माझ्या ठायी
परी तुझ्या पायी । देई थारा ॥
नको नको मज । अव्हेरू दातारा
नाही हो आसरा । अन्य आता ॥
वाटते अंतरी । तुलाचि चिंतावे
भजनी रंगावे । मन सदा ॥
परी काय सांगू । मन हे ओढाळ
ऐकेना वेल्हाळ । लवलाही ॥
नकळत ते । जाई विषयात
रमेना नामात । क्षणभरी ॥
तुझ्या कृपेविण । साधन कठीण
म्हणून शरण । तुजलागी ॥
अंतकाळी आता । तूच होय सखा
देई माझ्या मुखा । रामनाम

**सौ. प्रभाताई टेंभेकर**

# उपनिषद् रहस्य

**प्रा. डॉ. शं. रा. तळघट्टी**

*एम.ए., पीएच.डी., तत्त्वज्ञानाचे निवृत्त प्राध्यापक पुणे विद्यापीठ. अनेक इंग्रजी-मराठी लेख. भारतीय तत्त्वज्ञान व विशेषतः संत-वाङ्मयाच्या अभ्यासाची आवड. त्यावर व्याख्याने व व्याख्यानमाला. पीएच.डी.साठी अनेक विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. प्रकाशित पुस्तके १) श्रीज्ञानेश्वर विचार दर्शन, २) चांगदेव पासष्टी - इंग्रजी भाषांतर व टीपा. ३) The Concept of Moral Obligation*

भारतीय तत्त्वज्ञानाचे मूलस्रोत म्हणून उपनिषदांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. वेदवाङ्मयांचा अंतिम भाग या अर्थाने तर उपनिषदे वेदान्त आहेतच. परंतु वैदिक तत्त्वज्ञानाचे शिखर या अर्थानेही वेदान्त हे नामाभिधान उपनिषदांना यथार्थपणे लागू पडते. त्यामधून केलेली चर्चा ही निखळ तात्त्विक स्वरूपाची आहे. जीव, जगत आणि ईश्वर (सद्‌वस्तू) यांच्या स्वरूपाची आणि त्यांच्या परस्पर संबंधाची चर्चा भारतीय तत्त्वज्ञानात प्रामुख्याने केली जाते. उपनिषदांमध्ये तत्त्वज्ञ ऋषींनी या विषयासंबंधी सखोल व सर्वांगीण चिंतन व चर्चा करून अत्यंत महत्त्वाचे तात्त्विक निष्कर्ष काढलेले आढळतात. मात्र ही तात्त्विक चर्चा गुरु-शिष्य संवाद व उपदेश या स्वरूपात विखुरलेली असल्याने औपनिषादिक तत्त्वज्ञानाची सुव्यवस्थित व सुसंबद्ध मांडणी करण्यासाठी बादरायण व्यासांनी ब्रह्मसूत्रे (वेदान्त सूत्रे) रचून 'वेदान्त दर्शना'ची पायाभरणी केली. त्यावर अनेक आचार्यांनी भाष्य करून त्या द्वारा आपापले वेदान्त-दर्शन प्रसृत केले आहे. शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य आणि वल्लभाचार्य हे प्रमुख आचार्य अनुक्रमे केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैत आणि शुद्धाद्वैत या वेदान्त-दर्शनांचे संस्थापक म्हणून प्रसिद्ध आहेत. वेदान्त दर्शनाचे तीन आधारभूत ग्रंथ आहेत त्यांना 'प्रस्थान त्रयी' असे म्हणतात. ते ग्रंथ म्हणजे उपनिषदे (प्रमुख दहा) ब्रह्मसूत्रे, आणि भगवद्‌गीता. यापैकी मूळ आधार म्हणजे उपनिषदे.

आज मुद्रित स्वरूपात उपलब्ध असलेल्या उपनिषदांची संख्या दोनशेच्या वर भरते. परंतु ज्या दशोपनिषदांवर आद्य शंकराचार्यांनी भाष्य केले आहे ती दहा उपनिषदे प्राचीन म्हणून अधिकृत महत्त्वाची मानली जातात. त्यांची नावे आहेत - ईश, केन, कठ, मुंडक, मांडूक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, प्रश्न, छांदोग्य आणि बृहदारण्यक. या व्यतिरिक्त आणखी तीन उपनिषदे प्रमाण मानण्यात येतात ती म्हणजे – श्वेताश्वतर, कौषीतकी, मैत्री. औपनिषदिक तत्त्वज्ञानाची चर्चा प्रामुख्याने या तेरा उपनिषदांच्या आधाराने केली जाते. पूज्य गुरुदेव रानडे यांनीही त्यांच्या आधारे उपनिषदांमधील तत्त्वचिंतनाचे स्वरूप उलगडून दाखविणारे विस्तृत विवेचन आपल्या ग्रंथात केले आहे. खरे तर या उपनिषदांमधून सर्वत्र विखुरलेले तत्त्वज्ञान सुसंगतपणे प्रणालीच्या स्वरूपात मांडणे हे एक मोठेच आव्हान आहे. ते स्वीकारून आचार्यांनी आपापली मते मांडली. परंतु आजच्या आंग्ल विद्येच्या काळात वेदान्त दर्शनाचे स्वरूप जगाला समजावून सांगण्यासाठी त्याची पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या पद्धतीने व परिभाषेत इंग्लिश भाषेमधून मांडणी करणे आवश्यक होते. ते काम अत्यंत प्रभावीपणे गुरुदेवांनी केले आहे. या कामासाठी त्यांच्या इतका सुयोग्य प्रवक्ता दुर्मिळच. त्यांचे संस्कृत व इंग्लिश भाषेवर प्रभुत्व होतेच. मराठी, कानडी, हिंदी या भाषांमधील संतवाङ्मयावर तर त्यांनी ग्रंथच लिहिले आहेत. ग्रीक तत्त्वज्ञानाचा मुळातून अभ्यास करता यावा म्हणून त्यांनी ग्रीक भाषाही आत्मसात केली होती. भारतीय दर्शने व पाश्चात्य तत्त्वज्ञानातील विविध विचार-प्रवाह यांचा त्यांचा व्यासंग सखोल होता. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे ते स्वतंत्रप्रज्ञ विचारवंत होते. आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांची ईश्वरावर जशी दृढ श्रद्धा होती तशीच सद्‌गुरुंवरही होती. श्वेताश्वतर उपनिषदांच्या वचनानुसार अशा सत्पात्र गुरुकृपाप्राप्त सत्पुरुषांनाच उपनिषदांचे रहस्य अवगत होते.* तेव्हा गुरुदेवांसारख्या थोर अधिकारी तत्त्वज्ञ संताकडून उपनिषद्-रहस्य समजून घेणे किती इष्ट आहे हे निराळे सांगावयास नको.

*"यस्य देवे पराभक्तिः यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिताह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनाम् ॥' (श्वेत.)*

गुरुदेव रानडे यांची ग्रंथसंपदा मोठी आहे. परंतु ज्या ग्रंथामुळे त्यांना जागतिक मान्यता मिळाली तो त्यांचा पहिलाच महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे 'A Constructive survey of upanisadic Philosophy' हा ग्रंथ १९२६ साली प्रसिद्ध झाला. त्याचे मराठी भाषांतर 'उपनिषद्‌रहस्य' या नावाने प्रा. श्री. कृ. वें. गजेंद्रगडकर, एम.ए. यांनी गुरुदेवांच्याच अनुमतीने १९२८ साली पूर्ण केले. मात्र ते प्रसिद्ध झाले ते १९३८ साली. 'औपनिषदिक तत्त्वज्ञानाचे विधायक समालोचन' असे त्यांचे कंसामध्ये मूळ इंग्रजी नावाबरहुकूम भाषांतर दिले आहे. हे भाषांतर गुरुदेवांनी स्वतः पाहिलेले असल्याने अधिकृत म्हणून मान्यता पावले आहे. यास्तव त्याच्या आधारेच गुरुदेवांनी उपनिषदांमधील तत्त्वज्ञानाचा जो सर्वकष आढावा घेतला आहे त्याचे स्वरूप आपण प्रस्तुत लेखात समजून घेण्याचा प्रयत्न करणार आहोत.

उपनिषदांवरील हा ग्रंथ लिहिण्यामागे कोणती भूमिका होती व प्रयोजन काय होते या संबंधी गुरुदेवांनी ग्रंथाच्या प्रस्तावनेत विस्ताराने लिहिले आहे. उपनिषदातील तत्त्वज्ञान आधुनिक शास्त्रीय परिभाषेत – आधुनिक तात्त्विक परिभाषेत व पद्धतीने मांडण्यासाठी त्यांनी हा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाचे तीन उद्देश आहेत असे ते सांगतात. त्यांच्या शब्दात - 'हिंदी तत्त्वज्ञानातील प्रश्नांचा उहापोह नवीन शास्त्रीय पद्धतीने कसा करावा हे प्राच्य पंडितांना दाखविण्याचा पहिला उद्देश; व युरोपीय तत्त्वज्ञांपुढे त्यांच्या विचारार्थ नवीन साहित्य मांडावयाचे हा दुसरा उद्देश. पण हे दोनही उद्देश गौण आहेत. अध्यात्म-प्रतिपादन हाच या ग्रंथाचा मुख्य व अंतिम उद्देश आहे. (पृ. ११). उपनिषदातील तत्त्वज्ञान व धर्मविचार अत्यंत श्रेष्ठ असल्याने त्यांना जागतिक धर्मतत्त्वज्ञानात श्रेष्ठ स्थान देणे योग्य होईल अशी त्यांची दृढ धारणा होती. आत्मानुभूती हेच उपनिषदांचे मुख्य ध्येय आहे. आत्मानुभवशास्त्राची तर्कशुद्ध मांडणी करण्यासाठी गुरुदेवांनी आपले सर्वच लिखाण केले आहे. यालाच 'अध्यात्मशास्त्र' म्हटले जाते. पाश्चात्य तत्त्वज्ञानाची एक रूढ परिभाषा आहे. त्याचप्रमाणे तत्त्वज्ञानाची मांडणी करण्याची एक तार्किक पद्धती

आहे. त्या परिभाषेत व त्या पद्धतीने वेदान्त दर्शनाची मांडणी करणे गुरुदेवांना आवश्यक व इष्ट वाटत होते. त्यानुसार प्रस्तुत ग्रंथाची रचना त्यांनी केली आहे.

या ग्रंथातील विवेचन पद्धती संबंधी ते म्हणतात, 'औपनिषदिक तत्त्वज्ञानातील प्रत्येक प्रश्नाचा सांगोपांग, सुसंघटित व विधायक पद्धतीने विचार करावयाचा आमचा उद्देश आहे. हा ग्रंथ म्हणजे हिंदी तत्त्वज्ञानाच्या अभ्यासास उपयुक्त अशी सुव्यवस्थितपणे लिहिलेली प्रस्तावनाच आहे, असे म्हटले तरी चालेल. उपनिषदात प्रतिपादिलेली सर्व भिन्न मते एकत्र करून त्यांची सृष्टी निर्माणशास्त्र, मानसशास्त्र, परतत्त्वविवेचन, आत्मानुभूति इत्यादी योग्य अशा सदरांखाली विभागणी केली आहे व त्यांचे तर्कानुक्रमाने विवेचन करीत असता स्वतःचे मत दिग्दर्शित करण्याचा प्रस्तुत ग्रंथकाराने प्रयत्न केला आहे.' याचा अर्थ असा की ग्रंथकारांनी स्वतःची मते मांडण्याचा मोह आवरून औपनिषदिक तत्त्वज्ञान वस्तुनिष्ठपणे विवेचिले आहे. ग्रंथाचा प्रकरणशः धावता आढावा घेणेच प्रस्तुत लेखाच्या मर्यादेत शक्य होणार आहे. कारण त्याचा आवाका फार मोठा आहे.

'उपनिषद्रहस्य' हा ग्रंथ सप्त प्रकरणात्मक आहे. त्याला शेवटी दोन परिशिष्टेही जोडली आहेत. प्रकरणांची नावे अशी १) पूर्वपिठीका, २) सृष्टिनिर्माण शास्त्र, ३) मानसशास्त्र, ४) अर्वाचीन दर्शनांचे मूळ, ५) परतत्त्व विवेचन, ६) नीतिशास्त्र आणि, आत्मानुभूतीचे दिग्दर्शन. दोन परिशिष्टांपैकी दुसरे परिशिष्ट उपनिषद् वाङ्मयावरील ग्रंथसूची असे आहे. पहिले परिशिष्ट हे खरे तर आठवे प्रकरण असल्यासारखेच असून त्याचे नाव आहे 'नव्य उपनिषदांतील तत्त्वज्ञान.' त्यात प्राचीन तेरा उपनिषदांव्यतिरिक्त जी अन्य महत्त्वाची उपनिषदे आहेत त्यांच्यामधील उपरिनिर्दिष्ट प्रकरणांमधील विषयांची चर्चा गुरुदेवांनी केलीआहे व ती महत्त्वाची आहे. आता आपण या प्रकरणांमधील विषयांचे स्वरूप पाहू या.

**१) पूर्वपीठिका** — या प्रकरणात गुरुदेवांनी उपनिषदांचे बहिरंग परीक्षण केले आहे. त्यांचे महत्त्व, त्यांचा कालानुक्रम, त्यांच्यामधील तत्त्वज्ञान-विवेचन पद्धतीचे स्वरूप, तत्त्वज्ञ, तत्कालीन सामाजिक परिस्थिती, काव्य, अशा विषयांची चर्चा करून शेवटी मुख्य तात्त्विक मुद्दे सांगितले आहेत. त्यांचीच विस्तृत चर्चा पुढील प्रकरणांमधून केली आहे. बहिरंगाच्या तपशिलात न जाता प्रकरणाअंती त्यांनी एक महत्त्वाचे विधान केले आहे. ते सांगून आपण पुढील प्रकरणांकडे वळू. त्यांच्या मते - 'आत्मज्ञान हे सर्व तत्त्वज्ञानाप्रमाणे औपनिषदिक तत्त्वज्ञानाचेही अंतिम साध्य होते; व सृष्टिनिर्माणशास्त्र, मानसशास्त्र, नीतिशास्त्र व वेदांत शास्त्र ही सर्व शास्त्रे या अध्यात्मशास्त्रास उपोद्घातरूप आहेत हे ज्याच्या लक्षात येत नाही त्यास औपनिषदिक तत्त्वज्ञानाचे खरे मर्म समजले नाही असे म्हटले पाहिजे.' (पृ. ५८)

**२) सृष्टिनिर्माणशास्त्र** — सृष्टी कशी उत्पन्न झाली? तिच्या मुळाशी असलेल्या तत्त्वाचे स्वरूप काय? हा प्रश्न विचारी माणसाच्या मनात सृष्टीसंबंधीच्या कुतूहलातून निर्माण होतो. उपनिषत्कारांनीही ज्याच्यापासून हे विश्व निर्माण होते, ज्याच्या आधारावर व्यवहार करते व अंती ज्यामध्ये लय पावते असे 'तज्जलान्' मूळ तत्त्व कोणते याचा शोध घेतला व 'अंततो गत्वा' हे तत्त्व 'ब्रह्म' असल्याचा निष्कर्ष काढला. तैत्तिरीय उपनिषदामधील एतदविषयक विधान औपनिषदिक तत्त्वज्ञानाचा मूलाधार आहे – 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते, येन जातानि जीवन्ति, यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व, तत् ब्रह्मेति ।' (३.१) या अंतिम निर्णयाप्रत येण्यापूर्वी ऋषींनी पंचमहाभूते, प्राण, सत्, असत् इत्यादी अन्य तत्त्वांचीही चर्चा केली आहे. यापैकी 'पुरुष' ही संकल्पना महत्त्वाची आहे. ऋग्वेदातील 'पुरुषसूक्त'ही या दृष्टीने महत्त्वाचे आहे. गीतेतील 'विश्वरूप दर्शन' आणि ज्ञानेश्वरांची विश्वात्मक ईश्वराची संकल्पना याच तत्त्वाचे प्रतिपादन करतात. 'आत्मा' किंवा 'ब्रह्म' असे या विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण तत्त्वालाच म्हटले आहे. गुरुदेवांनी या विविध तत्त्वांची विभागणी 'अपौरुषेय' व 'पौरुषेय' अशी करून प्रकरणाच्या शेवटी 'ईश्वरापासून सृष्टी निर्माण झाली' या विषयी विशेषतः श्वेताश्वतर उपनिषदाच्या आधाराने चर्चा केली आहे. त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे ग्रीक तत्त्वज्ञानाशी या विचारांची केलेली तुलना.

**३) मानसशास्त्र** — भारतीय तत्त्वज्ञानाच्या संदर्भात मानसशास्त्राची चर्चा गुरुदेवांपूर्वी फारशी झालेली दिसत नाही. परंतु ती करणे आवश्यक आहे हे त्यांनी ओळखले होते. ही चर्चा त्यांनी तीन विभागात केली आहे – आधिभौतिक मानसशास्त्र, विकृत मानसशास्त्र व आध्यात्मिक मानसशास्त्र. विकृत मानसशास्त्र म्हणजे मनोविश्लेषण. त्यात मृत्यू, निद्रा, स्वप्न इ. विषयांची मीमांसा येते. आधिभौतिकात सामान्य मनोव्यापाराची चर्चा येते. चित्त, मन, मनोवृत्तींचे वर्गीकरण, संकल्प, विचार इत्यादी विषयांचा त्यात समावेश होतो. आध्यात्मिक मानसशास्त्र मुख्यतः तत्त्वज्ञानाच्या अंगाने विचार करते. आत्मा, जाणीवेच्या जागृत, स्वप्न, सुषुप्ती, तुर्या या अवस्था, परलोकी, शरीर व आत्मा यांचा संबंध, पंचकोश, पुनर्जन्म इत्यादी महत्त्वाचे विषय यात मोडतात. गुरुदेव रानडे यांनी या तऱ्हेची मांडणी करून भारतीय तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाला एक वेगळी शास्त्रीय अभ्यासाची दिशा दिली आहे असे निश्चितपणे म्हणता येते. आध्यात्मिक मानसशास्त्राचा अध्यात्मशास्त्राशी साक्षात संबंध आहे हे वेगळे सांगायला नको.

**४) अर्वाचीन दर्शनांचे मूळ** — बौद्ध दर्शन व प्रसिद्ध अशी न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा व वेदान्त ही षड्दर्शने यांचा औपनिषदिक तत्त्वज्ञानाशी कसा घनिष्ट संबंध आहे ते या प्रकरणात दाखवून दिले आहे. उपनिषदात एकच तत्त्वज्ञान सांगितले आहे या मताचा प्रतिवाद गुरुदेव करतात. त्यांच्या मते उपनिषदांपासून अनेक विचार प्रवाह निघून पुढे त्या विचारांस क्रमाक्रमाने अधिकाधिक सुसंघटित अशा दर्शनांचे रूप प्राप्त झाले. ऐतिहासिक दृष्ट्या हे मत महत्त्वाचे आहे.

**५) परतत्त्व विवेचन** — हा तत्त्वज्ञानाचा गाभा मानला जातो. परमश्रेष्ठ तत्त्व कोणते व ते जाणण्याचा मार्ग काय? हा प्रश्न केंद्रवर्ती तात्त्विक प्रश्न होय. गुरुदेवांच्या मते उपनिषत्कारांनी या प्रश्नासंबंधी आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा विविध पद्धतीने हा विचार करून अंतिम निष्कर्ष काढला आहे. यापैकी पहिल्या दोन पद्धतींपेक्षा आध्यात्मिक विचार पद्धतीच श्रेष्ठ असून अंतिम तत्त्वाचे प्रत्यक्ष ज्ञान प्राप्त करून घेण्यास या शिवाय अन्य मार्ग नाही असे उपनिषत्कारांचे मत होते, हे गुरुदेवांनी दाखवून दिले आहे. या पद्धतीने विचार करता 'आत्मा' हे अंतिम सत्य होय. हा आत्मा स्वसंवेद्य, स्वयंप्रकाशी, केवल व स्वयंसाक्षी आहे. तोच परतत्त्व होय. तो सच्चिदानंद स्वरूप आहे. तो सर्वव्यापी-बृहत-असल्याने ब्रह्म होय. त्याचे लक्षण 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' असे

उपनिषदात केले आहे. आत्मा हा इंद्रिय, मन, बुद्धी यांच्या अतीत असल्याने व स्वतःच ज्ञानस्वरूप असल्याने तो ज्ञानाचा विषय (ज्ञेय) नाही. या अर्थाने तो अज्ञेय आहे. परंतु 'स्वसंवेद्य' या अर्थाने त्यास ज्ञेय म्हणता येईल. याचा अर्थ आत्मज्ञान हे बुद्धीच्या द्वारा वा इंद्रियांच्या द्वारा होत नाही. आत्म्याचा प्रत्यक्ष अनुभव घेणे म्हणजेच आत्मज्ञान होणे. यालाच **साक्षात्कार, अपरोक्ष, अनुभूती असे म्हणतात.** उपनिषदांमध्ये आत्मा आणि ब्रह्म यांच्यातील संबंधाविषयी काही महत्त्वाची विधाने सिद्धांतरूपाने केलेली आढळतात. भाष्यकारांनी त्यांचा सांप्रदायिक अर्थ लावला असल्याने मतभिन्नता निर्माण झाली आहे. परंतु गुरुदेवांच्या मते त्यातील उत्तरोत्तर श्रेष्ठ सिद्धान्त जर आपण क्रमवार लावले तर या परस्पर विरोधी मतांचा समन्वय साधता येतो. उपनिषत्प्रणीत आत्मानुभवाचा तात्त्विक विचार करून एकाहून एक उच्च अशा पाच सिद्धांतांच्या रूपाने पाच पायऱ्यांची अध्यात्मानुभवाची एक सोपानपंक्ती सांगता येते. ते पाच सिद्धान्त क्रमशः असे – १) आपणामधील आत्म्याच्या दिव्य तेजाचा स्वतःला भिन्न मानून प्रत्यक्ष अनुभव घेणे, २) मी व शुद्ध आत्मा एक आहोत असा अनुभव घेणे (देहबुद्धि ते आत्मबुद्धी करावी / रामदास), ३) आपला आत्मा व ब्रह्म एक आहेत असा अनुभव घेणे, (आत्मा च ब्रह्म), ४) मी ब्रह्मच आहे असा अनुभव घेणे - (अहं ब्रह्मास्मि); आणि ५) सर्व काही ब्रह्मच आहे असा विश्वात्मैक्याचा सर्वोच्च अनुभव घेणे - (सर्व खल्विदं ब्रह्म ।). हे आत्मानुभवाचे सर्वोच्च शिखर होय. गुरुदेव रानडे सांगतात, 'हेच खरोखर पूर्ण अद्वैत होय.' (पृ. २४८) त्याचा साक्षात अनुभव (साक्षात्कार) हे जीवनाचे परम प्राप्तव्य होय. सर्व साधन-मार्गांचा खटाटोप हा त्यासाठीच !

**६) नीतिशास्त्र –** आत्मा हे परतत्त्व असून त्याचा साक्षात्कार हे जीवनाचे परम साध्य आहे. असे जाणल्यानंतर हे साध्य प्राप्त करण्याची साधने कोणती असा प्रश्न आपल्यापुढे उभा राहतो. सामाजिक दृष्ट्या जसे नीतिशास्त्र महत्त्वाचे आहे तसे किंबहुना त्याहून अधिक ते अध्यात्मशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. नीती हा आध्यात्मिक साधनेचा पाया होय. आध्यात्मिक उन्नतीसाठी वेदान्त आणि अनुभवशास्त्र (मिस्टिसिझम्) यांच्या प्रमाणेच नीतीपण नितांत आवश्यक आहे. गुरुदेवांनी उपनिषदातील नीतिशास्त्राची चर्चा तीन उपविभागांत केली आहे. ते म्हणजे – नीतिप्रामाण्यवाद, नैतिक ध्येयवाद आणि व्यावहारिक नीतिशास्त्र. सद्वर्तन, सद्भावना व सद्विचार हा नैतिक चांगुलपणा व चारित्र्याचा आशय आहे. वैराग्य, अनासक्ती, व्यावहारिक सुखभोगाला उच्च दृष्टीने विरोध, श्रेय-प्रेय विवेक इत्यादी महत्त्वाचे विषय नीतिशास्त्रात येतात. विशेषतः कर्म आणि अकर्म (कर्म संन्यास) हा वाद मौलिक स्वरूपाचा आहे. त्याची सांगड कर्मयोगात घातली आहे. या दृष्टीने ईशोपनिषद् महत्त्वाचे आहे. एकूण उपनिषदातील नितिशास्त्र हे अंततो गत्वा 'आनंद मीमांसा' या स्वरूपाचे आहे. त्यानुसार शाश्वत आनंद आहे आत्मानंद. विषयानंद हा नश्वरही आहे आणि दुःखयुक्त म्हणून आत्मानंद हे जीवनाचे मोक्ष स्वरूप परम प्राप्तव्य - पुरुषार्थ आहे. आत्मा हा आनंद स्वरूप असल्याने आत्मानंद प्राप्ती म्हणजे आत्मानुभूतीच होय. अर्थात नीतीचा अध्यात्माशी आंतरिक संबंध आहे. म्हणूनच गुरुदेव सांगतात की, नीती व अनुभव ही आत्मज्ञानाची दोन अंगे आहेत. (पृ. २७२) हे झाले आध्यात्मिक नीतिशास्त्र. त्याच्या पायावरच व्यावहारिक नीतिशास्त्राची उभारणी उपनिषदात केली आहे. सद्गुण, दुर्गुण, नीतिनियम, सदाचाराची तत्त्वे इत्यादींचा विचार व्यावहारिक नीतिशास्त्रात केला जातो. त्याचा संबंध जीवनाच्या अंतिम ध्येयाशी आहे हे निराळे सांगावयास नको. नीतीला धर्मपुरुषार्थ नाव आहे. धर्माच्या एका बाजूला अर्थ व काम पुरुषार्थांशी, तर दुसऱ्या बाजूला मोक्ष या परम पुरुषार्थाशी आंतरिक आवश्यक संबंध आहे. नीतीचे पर्यवसान आत्मानुभूतीत अर्थात आत्मानंदात होते असा सारभूत निष्कर्ष गुरुदेवांनी काढला आहे.

**७) आत्मानुभूतीचे दिग्दर्शन –** आत्मानुभूती हाच परमार्थ. तो कसा साधावयाचा, त्यासाठी लागणारा अधिकार कसा प्राप्त करावयाचा याची अत्यंत महत्त्वपूर्ण चर्चा प्रस्तुत अखेरच्या प्रकरणामध्ये गुरुदेवांनी केली आहे. गुरुदेव हे स्वतः आत्मानुभवी गुरुपुत्र असल्याने या विषयासंबंधीचे उपनिषदाधारित मार्गदर्शन करण्यास त्यांच्या इतका अधिकारी पुरुष मिळणे कठीण. नैतिक सद्गुण संपादन करणे ही परमार्थाची पूर्वतयारी होय. त्या पुढील पायरी म्हणजे योग्य सद्गुरुंकडून त्यांना शरण जाऊन उपदेश वा मार्गदर्शन घेणे. 'तद् विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्।' असे या विषयी मुंडकोपनिषदाचे वचन आहे. गुरु मात्र श्रोत्रिय म्हणजे शास्त्रवेत्ता आणि ब्रह्मनिष्ठ म्हणजे आत्मानुभवी असला पाहिजे. पराविद्या म्हणजेच अध्यात्म विद्या. ती प्राप्त करण्यास गुरुप्रमाणे शिष्यही अधिकार संपन्न असला पाहिजे. विवेक, वैराग्य, शमदमादिसाधन आणि मुमुक्षुत्व यांनी युक्त शिष्यच आत्मज्ञानाचा-साक्षात्काराचा-अधिकारी होय. केवळ बुद्धिमत्ता पुरेशी नाही. प्रणवोपासना, योगाभ्यास व ईश्वर आणि सद्गुरु यांच्यावरील पराभक्ती ही प्रमुख साधने (साधना) होत. ज्ञान म्हणजे साक्षात्कार हे तर साध्यच आहे. ईश्वर सर्व विश्वात ओतप्रोत भरून राहिला आहे. त्याचा साक्षात्कार म्हणजे विश्वात्मैक्यानुभूती 'जें जें भेटें भूत । तें तें मानिजे भगवंत ।' असे ज्ञानेश्वर सांगतात. 'ईशावास्यमिदं सर्वम्।', 'वासुदेवः सर्वम् ।', 'सर्व खल्विदं ब्रह्म ।' - या विधानांमधून व्यक्त केलेल्या सत्याचा अनुभव घेणे हेच आत्मानुभवाचे स्वरूप आहे. कारण 'आत्मा' हा ब्रह्म वा ईश्वर स्वरूप आहे. म्हणून ईशोपनिषदात 'यस्मिन् सर्वाणिभूतानि आत्मैवाभूत् ।' असे आत्मसाक्षात्कारी पुरुषाविषयी म्हटले आहे. या संदर्भात गुरुदेवांनी स्वानुभूतीच्या आधारे योगमार्गातील रूप, रंग, नाद, तेज यांच्या अनुभवाचा उल्लेख केला आहे. पण ही आत्मानुभूतीची पूर्वचिन्हे असल्याचे ते सांगतात. आपल्या ब्रह्मत्वाची अपरोक्ष अनुभूती हीच आत्मानुभवाची परिसीमा होय. असा आत्मसाक्षात्कार (ईश्वर-साक्षात्कार वा ब्रह्मसाक्षात्कार) ज्यास होतो तो महापुरुष संपूर्णपणे दुःखमुक्त होऊन ज्ञानेश्वरांच्या शब्दात 'स्वानंद साम्राज्याचा चक्रवर्ती' होतो. हेच 'उपनिषद्रहस्य' होय !

**'नव्य उपनिषदातील तत्त्वज्ञान' –** या परिशिष्ट स्वरूप प्रकरणात गुरुदेवांनी वरील सात प्रकरणांमधील विषयांची चर्चा नव्य-म्हणजे त्रयोदश उपनिषदां व्यतिरिक्त अन्य उपनिषदांच्या समीक्षणाच्या स्वरूपात केली आहे.

गुरुदेव रानडे यांनी आपल्या या महत्त्वाच्या ग्रंथात औपनिषादिक तत्त्वज्ञानाचे जे विधायक समालोचन केले आहे त्याचा धावता आढावा आपण येथवर घेतला. हे तात्त्विक समालोचन करताना त्यांनी हेतुपूर्वक पाश्चात्य तत्त्वज्ञानाची परिभाषा आणि पद्धती वापरली आहे. त्यामुळे पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या देशातील व देशाबाहेरील सर्वच अभ्यासकांना त्यांच्याच भाषेत व पद्धतीने औपनिषदिक तत्त्वज्ञानाचा ते यथार्थ परिचय

करून देऊ शकले. 'ए कन्स्ट्रक्टिव्ह सर्व्हे ऑफ उपनिषदिक फिलॉसॉफी' अर्थात 'उपनिषद्रहस्य' या प्रस्तुत ग्रंथामुळे त्यांना जागतिक कीर्ती मिळाली हे तर खरेच. परंतु या ग्रंथाचे थोरपण व वेगळेपण यात सामावले आहे की औपनिषादिक तत्त्वज्ञानाचे समालोचन करताना शुद्ध, तात्त्विक पद्धतीचाच त्यांनी वापर केला आहे आणि कोणत्याही भाष्यकाराचे अनुकरण न करता केवळ उपनिषदांचाच आधार घेऊन स्वानुभव आणि स्वतंत्र चिंतन यातून निघालेले निष्कर्ष त्यांनी आधुनिक परिभाषेत मांडले आहेत. परंतु एवढेच त्याचे महत्त्व नाही. अभ्यासकांना तर हा ग्रंथ उपयुक्त आहेच त्याबरोबर साधकांनाही त्यातून मार्गदर्शन मिळू शकते. आत्मसाक्षात्कार हाच मुळी उपनिषदांचा प्रतिपाद्य विषय असल्याने त्यात साधन-मीमांसाही येते व ती साधकांना विशेष मार्गदर्शक आहे. गुरुदेवांनी अभ्यासक व साधक अशा दोन्ही वर्गातील जिज्ञासूंना हा ग्रंथ (व अन्य ग्रंथही) लिहून जन्माचे ऋणी केले आहे. त्यांनी दाखविलेल्या आत्मसाक्षात्काराच्या (ईश्वर साक्षात्काराच्या) मार्गाने प्रत्यक्षात वाटचाल करून साक्षात्कार करून घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न करणे हाच, असल्यास, त्यांच्या ऋणातून मुक्त होण्याचा मार्ग असू शकेल किंवा तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे – 'काय द्यावे त्यांसी व्हावे उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥'

इति शम् ।

**प्रा. डॉ. शं. रा. तळघट्टी**
गणंजय सोसायटी, आझाद नगर, पुणे ४११०२९.

# ब्रह्मसूत्रे वेदांताचे स्वरूप : गुरुदेव

**प्रा. अजित कुलकर्णी**

*बी.ए. (तत्त्वज्ञान), एम.ए. (तत्त्वज्ञान) (समाजशास्त्र) पीएच.डी. काम सुरू. रजिस्ट्रार बी. एम. सी. सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली २५ वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान. श्रीज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इ. गाढा अभ्यास. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक. धर्मभूषण पदवी - श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्य (पुरी) १९९६.*

गुरुदेवांनी तत्त्वज्ञानाचा अत्यंत सखोल तसेच चिकित्सक अभ्यास केला आहे. ब्रह्मसूत्रांवर मत देताना गुरुदेव म्हणतात,

'उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि भगवत्गीता या तीन कोनशिलांच्या आधारावरच वेदांतांच्या अनेक मतांची इमारत उभारली आहे.'

## ब्रह्मसूत्रे

आद्य जगद्गुरु शंकराचार्यांचे बादरायणाच्या वेदान्त सूत्रांवर, शारीरभाष्य अथवा शांकर ब्रह्मसूत्रभाष्य या नावाने प्रसिद्ध आहे. वेदातील तत्त्वज्ञान उपनिषदात आले आहे. उपनिषदाचा विचार अत्यंत मोजक्या व थोडक्या शब्दात, बादरायणाय व्यासांनी आणले ते ब्रह्मसूत्र. ब्रह्माचे ज्ञान करून देणारे एक सूत्र ! यावर शंकराचार्य, रामनुजाचार्य, वल्लभाचार्य, मध्वाचार्य यांनी आपापले चिंतन या सूत्रांवर व्यक्त केले आहे. हे प्रमुख तत्त्वचिंतक होत. इतर अभ्यासकांनी ही मते व्यक्त केली आहेत.

विद्वानांच्या मते तीन व्यास आहेत; बादरायण व्यास, व्यास, पाराशर व्यास असे मानतात. तथापि आपण तत्वचिंतनाचा अभ्यास पहावा. या वादात पडण्याचे कारण नाही.

शंकराचार्यांचे भाष्य महत्त्वाचे आहे. या भाष्याला बादरायण ब्रह्मसूत्र म्हणतात. याचे एकूण चार अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायात चार पाद (विभाग) आहेत. पहिल्या अध्यायात जगाचे कारण ब्रह्म आहे, हे उपनिषदातील वाक्यांचा समन्वय करून दाखविले आहे. दुसऱ्या अध्यायात ब्रह्मकारणवादावर इतर स्मृतिकारांचे व दर्शनकारांचे आक्षेप मांडले आहेत व त्यांचे निरसन केले आहे. तिसऱ्या अध्यायात ब्रह्मप्राप्तीच्या साधनांचे विवेचन केले आहे आणि चवथ्या अध्यायात मोक्षरूप फलाचे विवेचन आहे. म्हणजेच चार सिद्धान्त ब्रह्मसूत्रे व्यक्त करतात –

१) ब्रह्म हे एकच पारमार्थिक तत्त्व आहे.

२) तेच ब्रह्म सर्व जगाचे कारण आहे. अर्थात जगाचे उत्पत्ती, स्थिती, व लय त्यावरच अवलंबून राहतात. तेच जीव हे परब्रह्माचे स्वरूप आहे.

३) या ब्रह्माच्या ज्ञानापासूनच जीवाला मुक्ती प्राप्त होते. ही तीन बादरायण सूत्रात सांगितलेली मूलभूत तत्त्वे आहेत. या शिवाय तत्त्वज्ञानाला शास्त्राचे नित्यत्व, प्रामाण्य, तर्काचे अप्रामाण्य व शास्त्राचे प्रामाण्य जीवाचे परमात्म्याचे ठिकाणी आभासत्व, परमात्म्याचे सर्व भूतांचे ठिकाणी अंतर्यामी रूपाचे वास्तव्य आहे. तसेच जग हे परब्रह्माचे कार्य आहे.

४) तसेच कर्माचे महत्त्व व ज्ञानास त्याचा उपयोग दाखवून प्रतीकोपासनेचे पर्यवसान ब्रह्मज्ञानात होते व ब्रह्मसाक्षात्कार रूपाने मोक्ष प्राप्त होतो हे ते सांगतात. म्हणजेच मुक्ती हा परमपुरुषार्थ आहे. तो ब्रह्मज्ञानाने मिळतो असे चार सिद्धान्त होत.

## गुरुदेवांचे चिंतन

गुरुदेव म्हणतात, बादरायणाचार्यांचे तत्त्वज्ञान समन्वय करणारे आहे. त्यांच्या मते हे बुद्धिवादाचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. गुरुदेव यातील दोन उदाहरणे प्रामुख्याने सांगतात –

१) (सूत्र – ३.४.३६-३९) मध्ये नमूद केल्याप्रमाणे आश्रमसंस्था प्रचलित असतानाही बादरायणाचार्य म्हणतात, की मनुष्याने खटपट करून कोणत्या तरी आश्रमात (ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम इ.) राहावे हे खरे असले, तरी अनाश्रमींना विद्येचा अधिकार नाही असे मात्र नाही. त्यांना आश्रमकर्मे करता आली नाहीत तरी इतर मार्गांनी विद्याधिकार प्राप्त होतो. हा एक समन्वय !

२) (सूत्र – ४.२.१९-२०) ज्ञानी मनुष्याचा मृत्यू रात्री अथवा दक्षिणायनात झाल्यास तो मुक्त होत नाही. या अंधश्रद्धेविरुद्ध बादरायणाचार्य म्हणतात की, असे नाही. तो केव्हाही मृत्यू पावो त्यात विद्येचे फळ मिळतेच. हा एक समन्वय ! यावरून गुरुदेवांना बुद्धिवाद व हा युक्तीवाद पटला होता. प्रामुख्याने माध्व, रामानुज व शांकर या तीन वेदान्ताच्या प्रमुख पंथांपैकी प्रत्येक पंथाने जो अर्थ पाहिला त्याचा तौलनिक अभ्यास ब्रह्मसूत्राचे चिंतनात गुरुदेव करतात. हे सर्व करताना उपनिषदातील विचारांचाही मागोवा गुरुदेव घेत आहेत. त्यामुळे ब्रह्मसूत्राचे चिंतन अधिक खुलून गेले आहे.

तरी गुरुदेव शंकराचार्यांचे मतात अधिक विचार करताना दिसतात. म्हणून गुरुदेव म्हणतात, इंद्रियगोचर सत्य हे अतिंद्रिय सत्याहून भिन्न आहे. आणि पारमार्थिक सत्य व व्यावहारिक सत्य ही परस्परभिन्न आहेत या शंकराचार्यांच्या मताशी गुरुदेव सहमती दर्शवितात.

ब्रह्मसूत्राच्या माध्यमानी तत्त्वचिंतनाची जागृती होते. जीव, जगत् व ब्रह्म यांचे हे चिंतन आहे. या ब्रह्मसूत्र चिंतनात या तीनही बाबींचा समन्वय गुरुदेवांनी योजला आहे.

**प्रा. अजित कुलकर्णी**

६९५, नारायण पेठ, पुणे ४११ ०३०.

फोन : ४४८७०३०

***• प्रवचन - सद्गुरुंनी सांगितलेले वचन म्हणजेच उपदेश, याचा जो तंतोतंत अर्थ, निरूपण, विस्तार करणे म्हणजे प्रवचन !***

# गुरुदेव रानडे व साक्षात्कार मार्ग


**सौ. सुरबाला राजाराम जोशी**

*एम्.ए.एम्.एड., सेवानिवृत्त प्राध्यापिका. गुरुदेवांच्या 'Constructive Survey of Upanishadic Philosophy' या ग्रंथातील उपनिषदातील उताऱ्यांचे स्पष्टीकरण, अनुवाद व चिंतन अशी संकलनात्मक पुस्तिका 'उपनिषद्‌रहस्य' याचे संपादन केले. भागवत ग्रंथातील कथांचा आधुनिक कालाला अनुसरून संदर्भ देऊन त्याचे ४३ लेखांक 'विजयंत' साप्ताहिकात प्रसिद्ध. निंबाळ येथे व इतर धार्मिक संस्थांत आध्यात्मिक प्रवचने.*


## गुरुदेवांचा अल्प परिचय

डॉ. रा. द. रानडे आपल्या अनुयायी साधकांमध्ये गुरुदेव म्हणून अधिक परिचित आहेत. त्यांचा जन्म कर्नाटकातील जमखंडी येथे झाला. त्यांनी एम्.ए.ची पदवी मुंबई विद्यापीठातून विशेष योग्यतेने मिळवली. शालान्त परीक्षेतही त्यांनी संस्कृतची शंकरशेट शिष्यवृत्ती मिळवली होती. लहानपणापासून त्यांच्या मनाचा कल अध्यात्माकडे होता.

पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये ते तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर होते. त्यानंतर अलाहाबाद विश्वविद्यालयात प्रथम ते तत्त्वज्ञानाचे प्रमुख व नंतर उपकुलगुरू झाले. ही त्यांची संपूर्ण कारकीर्द आध्यात्मिक दृष्ट्याही वैशिष्ट्यपूर्ण झाली.

त्यांनी निंबाळ येथे अध्यात्म विद्यापीठाची स्थापना केली. तेथेच त्यांनी तत्त्वज्ञान व अध्यात्म या विषयांवर अनेक ग्रंथ लिहिले. The Creative Period of Indian Philosophy हे त्यांचे पहिले पुस्तक त्यांनी डॉ. बेलवलकरांच्या सहकार्याने लिहिले. त्यानंतर त्यांचा गाजलेला जागतिक कीर्तीचा ग्रंथ - The Constructive Survey of Upanishadic Philosophy. हा ग्रंथ वाचून जर्मनीतील विद्वानांची गुरुदेवांना पत्रे आली की, 'आपल्या या ग्रंथावरून आमचा तत्त्वज्ञ कांट आम्हाला चांगला समजला.'

यानंतरचे त्यांचे ग्रंथ - Pathway to God in Marathi, Hindi, Kannad Literature. हे त्यांचे ग्रंथ सामान्यजनांसाठी फार उपयुक्त आहेत. कारण त्या त्या भाषांतील संतांचे विपुल वाङ्मय पाहिल्यावर त्यातले नेमके काय घ्यावे याबद्दल सामान्य माणसाच्या मनात संभ्रम निर्माण होतो. गुरुदेवांनी या तीनही भाषांमधील संतांच्या आध्यात्मिक पदातील नेमके काय अभ्यासावे, त्यामागे कोणती दृष्टी असावी हे दाखवून दिले. त्यांनी भगवद्‌गीतेवरही एक ग्रंथ लिहिला.

गुरुदेव साक्षात्कारी संत होते, स्कॉलर होते. तत्त्वज्ञानी होते व गाढ पांडित्यपूर्ण लेखक होते. या चार गोष्टी एकत्र असलेले व्यक्तिमत्त्व विरळच !

## नाममार्ग

गुरुदेवांनी साधकाला नामस्मरणाचा मार्ग दाखवून दिला. हा मार्ग ईश्वराकडे नेतो. ही एक महान यात्रा आहे. या मार्गाच्या यात्रेकरूला नाम संपादन करण्यासाठी गुरू शोधावा लागतो. सद्‌गुरुंकडून सबीज नामाची प्राप्ती झाल्यावर नामसाधना सुरू करण्यापूर्वी काही तयारी करावी लागते. ही तयारी शारीरिक, मानसिक, नैतिक व साक्षात्कारी पातळ्यांवरची आहे. या शिवाय साधकाला ईश्वरप्राप्तीची तळमळ वाटली पाहिजे. म्हणजे ही यात्रा पूर्ण सफल होते, असे गुरुदेवांचे सांगणे आहे.

## सद्‌गुरूंचा शोध

गुरू म्हणजे अध्यात्ममार्गाचा वाटाड्या. हा प्रथम शोधावा लागतो. गुरूंना भेटण्याची अत्यंत तळमळ लागली की ते भेटतात. तेच आपली जीवनरूपी नाव सुखरूप पैलतीराला लावतात; पण ते ओळखायचे कसे ? त्याचे विशेष गुरुदेव सविस्तर सांगतात. सद्‌गुरू निर्भय असतो. त्याच्या मनात आनंदाचा डोह असतो. आपल्या शिष्याच्या व ईश्वराच्या मध्ये येणाऱ्या अडचणी तो दूर करतो. शिष्याच्या अज्ञानरूपी अंधाराचा पडदा तो दूर करतो. आपण अनुभवलेले अध्यात्मातील अनुभव आपल्या शिष्याला अनुभवता यावेत असे तो करतो. शिष्याला तत्काळ आपल्यासारखे करतो.

## अंतरंग साधना

हे सर्व साधकाला प्राप्त करून देण्यासाठी सद्‌गुरू नामाचे साधन त्याला देतात. सद्‌गुरूंनी दिलेले नाम त्यांच्या उच्च अनुभूतीतून, त्यांच्या अंतःकरणातून स्फुरलेले असते. त्यात फार मोठे सामर्थ्य असते. म्हणून गुरुदेव त्या नामाला सबीज नाम म्हणतात. हे नामच आत्मा व ईश्वर यांना एकत्र आणते. ते सगुण व निर्गुण या दोहोंना एकत्र आणण्याचे महान कार्यही करते. म्हणून त्याला उभयप्रबोधक म्हटले आहे. असे हे नामाचे माहात्म्य सांगितल्यावर याच ठिकाणी गुरुदेव साधकाला जागरूक करतात. ते त्याला सुचवतात, की इतका जरी नामाचा महिमा असला तरी ते नाम यांत्रिकपणे आयुष्यभर घेत राहिले तर त्याचा काही उपयोग नाही. जिभेने नाम घेत असताना त्यात आत्म्याने सहयोग द्यायला हवा. नामस्मरण करीत असतानाच चांगले विचार व चांगली कृती केली पाहिजे. मला ईश्वरदर्शनावाचून दुसरे काहीही नको असे त्याला मनापासून वाटले पाहिजे. हे साधण्यासाठी इंद्रियांचे दरवाजे बंद करायला नकोत. श्वासाचे नियमन करणे नको. सर्व इंद्रियांचा ईश्वरदर्शनासाठी उपयोग करून घ्यायचा. ईश्वरच पाहावा, त्याचे गुणगानच ऐकावे, तोच ध्यावा, तोच गावा, असे होणे हीच सहजसमाधी. हीच अंतरंगसाधना असे गुरुदेव म्हणतात.

## चित्ताची एकाग्रता

अशी अंतरंगसाधना नामाने साधायची तर त्यासाठी मनाची एकाग्रता झाली पाहिजे. मन हे चंचल व अस्थिर आहे, हट्टी आहे, चुकार आहे अशी, अर्जुनाने भगवद्‌गीतेत तक्रार केली आहे व भगवंतांनी ती मान्य केली आहे; पण असे बारा वाटा धावणारे मनसुद्धा एकाग्र करण्याचा मार्ग गुरुदेव सांगतात. मन एकाग्र झाले असे केव्हा म्हणता येईल याची खूण त्यांनी प्रथम सांगितली आहे. मन एकाग्र करू लागताच देवाचे रूप दिसू लागणे ही खरी एकाग्रता.

एकाग्रता कशी साधावी हे स्पष्ट करताना गुरुदेवांनी कबिराच्या पदातील तीन उदाहरणे साधकांसमोर ठेवली आहेत.

डोंबाऱ्याच्या खेळातला एक डोंबारी खाली उभा राहून ढोलके वाजवत असतो. दुसरा डोंबारी डोक्यावर भले मोठे ओझे घेऊन वर उंच बांधलेल्या

दोरीवरून तोल सावरत चालत असतो. त्या वेळी त्याचे सारे लक्ष तोल साधण्यासाठी एकाग्र झालेले असते. साधकाच्या डोक्यावरही प्रापंचिक चिंतांचे मोठे ओझे असते; पण त्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून सर्व लक्ष त्याने ईश्वराच्या ठिकाणी केंद्रित करावे.

एकाग्रतेसंबंधी दुसरे उदाहरण पवनाशी नागाचे दिले आहे. त्याच्या डोक्यावर रत्न असते. तेच त्याचे सर्वस्व. हा नाग कधी कधी पहाटेच्या वेळी गवतावरचे दवबिंदू चाटण्यासाठी रानात जातो. रत्न काढून समोर ठेवतो. दवबिंदू चाटत असतानाही त्याचे संपूर्ण लक्ष त्या रत्नावर असते. रत्नच त्याचे सर्वस्व. ते गमावले तर आपला जीव जाईल असे त्याला वाटते. तशी साधकाची एकाग्रता असावी. प्राण जावो पण आत्मरूपी रत्नावरून लक्ष विचलित होऊ देणार नाही. या संसारात हाताने काम करायला हरकत नाही; पण मन मात्र नामापासून, देवापासून ढळणार नाही. ही एकाग्रता.

तर एकाग्रतेचे तिसरे उदाहरण पतीबरोबर देह-त्याग करायला निघालेल्या सतीचे. तिचे पतीवर कर्तव्याच्या जाणिवेने ओतप्रोत असे प्रेम आहे. म्हणूनच पतीच्या कलेवराबरोबर ती या जगताचा निरोप घ्यायला उत्सुक आहे. त्या वेळी तिच्याभोवती तिचे आईवडील, भावंडे, सासरचे आप्तसंबंधी सगळे जमलेले असतात; पण त्यांच्याकडे तिचे मुळीच लक्ष नसते. तिचे संपूर्ण लक्ष पतिमुखावर खिळून असते. पतीच्या धगधगणाऱ्या चितेत ती आत्मदहन करते. तसे साधकाने ईश्वराच्या उंबरठ्यावर आपल्या जीवनाची आरती करायची आहे. हे करत असताना त्याला दिव्य तेज दिसेल. अनाहत ध्वनी ऐकू येईल. सुगंध दरवळेल. या सर्वांच्या अस्तित्वात राहूनच त्याला आत्मसमर्पण करायचे आहे.

येथपर्यंत गुरुदेवांनी नाममार्गाच्या यात्रेतील अंतरंग साधना व मनाची एकाग्रता यासंबंधी विचार सांगितला. यानंतर त्यांनी नामाची दीर्घकालीनता, नैरंतर्य व सत्कार यांचे वर्णन केले. या संबंधी पतंजलीचेही सूत्र आहे –

*स तु दीर्घकालनैरंतर्यसत्कारसेविता दृढभूमिः ।*

साधकाने नामसाधना दीर्घकाल, निरंतर व पूर्ण समर्पण भावनेने करायची आहे.

## दीर्घकाल नामस्मरण

नामस्मरण किती काळ करायचे याला उत्तर देताना गुरुदेवांचे ज्येष्ठ गुरुबंधू अंबुराव महाराज यांनी सांगितले - 'जीवनाच्या अंतापर्यंत, शेवटच्या श्वासापर्यंत नाम घ्यायचे आहे.' क्षणाक्षणाने आयुष्याचा नाश होतो आहे. गेलेला क्षण पुन्हा कधीच परत येत नाही. छिद्राच्या घटातून थेंबथेंब पाणी पाझरावे तसे आतापर्यंत व्यर्थ आयुष्य जिथे घालवले त्या स्थानाची, त्या काळाची व त्या परिस्थितीची नीट पाहाणी करा. पश्चात्ताप करा. म्हणजे उरलेले आयुष्य कसे घालवावयाचे याची साधकाला सुस्पष्ट कल्पना येईल. आता फार उशीर झाला, आता यापुढे साधना करून काय होणार, असे मनातही आणू नका. असे साधकाला कळवळून सांगताना गुरुदेव एका आशावादी हिंदी कवीच्या ओळी पुष्टीदाखल सांगतात –

*अब भी नही बिगडा है कुछ । थोडा समय बाकी रहा ।*
*कस कमर मन बस में कर । देखो सुबाई आगई ॥*

जीवनात माणूस नश्वरतेच्या मागे धावतो व मुख्य प्राप्तव्य जो ईश्वर त्यालाच विसरतो. तसे करू नका. ईश्वरावर, नामावर लक्ष केंद्रित करा असे संत वारंवार सांगतात.

## नैरंतर्य

नामसाधना निरंतर करायची आहे. याच क्षणापासून व येथून पुढे एकही क्षण न दवडता करायची आहे. जीवनातील प्रत्येक क्षणाचा हिशेब ठेवला पाहिजे व त्यातील एकही क्षण नामाविना वाया तर जात नाही ना, यावर सतत लक्ष ठेवले पाहिजे असे गुरुदेव आवर्जून सांगतात. झोपडीला आग लागणार आहे, ती भस्मसात होणार आहे; त्यापूर्वीच धडपडून उठून त्यातल्या मौल्यवान वस्तूंची काढाकाढी केली पाहिजे. त्याचप्रमाणे हा देह बुडबुड्यासारखा नश्वर आहे. केव्हा त्याचा अंत होईल नेम नाही. त्यापूर्वीच प्रत्येक क्षणाचा आध्यात्मिक उन्नतीसाठी उपयोग करून घ्यायला हवा. हेच मानवी जीवनाचे खरे ध्येय आहे. ते गाठण्यासाठी करायची कर्तव्ये आणखी पुढे ढकलू नका. किंवा आणखी कुठे परक्या प्रदेशात जाऊन ते साधण्याचा बेत आखू नका. याच क्षणी व याच ठिकाणी ते साधा असा गुरुदेवांचा उपदेश आहे.

## सत्कार

नामस्मरण दीर्घकाल व निरंतर करून त्यात सफलता प्राप्त करून घ्यायची आहे. ईश्वराच्या पसंतीला उतरायचे आहे.

***'साई के मन भावै'***

हे अंतिम साध्य आहे. त्यासाठी विणकर संतांनी चरख्याचे रूपक रचले. या आध्यात्मिक चरख्याच्या सहाय्याने नामसाधना सफल होते. सूत काढायला सुरुवात करण्यापूर्वी मनरूपी कापूस निवडून, पिंजून घ्यावा लागेल. मनातील विकार, वासना काढून टाकून ते शुद्ध करावे लागेल. नंतर सूत काढायचे. चरखा चालू झाला की त्याकडे पूर्ण लक्ष द्या. आजूबाजूला काय चाललय, कोण येतय जातय काही पाहू नका. एकटक सूतच कातत राहा. या सुताचे वस्त्र विणताना उभे व आडवे धागे घ्यावे लागतील. भक्तीचा एक धागा, दुसरा धागा श्वासोच्छ्वासाचा. हेच उभे-आडवे धागे. अशा रीतीने श्वासात नाम घेणे हाच अजपाजप. मात्र भक्तिप्रेमाने हे नाम घ्या. यांत्रिकपणे नको. असे अध्यात्मप्रेरित नामस्मरण चालू असताना आध्यात्मिक प्रेमभाव अंतरंगात जागृत होतो. आध्यात्मिक एकाग्रता व ईशप्रेम या दोन गोष्टी एकत्र जमल्या की डोळ्यांसमोर विविध रंगांचे अनुभव येऊ लागतात. याचेच स्पष्टीकरण गुरुदेवांचे सद्‌गुरू भाऊसाहेब महाराज उमदीकर यांनी केले आहे - **'प्रेम प्रीतीने बांधावे'** - श्वासाच्या धाग्याने ईशप्रेमाच्या धाग्याला बांधून ठेवा.

हे विणलेल्या धाग्याचे रूपक आणखी पुढे नेऊन गुरुदेव स्पष्ट करतात की वस्त्र विणताना एक जरी धागा चुकला तरी वस्त्रात फट दिसते. त्याचा एकसंधपणा बिघडतो. तसे दिवसाच्या चोवीस तासांची मिनिटे काढली व प्रत्येक मिनिटाला पंधरा श्वासोच्छ्वास धरले तर चोवीस तासांत २१,६०० होतात. हे सर्वच्या सर्व श्वास नामासाठी उपयोगात आणलेत म्हणजे आध्यात्मिक वस्त्र उत्तम विणले जाईल. या वस्त्राला कोणी पितांबर नाव देतो तर कोणी चादर. नाव कोणतेही असो पण हे वस्त्र जास्तीत जास्त उत्तम विणून विनम्र भावाने ईश्वराला अर्पण करायचे आहे. हाच उच्चतम समर्पण भाव. हाच सत्कार. हे वस्त्र ईश्वराने शुद्ध स्वरूपात आपल्याला दिले आहे. आपणही जसेच्या तसे त्याला परत दिले पाहिजे. ही तुझीच वस्तू तुला परत करीत आहे असा भाव हवा. अशा रीतीने ही आध्यात्मिक कृती केल्याने जर आपले जीवन ईश्वरार्पण झाले तर तेच जीवनाचे सार्थक, तेच जीवनाचे साफल्य !

## निंबाळ : श्रेष्ठ अध्यात्मपीठ

ही गुरुदेवांची नामसाधनेसंबंधी शिकवण. निंबाळ येथे अध्यात्म-पीठ स्थापन करून गुरुदेवांनी आश्रमाची दिनचर्या स्वतः आचरून दाखविली. अनेकांना हा मार्ग दाखवला. नामस्मरण करीत बसण्याला निंबाळ येथे 'नेमाला बसणे' म्हणतात. असा नेम दिवसभरात नऊ तास करण्यास 'कट्टाचा नेम' म्हणतात. आजही निंबाळात नऊ तासांचा नेम, काकडारती, दुपारची आरती, सायंकालीन आरती व रात्रीची शेजारती आणि भजन अखंड चालते. संपूर्ण श्रावणमास, तसेच सद्गुरुनाथ भाऊसाहेब महाराज, सद्गुरुनाथ अंबुराव महाराज, सद्गुरुनाथ गुरुदेव रामभाऊ महाराज यांच्या तिथीस या काळात मोठ्या प्रमाणात निंबाळ येथे उत्सव होतात. उत्सवाच्या काळातही नऊ तासांचा साधकांचा सामुदायिक नेमच असतो. पहाटे ३।। ते ५।। दोन तास, सकाळी ८ ते १२ चार तास, सायंकाळी ३ ते ५ दोन तास व ६।। ते ७।। एक तास असे नेमाचे नऊ तास असतात.

साधकाने निंबाळला येऊन साधना करावी. नामातले प्रेम येथून जाताना बरोबर न्यावे. घरीही साधना करावी. नेम वाढवत वाढवत कट्टाचा नेम साधावा. हळूहळू आत्मोन्नती करून घ्यावी असे गुरुदेवांचे आपल्या अनुयायांना आग्रहाचे सांगणे होते. त्यांच्याच अत्यंत आवडत्या सिद्धांताने या लेखाचा शेवट करते -

ते सांगतात –

**'नीती हा आध्यात्मिक जीवनाचा पाया आहे व साक्षात्कार हा त्याचा कळस आहे.'**

**सौ. सुरबाला राजाराम जोशी**
'सावली' मंगलमूर्ती कॉलनी, दक्षिण शिवाजीनगर, सांगली.



## अशी आहे संतवाणी

देव नाही देवाऱ्यात देव नाही मंदिरात
परी मनी समाधान मिळे मूर्ती पूजनात
एक महानशी शक्ती रूप आहे निसर्गाचे
निसर्गाची सारी कृती रूप आहे ते देवाचे
त्याचे अस्तित्व जाणवते जीवनात पुन्हः पुन्हा
मात्र आपण अजाण जाण नाही मुळी कुणा
त्याच्या अस्तित्वाची रूपें निसर्गात दीसताती
त्याने केले हे निर्माण जगी दिसती अद्‌भुत गोष्टी
निसर्गाची शिकवण समभाव दाखवावा
हेच देवत्व लक्षण भेदभाव तेथे नसावा
भुकेल्याला द्यावा घास तान्हेल्याला द्यावे पाणी
संत नामदेव यानी हेच गायिलेले भजनी
कुणाच्याही संकटसमयी मदतीचा द्यावा हात
मात्र अपेक्षेवाचूनी आपुलकी दाखवीत
अनाथांचे आशिर्वाद हेच जीवनाचे धन
माणुसकीच्या वागण्याने त्यास येते देवपण
त्याच्यासाठी नको धन नको त्याच्यासाठी श्रम
चार घास देण्यासाठी मोठे असावे पण मन
अकस्मात संकट समयी कुणीतरी मदतीस येतो
अनामिकाच्या रूपाने देव असाही भेटतो
कलियुगात दुर्मिळ आपुलकी वागण्यात
जो तो आहे गुंतलेला आपुलेच हित करण्यात
परी कलीयुगातही कुठे तरी देव दिसतो
सज्जनांच्या मदतीने देव असाही भेटतो
अशा निर्मळ सज्जना भेटतसे चक्रपाणी
अशी आहे संतवाणी सांगितले ज्ञानेशानी

**सौ. कमला दातार**

# साक्षात्काराचा महाभाष्यकार श्रीगुरुदेव रा. द. रानडे

**श्री. नरहरी वि. कुलकर्णी**

*बी.ई.इलेक्ट्रिकल. २० वर्षे मिलिटरी इंजिनिअरींग सर्व्हिस नोकरी व स्वेच्छानिवृत्ती. ३० वर्ष स्वतंत्र व्यवसाय. १९७३ साली श्रीगुरुदेवांच्या समाधीवर नाम घेतले.*

## अंतिम सत्याचा शोध - मानवाची अथक तृष्णा.

अंतिम सत्याचा शोध घेण्याचा मानवाचा प्रयत्न वेद कालापासून आजतागायत कार्यरत आहे. एक गट तत्त्वज्ञान्याचा आहे तर दुसरा आहे वैज्ञानिकांचा. अंतिम सत्याविषयी पडणाऱ्या प्रश्नांपैकी काही महत्त्वाचे खालील प्रमाणे –

अंतिम सत्य कोणते आहे? आत्मा, ब्रह्म म्हणजे काय? ह्याबद्दल तर्कशुद्ध सिद्धांत मांडता येतील का? मग हे सिद्धांत पडताळून पाहण्याचा मार्ग कोणता? आचरण कसे ठेवल्यास ब्रह्माची गाठ पडू शकेल? ह्या सर्वांचे फळ जे साक्षात्कारात प्रकटेल व ज्यामुळे नीतिशुद्ध आचरणाला परिपूर्णता लाभेल, तो साक्षात्कार कसा घडेल?

ह्याविषयी समर्थ रामदासांनी म्हटले आहे –

*"पापाची खंडणा जाली । जन्मयातना चुकली ।*
*ऐसी स्वये प्रचीत आली । म्हणिजे बरे ॥*
*परमेश्वरास वोळखिले । आपण कोणते कळले ।*
*आत्मनिवेदन जाले । म्हणिजे बरे ॥*
*ब्रह्मांड कोणे केले । कासयाचे उभारले ।*
*मुख्य कर्त्यास वोळखिले । म्हणिजे बरे ॥*

(दासबोध दशक १०, स. ८ ओ. २१ ते २३)

## साक्षात्काराची व्याप्ती

श्रीगुरुदेवांच्या साक्षात्कार शास्त्राच्या अभ्यासाचा विचार करताना त्यांनी त्यांच्या पहिल्या ग्रंथापासून विवेचनास कशी सुरुवात केली हे पाहून इतर ग्रंथांच्या आधारे साक्षात्कारातील साक्षात्काराचे तत्त्वज्ञान, मानसशास्त्र इ. प्रश्नांचे कसे सानुभव स्पष्टीकरण केले, याचा विचार आपण थोडक्यात करणार आहोत.

श्रीगुरुदेवांनी त्याचे विवेचन 'A Constructive Survey of Upanishadic Philosophy' ह्या त्यांच्या पहिल्या ग्रंथामध्ये अत्यंत विस्तृतपणे केले आहे. ते प्रथम पाहून नंतर त्यांच्या इतर ग्रंथांवरून साक्षात्काराबद्दल इतर प्रश्नांचा उहापोह करण्यात येईल.

## सर्व काही आत्माच होय

बृहदारण्यकोपनिषदात याज्ञवल्क्य आपली पत्नी मैत्रेयी हिला सांगत आहेत –

'हे सर्व ब्राह्मणत्व, क्षत्रियत्व, हे लोक, हे देव, ही भूते व हे सर्व हा प्राकृत आत्मा आहे. जसे काठीने वाजविल्या जाणाऱ्या दुंदुभीचे दूरवर पसरणारे ध्वनी जाणण्यास कोणी समर्थ होत नाही पण हे शब्द कशाचे आहेत असे म्हणून त्यांच्या उत्पत्तिस्थानापाशी जाऊन किंवा पुष्कळ परिचयामुळे ते दुंदुभीचेच आहेत हे ओळखून दुंदुभीच्या वादनाच्या ज्ञानाने हा शब्द दुंदुभीचा आहे, असे ज्ञान होते. जसे शंखाचे बाह्य शब्द ग्रहण करण्यास मनुष्य समर्थ होत नाही, पण शंखाच्या ग्रहणाने किंवा शंखवादनाच्या ग्रहणाने हा शंखाचा शब्द आहे, असे ज्ञान होते. जसे वीणा वाजविली जाऊ लागली असता तिचे बाह्य शब्द ग्रहण करण्यास कोणी समर्थ होत नाही. पण वीणेच्या किंवा वीणा वादनाच्या ग्रहणाने तो शब्द गृहीत होतो.' (बृ.२ ४.६.९)

ह्यावर श्रीगुरुदेव म्हणतात, 'तद्वत् जर एखाद्यास बाह्य सृष्टीचे ज्ञान, बाह्य सृष्टी म्हणून ग्रहण करण्यास येत नसेल तर मन अथवा आत्म्याचे ज्ञान ग्रहण करून त्यास बाह्य सृष्टीच्या ज्ञानाचे आकलन घडेल. असे वरील परिच्छेदात जरी स्पष्ट नसले तरी अभिप्रेत आहे. आत्म्याची तुलना दुंदुभी वादकाशी, शंख फुंकणाऱ्याशी व वीणा वाजविणाऱ्याशी केली असून ज्याच्या तर्फे आत्म्यास बोध घडतो त्या मनाची तुलना दुंदुभी, शंख व वीणा ह्यांच्या बरोबर केली आहे. बाह्य सृष्टीची तुलना ह्या तिन्हीतून निघणाऱ्या ध्वनीशी केली आहे.'

## मनच उन्मन होते

हेच उपनिषद दुसरे ठिकाणी म्हणते

*'यत्किंच विजिज्ञास्यं मनसस्तद्रूपं*
*मनो हि विजिज्ञास्यं मन एनं तद्भूत्वावति ॥' (बृ.१-५-९)*

अर्थ : ज्याचे काही ज्ञान घडावयाचे असते ते मनाचेच रूप होय कारण मनालाच माहीत करून घ्यावयाचे आहे. जे काही जाणून घ्यावयाचे आहे तेच बनून मन त्याचे रक्षण करते.

## आत्म्यास कोण जाणू शकतो? आत्माच !

ह्याच उपनिषदात दुसरे ठिकाणी याज्ञवल्क्य मैत्रेयीस म्हणतो, 'आत्मा एकच ज्ञाता आहे. त्याचे ज्ञान त्याच्याखेरीज इतरांना घडणे शक्य नाही.'

*'अलं वा अर इदं विज्ञानाय'*

बृ.२.४.१३

हे (ब्रह्म) निश्चितपणे समजू शकते. (ब्रह्मास ज्ञान होते.) कारण ज्या अविद्यावस्थेत द्वैत भासते तेव्हा इतर वास घेणारा, इतर गंधाला हुंगतो; तेव्हा इतर दृष्टा दुसऱ्या रूपाला पाहतो, तेव्हा इतर श्रोता, इतर शब्दाला ऐकतो. तेव्हा इतर वक्ता इतर शब्दाला बोलतो. तेव्हा इतर मनन करणारा इतर मन्तव्याचे मनन करतो; तेव्हा इतर विज्ञाता इतर विज्ञेयाला जाणतो. पण ज्या विद्यावस्थेत या ब्रह्मवेत्याला सर्व आत्माच झाले तेव्हा कोणकोणत्या साधनाने गंधाचा वास घेणार? तेव्हा कोणत्या साधनाने कोणाला पाहणार? कोणत्या साधनाने कोणत्या शब्दाला ऐकणार? कोणत्या साधनाने काय बोलणार? कोणत्या साधनाने कशाचे मनन करणार? कोणत्या साधनाने कशाला जाणणार? ज्याच्या योगाने हे सर्व जाणले त्याला कशाने जाणावे? हे मैत्रेयी विज्ञात्याला कोणत्या (कशाने) साधनाने जाणावे?

ह्याच उपनिषदात आणखी एके ठिकाणी म्हटले आहे –

*'न दृष्टे र्द्रष्टारं पश्येर्न श्रुतेः श्रोतरं*
*श्रृणुयार्न मतेर्मतारं मन्वीथा न*
*विज्ञातेर्विज्ञातारं विजानीयाः । बृ. ३-४-२*

अर्थ : दृष्टीच्या द्रष्ट्याला तू पाहू शकत नाहीस, श्रुतीच्या श्रोत्याला तू ऐकू शकत नाहीस, विचार करणाऱ्याचा विचार तू करू शकत नाहीस, ज्ञानाच्या ज्ञात्याला तू जाणू शकत नाहीस. हा तुझा आत्मा सर्वान्तर आहे. याहून दुसरे सर्व विनाशी आहे.

## आत्माच अंतीम श्रोता, द्रष्टा...

ह्यामुळे निर्माण होणारा प्रश्न म्हणजे मग पाहतो, ऐकतो, विचार करतो कोण?

त्यास उत्तर दिले आहे ह्या उपनिषदातच, **'अदृष्टो द्रष्टा, अश्रुतः श्रोता, अमतो मन्ता, अविज्ञातो विज्ञाता, नान्योऽतोऽस्ति द्रष्टा, नान्योऽतोऽस्ति श्रोता, नान्योऽतोऽस्ति मन्ता, नान्योऽतोऽस्ति विज्ञाता, एष त आत्मान्तर्याम्यमृतः, अतोऽन्यदार्तम्; ततो होद्दालक आरुणिरुपरराम.'**

बृ. ३.७.२३

अर्थ : तो अदृष्ट पण द्रष्टा, अश्रुत पण श्रोता. अमत पण मन्ता, अविज्ञात पण विज्ञाता आहे. याहून अन्य द्रष्टा नाही. याहून अन्य श्रोता नाही, याहून अन्य मनन करणारा नाही, याहून अन्य विज्ञाता नाही, तो, तुझा आत्मा अंन्तर्यामी व अमर आहे व अन्य सर्व विनाशी आहे. (त्यानंतर उद्दालक आरुगणि उपरम पावला.)

## ससंवित् - अस्तित्त्वाची अंतिम पायरी

याज्ञवल्क्य म्हणतो स्वसंविज, आपल्यात असणाऱ्या आत्म्याने स्वतःस जाणणे हे शक्य तर आहेच पण हेच अंतिम सत्य आहे व अस्तित्वाची अंतिम पायरी आहे. बृ. २.३.६ श्लोकांबद्दल श्रीगुरुदेव म्हणतात,

'तर आपल्यास असे दिसते... आत्म्यास जाणणे शक्य नाही कारण तो ज्ञानाचा अमर, कालातित ज्ञाता आहे व तो आपल्या व्यतिरिक्त दुसऱ्यास ज्ञानाची वस्तू होऊ शकत नाही.

पण ह्यामुळे एक मूळ प्रश्न उठतो. जरी असे गृहीत धरले की आत्माच कालातीत वस्तूंचा ज्ञाता आहे. त्यास जाणणारे दुसरे कोणीच नाही. तर मग निदान आत्म्यास स्वतःचे ज्ञान करून घेणे तरी शक्य आहे का? हा सूक्ष्म प्रश्न जेव्हा याज्ञवल्क्यास विचारण्यात आला तेव्हा त्यांनी ह्यावर टाकलेला दैदीप्यमान प्रकाश परत डोळे दिपवतो. याज्ञवल्क्य म्हणतो, 'ज्ञात्यास स्वतःचे ज्ञान करून घेणे शक्य आहे.' किंबहुना स्वतःचे ज्ञान, ससंवित् हीच अंतिम अस्तित्वाची पायरी आहे. आत्मा स्वतःसाठी ज्ञेय बनू शकतो. याज्ञवल्क्याच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे जर स्वसंविज्ञ शक्य नसेल तर सर्व काही अशक्य आहे. स्वं संवित अस्तित्वाचे अंतिम सत्य होय. येथे याज्ञवल्क्य किती छातीठोकपणे अंतर्निरीक्षण व स्वसंवित् ह्या दोन्ही गोष्टी अनुभवांचे प्रकार असल्याचे सांगताना दिसते. अंतर्निरीक्षण ही एक मानसिक प्रक्रिया आहे व ती स्वसंविताच्या अधिभौतिक सत्यतेशी मिळती-जुळती आहे. ससंविताचे ज्ञान अंतर्निरीक्षणातूनच शक्य आहे. तर याज्ञवल्क्याचे उत्तर असे आहे.स्वसंवित् आत्म्यास स्वतःचे ज्ञान शक्य तर आहेच आहे पण तेच फक्त अंतिम सत्य आहे.'

जनक राजा याज्ञवल्क्यास नंतर विचारता झाला, 'मानवास प्रकाश कोणता?' प्रथम याज्ञवल्क्य म्हणाला, मानवास प्रकाश सूर्याचा. सूर्याच्या प्रकाशामुळे मनुष्य बसू शकतो. हिंडू शकतो. आपले कार्य करून परतू शकतो. मग राजा विचारतो 'सूर्य मावळल्यानंतर कोठला प्रकाश?' त्यास उत्तर चंद्रप्रकाश म्हणून देऊन त्यात मनुष्य बसू शकतो. हिंडू शकतो, आपले कार्य करून परतू शकतो असे याज्ञवल्क्य म्हणाला. ह्यानंतर अग्नीच्या प्रकाशात चंद्र व सूर्य मावळल्यानंतर मनुष्यास आपला कार्यभाग करता येतो असे राजास याज्ञवल्क्याने उत्तर दिले. राजा परत विचारता झाला, 'सूर्य मावळल्यानंतर, चंद्र मावळल्यानंतर, अग्नी विझल्यानंतर, मानवाला प्रकाश कोणता?' याज्ञवल्क्य म्हणाला, 'हे राजन तू मला अत्यंत गुह्य प्रश्न करीत आहेस. सूर्य मावळल्यानंतर, चंद्र मावळल्यानंतर, अग्नी विझल्यानंतर, मानवास त्याचा आत्मा हाच प्रकाश होय.'

ह्यावर गुरुदेव म्हणतात, 'Yajnyvikya is here clearly positing what Aristotale called 'theoria' the art of pure self, contemplation in which the self is most mysteriously both the subject and object of knowledge.'

अर्थ : 'ॲरिस्टॉटल ज्यास 'थिओरिया' (चिदानंद) म्हणतो, तीच कल्पना याज्ञवल्क्य स्पष्टपणे मांडतो आहे. ज्यात आत्मा अत्यंत गूढपणे ज्ञेय व ज्ञाता होतो व राहतो.'

## पारमार्थिक अनुभव-साक्षात्कार व साक्षात्काराची शिडी

आपण पाहिले की आत्म्याचे ज्ञान आत्म्यास होते ते कोणत्या पद्धतीने घडते? त्यासाठी प्रगतिपथावरील साधकांचा अनुभव तसेच गुरुदेवांनी मांडलेली ही ज्ञानाची पारमार्थिक शिडी पाहूया :

'तस्य ह एंतस्य पुरुषस्य रुपं यथा महारजनं वासो, यथा पाण्डवदिकं, ययेंद्रगोपो, यथा अग्न्यर्चिः, यथा पुण्डरीकं, यथा संकृद्विद्युत् । ते ह वा अस्य श्रीर्भवति य एवं वेद । (बृ. II ३.६)

अर्थ : त्या या पुरुषाचे रूप ज्याप्रमाणे हळदीने रंगविलेले वस्त्र, जसे पांढरे लोकरीचे वस्त्र, जसा देवगायीचा पूज्यपणा, जशी अग्नीची ज्वाला, जसे शुभ्र कमळ जसे एकाएकी एकदाच विजेचे चमकणे. तशीच त्याची निरनिराळी रूपे असतात.

## पारमार्थिक शिडी

१) आत्मा व अरे द्रष्ठग्यः । (बृ. II ४.५)

२) आत्मानं विजानियादयम स्मीति पूरुषः । (बृ. IV.४.१२)

३) अयमात्मा ब्रह्म

पूर्णमदः पूर्णमिदं पूर्यात्पूर्णमुदच्यते ।

पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।। शांतिः ।। (बृ. II.५.१९)

४) अहं ब्रह्मांस्मि (बृ. I.४.१०)

तत्त्वमसि । (छां VI.१४.१)

५) सर्व खल्विदं ब्रह्म (छां ४.८.७)

पारमार्थिक शिडी अर्थ :

१) ह्या पहिल्या पायरीमध्ये आपल्यात असलेल्या आत्म्याच्या दिव्यप्रतिभेचा साक्षात्कार होतो. पण ह्यात आपण संपूर्णपणे वेगळे असण्याची जाणीव आहे.

२) ह्यात आपल्यातला 'मी' व आत्मा हे एकच आहेत असा बोध घडतो. 'मी' म्हणजे माझे शरीर, इंद्रिये, बुद्धी किंवा भावना नव्हेत तर 'मी' म्हणजे शुद्ध आत्मा होय हे ज्ञान होते.

३) त्यात 'मी' म्हणजे आत्मा व आत्मा म्हणजे ब्रह्म हे ज्ञान होते.

४) जर मी म्हणजे आत्मा व आत्मा म्हणजे ब्रह्म तर 'मी' म्हणजे पण ब्रह्मच होय हे ज्ञान घडते किंवा छांदोग्य उपनिषदाप्रमाणे तोच आत्मा (जो ब्रह्म आहे) तू आहेस.

५) समस्त दृश्य जगत् जे काही आहे ते सर्वच ब्रह्म होय हे ज्ञान होते.

ह्यावर शेवटी गुरुदेव म्हणतात,

'ही संपूर्ण अद्वैत अवस्था फक्त बुध्दी जाणून घ्यावयाची की तिचा बोध साक्षात्काराने घडवून आणावयाचा हे परमार्थाच्या वाटेवर आपण फक्त मशाल धारक होणार का साक्षात्कारी होणार ह्या स्वभावाच्या पूर्व नियोजनावर अवलंबून आहे?

इथपर्यंत साक्षात्काराची व्याप्ती पाहिली. ह्यानंतर साक्षात्काराची व्याख्या, साक्षात्काराचे तत्त्वज्ञान, मानसशास्त्र इ. गोष्टींकडे वळू या.

## साक्षात्काराची व्याख्या

श्रीगुरुदेवांनी 'साक्षात्काराच्या' व्याख्येपासूनच आपले वेगळेपण वैशिष्ट्यपूर्णरीत्या वाचकांच्या मनी बिंबवले. पूर्वी Mysticism चा अर्थ गूढवाद असा करत. तो पूर्णतया चूकीचा असल्याचे श्रीगुरुदेवानींच प्रथम मांडला व त्या शब्दाचा खरा अर्थ व्युत्पत्तीसह मांडला.

गुरुदेव Mysticism (साक्षात्कार) ची व्याख्या अशी करतात – Mysticism denoted that attitude of mind which involves a direct, immediate first-hand intuitive apprehension of God.'

अर्थ : साक्षात्कार मनाची अशी अवस्था आहे. ज्यात परमेश्वराचे प्रत्यक्ष (माध्यमा शिवाय) तत्काळ परमेश्वराकडूनच प्रातिभ ज्ञान होते :

पुढे गुरुदेव म्हणतात –

Mysticism implies a silent enjoyment of God. It is in this sense that mystical experience often has been regarded as ineffable (ज्यास उपनिषद नेति नेति म्हणतात.)

साक्षात्काराची तीन वैशिष्ट्ये ते मांडतात –

१) Intuitive प्रातिभ

२) Central Initiative अंतर्निर्मित

३) Super Sensuous अतींद्रिय

अनेकदा असे मानण्यात येते की, साक्षात्कार होण्यासाठी एखाद्या वेगळ्या शक्तीची (प्रतिभा) गरज असू शकते असे नाही तर बुद्धी, इच्छाशक्ती व भावनेच्या योगे देवाचे पूर्ण ज्ञान अनुभवता येते. पण सर्वसाधारणपणे असे दिसते की, उच्चतम कलाकृतिच्या निर्मितीसाठी वैज्ञानिक शोधासाठी वा काव्यकृति घडण्यास थोडा तरी प्रत्यक्ष, तात्काळ व प्रातिभ ब्रह्म संस्पर्श आवश्यक असतो. तर मग साक्षात्कारासाठी काही वेगळे का असेल का? प्रातिभ शक्ती, बुद्धी, इच्छाशक्ती व भावनेशी विसंगत नसून ती त्यांचा भेद घेत मूळाशी जाऊन त्यांच्या मागे कार्यरत असते. बुद्धी जर तत्त्वज्ञानासाठी वेगळी संज्ञा शोधील तर प्रातिभ शक्ती साक्षात्कारासाठी ते नाकारणार नाही. साक्षात्कार होण्यास दीर्घ, निरंतर अविरत श्रमांची निकड असते. हे जबरदस्त इच्छाशक्ती शिवाय अशक्य आहे. कोठल्याही मानसिक प्रक्रियेपेक्षा भावना ज्ञेय व ज्ञात्यातील अंतर परिमाणकरित्या कमी करू शकते, तर मग भावाची साक्षात्कारामध्ये महत्त्वाची भूमिका असते. तर मग असे दिसून येते की, साक्षात्काराच्या प्रयत्नामध्ये बुद्धी, इच्छाशक्ती व भावना ह्या तिन्हींची गरज आहे. गुरुदेव परत एके ठिकाणी म्हणतात, 'धर्मास, तत्त्वज्ञान एखाद्या भिंती प्रमाणे अथवा तारेच्या कुंपणाप्रमाणे आत घुसणाऱ्या भटक्या जनावरांना अटकाव करते. बुद्धी ही तिच्या जन्मजात सहजप्रवृत्ती व प्रातिभ शक्ती अधिक कार्यरत असते. पहिली बुद्धीची खालची पातळी तर दुसरी उच्च पातळी होय. प्रातिभ शक्तीस दृष्टिची तत्कालता व प्रत्यक्षता असते. फक्त ती फार निश्चित असते तर दृष्टीची क्षणभंगुर असते.

ह्यापुढे तत्त्वज्ञानाचे कार्य म्हणजे चिंतन करणे, तर्क करणे व मुद्दे मांडून मनाच्या विचार शक्तीमध्ये समाधान करणे होय. तर्क न करता देवाचे अनुभव जन्यज्ञान म्हणजे प्रातिभ शक्ती (घडलेले आकलन) नेहमीचे अनुमान ह्या बाबतीत उपयोगाचे नाही. तसेच नेहमीचे प्रत्यक्ष पण नाही कारण ते केवळ शारिरीक स्वरूपाचे आहे. (डोळ्यांना घडणारे) निश्चित निकष म्हणजे अनुभूती जी संप्राधनाच्या अवस्थेत घडते व ज्यात यौगिक प्रत्यक्ष व प्रातिभ दर्शनाने पूरक असे अनुमान असते.'

'अपि संराधने प्रत्यक्षानुमानाभ्यां ॥' (ब्रह्मसूत्रं ३.२.२४)

अर्थ : तथापि या परमात्म्याला समाधीत कृतार्थ योगी पुरुष पाहतात.

गुरुदेवांनी साक्षात्कार प्रातिभ शक्तीतच होतो हे सांगताना वरील सूत्र घेतले आहे. ते म्हणतात :

'संराधना म्हणजे सम्यक आराधना. पूजनात अवलोकन. समोर दुसरे काही असल्यास पुजा शक्य आहे. अद्वैतात (साक्षात्कारात, आत्मा आत्म्यास पाहतो तेव्हा) पूजा नाही. ते तत्त्वज्ञानी अंतर निरीक्षण आहे. (Meditation ध्यानात अंतर निरीक्षणच फक्त असते.) नेहमीचे प्रत्यक्ष येथे विसंवादी होते. कारण देवाचे ज्ञान इंद्रियांस होत नाही. बादरायणाच्या मते हे अतिंद्रिय प्रत्यक्ष असावे. नेहमीचे दिसणे नव्हे तर प्रातिभ दर्शन होय.'

## अंतर्निर्मिती

येथपर्यंत आत्मा म्हणजेच ब्रह्म. सर्व चराचरास व्यापून आहे. तो प्रत्येकात आहे व त्याचे ज्ञान प्रातिभ आहे हे पाहिले. आत्मा आतच असल्यामुळे त्याचे ज्ञान आतूनच घडते. ते अंतर निर्मित आहे ह्याकडे वळू या.

ध्यानात शरीरातील इतर उर्जेचे पारमार्थिक उर्जेत रूपांतर होते.

ध्यानात तयार झालेली पारमार्थिक ऊर्जा मणक्याच्या हाडातून पाठीच्या कण्याच्या बाजूनी असणाऱ्या द्रवामध्ये मिसळते. हे द्रव म्हणजे CSF Carbro Spiral Fluid. ह्यास गुरुदेवांनी आत्म्याचा बाहेरील (दृष्य जगातील) अविष्कार म्हटले आहे. उर्जेचा प्रवास ह्या द्रवातून सुरू होतो. व शेवटी मेंदूतील पोकळ्यांमध्ये शिरतो. अंतिम निकषात ही ऊर्जा श्रेष्ठ ठरते व भारतीय औषध प्रणालीतील ओजस किंवा सध्याचे मनोविज्ञानिकांच्या मज्जा रासायनिक ऊर्जेच्या पलीकडे जाते. हिंदी-संत ज्यास अभिरस म्हणतात ती हीच ऊर्जा होय.

मेंदू मधे जाणीव असणाऱ्या पेशी असतात. हल्लीच्या वैद्यकीय संशोधनातून असे आढळून आले आहे की शरीराचे अंतिम संतुलनास हे CSF च जबाबदार आहे. ह्या द्रवाचा उपयोग आत्म्याचे वाहक म्हणून होतो. द्रव तयार होण्याचे सर्वात वरचे ठिकाण म्हणजे आत्म्याच्या वास्तव्याचे पीठ होय. (येथे ह्या द्रवाचे गुणधर्म, उत्पत्ती, प्रवास मार्ग इ. शरीरशास्त्रातील तपशील प्रस्तुत लेखकाने विस्तारभयास्तव व दुर्बोधता टाळण्यासाठी दिलेले नाहीत) प्रत्येक पेशीमध्ये आत्म्याचा आविष्कार उर्जेच्या रूपात घडत

राहतो. (शरीरात जीव / प्राण असेपर्यंत कारण देहात आत्मा सेंद्रिय रूपाने मिसळला आहे.) ही ऊर्जा/शक्ती म्हणजेच आत्मा जेव्हा उमगतो तेव्हा हे उमगणे अंतर बाह्य असते. ह्यामध्ये आतील संवेदना आत्म्यातून निर्माण होत असतात. त्या आतून स्फुरतात. दिक्कालातीत असे त्यांचे स्वरूप आहे. ही पारमार्थिक ऊर्जा, आत्मा, अनंत, देव, देवी, शक्ती सर्व एकाचीच विविध नामे होत. ही ऊर्जा निर्माण झाल्यानंतर (प्रवास करीत मेंदूच्या पोकळीत शिरल्यानंतर) मेंदूतील अनुभवांची केंद्रस्थानाना भिडते व त्यांचे उद्दीपन करते. ज्यामुळे नाद, बिंदु, प्रकाश इ. पारमार्थिक अतिंद्रिय अनुभव येतात. हीच साक्षात्काराची सुरुवात.

आता अनुभवांच्या / साक्षात्काराच्या अतिंद्रियत्वाकडे वळू या.

### अतिंद्रियत्व

*'राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।*
*प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥' (गीता ९.२)*

ह्या गीतेच्या श्लोकावर गुरुदेव म्हणतात, 'नवव्या अध्यायाच्या एका प्रसिद्ध ओवीमध्ये गीता साक्षात्काराचे प्रत्यक्षावगम धर्म्य सुसुखं कर्तुमण्यमम् असे वर्णन करते. हे फार अर्थपूर्ण शब्द आहेत. प्रत्यक्षावगमं, सुसखं व अण्यमम् विचार करता येण्याजोगे साक्षात्काराबद्दलचे सर्व निकष ह्या शब्दांमध्ये दडले आहेत. त्यांचा अर्थ पाहू. पहिला आहे प्रत्यक्षावगमं जर आपला अनुभव प्रत्यक्षाची वस्तू झाल्यास आपला अनुभव खरा म्हणावयाचा. मग हे प्रत्यक्ष काय? ते का खरेखुरे सोदाहरण प्रकटन आहे? चर्मचक्षुस प्रतित होणारी ती गोष्ट आहे का अंतरचक्षु समोर उभी राहणारी वस्तू, योग्यास दृगोचर होण्यासाठी? भगवतगीता ह्या शब्दाचे नियोजन भौतिकशास्त्र वा शरीरविज्ञान शास्त्रदृष्ट्या नसून, ते अतिंद्रिय साक्षात्कारी स्वरूपात केले आहे. अतिंद्रियता म्हणजे इंद्रियांच्या आकलनाच्या पलीकडील गोष्ट.

ज्या वेळी अक्रूर यमुनेच्या पाण्यामध्ये डुबकी मारतो तेव्हा त्यास घडलेले कृष्णाचे दर्शन व परत पाण्याबाहेर पाहिल्यानंतर रथामधील कृष्ण हे एक साक्षात्कारी व प्रत्यक्ष (चर्मचक्षुनी पाहिलेले) अनुभवाचे संयुग आहे. ज्यात एक अनुभव दुसऱ्याला पुष्टी देत आहे.

विषय जास्त स्पष्ट होण्यासाठी दोन गोष्टी पाहू ज्या गुरुदेवांना देण्याची आवश्यकता नव्हती. कारण साक्षात्कार विषयच गीतेच्या त्यांच्या पुस्तकात विस्तृतपणे मांडला आहे. किंबहुना हे त्यांच्या सर्व ग्रंथाबद्दलच म्हणता येईल.

१) ज्ञानेश्वरांचे म्हणणे

२) मूळ भागवतातील अर्थ.

ज्ञानेश्वर :

*मोटके गुरुमुखे उदैजत दिसे ।*
*आणि हृदयी स्वयंभचि असे ।*
*प्रत्यक्ष फावो लागे तैसे । आपैतया ।*

ज्ञा. ९.४८.

१) अर्थ : जे ज्ञान मोजके गुरुमुखातून उदयाला आल्यासारखे दिसते मात्र, पण ते हृदयाला स्वतः सिद्ध आहे ते आपोआपच प्रत्यक्ष अनुभवाला येते.

२) तिथे त्यांनी हात-तोंड धुवून यमुनेचे नीळेशार व अमृताप्रमाणे असणारे पाणी प्राशन केले. नंतर बलरामाबरोबर सावलीत उभ्या असलेल्या रथात कृष्ण बसला.

अक्रूरांनी दोघांना रथावर बसल्याचे बघून त्यांची आज्ञा घेऊन तो यमुनेच्या कुंडात विधिपूर्वक स्नान करू लागला.

कुंडात स्नान करून, नदीत डुबकी मारून गायत्री पठण सुरू केले तर पाण्याच्या आत अक्रूरास कृष्ण व बलराम दोघे बसल्याचे दिसले.

अक्रूराच्या मनात शंका आली की वसुदेवांच्या मुलांना मी रथामध्ये बसवून आलो होतो. तर ते दोघे पाण्यात कसे आले? कदाचित रथात नसतील म्हणून डोळे पाण्याबाहेर काढून त्याने पाहिले.

तर कृष्ण बलराम दोघे रथातच होते. त्याला वाटले आपल्यास भ्रम झाला असेल म्हणून परत डुबकी मारली.

परत त्यास पाण्यात शेषशायी कृष्णाचे दर्शन झाले व सभोवती यक्ष, किन्नर, गंधर्व आदी भगवंताची स्तुती करत उभे होते.

अतिंद्रियत्वाचा एक दुसरा पैलू नानकाच्या 'काहे रे बन खोजन जाई' ह्या पदावर भाष्य करताना गुरुदेव मांडतात

***काहे रे बन खोजन जाई ॥२॥***
***बाहर भीतर एकहि जानो***
***यह गुरु ज्ञान बताई ॥४॥***

अर्थ : अरे देवाचा शोध वनामध्ये जाऊन का घेतोस? आत व बाहेर एकच हरि आहे हे जाणून घे. ह्यासच गुरुंनी ज्ञान म्हटले आहे.

गुरुदेव लिहितात, ही एक अप्रतिम कल्पना आहे. नानक म्हणतात, मला देवाचे रूप आत व बाहेर दिसले. बाहेरच्या व आतल्या अनुभवात एकसारखेपणा आहे. मानस शास्त्राच्या दृष्टीने हा एक अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत आहे. तर एखादी बाह्य जगातील वस्तू पाहून तुम्ही डोळे मिटल्यास त्याचे बिंब दिसते. ह्या प्रतिमेस Positive अथवा Negative म्हणतात. ती प्रतिमा त्याच रंगाची अथवा पूरक रंगाची असू शकते. पण कबीर व नानक दोघेही स्पष्टपणे सांगतात, की तोच देव त्यांनी आत व बाहेर बघितला.

तुम्ही जर एखादी गोष्ट बघून डोळे मिटून त्याची आठवण केली (व तुम्हास ती दिसल्यासारखी वाटली) तर त्याला मूल्य नाही. पण जर तुम्हास एखादी वस्तू आत (डोळे मिटून) दिसली आणि नंतर डोळे उघडल्यावर जर तुम्हास ती तशीच दिसली तर तो मानसिक अनुभव एक आधी भौतिक व साक्षात्कारी सत्य ठरते. जे मी आत बघतो तेच बाहेर दिसते. तर वस्तु (पारमार्थिक) दर्शनाचा खरा प्रकार असा – जे आत दिसले तेच बाहेर दिसले पाहिजे. देवाच्या समदर्शनाची आतील व बाहेरील सत्यता साक्षात्काराचे एक प्रधान गमक ठरेल.

पुढे गुरुदेव म्हणतात,

'The internal and external perception of God must be a life. If there is internal perception to which nothing external corresponds, it may be a case of imagination, hallucination of illusion. If on the other hand, there is something external to which nothing internal corresponds, then it cannot be evidently a case of super conscious experience and may be ultimately unreal.'

अर्थ : देवाचे होणारे आतील व बाहेरील आकलन एक सारखेच पाहिजे. जर आतल्या होणाऱ्या आकलनाशी बाहेरील कोणत्याही गोष्टीबरोबर साम्य नसेल तर ती एक कल्पना, भ्रम अथवा मनाची फसवणूक ठरेल. उलटपक्षी एखाद्या बाहेरील गोष्टी बरोबर आत आकलन होणाऱ्या गोष्टी बरोबर काहीच साम्य नसले, तर नक्कीच तो अतिंद्रिय अनुभव नसेल व

शेवटी असत्यच राहील.

साक्षात्कार शास्त्र बुद्धीनिष्ठ व तर्कशुद्ध कसे आहे हे आतापर्यंत पाहिले. गुरुदेवांचे Mysticism हे Rational आहे. त्यात कोठल्याही प्रकारचा गूढवाद, जादूटोणा, मंत्रसामर्थ्याने भूतभविष्य जाणणे व इतर चमत्कारास जागा नाही. डोळ्यावर हात ठेवून देण्याची ही बाब नाही. सद्गुरुकडून सबीज नाम प्राप्ती झाल्यानंतर त्याचे दीर्घ, निरंतर व भावयुक्त स्मरण करीत राहिल्यानंतर देवाची कृपा झाल्यावर परमेश्वराचे प्रातिभ अनुभव येतात म्हणजेच साक्षात्कार होतो. हे अनुभव.

सपदर्शी (Hosplist)
तेजोदर्शी (Photist)
वर्ण दर्शी (Chromist)
नादश्रव (Audist)
रसास्वादी (Flavourist)
स्पर्शानुभवी (Tactist)
गंधानुभवी (Odomist)
ह्या प्रकारचे असतात.

## साक्षात्काराच्या तत्त्वज्ञानात घातलेली भर

ह्याचा एक धावता आढावा घ्यावा लागेल. गुरुदेवांचे जवळ जवळ सर्वच ग्रंथ साक्षात्कारावरील महान भाष्ये आहेत. त्यास परमार्थाची पाणिनी हे यथार्थ संबोधन आहे. त्यांचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे शक्यतो सर्व विषय इतरांच्या इतर साक्षात्कारी संतांच्या भाषेत मांडावयाचे. अर्थात त्यांनी अशी दुसऱ्याची कोणतीही गोष्ट घेतली नाही. इतरांचे अनुभव स्वतःच्या अनुभवांच्या निकषाशी मापून, सत्यता पारखून मगच ते त्या संतांच्या भाषेत मांडतात. ही त्यांची शैली आहे. ग्रंथाचे वाचन सूक्ष्म तऱ्हेने केल्यासच त्यांचे म्हणणे काय असावे ह्याचा थोडाबहुत बोध माझ्यासारख्याला घडतो. गुरुदेवांनी निर्माण केलेल्या साक्षात्काराच्या अथांग सागरातून चुळकाभर जलाने ही भावांजली दिली आहे.

## निती व साक्षात्कार

गुरुदेव म्हणतात, 'knowledge of Reality is the crest of morality' अंतिम सत्याचे ज्ञान म्हणजे नितीचे शिखर होय.

तसेच '... a mystic without morality if such one were possible, might only be a hideous creature who is a blot to the spiritual evolution of man...'

'नीतिहीन साक्षात्कारी व्यक्ती जर तशी एखादी असू शकेल तरी ती एक ओंगळ हिडीस प्राणी ठरेल व जी माणसाच्या पारमार्थिक विकासात एक कलंक होईल.'

## साक्षात्कार एक प्रक्रिया

साक्षात्कार एक घटना नसून ती एक प्रक्रिया आहे. पूर्णत्वाकडे अखंड वाटचाल आहे. पौर्णिमेचा चंद्र व चतुर्दशीचा चंद्र इतके अंतर देव-भक्तात राहतेच. मृत्यूनंतर मात्र देवाशी पूर्ण ऐक्य होते.

## ईश्वराच्या लक्षणातील विरोधाभासाचा परिहार

अ) ईश्वर सगुण का निर्गुण ह्याचा परिहार तो सगुण-निर्गुण आहे. गुणातीत आहे या सिद्धांताने करतात.

आ) ईश्वर कर्ता की द्रष्टा याचा समन्वय तो मूळ प्रेरक आहे ह्या वचनाने होतो.

*'मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्।।' गीता ९.१०*

त्याच्या अध्यक्षत्वामुळे, प्रेरकत्वामुळे प्रकृति गुणांची साम्यावस्था किंवा निष्क्रियता भंगते. प्रकृती पुढील उत्पत्ती कार्य करते. म्हणून ईश्वर साक्षर व कर्ता म्हणून प्रेरक ठरतो.

इ) ईश्वर अंतर्यामी की सर्वातीत : तो दोन्हीही आहे. हा विरोधाभास गीता मोडते. तो सर्वातीत आहे पण अवतार घेऊन जगाच्या अंतरी उतरतो.

## अवतार

साधकाच्या दृष्टीसमोर जे देवाचे रूप अवतरते तो अवतार.

## साक्षात्काराच्या सत्यतेचे निकष

सार्वत्रिकता, जाणीवेच्या सर्व अवस्थेत साक्षात्कार झाला पाहिजे, त्यात वाढ तो प्रातिभ आहे. अंतरनिर्मित व अतेंद्रिय आहे असे अनेक निकष मांडले.

## ईश्वराचे अंतिम स्वरूप

हे आनंद आहे. त्याचा साक्षात्कारवाद म्हणजे ब्रह्मानंद वाद होय किंवा कबीर, दादू इत्यादी हिंदी संतांच्या परिभाषेत Flavourism ब्रह्मसंती स्वाद अस्वाद आहे.

साक्षात्कार हा beyond space and time दिक्कालातीत आहे.

## One World One God One Humanity

साक्षात्कार James च्या भाषेत ineffable आहे. त्याचे शब्दांकन करता येत नाही. केल्यास समजत नाही. म्हणून साक्षात्कारी संतांचे जणू एक गुप्त समान ध्येय असलेले संतकुलच बनते. त्यांचे नियम फक्त देवालाच ठाऊक असतात. त्या संतांना पण नाही. सर्व देशातील, कालातील, धर्मातील संत एकाच अध्यात्मिक जगात राहणारे असल्याने आपल्या अनुभवासंबंधी ते एकच भाषा बोलतात. वंश, जाति, धर्म, देश यांच्यामुळे त्यांची मने विकृत, दूषित होत नाहीत. त्यांचे अनुभव शाश्वत मर्यादातीत दिक्कालातीत असल्याने देशकालाशी त्यांचा काही संबंध राहत नाही.

ईश्वराचा साक्षात्कार हेच मानवतेचे उच्चतम ध्येय, एकमेव धर्म आहे. ह्या ध्येयामुळे सर्व जग व मानवता एक होईल. कारण एकाच देवाचे सर्व पाईक असतील.

साक्षात्काराचे तत्त्वज्ञान काही भागांचे सूक्ष्म अवलोकन तर काही भागाचे निर्देशन करून इथवर झाले.

ह्यानंतर गुरुदेवांचा आवडता विषय Psychology of Mysticistm साक्षात्काराचे मानस शास्त्र पाहू या.

## साक्षात्काराचे मानसशास्त्र

जीवनातील अनिश्चितता, असाह्यता व नित्य गरजेचा तुटवडा, यामुळे दैनंदिन व्यवहाराच्या सुरळीतपणास आव्हान पडताच ह्या गोष्टी जर मनुष्यास सातत्याने सतावू लागल्या तर विवेकी मनुष्याची बुद्धी ह्याचे उत्तर अनाकलनीय अतीताच्या प्रांतात शोधू लागतो. ह्या शोधामध्ये

त्यास अंतिम उद्देशाच्या दृष्टीने हे सर्व अर्थपूर्ण भासते व त्यांची स्विकृती व त्यांच्या बरोबर तडजोड शक्य वाटते.

गुरुदेवांनी Kant च्या भाषेत हे विचार असे मांडले आहेत.

'थोर जर्मन तत्त्ववेत्ता कांट यास त्याच्या पहिल्या तार्किक ग्रंथात केवळ तर्काच्या आधारात ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करता आले नाही. परंतु आपल्या दुसऱ्या तार्किक ग्रंथात सद्गुणास शेवटी योग्य फळ मिळणे अपरिहार्य आहे. या नैतिक तत्त्वाचा आधार घेऊन ईश्वराचे अस्तित्व सिद्ध केले. कांट म्हणतो, या जगात सज्जनांना दुःख भोगावे लागते व दुर्जनांची भरभराट होते. सद्गुण व सुख यांचे समीकरण कसे सिद्ध करावयाचे ह्यास त्याने दोन प्रकारे उत्तर दिले. प्रथमतः आत्म्याचे अमरत्व गृहीत धरावे लागेल. त्यास पुनर्जन्म आहे असे मानावे लागेल. म्हणजे ह्या जन्मातील भोगलेल्या दुःखाची भरपाई पुढील जन्मात सुख मिळून होईल. तद्वत वाईट प्रवृत्ती ते ह्या जन्मी दुष्कृत्य केलेल्यांना पुढील जन्मी योग्य ते शासन घडेल. दुसरे उत्तर म्हणजे सद्गुण, दुष्कृत्ये त्यांचे योग्य फळ ठरविणार कोण? त्यासाठी सर्वश्रेष्ठ न्यायाधिश हवा. तो म्हणजे ईश्वर. तोच कर्म व त्याचे योग्य फळ ठरवू शकतो. ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणारा हा नैतिक पुरावा होय. पण ह्याचा आपल्यावर परिणाम काय? ईश्वराने / नियतीने सद्गुण व त्यांचे फळातील सुव्यवस्था साधावी असे आपणास वाटणे व त्यासाठी प्रार्थना करणे हे आपले कार्य नव्हे का? जर त्यांच्यात सुव्यवस्था साधली गेली नाही व तसे घडले हे आपल्या दृष्टिक्षेपात नेहमीच येते, तर आपल्या पारमार्थिक प्रयत्नाने अशी इच्छा का करू नये की ह्यांचे समीकरण येथेच व ह्या क्षणी घडावे म्हणून? निदान ह्या पारमार्थिक प्रयत्नाने आपल्या अंतःकरणास जोरदार स्फूर्ती मिळेल व अधिक तीव्रतेने आपले पारमार्थिक प्रयत्न होतील ज्यामुळे आपल्यास हे समीकरण साधण्याची दृष्टी मिळेल.

हा सर्व खटाटोप, पारमार्थिक दृष्टी घेऊन जे घडते आहे ते देवाच्या ईच्छेनेच घडते आहे व आपल्या अंतिम हितासाठीच आहे, हे अंतःकरणात ठसून खरे सुख सद्गुण व त्यांचे फळ हे नसून ईश्वराशी तादात्म्य साधून त्याच आनंदात मग्न होण्यात आहे. हे स्वानुभवाने पटणे व तशी खात्री होणे ह्यासाठी करावयाचा आहे. हे मनोमार्गानेच साधावे लागते. म्हणून साक्षात्काराचे हे मानसशास्त्र ह्या मानसशास्त्राची व्याप्ती ईश्वराभिमुख होण्यापासून ते ईश्वरप्राप्तीपर्यंत आहे.

## समारोप

आतापर्यंत आपण श्रीगुरुदेवांनी साक्षात्काराविषयीचे तत्त्वज्ञान स्वानुभवाच्या जोरावर कसे मांडले हे पाहिले. गीता, वेदांत व उपनिषदे ह्या प्रस्थानत्रयीवरील त्यांच्या भाष्यांतही 'साक्षात्काराचे तत्त्वज्ञान' त्यांनी अत्यंत स्पष्टपणे साधार व परखडपणे मांडल्याचे आपण पाहिले. तत्त्वज्ञानाच्या बरोबरीने साक्षात्कारासाठी असलेला भक्तीमार्ग विविध काळातील अनेक संतांच्या पदांच्या आधारे व भारतीय व पाश्चिमात्त्य संतांच्या उदाहरणांसह स्पष्ट मांडला आहे. म्हणूनच त्यांना साक्षात्काराचा महाभाष्यकार म्हटले आहे.

**श्री. नरहरी वि. कुलकर्णी**
'अभय' २७, सावली सोसायटी,
पौड रोड, पुणे ४११०३८.

# गुरुदेव रा. द. रानडे : पारमार्थिक जीवनाची झलक

**डॉ. अशोक कामत**

*एम.ए., पीएच.डी (मराठी), पीएच.डी. (हिंदी). १९८५ पासून प्रमुख - नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ. हिन्दी, मराठी संत साहित्याचे अध्ययन, अध्यापन, अनुबंध, लेखन, संशोधन व शोध कार्यासाठी मार्गदर्शन. सामाजिक प्रबोधन व व्याख्यान. एम.फिल्., पीएच.डी. पदवीसाठी २८ शोध प्रबंध पूर्ण. ७५ संशोधन प्रकल्प संत साहित्याच्या अभ्यासकांकडून करवून घेतले. संशोधन प्रकल्प कार्यरत. विविध पुरस्कार प्राप्त.*

## आरंभिक

'गुरुदेव' या पदवीपर्यंत पोहोचलेले प्रा. रामचंद्र दत्तात्रेय रानडे हे आधुनिक काळातील एक थोर तत्त्वज्ञ सत्पुरुष. कुशाग्र बुद्धिमत्ता, उत्तम अध्ययन, मनन आणि निष्ठापूर्वक जमलेला सत्संग यांसह गुरुदेव साधनमार्गावर वाटचाल करीत राहिले. त्यांनी 'परमार्थ' हेच जीवितध्येय मानले. भारतीय, ग्रीक आणि तत्त्वज्ञानाचा सखोल व्यासंग करून त्यांनी साक्षात्काराचे तत्त्वज्ञान मांडण्याचा यशस्वी प्रयत्न केला...

## लौकिक वाटचाल

एक मध्यमवर्गीय सुविद्य ब्राह्मण परिवारात जमखंडी येथे गुरुदेव रानड्यांचा जन्म झाला. शालेय शिक्षण जमखंडीलाच झाले. शालांत परीक्षेत त्यांना जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती मिळाली. पुढे पुण्याला येऊन डेक्कन कॉलेजातून ते गणित घेऊन बी.ए. झाले. नंतर तत्त्वज्ञान घेऊन सुवर्णपदक मिळवून एम.ए. झाले. काही दिवस डेक्कन कॉलेजात वस्तुपाल पुढे फर्गसन कॉलेजात प्रथम इंग्लिशचे नंतर तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून त्यांनी काम केले. डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे दहा वर्ष ते आजीव सदस्य राहिले. पुढे १९२८-१९४६ ते अलाहाबाद विद्यापीठात तत्त्वज्ञान विभागप्रमुख म्हणून कार्यरत होते. निवृत्तीनंतर अखेरची दहा वर्षे ते विजापूर नजिकच्या निंबाळला येऊन राहिले.

गुरुदेवांचा सारा जीवनप्रवास एका बुद्धिवादी तत्त्वज्ञ सत्पुरुषाचा आहे. इंचेगिरी येथील सत्पुरुष भाऊसाहेबमहाराज उमदीकर यांचा त्यांना अनुग्रह मिळाला. त्यांचेकडून परमार्थ ज्ञानाबरोबर काही अलौकिक अनुभवही त्यांनी ग्रहण केले. पुढे त्याला तात्त्विक अधिष्ठान मिळवावे म्हणून ते पाश्चात्त्य आणि भारतीय तत्त्वज्ञानाच्या पद्धतशीर अध्ययनाकडे वळले आणि त्यांनी महत्त्वपूर्ण ग्रंथसंपदा निर्माण केली.

## ग्रंथलेखन

गुरुदेवांचा 'ए कन्स्ट्रक्टिव्ह सर्व्हे ऑफ उपनिषदिक फिलॉसॉफी' हा उपनिषद-भाष्य ग्रंथ १९२६ साली प्रकाशित झाला. मराठी संतपरंपरेचे आध्यात्मिक विशेष स्पष्ट करणारा 'मिस्टिसिझम इन महाराष्ट्र' हा ग्रंथ १९३३ मध्ये आला. हिंदी संतभक्तांच्या रचनांतून अनुभवलेला परमार्थ मार्ग त्यांनी 'पाथ वे टू गॉड इन् हिंदी लिटरेचर' या ग्रंथाद्वारे १९५४ मध्ये प्रकट केला. 'दि कनसेप्शन ऑफ स्पिरिच्युअल लाईफ इन महात्मा गांधी ॲण्ड हिंदी सेंटस्' हे त्यांचे पुस्तक १९५६ मध्ये झाले. 'फिलॉसॉफिकल ॲण्ड अदर एसेज्' (१९५६) हे त्यांचे अखेरचे पुस्तक.

गुरुदेवांच्या निर्वाणानंतर 'दि भगवद्‌गीता ॲज ए फिलॉसॉफी ऑफ गॉड रिअलायझेशन' (१९५९) 'पाथ वे टू गॉड इन कन्नड लिटरेचर' (१९६०), 'ऐसज् ॲण्ड रिफ्लेक्शन्स्' (१९६४), 'वेदान्त : दि कल्मिनेशन ऑफ इंडियन थॉट' (१९७०) असे त्यांचे बरेच ग्रंथ त्यांच्या निर्वाणानंतर प्रकाशित झाले.

'ज्ञानेश्वरवचनामृत', 'संतवचनामृत', 'तुकाराम वचनामृत', 'रामदास वचनामृत' हे त्यांचे चार मराठी ग्रंथ १९२६ सालीच प्रकाशित झाले होते. 'परमार्थसोपान' १९५४ मध्ये तर 'एकनाथ वचनामृत' त्यानंतर लगेच प्रकाशनात आले. हे ग्रंथ त्यांच्या, मराठी संत परम्परेच्या अभ्यासाची साक्ष देणारे आहेत.

गुरुदेवांच्या या ज्ञानसाधनेला उपासनेची सुदृढ अशी बैठक लाभलेली आहे. या दृष्टीने त्यांचे पारमार्थिक साधक जीवन अभ्यासण्यासारखे आहे.

## गुरुकृपांकित जीवन

गोष्ट १९१३ सालच्या एप्रिलमधली आहे. गुरुदेव त्या काळातच पुण्याच्या डेक्कन कॉलेजात वस्तुपाल (क्युरेटर) म्हणून नोकरीला लागले होते. त्या आधीची दोन वर्षे खडतर गेली होती. नोकरीच्या शोधात जवळपास वर्ष गेले. कोल्हापुरात एक नोकरी आली. पण आयत्या वेळी मिळाली नाही. मग इतरत्र खूप खटपट केली. व्यर्थ ठरली. मग त्यांचे ठरले : 'नोकरीचे जुळत नाही. व्यर्थ खटपट सोडून दिली पाहिजे. कुठेही मिळेल ते काम दोन तासांपुरते करावे. अन्न-आच्छादनापुरते मिळाले की झाले. नोकरी हे एक साधन आहे. पण साधनेपेक्षा मोठे नाही. जर ती प्रयत्न करूनही मिळत नसेल तर फार तिच्या मागे लागून नामसाधना बुडू देता कामा नये. याशिवाय त्यांच्या मनात असेही येऊन गेले.... 'कॉलेजच्या मोठ्या वर्गांना मोठ्या आवाजात ओरडून शिकविणे आपल्या प्रकृतीला झेपेल का? कोल्हापूर भागात पाऊस अधिक. हवा पुण्यासारखी नाही. आपल्याला ती हवा किती सोसेल? शिवाय तिथले एकूण वातावरण भक्तिमार्गात प्रगती करण्यास किती अनुकूल असेल?' मग त्यांनी आपल्या सद्‌गुरुंना इंचगेरीच्या महाराजांना सरळ पत्र लिहून मन मोकळे केले. : 'कोल्हापुरातील एकंदर स्थिती भक्तिमार्गास प्रोत्साहक होईल किंवा नाही, याबद्दल माझ्यासारख्या अज्ञानास काहीच कळणे शक्य नाही. पण माझी समर्थचरणी, विनंती एवढीच आहे की, भक्तिमार्गास प्रोत्साहन मिळत असल्यासच ती जागा मला मिळावी. नसल्यास इतका पगार न मिळाला तरी चालेल.'

गुरुदेवांचे १९/२/१९११ चे हे पत्र बोलके आहे. त्यातून त्यांची गुरुभक्ती, आध्यात्मिक प्रगतीची ओढ, पदसन्मान, प्रतिष्ठा-पैसा याबद्दलची अनासक्ती दिसते. पुढे त्यांच्या इच्छेप्रमाणे गुरुकृपेने त्यांना फर्गसन महाविद्यालयात निबंध-शिक्षक/ट्यूटर म्हणून चाळीस रुपयांची नोकरी मिळाली. गदग वा कोल्हापूरला शंभरावर रुपये मिळाले असते. त्या भागातील स्वस्ताईमुळे मजेत राहता येऊन, वर मोठी प्रतिष्ठाही मिरविता आली असती. पण ते ध्येयच नसल्यामुळे गुरुदेवांनी महाराजांना पुन्हा कळवून टाकले.... 'आणखी एक परीक्षा झाल्यावर पगार वाढेलही. तूर्त पुण्यालाच

चाळीस रुपयांवर राहण्याचा विचार आहे. समर्थांचे पसंतीस आल्यास हल्लीच्याच जागी कायम राहण्याचा निश्चय करतो... सत्संग, श्रवण, भजन इत्यादींचा लाभ होत नसल्याने भगवंताकडे जितका वेळ जावा तितका जात नाही. नोकरी वगैरे करू लागल्यामुळे साधनाचे बळ कमी पडते. त्यामुळे जितका आनंद व्हावा तितका होत नाही. अशी स्थिती असल्याने कृपेची फार आशा आहे.'

मानवी प्रयत्नापेक्षा सद्गुरुकृपा कितीतरी पटींनी मोठी आहे/असते असा अनुभव गुरुदेवांना ऐन तारुण्यातच आलेला होता. आपले सद्गुरु 'समर्थ' आहेत. त्यांचे आशीर्वादानेच आपण जीवनाचे सार्थक करणार आहोत अशी त्यांची उत्कट श्रद्धाच असल्यामुळे ते विद्येच्या माहेरी आधुनिक पुण्यात एका नामवंत संस्थेत अनेक व्यावहारिक दृष्टीने यशस्वी मंडळींच्या साहचर्यात वावरत असतानासुद्धा मनाने गुरुचरणी लीन राहिले. आपल्या मनातील प्रत्येक भलाबुरा विचार आणि प्रपंचातील सर्व अडीअडचणी वेळोवेळी गुरुपाशी मोकळेपणाने सांगून टाकल्या.

## प्रपंच अन् परमार्थ

गुरुदेव एकीकडे नोकरी करीत होते. त्यातून मिळणाऱ्या थोडक्या पैशातून प्रपंच संभाळीत होते. मातोश्री, बहीण यांना घेऊन ते पुण्यात रहात. ते दिवस प्लेगचे. गावाबाहेर झोपड्या घालून राहण्याचा वारंवार प्रसंग येई. प्रपंचात राहून परमार्थ साधणे फार कष्टाचे आहे याचा सतत प्रत्यय यायचा. जनांची वाकडी चाल जाणवायची. मनात यायचे : 'आपल्या सद्गुरुंनी प्रपंच परमार्थाचा मेळ कसा घातला असेल?' मग त्यांनी सरळ पत्रच लिहिले, 'प्रपंचामध्ये राहून परमार्थ करणे हे आता थोडे कळू लागले आहे. रात्रंदिवस शरीराच्या जोपासनेत जात असल्याने परमार्थाकडे बहुतेक दुर्लक्ष्य होत आहे. साधना होत नाही. त्यामुळे आनंद नाही. जगामध्ये किती दुःख आहे, किती अपमान व निंदा आहे, याचा प्रत्ययी अनुभव येतच आहे. त्यातल्या त्यात प्रपंच करीत साधन कसे वाढेल, हेही कळविण्याची कृपा व्हावी.'

गुरुदेवांची सारी स्थिती समजायून घेऊन एके दिवशी महाराजांनी त्यांना कळविले : 'समर्थांचे कृपेने आहे त्यात आनंद मानून घेणे हे धीर, भक्तीकडे अंतःकरण देणे म्हणजे उदार आणि परविषयाकडे न पाहणे म्हणजे गंभीर. असे 'धीर-उदार-गंभीर' मान्य करण्याने जीवनात सुखसंतोष येतो. तोच खरा मानून जमेल तेव्हा आणि तितका नामाचा नेम ठेवावा. तो कमी झाला, अशी खंत करीत बसू नये.'

अशा पत्राचाराने गुरुदेवांची उरलीसुरली चिंता सरली. ते शांतपणाने प्रापंचिक संघर्षांना सामोरे जात राहिले आणि परमार्थसाधनाही अखंड राखू शकले.

एरव्ही कुणीही पंचविशीत जितके भावनाशील असते, तितकेच गुरुदेवही होते. पण त्यांची भावनाप्रधानता सद्गुरुपाशी अधिक दिसते. त्यांचे या संदर्भातील मनोगत पाहण्यासारखे आहे... 'सद्गुरु इंचेगिरी मुक्कामी राहून जी साधना करतात, शिष्यांची काळजी वाहतात, त्यांचेच फळ काव्यपदे वा कीर्तने आहेत. शिष्यवर्गाकरवी ते सारे करवून घेतात. त्यांनी आत्मज्ञान दिले म्हणूनच सारे होते आहे. आपण केवळ निमित्तमात्र आहोत... देवाशी आपले तादात्म्य झाले असल्याने देवरूपच जाहला आहात.'

काही वेळा प्रपंच नीट चालावा म्हणून पैसा मिळावा असा मोह झाला. तोही सद्गुरुंना त्यांनी कळवून टाकला. आपला शिष्य वारंवार विचलित होत नाही? तो पुनः पुन्हा साधना मनासारखी घडत नाही हे का बरे लिहितो? सद्गुरुंनी आपली अशी नापसंती स्पष्टपणे लिहून कळविली.

गुरुदेवांना वाईट वाटले. त्यांनी लगोलग क्षमायाचनेचे पत्र पाठविले आणि एक चमत्कार घडला. नवी नोकरी डेक्कन कॉलेजमध्ये होती. आवडीचे काम होते. परमार्थासाठी सवड मिळणार होती. पगार आधीच्या तिप्पट एकशे पंचवीस रुपये मिळणार होता. गुरुदेवांनी विनयपूर्वक लिहिले आहे : 'समर्थांनी आपल्या भविष्यज्ञानाने ही गोष्ट मला पूर्वीच सांगून ठेवली होती. दिवस चांगले आले आहेत. सुगंध कानावर पडेल. आनंद आनंद होत जाईल. असा वेळोवेळी इशारा दिलाच आहे. त्याप्रमाणे ही गोष्ट घडून आली.'

चांगली नोकरी मिळाली. एम.ए. चांगल्या रीतीने होता येईल अशी उमेद निर्माण झाली. पण नव्या नोकरीत रजा अवघड होती. सद्गुरु दर्शनाकरिता इंचगेरीला जाणे जमेना. मनात आले : आपले कामकाज मध्यम आहे. 'कनिष्ठ नोकरी' हेच खरे. इथेच थोडंसं काम बदलून घ्यावं.'

मिळालेल्या नव्या नोकरीबद्दलची कुरकूर आणि असमाधान गुरुदेवांनी करावी हे महाराजांना अजिबात आवडले नाही. जे मिळाले त्यात आनंद मानून क्रियाशील राहावे, कुठलीच तक्रार करू नये असे त्यांचे मत होते. त्यांनी कडकपणानं कळविले. : 'कामाविषयी लिहिले ते योग्य नाही. नारायणानं जिथं कृपा केली तिथं आनंद मानला पाहिजे. काशीचे जळ श्रेष्ठ वा विशुद्ध आणि ज्यानं जीवन जगतो ते आपल्या विहिरीचे पाणी कनिष्ठ वा अशुद्ध हे म्हणणेच अनुचित. कोणतेच काम श्रेष्ठ वा हलके नव्हे. काम आदरपूर्वक व्हायला हवे. त्यातून जे मिळते ते जीवन यशस्वी करते.'

अशा कानउघाडणीने आणि उत्कट स्नेहाच्या शिडकाव्याने गुरुदेव घडत राहिले. त्यांची चित्तवृत्ती प्रसन्न होत गेली. डेक्कन कॉलेजच्या ग्रंथालयाचा त्यांनी पुरेपूर लाभ घेतला. त्यांनी ॲरिस्टॉटल, प्लेटो, सॉक्रेटिस इत्यादी ग्रीक तत्त्वज्ञांचे ग्रंथ, कांट सारख्या जर्मन दार्शनिकांचे ग्रंथ मुळातून वाचले, ग्रीकचा खच्चून अभ्यास केला... अद्भूत स्मरण, कुशाग्र बुद्धी, सखोल व्यासंग आणि सद्गुरुकृपा - सत्संग यांचे बळावर गुरुदेव सुवर्णपदक मिळवून उत्तम रीतीने एम.ए. झाले.

## सत्त्वपरीक्षा

नोकरीतून मुश्किलीने रजा मिळवून १९१२ च्या मार्गशीर्षात गुरुदेव माताभगिनींसह इंचगेरीला येऊन पोहोचले. सद्गुरुसान्निध्यात सप्ताह आनंदाने गेला. परतल्यावर पुन्हा घरसंसार, प्रपंच, आईची - भगिनीची काळजी, एम.ए.च्या अभ्यासाचा बोजा, प्रकृतीचे त्रास असे बरेच काही व्यग्रता वाढविणारे होते. त्यांना सर्वात अधिक बोचणी होती ती अधिक सद्गुरुसहवास मिळत नसल्याबद्दलची होती. त्यांनी महाराजांना लिहून टाकले, 'भक्तिमार्ग ही सुळावरील पोळी आहे, असे संत सांगत आले आहेत. त्याची प्रचिती चांगलीच बाणावयास लागली आहे. नामामृत ही कामधेनु आपण दिलेली आहे. तरी तिचे दूध काढणे हे प्रत्येक इसमाकडून होणे शक्य नाही... या अनुभवाचे मार्गावर उत्तेजन देणेबद्दल आपली जितकी प्रार्थना करावी तितकी थोडीच आहे. सद्गुरु कृपेखेरीज अनुभवही येणे शक्य नाही. असे वाटत असल्याने अनुभव वाढविण्याबद्दल वारंवार आपल्याजवळ प्रार्थना करणे इतकेच आमच्या आधीन आहे.'

थोडेच दिवस मध्ये गेले आणि गुरुदेवांना सद्गुरु निर्याणाचे अपार दुःख साहावे लागले. त्यांनी लिहिले आहे, 'महाराजांच्या निर्वाणानंतर एक

वर्षभर रात्रीच्या वेळी महाराजांच्या विरहाच्या दुःखाश्रूंनी उशी भिजत असे. पुढे बारा वर्षे महाराजांच्या प्रत्येक पुण्यतिथीला रात्रीच्या वेळी उशी अश्रूंनी भिजत असायची.'

हळूहळू महाराजांनीच गुरुदेवांना विरहव्यथेतून बाहेर काढून त्यांचे सारे लक्ष एम.ए.च्या परीक्षेकडे वळविले. ते प्रथमश्रेणीत प्रथम आले. त्यांना दोन सुवर्णपदके मिळाली. लगेच डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्यत्व आणि प्राध्यापकत्व त्यांचेकडे चालून आले. लक्ष्मी आणि सरस्वती दोघींची कृपा होऊन अभ्युदयासंबंधीचा आत्मविश्वास वाढला.

एवढ्यात एक मोठी नामी संधी चालून आली. 'उपनिषदे आणि पाश्चात्य वेदान्त' या विषयावर बंगलोरला विद्वद् सभेपुढे बोलण्यासाठी गुरुदेवांना निमंत्रण आले. 'समर्थकृपेनेच हे होत आहे' या उत्कट श्रद्धेने व्याख्यानांसाठी गेले. लगेच त्यांनी 'उपनिषिदिक तत्त्वज्ञानाचे रचनात्मक समीक्षण' लिहून काढले. हा त्यांचा पहिलाच ग्रंथ. त्यामुळे गुरुदेव जागतिक विद्या जगतात मानाने प्रतिष्ठित झाले.

याच काळात गुरुदेवांचा म्हैसूर संस्थानचे दिवाण कर्पूर श्रीनिवासराव, बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड आणि लोकमान्य टिळक यांचेशी निकट संबंध आला. गुरुदेवांच्या कुशाग्र बुद्धिमत्तेचा आणि गुणसंपदेचा उपयोग देशकार्याकरिता व्हावा, यासाठी त्यांनी 'केसरी', 'मराठा' पत्रांचे संपादकत्व स्वीकारावे असे लोकमान्यांनी सुचविले. पण 'राजकारण हे आपले कार्यक्षेत्र नाही. आध्यात्मिक विकासाचे ध्येय निश्चित केले आहे.' असे स्पष्टपणे सांगून गुरुदेव आपल्या स्वीकृत मार्गावर अढळ राहिले.

गुरुदेव याच वेळी 'पत्रकार' झाले पण त्यांनी काढलेले त्रैमासिक होते : 'इंडियन फिलॉसॉफिकल रिव्ह्यू.' हे भारतीय तत्त्वज्ञानाच्या आधुनिक भारतीय आणि पाश्चात्त्य अभ्यासकांचे मुखपत्र ठरले. पहिल्याच अंकात 'उपनिषदातील मानसशास्त्र' हा गुरुदेवांचा लेख होता. 'टीकात्मक संशोधन करण्याची शक्ती आणि सुसंबद्ध विचारधारा अत्युत्तम रीतीने प्रकट झाली आहे. वाचून थक्क झालो.' असे त्यावर डॉ. रा. गो. भांडारकरांनी लिहून कळविले.

गुरुदेवांनी या मुखपत्रांतून आपला ग्रीक तत्त्वज्ञानाचा व्यासंगही मोठ्या सामर्थ्याने प्रकट केला आणि 'ईशसेवा हीच देशसेवा' मानून ते योगीराज अरविंदांप्रमाणे कार्यरत राहिले.

## संकटांचे डोंगर

१९१६ साल उजाडले. गुरुदेव तत्त्वज्ञानाचे गाढे अभ्यासक भाष्यकार म्हणून गाजू लागले होते. त्यांचा संसारही सुरू होऊन एक पुत्ररत्न जन्माला आले होते. पण हा आनंद दहा महिनेच टिकला. ते त्यांच्या जमखंडीमध्ये शाळेचे पाहुणे म्हणून कार्यक्रमासाठी आले असताना मुलगा गेल्याची तार मिळाली. मनातल्या मनात दुःख गिळून ते कार्यक्रमास गेले. तिथे स्वीकारलेले सारे कर्तव्य शांत चित्ताने पार पाडले. परतताना त्यांनी मित्राला तार दाखवून म्हटले : 'देवाने दिले देवानेच नेले. देवाची करणी मानायला हवी.' असेच त्यांनी इंचगेरीला बाबामहाराजांना लिहिले, 'श्रीसमर्थ इच्छेने माझा एक दहा महिन्यांचा मुलगा होता. त्यास पंधरा दिवसांपूर्वी समर्थांनी आपल्याकडे नेले.'

यानंतर आपत्तीवर आपत्ती येत राहिल्या. साथीच्या तापाचे निमित्त झाले. गुरुदेवांच्या पत्नी सीताबाई यांचे निधन झाले. त्यांचे बाबांना पत्र गेले. त्यात वार्ता अशा रीतीने नमूद केली होती : 'माझे कुटुंबास साथीच्या तापाने देवाज्ञा होऊन आज पंधरा दिवस झाले. तिला फार पुण्यकारक गती मिळाली, यात संशय नाही.'

पत्नी पाठोपाठ मातोश्री साथीच्या तापाने आजारी झाल्या. महिन्याभरात त्यांना दुसरा अग्निसंस्कार करावा लागला. गुरुदेव अनाथ झाले. एकटे राहिले. मनात म्हणाले, 'देहाशिवाय आता आपले म्हणण्यासारखे काही राहिले नाही.' पण हे देखिले समाधान मिळाले नाही. तेच हिवतापाने आजारी पडले. आधीच क्षीण असणारी प्रकृती नंतर कायम क्षीण राहिली. प्रकृतीचे स्वास्थ्य मिळू शकले नाही.

याच काळात त्यांनी पुण्यात घर बांधण्याचा घाट घातला. अनंत अडचणी आल्या. बांधकाम कोसळले. पुढे कसेतरी घर झाले पण लाभले नाही. गुरुदेव सतत आजारी पडू लागले. जो हिवताप अंगात शिरला तो दोन वर्षे हटलाच नाही. यातच एक आपुलकीचा धागा तुटला. अचानक मुलासारखा वाटावा असा पुतण्या गेला.

प्रपंच आणि परमार्थ यांचा मेळ साधण्याचा प्रयत्न करीत गुरुदेव येणाऱ्या प्रत्येक आपत्तीवर गुरुकृपेने मात करीत होते. 'भवरोग नाश करण्याची शक्ती ज्या नामात आहे त्या नामात क्षयरोग नाहीसा करण्याची शक्ती खचितच असली पाहिजे.' अशा श्रद्धेने ते नित्य नामस्मरण करीत होते.

पुण्याची हवा मानवत नव्हती म्हणून पुण्याचा नि तिथल्या नोकरीचा निरोप घेतला. सद्गुरु सहवासातच काही वर्षे काढली. निंबाळला आश्रम उभा राहिला. हळूहळू प्रकृती ठीक झाली. त्यांचा द्वितीय विवाह झाला. १९२५ मध्ये कन्यारत्न झाले. ग्रंथलेखन होत राहिले आणि एके दिवशी अचानक अलाहाबाद विद्यापीठाचे विद्वान कुलगुरु पं. गंगानाथ झा यांचे पत्र येऊन थडकले, 'आपल्यासारख्या बुद्धिमान व योग्यतेच्या प्राध्यापकांना या विद्यापीठास मिळवून देण्यात मला जर यश मिळाले तर एक महत्त्वाचे कार्य केल्याचे श्रेय मला मिळेल, अशी माझी समजूत आहे. कृपया माझी निराशा करू नये.'

... पारिवारिक आपत्ती, प्रकृतिचे त्रास, अनेक प्रकारची निराशा आली आणि हळूहळू दूर झाली. गुरुकृपेने सारे काही योग्य तेच झाले. याला कारण एकच... गुरुदेव ज्ञानसाधना जशी करीत राहिले तशीच ते उपासनाही करीत राहिले.

## साक्षात्काराचे दर्शन

गुरुदेवांची आध्यात्मिक जडण-घडण मूलतः भाऊसाहेब महाराजांच्या सत्संगातून झाली. वयाच्या पंधराव्या वर्षीच त्यांना महाराजांकडून नाममंत्र मिळाला आणि 'परमार्थ' हेच आपले जीवितध्येय त्यांनी ठरवून टाकले. दीर्घकाळ आणि निरंतर नामसाधनेतून त्यांना साक्षात्काराचे अद्भुत अनुभव प्राप्त झाले. पण ते त्यांनी स्वतंत्रपणे लिहून ठेवले नाहीत. त्यांच्या ग्रंथसंपत्तीतून मात्र आपल्याला बुद्धिवादी तत्त्वज्ञान आणि भक्तांची उत्कट देवानुभूती यांचा मनोहर संगम अनुभवता येतो.

'गुरुदेव' या आपल्या लोकदत्त नामाचे त्यांनी आपल्या विलक्षण कार्यकर्तृत्वानं सार्थक करून दाखविले. त्यांनी भारतीय दर्शनांचे आणि संतमहात्म्यांच्या वाणीचे गंभीरपणे अध्ययन मनन केले. त्याचबरोबर पाश्चात्य तत्त्वचिंतनाचाही सखोल व्यासंग केला. आपल्या ग्रंथातून त्यांनी साऱ्यांचा सुरेख समन्वय साधला आणि ससंगत विवरणासह ईश्वराच्या साक्षात्काराचे तत्त्वज्ञान त्यांनी सिद्ध करण्याचा प्रयत्न केला.

ठळक संदर्भग्रंथ

१) ग. वि. तुळपुळे : 'गुरुदेव रानडे : साक्षात्काराचे तत्त्वज्ञान व सोपान' पुणे १९६२

२) कृ. दा. संगोराम : 'गुरुदेव रानडे यांच्या पुण्यस्मृती', निंबाळ, १९६४.

३) रामण्णा कुलकर्णी : 'अंबुराव महाराज यांचे जीवनदर्शन' अथणी, १९६६

४) म. श्री. देशपांडे : 'जीवनगंगा' (श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर चरित्र), पुणे १९६६

५) ग. वि. तुळपुळे : 'साधकाची आत्मकथा', १९६८

६) वि. चिं. केळकर : 'गुरुदेव रा. द. रानडे, आत्मचरित्र : एक शोध', पुणे १९८२

७) डॉ. शं. गो. तुळपुळे : 'गुरुदेव रा. द. रानडे' चरित्र आणि तत्त्वज्ञान, पुणे (तिसरी आवृत्ती) १९८३.

८) विजया आपटे / प्रा. सुरेश गजेंद्रगडकर : 'गुरुदेव रानडे यांचा पारमार्थिक पत्रव्यवहार', पुणे १९८६.

९) बी. आर. कुलकर्णी : 'हे प्रचितीचे बोलणे', निंबाळ, १९८६

१०) रामण्णा कुलकर्णी : 'श्रीगुरुदेव दर्शन', (द्वितीय आवृत्ती), निंबाळ, १९९२.

११) मधुकर शंकर पतिहाळ / सौ. प्रमिला प्रतिहाळ : 'चिंतनिका' (गुरुदेव रानडे यांच्या पत्रव्यवहाराचा अभ्यास), पुणे १९९८.

**डॉ. अशोक कामत**
'शिवश्री', २५८, सहजीवन सोसायटी,
पर्वती, पुणे ४११००९.

# श्रीगुरुदेवांचे आत्मानंदाचे तत्त्वज्ञान

**प्रा. सुरेश गजेंद्रगडकर**

*एक साधक*

श्रीगुरुदेवांनी साक्षात्कारवाद किंवा आध्यात्मिक तत्त्वज्ञानास अनेक नवीन परिमाणे दिली आहेत. त्यातील सर्वात मोठी देणगी म्हणजे आत्मानंदवाद ही होय. त्यांनी त्याचा उल्लेख सर्व ग्रंथांतून अनेक ठिकाणी केला आहे. गीतेवरील ग्रंथात ह्याची अधिक विस्तृत चर्चा आली आहे. हा आत्मानंद म्हणजे पारमार्थिक साक्षात्कारी अनुभवाचे शिखर असल्याचे त्यांनी म्हटले आहे.

## सहा शास्त्राधारे आनंदाचे तत्त्वज्ञान

उपनिषद्रहस्यांत प्रथमच आपले भारतीय तत्त्वज्ञान पाश्चिमात्यांच्या भाषेत व पद्धतीत मांडणारे म्हणजे गुरुदेवच होत. तीच पद्धत त्यांनी शेवटपर्यंत पाळली होती. आत्मानंदाच्या तत्त्वज्ञानाची मांडणी करताना त्यांनी 'आत्मानंदाचा विचार सहा शास्त्रांच्या दृष्टीने करता येतो' असे म्हटले आहे. परतत्त्वज्ञान व ज्ञानशास्त्र, मानसशास्त्र व साक्षात्कार शास्त्र, जीवनमूल्य शास्त्र व नीतिशास्त्र ह्या सहाही दृष्टिकोनातून अभ्यास केल्यानंतर जीवनाचा खरा ध्येयवाद म्हणजे आनंदवादच होय हे स्पष्ट होते. केवळ आत्मानंदवादच ह्या सहाही शास्त्रांना पूर्णतेला नेऊ शकतो. परतत्त्वज्ञान हे विश्वाच्या मुळाशी असलेल्या एकमेव अविनाशी तत्त्वाचे संशोधन करत असते. असे अविनाशी एकमेव तत्त्व म्हणजे आत्मानंद अथवा ईश्वर हेच आहे. ज्ञानशास्त्र आपल्या अनुभवाची प्रमाणभूतता किंवा भ्रामकता ह्या विषयी शोध घेते आणि संतांनी स्वानुभवाने सांगितलेले सत्य हे आहे की आत्मानंद हे एकच ज्ञान भ्रमरहित पूर्ण सत्य आहे. ईश्वराचे दर्शन हेच खरे ज्ञान ! आपली जाणीव - मनाच्या सर्व शक्ती - ईश्वराकडे नेणे हे ईश्वराभिमुख मानसशास्त्र व आत्मानंदातच ही जाणीव सर्वोच्च स्थितीला पोहोचते. सत्यं शिवं सुंदरम् हे मिळवण्याच्या स्थिती पलीकडीची स्थिती म्हणजे आनंदाची स्थिती. साक्षात्कार शास्त्राच्या दृष्टीचा विचार आपण पाहिला तर खरा साक्षात्कार म्हणजे आत्मानंदच होय. ईश्वराच्या प्रत्यक्ष दर्शनाच्या आनंदाविषयी श्रीगुरुदेव, आनंदच होणे - आनंदरूप होणे ही अंतिम पायरी असे म्हणतात. जीवनमूल्य शास्त्राच्या दृष्टीने विचार केला तर परमेश्वर दर्शन, साक्षात्कार आत्मानंद हेच सर्वश्रेष्ठ जीवनमूल्य आहे. आत्मसाक्षात्काराचा आनंद मिळवणे हेच जीवनाचे ध्येय आहे. ह्या श्रेष्ठ मूल्यातच सर्व मूल्ये सामावलेली असतात. आत्मानंद मिळवला की आपोआपच इतर मूल्येही आपलीशी होतात. नीतीशास्त्राविषयीचे श्रीगुरुदेवांचे विचार अत्यंत स्वच्छ व वैशिष्ट्यपूर्ण आहेत. नीती व आत्मसाक्षात्कार यांची वाढ एकत्र असते असे ते म्हणतात. ईश्वरपर्यवसायी नीतीशास्त्र हा गुरुदेवांच्या आत्मानंदाच्या तत्त्वज्ञानाचा अविभाज्य भाग आहे. आत्मानंद हे नीतीचे शिखर. नीतीशास्त्राच्या दृष्टीनेही साक्षात्काराचा आनंद प्राप्त झाल्यावर अनीती घडूच शकत नाही. कारण तो आनंदाशी एकरूप झाला असतो. त्याचा जीवभाव उरतच नाही. तेव्हा आत्मानंद हे नीतीचे शिखरच ठरते अशा रीतीने सहाही दृष्टिकोनातून श्रीगुरुदेवांनी आत्मानंदाचे श्रेष्ठत्व थोडक्यात मांडले आहे.

## गीतेतील आनंदाचे तत्त्वज्ञानाचे उल्लेख

श्रीगुरुदेवांच्या योजित ग्रंथाचे नाव 'पाथ वे टु गॉड' असे होते. त्यामध्ये परमार्थमार्गाची विविधांगी चर्चा ते करणार होते असे त्यांनी अनेकदा म्हटले आहे. शिवाय हे त्या ग्रंथाच्या योजित प्रकरणांवरून स्पष्ट होते. त्या ग्रंथाचे उपशीर्षक 'आत्मानंदाच्या तत्त्वज्ञानाचा एक अभ्यास' (ए स्टडी इन् द फिलॉसॉफी ऑफ् बिॲटिफिसिझम) असे होते. तो ग्रंथ पुरा झाला नाही हे आमचे दुर्भाग्य. ह्या आनंदाच्या तत्त्वज्ञानासाठी बिॲटिफिसिझम हा स्वनिर्मित शब्द त्यांनी वापरला आहे. ह्या नव्या शब्दाच्या निर्मितीने विशिष्ट अर्थ त्यांना पोचवायचा होता. डेक्कन कॉलेजमध्ये ते नोकरी करत असता ह्या शब्दनिर्मितीने प्रा. वुडहाऊस ह्यांना फार आनंद झाला होता हे त्यांनीच सांगितले आहे. भगवद्‌गीतेवरील ग्रंथात ह्या आत्मानंदाची चर्चा दोन-तीन ठिकाणी केली आहे. विशेषतः गीतेतील आनंदवाद, भव्योदात्त अनुभव इत्यादींच्या चर्चेच्या वेळी आनंदवादाचे स्वरूप मांडले आहे. गीतेमधील आनंदवादाच्या चर्चेत तीन मुद्दयांच्या योगे आनंदवाद मांडला आहे.

१) हा ब्रह्मानंद होण्यासाठी आत्मसाक्षात्काराची-आत्म्याच्या प्रत्यक्ष अनुभवाची गरज आहे. गीतेच्या आधारे 'ब्रह्मसंस्पर्श' ह्या संकल्पनेचे महत्त्व सांगताना ईश्वराशी तत्काल संबंध-संवाद-स्पर्श-हवा हे त्यांनी सांगितले आहे. ईश्वराच्या (आत्म्याच्या) साक्षात्काराचे जे काही दृश्य, नाद, गंध, स्राव, अमृत, स्पर्शन अनुभव येतात त्या प्रत्येकात आनंद देण्याची शक्ती असतेच. परंतु सुरवातीला तो जाणवत नाही. अनुभवांची वाढ होत राहिली की कळतो. दर्शन, स्पर्शन, संभाषण हे समोर दिसणाऱ्या आत्मरूपाशी होत असताना ब्रह्मानंद होतो. त्याची जाती बदलते.

२) विविध अनुभव घेतल्यानंतर चढत्या-वाढत्या अनुभवानंतर येणारी पुढची स्थिती-दुसऱ्या मुद्दयासाठी घेतली आहे. आत्मा व परमात्म्याचे ऐक्य, संत व ब्रह्म एक होणे ही 'निर्वाण' स्थिती अंतरात्म आंत व बाहेर एकच आत्मा आहे हे आत्मा स्वतःला बाहेर काढून पाहतो. ह्या अनुभवात आनंद-श्रेष्ठ आनंद आहे. त्या आनंदाचा अनुभव सर्व आत्मज्ञानी संतांना आलेला आहे व तो घेतल्याचे त्यांनी स्पष्टपणे लिहिले आहेच.

३) तिसरा महत्त्वाचा मुद्दा म्हणजे ब्रह्म व आनंद एकच. ब्रह्म म्हणजेच आनंद व आनंद स्थिती होय. संत आनंदमय झाला आहे म्हणणे आणि तो ब्रह्माशी एकरूप झाला आहे म्हणणे दोन्ही एकच होय. हे वेगळे सांगण्याची गरज नाही. परंतु तो आनंद हा ब्रह्मच. त्या आनंदाचे परमसत्याशी ऐक्य, आनंदाची जीवनमूल्याधिष्ठित संकल्पना व परतत्त्ववादाची ब्रह्म्याची संकल्पना हे तिन्ही एकच आहेत.

*प्रशान्तमनसंह्येनं योगिनं सुखमुत्तमम्*
*उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ ६:२७ ॥*

ह्या श्लोकाचा उल्लेख करून आनंद व परमेश्वर एकच असे श्रीगुरुदेवांनी म्हटले आहे. जीवनमूल्याधिष्ठित आनंद व परतत्त्वशास्त्राधिष्ठित ब्रह्म एकच. काही तत्त्वज्ञांच्या मते आत्मजाणीव हे

मध्यवर्ती तत्त्व आहे. श्रीगुरुदेवांनी स्वानुभवाच्या जोरावर हे मान्य केले नाही. 'सारे अस्तित्वच ज्या (चक्रावर) फिरते त्या परमसत्याचा आधार; टेकू परमानंदच आहे. एकामध्ये आदर्शवाद (idealism) असेल तर दुसऱ्यामुळे आत्मानंदवाद सिद्ध होतो असे ते म्हणतात. ह्या श्लोकाचा अर्थ सांगताना 'ब्रह्मभूनम्' हा शब्द 'योगिनम्' बरोबर आणि 'सुखं' बरोबरही घेऊ शकतो असे सांगून ब्रह्मानंद-आत्मप्रसादजसुख आहे किंवा आत्मानंद म्हणजे ब्रह्माशी ऐक्य पावणे असा अर्थ निघतो, हे सिद्ध करतात. ब्रह्माबरोबर ऐक्य पावणे म्हणजेच आनंदाशी एकरूप होणे हाच आत्मानंदवाद आणखी एके ठिकाणी ह्याचा उल्लेख केलेला आठवतो. स्थितप्रज्ञाचा अर्थ लावतानाही त्याचा साक्षात्कारशास्त्रीय अर्थ लावून त्याची व्याख्या दिली आहे. खऱ्या स्थितप्रज्ञास आत्मा सर्वत्र (आंत बाहेर इत्यादी) दिसतो. तो सतत आनंद भोगत असतो. ही आत्मानंदाची स्थिती जीवनातील परमोच्च स्थिती असे ते सांगतात.

आत्मानंदाचा विविधांगी विचार गुरुदेवांनी अत्यंत खोलवर जाऊन केला होता. 'रसो वैसः।' (ब्रह्म हा रस आहे) ह्या अनुभवाच्या चर्चेच्या वेळी रसह्ययवायं लब्ध्वा आनंदी भवति । हा रस मिळाल्यास साधक आनंदी होतो असे सांगतात. ह्या 'आनंदरसास' । गुरुदेव Flaxounism रसास्वाद वाद म्हणतात. ह्या अनुभव रसाचा अनुभव घेताना आनंद देणारा व घेणारा आनंदच होतात. 'रस'च होतात. त्रिपुटीचा लय होऊन आनंदच राहतो. हा अनुभव केवळ साक्षात्काराचा परिणाम म्हणून उपभोगता येतो याचे स्मरणही त्यांनी दिले आहे हे विशेषत्वाने लक्षात येते.

आत्मानंदाचा 'भव्योदात्त' व 'विश्वरूपदर्शन' ह्यांच्या संदर्भातही उल्लेख येतो. भव्योदात्त म्हणजे सौंदर्य तत्त्व व हेतुवाद ह्यांचा एकत्रित अनुभव – एक महत्त्वाचा विशेष अनुभव असे म्हटले आहे. कृष्णाने अर्जुनाला विश्वरूपदर्शनाचा अनुभव दिला तो भव्योदात्त अनुभव होय. श्रीगुरुदेवांनी अक्रूर, यशोदा, राम ह्यांना झालेल्या विश्वरूप दर्शनाचाही उल्लेख केला आहे. त्यांनी ह्या विषयावर दिल्लीला राष्ट्रपती भवनात दिलेल्या व्याख्यानात हिंदी (कबीरादी) मराठी (ज्ञानेश्वरादी) व कानडी (भवतारकादी) संतांच्या पदाचाही उल्लेख केला आहे. स्वतःच्या अनुभवाने 'आदर, भय, आनंद, आश्चर्य व प्रेम' ह्या सर्व भावना एकदम ह्या भव्योदात्ताच्या अनुभवात असतात असे स्पष्ट सांगतात. इथेच आनंद व पराशांती ह्या वरवर विरोधी वाटणाऱ्या पारमार्थिक अनुभवाविषयी निश्चित विधाने केली आहेत. 'आनंदाच्या अनुभवानंतर पराशांती मिळते. ब्रह्मानंदात निमग्न होणे हे शांतीकडे नेणारे पाऊल आहे.' म्हणजे पारमार्थिक अनुभवाच्या उच्चतम स्थितीचे हे द्योतक आहे. शांती व आनंद हे एकमेकांस पूरक आहेत. श्रीगुरुदेवांनी उपनिषदांवरील ग्रंथांत तैत्तिरीय तथा इतर उपनिषदांतील 'मानवी आनंदाच्या पटींचे कोष्टक मांडून आत्मानंद हा मानवी भौतिक आनंदाच्या अनेक पट असतो' ह्या संदर्भात स्पष्ट सांगितले आहे की, ब्रह्मानंदाची अशी पटीने होऊ शकत नाही. कारण हा केवळ 'पटीचा' भाग नसून त्या आनंदाच्या जातीतच फरक आहे. (The quality of bliss असे ते म्हणतात). मिलच्या 'डुकराचे सुख व सॉक्रेटिसचा आनंद' ह्या तुलनेच्या आधारे 'ब्रह्मानंद हा सॉक्रेटिसच्या आनंदाच्या अनेक पटीने वरच्या पातळीचा असतो' असे विधान गुरुदेवांनी केले आहे. मानवी पातळीवरील सुख-इंद्रिय सुख हे परिघावरचे आहे, तर आत्मानंद हा आत्माच स्वतःला विभागून समोर ठेवून स्वतःच आनंद उपभोगत असल्याने तो केंद्रबिंदूमध्ये असतो. छांदोग्य उपनिषदाचा संदर्भ देऊन 'खरा आनंद हा अनंताच्या अनुभवात असतो. सर्वश्रेष्ठ आनंद म्हणजे अनंततत्त्व, स्व व आत्मा ह्या तिन्हीचे ऐक्य अनुभवणे हाच आत्मानंद. हा मिळवण्यापलीकडे दुसरे कुठलेही श्रेष्ठ ध्येय माणसाला असूच शकत नाही.

त्यांनी 'आनंदमयो अभ्यासात्' वरील चर्चेतही आनंदवादाचा उल्लेख केलेला आढळतो. बादरायणाने जैमिनीच्या मुक्तात्म्यास ब्रह्मानंद मिळतो ह्या मतावर चर्चा करताना आत्मा हा 'चित्' व 'आनंद' ह्यांच्या उपभोगाने त्यांच्याशी ऐक्य पावतो असे सांगितले आहे. शंकराचार्यही आनंद मानतात पण तो 'गुण' मानतात. भक्त 'चित्मय' होतो पण आनंदापासून वेगळा असतो. अशा प्रकारचे मत शंकराचार्यांचे आहे. 'ईश्वर चिद्रुप आहे हे मान्य केल्यावर तो आनंदरूप आहे, आनंदच आहे हे का मान्य होऊ नये?' असे श्रीगुरुदेव शंकराचार्यांच्या पुढे एक पाऊल जाऊन म्हणतात. 'चिदानंदस्वरूप' म्हणायचे व दुसरीकडे 'चित्', 'आनंद' वेगळे म्हणणे चूक आहे. बुद्धी व आनंद ह्यांची परमस्थिती एकच व ती म्हणजे ब्रह्मरूपच. ही जाणीव ब्रह्मानंदाशी निगडित आहे.

गौडपादांच्या कारिकेविषयीही (III.47) श्रीगुरुदेवांनी म्हटले आहे की, 'परमानंदाची स्थिती भोगल्यानंतर ब्रह्माशी एक झाल्यानंतर मनुष्य सर्वश्रेष्ठ आनंदाच्या निर्वाणस्थितीस पोचतो.' 'निर्वाण म्हणजे परम सत्य. ही परमानंद स्थिती' असे गौडपादांनी म्हटल्याचे स्पष्ट केले आहे. सर्वज्ञ ब्रह्म्याशी ह्या आनंदाचे ऐक्य गौडपादांनी इथे मांडले असल्याचेही गुरुदेवांनी दाखवून दिले आहे. बुद्धी व आनंद परमोच्च स्थितीत एकत्र असतात. 'यस्यब्रह्मणि रमते चित्तं नंदति नंदति नंदत्येव' ह्या संदर्भात आत्मा-परमात्मा एक आनंदरूप होतात. तिथे त्या वेळी आनंदाखेरीज काहीही नसते असे म्हटले होते. ह्या आत्मानंदाच्या साक्षात्काराच्या अनुभवातून मानवी जाणीवेच्या पातळीवर आल्यावर साधकाला कळते की आपण आनंदरूप अवस्थेत होतो, असे ते ऐक्य असते हे श्रीगुरुदेवांनी स्वानुभवाने सांगितले आहे.

बादरायणाच्या ब्रह्म्यास भूमा किंवा असीम आनंद म्हणता येईल ह्या व्याख्येवर श्रीगुरुदेवांनी अप्रतिम भाष्य केले आहे. 'भूमाच्या तत्त्वामध्ये आधिभौतिक, नैतिक व पारमार्थिक मूलतत्त्वे आहेत कारण भूमाच्या संकल्पनेत महानता, आनंद व साक्षात्कार ह्या तीनही घटकांचे एकीकरण आहे असे श्रीगुरुदेव वेदांतावरील ग्रंथात म्हणतात.

मराठी संतांच्या परमार्थमार्गावरील ग्रंथात मराठी संतांच्या अभंगाच्या आधारे, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव मधील ज्ञानेश्वरांच्या परमानंदावरील ओव्यांच्या आधारे, रामदास, एकनाथांच्या दासबोध भागवत ह्यांतील ओव्यांवर भाष्य करताना 'परमानंद-आत्मानंद-आनंद आनंदच होणे, हा परमोच्च अनुभव असल्याचे सांगताना हिंदी संतांवरील ग्रंथांत 'रामरस' विषयी सांगताना त्या अमृतरसाने समता व परमानंद भोगला हे स्पष्ट करतात. कबीर, दादू, मीरा इत्यादी सर्व संतांच्या पदांतील अनुभवांच्या आधारे आनंदाचे तत्त्वज्ञान मांडतात.

*'आनंद नहाया, बंदा खुदा दोनो बिसर गया ।*
*बेनाम का नाम होकर रहदाना राहा ॥'*

ह्या अनुभवाचे विश्लेषण करताना 'त्रिपुटी लय होतो. भोगणारा व भोग्य नाहीसे होऊन केवळ आनंद आनंदच उरतो. बाकी जाणीव नाहीशी होते असे सांगतात, कन्नड संतवाङ्मयातील परमार्थ मार्ग ह्या ग्रंथाची सुरुवातच वरच्या पट्टीत झाली आहे. ते प्रस्तावनेत म्हणतात, 'ब्रह्मानंद मीमांसा म्हणजे आत्मानुभवाची इंद्रियावर सर्वव्यापी घट्ट पकड कशी असते याचे विवरण होय.' एका उघड्या तळहातावर एक, दोन, तीन

अशी क्रमाने पाचही बोटे मिळवयाची व दुसऱ्या तळहाताचा विळखा घालून ती सर्व घट्ट धरून ठेवायची ह्या कृतीस ग्रीक भाषेत कॅटॅलेप्सिया म्हणतात. आध्यात्मिक आनंदात असा कॅटॅलेप्सिया असतो. असे एकत्रित गुंफलेले संमिश्र अतींद्रिय अनुभव म्हणजेच (डोळे, कान, स्पर्श, गंध, रस इत्यादी). केवळ ब्रह्मानंद होय. त्या ब्रह्मानंदाचे एक स्वतंत्र तत्त्वज्ञान आहे. त्यावर स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याची माझी तीव्र इच्छा आहे. ब्रह्मानंद हे अंतिम ध्येय आहे. त्याच्या प्राप्तीसाठी जगातील सर्व संतांनी प्रयत्न केले आहेत. परमानंदांचा आस्वाद घ्यायचा ह्या एकाच ध्येयाने सर्व संतसमाज एकत्र बांधला गेला आहे.' ह्या ग्रंथात पुढे पुरंदरदास, चिदानंद, महिपती, नागलिंग इत्यादींच्या पदांच्या आधारे हे ब्रह्मानंदाचे तत्त्वज्ञान मांडले आहे. ह्या विषयी आणखी पुढे एक मुद्दा मांडतात, 'ह्या आनंदाचा घेणाऱ्याला तो आनंद सर्वत्र वाटणे हे कर्तव्यच बनते. सर्व मानवतेविषयी कळवळा, सर्वात्मभाव निर्माण होतो.' आणि ह्या ग्रंथांच्या शेवटी सांगतात –

'अशा साक्षात्कारी संतांचा एक समाज बनतो. अखिल मानवतेचे कल्याण व्हावे व त्यांचे जीवन सुखी व्हावे एवढ्याचसाठी ते जिवंत राहतात व ईश्वराचा शुभसंदेश ह्या ध्रुवाच्या टोकापासून त्या ध्रुवाच्या टोकापर्यंत अनादि कालापासून अनंत कालापर्यंत आकाशात घनगर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणे सर्व विश्वास सांगतात. श्रीगुरुदेवांनी हेच कार्य आम्हा सर्वांसाठी पस्तीस वर्षे केले. त्यासाठी कितीही कृतज्ञता दाखवली तरी कमीच पडेल.

(हा लेख लिहिण्यास एन.व्ही.कुलकर्णी यांचे परम सहाय्य झाले.)


**प्रा. सुरेश गजेंद्रगडकर**

६५, पाटील इस्टेट, मुंबई-पुणे रस्ता, शिवाजीनगर, पुणे ४११००५.

# श्रीगुरुदेवांच्या बैठकीतील भक्ती प्रबोधनाचा 'सत्संग'

**श्री. नारायण रामचंद्र मसलेकर**

*रेल्वेत नोकरी. निवृत्त. श्रीगुरुदेवांचे सत्‌शिष्य व निंबाळ आश्रमाचे विश्वस्त.*

## मनोगत

'तापत्रये हा बहुगांजलो मी'... ही उक्ती माझ्या पूर्व आयुष्याची ओळख पटण्यास पुरेशी बोलकी आहे. शिरवळ (अक्कलकोट) या खेडेगावातला अतिशय गरीब कुटुंबातला सर्वात मी मोठा मुलगा. त्यामुळे मोठ्या प्रपंचाची नैतिक जबाबदारी माझ्यावरच होती. इमाने-इतबारे नोकरी करून ही प्रपंचाची भली मोठी नाव पैलतीराला सुखरूप कशी नेता येईल या विवंचनेतच मी नेहमी आकंठ बुडालेला असायचा. हा भवसागर पार करण्यास मी एकटा अगदी अपुरा आहे, असहाय्य आहे. मला कुणाची तरी मदत हवी. मानवी मदत मला कितीशी पुरणार? मला कुण्या दैवी शक्तीचाच आधार हवा. भगवंतांचे अधिष्ठान हवे. त्या शिवाय मी जगूच शकणार नाही ही भावना दिवसेंदिवस दृढ होत चालली होती. रामकृष्ण परमहंस, विवेकानंद यांच्या साहित्याने मी भारावून गेलो होतो आणि नोकरी निमित्ताने पंढरपूरच्या विठ्ठल-भक्तांच्या सहवासाने परमेश्वराकडे ओढला गेलो होतो. आपल्याला संतांचे दर्शन केव्हा होईल? माझ्या इच्छित देवगुरुंची भेट मला केव्हा होणार? या एकाच तळमळीने मी अक्षरशः आतल्या आत जळत होतो. काय करावे? कुठे जावे? कुणाकडे गेले असता ह्या चक्रव्यूहातून सुटका होऊन चिर-आनंद मिळेल? अशी माझी अंतरावस्था इ. स. १९४१ ते १९४७ पाच/सहा वर्षे होती.

## दृष्टांत

इ. स. १९४७ मधील २५ जुलैच्या निशांत समयी माझ्या नशिबाने कूस बदलली आणि मला स्वप्न पडले.

तेजःपुंज आनंदी चेहरा, डोक्याला रुमाल (फेटा) गुंडाळलेला, लांब कोट, लुंगीवजा पांढरेशुभ्र धोतर, कृश पण सतेज अंगकांती अशा महान संतांचे दर्शन झाले आणि त्यांचे मुखातून 'तुला मी मदत करीन' असे शब्दोद्‌गार बाहेर पडताच मी मंत्रमुग्ध होऊन निःशब्द झालो. त्या वेळचा माझा आनंद शब्दांकित करणे केवळ अशक्यच ! कृतज्ञतापूर्वक आनंदाश्रू पाझरत असतानाच मी स्वप्नातून जागा झालो.

## ईश्वरी सूचकत्व

माझे दृष्टातांतील सद्‌गुरु मला या अवनीवरती केव्हा दिसतील? केव्हा भेटतील? या एकाच तळमळीमुळे मला जेवण-खाण काही सुचेनासे झाले. एकच ध्यास लागून राहिला की माझे गुरुदेव मला केव्हा भेटतील? अहमदनगरचे मेहेरबाबा, शिर्डीचे साईबाबा, केडगांवचे नारायण महाराज इ. सर्व पडताळून सुद्धा दृष्टांतातील वर्णनाप्रमाणे कोणीच दिसेना. काय करावे? कुठे हुडकावे? या दोलायमान अवस्थेत काही दिवस गेले. काजव्याप्रमाणे दृष्टांतात क्षणभर अधांतरी चमकून पुन्हा अदृश्य झालेले माझ्या हृदयींचे स्वामी माझ्या पुढे केव्हा प्रगट होतील? ही आस रात्रंदिवस लागून राहिली होती.

अचानक एकेदिवशी माझे परमस्नेही, समव्यवसायी, ज्येष्ठ व श्रेष्ठ साधक श्री. शामराव कुमठेकर दौंड स्टेशनवर मुंबई मेलने उतरले. मीही तेथेच ड्यूटीवर होतो. ते भेटताच मला मनस्वी आनंद झाला व मी त्यांना वरील दृष्टांताचा व सद्‌गुरु भेटीच्या तळमळीचा सारा वृत्तांत निवेदन केला. अशा परिस्थितीत आपल्याला जाणून घेणारा, आपल्या जिवाभावाचा सखा जवळ असावा या उद्देशाने मी त्यांना दौंडलाच बदली करून घेण्याविषयी आग्रह केला. त्यावर श्री. शामराव म्हणाले, 'मी कशाला इथे येऊ? तुलाच मी ओढतो.' या वाक्याचा पुरेसा उलगडा न झाल्यामुळे मी विचारले, 'याचा अर्थ काय?' श्री. शामराव उत्तरले, 'निंबाळला जा. तेथे आमचे साहेब (श्री. रा. द. रानडे) आहेत. त्यांना भेट. ते तुझ्या दृष्टांताप्रमाणेच हुबेहुब दिसतात.' येथपर्यंत श्री. शामराव त्यांचे अनुग्रहीत अनुयायी आहेत याची मला बिलकुल कल्पना नव्हती.

## भाग्योदय

मी तात्काळ निंबाळला मोठ्या उत्साहाने-आनंदाने माझ्या गुरु-माऊलीला भेटायला गेलो. पण निराशाच पदरी पडली. दुसऱ्यांदाही त्यांचे दर्शन होऊ शकले नाही. दोन्ही वेळेला सौ. सीताबाई तथा काकूसाहेब (रानडे) यांची भेट झाली. 'तुम्हाला भेटतील' असे त्यांनी आश्वासन दिले. तिसऱ्या वेळेस मी १७ ऑगस्ट १९४७ या दिवशी जेव्हा निंबाळला गेलो त्या दिवशी जणू माझ्या जीवनाचाच भाग्योदय झाला असे म्हणावयास हरकत नाही. दृष्टांतातील दर्शन व प्रत्यक्षातील दर्शन झाल्यावर हेच माझ्या मनीचे 'देव-गुरु' याची खात्री पटली. जिवा-शिवाची भेट होऊन मी त्यांना शरण गेलो. अंतःकरणपूर्वक नमस्कार करतो तोच मला 'जवळ बैस. तुला कष्ट फार झाले आहेत' अशी त्यांची अमृतवाणी कानी पडली आणि मला माझ्या जीवनाचे सार्थक झाल्याचे वाटून मी धन्य धन्य झालो. मला कृतकृत्य वाटले. माझे कष्ट जाणणारे व त्यातून श्रममुक्त करणारे हेच तर माझे सद्‌गुरु आहेत. हेच देव आहेत असे खोल खोल अंतःकरणात रुजले आणि त्या क्षणापासून खरोखरच त्यांनी माझा भार स्वीकारला व मी कष्टमुक्त झालो. 'तुला मी मदत करीन' ही दृष्टांतवाणी प्रत्यक्षात मात्र देववाणीच होऊन अमृतवाणी झाली. यथानुकाल ३/४ महिन्यांनी म्हणजे १ जानेवारी १९४८ या दिवशी मला त्यांच्याकडून प्रथेनुसार श्री. काकासाहेब कारखानीसांतर्फे 'सबीज नाम' मिळाले आणि त्या क्षणापासून माझी खऱ्या अर्थाने परमार्थ पंथाची वाटचाल सुरू झाली.

## जवळीक

मी नोकरीला रेल्वेत तिकीट चेकिंग ब्रँचला होतो. त्यामुळे सतत प्रवास व बदल्या व्हायच्या. जमेल तसे अधून-मधून मी निंबाळला जात असे. श्रीगुरुमाऊलींचे दर्शन-संभाषण मनात साठवून परतत असे. एक सोलापूर सोडले तर मला पारमार्थिक सत्संग मिळणे कठीण होई. अशा वेळी निंबाळच्या मुक्कामातील प. पू. गुरुवर्यांची वचने मी लिहून ठेवीत

असे. तीच पुढे मला 'सत्संग' देऊ लागली. नंतर माझी बदली सोलापूरला झाली. त्यामुळे निंबाळही जवळ झाले आणि साधकांच्या-भक्तांच्या सहवासातही आलो. श्री. गोपाळराव औरंगाबादकर हे माझे ज्येष्ठ गुरुबंधू व स्नेही होते. मी त्यांच्याकडे नेमाला जात असे. (आजही बरेच लोक त्यांच्या घरी नेमाला जातात.) वारंवार जाण्याने आमचा स्नेह दृढ होऊन माझी पारमार्थिक ओढ ओळखून त्यांनी मला त्यांच्या जवळ असलेली श्रीमहाराजांची (प.पू. भाऊसाहेब उमदीकर) २०/२५ पत्रे वाचावयास दिली आणि या पत्रांच्या विषयी कोणाजवळ काही बोलू नका म्हणून बजावले. मला ही सुवर्णसंधीच वाटली. मी ती पत्रे वाचली. त्यातील पारमार्थिक तत्त्वे, चर्चा, खुलासा, सूचना इ. सर्व खूप आवडले म्हणून त्या पत्रांची कॉपी करून 'हा मौल्यवान ठेवा' माझ्याजवळ ठेऊन पत्रे परत श्री औरंगाबादकरांच्या हवाली केली. याची वाच्यता मी कुठेही केली नाही. प्रवासात या पत्रांचा वाचन-मननासाठी मी उपयोग करत असे. निंबाळला जातानाही ह्या पत्रांची वही कायम माझ्याजवळ असे. ही गोष्ट मात्र कसे कोण जाणे निंबाळला श्रीगुरुदेवांच्या घरी राहणाऱ्या श्री. जगन्नाथ लेले या वृद्ध गृहस्थांना माहीत होती. इ. स. १९१९ मध्ये गुरुदेवांच्या मातोश्री व पत्नी यांचे निधन झाले असताना गुरुदेव अगदी एकाकी झाले होते. तेव्हा हे श्री. लेले त्यांच्याकडे आले आणि त्यांना सर्वतोपरी मदत करू लागले. पुढे श्रीगुरुदेव जेव्हा खूप आजारी पडले तेव्हा श्रीजगन्नाथांनी गुरुदेवांची आपुलकीने-मायेने खूप सेवा-सुश्रुषा केली. तेव्हापासून श्री. जगन्नाथ लेले हे श्रीगुरुदेवांच्या कुटुंबातील एक व्यक्तीच बनून शेवटपर्यंत त्यांच्या जवळच राहिले. श्री. लेले हे बाबांचे (प. पू. श्री. अंबुराव महाराज) यांचे शिष्य होते. त्यामुळे श्रीमहाराजांनीच जणू माझ्या मदतीला 'या जग्याला' माझ्याकडे पाठविले असे श्रीगुरुदेव प्रेमाने सांगत असत.

## पत्र स्नेह

एकदा रात्री दीड-दोनचे सुमारास श्रीगुरुदेवांनी श्री. जगन्नाथ यांना श्री. नारायणराव काळे यांचे 'गोकुळाष्टमी' संदर्भातील श्रीमहाराजांना (उमदीचे श्रीभाऊसाहेब महाराज हे श्री गुरुदेवांचे सद्गुरु होत.) पाठविलेले पत्र शोधून काढून वाचण्यास सांगितले. जगन्नाथला पत्र हुडकण्यास वेळ लागणार हे श्रीगुरुदेव जाणून होते. श्री. जगन्नाथांची अवस्था मोठी विचित्र झाली होती. दिवसभर कामे करून थकून नुकताच आडवा झालेला आणि हे पत्र हुडकून काढावयाचे म्हणजे मोठे जिकीरीचे काम. त्या काळात रॉकेलचे कंदिल होते. मिणमिणत्या प्रकाशात झोपाळू डोळ्याने भल्यामोठ्या पेटाऱ्यातून नेमके पत्र हुडकणे आणि तेही शक्य तितक्या लवकर म्हणजे खरोखर परीक्षाच होती! कुठे हुडकावे या विवंचनेत असताना त्यांना एकदम मी निंबाळला रात्री येणार होतो याची आठवण झाली आणि श्री. लेले तडक माझ्याकडे आले. मी जुन्या घरात (सध्याचे मंदिर) पिशवी डोक्याला घेऊन झोपलो होतो. त्यांनी मला रात्री २/३ चे सुमारास उठवून वरील सगळी हकीकत सांगून 'त्या' पत्राची मागणी केली. मी हादरलोच? किंचित भीतीही वाटली. मी पत्र देण्यास हयगय करतोय हे पाहून श्री. जगन्नाथ कळवळून म्हणाले, 'अरे, एवढ्या रात्री ते पत्र मी कुठे शोधत बसू? तुझ्याजवळची वही दे. मी श्रीगुरुदेवांना पत्र वाचून दाखवतो. त्यांच्या हातात अजिबात देत नाही. त्यांना काही कळणारही नाही. काम झाले की तुला तुझी वही मी गुपचूप आणून देईन. काळजी करू नकोस.' मला श्री. लेलेंची कीव आली व मी पिशवीतून वही काढून जरा साशंक मनानेच त्यांच्या हाती सुपूर्त केली. श्री. लेले नंतर आनंदाने वही घेऊन झपाझप श्रीगुरुदेवांकडे गेले.

श्रीगुरुदेवांना हवे असलेले श्री. नारायणराव काळे यांचे पत्र जगन्नाथांनी वाचून दाखविले. 'जग्या बघू मला ते पत्र' असे गुरुदेव म्हणताच श्री. जगन्नाथ गर्भगळीत झाले. श्रीगुरुदेवांनी माझी वही हातात घेऊन चाळून पाहिली व 'ही वही कुणाची?' असे विचारले. 'मसलेकरांची.' एवढे एकच वाक्य लेले कसेबसे उच्चारू शकले. श्रीगुरुदेवांनी ती वही जगन्नाथ जवळ न देता स्वतः जवळच ठेवली. मीही इकडे जुन्या घरात जगन्नाथ ती वही घेऊन केव्हा येतात याची आतुरतेने वाट बघत अस्वस्थच होतो. जस-जसा जगन्नाथांना यायला उशीर होऊ लागला तस-तशी माझी बेचैनी वाढतच होती आणि श्रीगुरुदेवांच्या हाती ती वही लागली तर कोणते संकट ओढवेल या जाणिवेने मी पुरता घाबरलो होतो.

## भयकृत भयनाशनः

सकाळी 'गुरुदेव तुम्हाला बोलवत आहेत' असा निरोप मला मिळाला. एरवी आनंदाने धावतच गुरुदेवांच्या घरी जाणारा मी पुढील संकटाची चाहूल लागून भय व अपराध अशा संमिश्र अवस्थेत कधी त्यांच्या घराच्या पायऱ्या चढलो हे समजलेच नाही. श्रीगुरुदेव तेव्हा त्यांच्या खोलीत होते. मी आत जाताच वही माझ्या दिशेने करत 'ही वही तुमची आहे?' असे गंभीर होऊन विचारले. मी 'हो' म्हणताच जरा आवाज चढवून 'ही चोरी आहे कुठे मिळाली तुम्हाला ही महाराजांची पत्रं?' असा त्यांनी प्रश्न केला. मला अतिशय वाईट वाटले होते. परंतु उत्तर देणे भाग होते. म्हणून मी नम्रपणे कापऱ्या आवाजात म्हणालो, 'खरं सांगू का?...' 'सांगा, सांगा. खरं तेच सांगा.' 'मला ही पत्रे सोलापूरच्या श्री. गोपाळराव औरंगाबादकरांनी वाचावयास दिली होती. देताना ह्या पत्राविषयी अतिगुप्तता पाळा असे ते म्हणाले होते. मी कुणालाही पत्राविषयी बोललो नव्हतो. घरी निवांत वेळी व प्रवासात ह्या पत्रांचे मी वाचन-चिंतन करतो. मला ही पत्रे पारमार्थिक मार्गदर्शिकाच वाटतात. इतर कोणा साधकांचा मला लाभ मिळू शकत नाही म्हणून मी हा 'अमूल्य सत्संग' नेहमी माझ्या जवळ जपून ठेवतो.' मी जस-जसा बोलत गेलो तस तसा त्यांच्या चेहऱ्यावरचा भाव विरत गेला. माझा त्या पत्राविषयीचा अंतःकरणपूर्वक जिव्हाळा त्यांनी जाणला आणि एकदम स्मितहास्य करीत म्हणाले, 'अशी चोरी करावी. जरूर करावी.' हे शब्द ऐकताच माझ्या मनावरचे दडपण एकदम दूर झाले आणि मला मनोमन खूप आनंदही झाला. 'तुम्ही अगदी व्यवस्थित खूप चांगले लिहिले आहे.' असे म्हणून त्यांनी माझी थोडी स्तुतीही केली. ती ऐकून माझी अपराधीपणाची भावना कुठल्या कुठे पळाली व मी सुखावलो.

## स्नेहपूर्ण संभाषण

तेव्हा पासून मी निंबाळच्या बैठकीतील महत्त्वाच्या चर्चा, महत्त्वाच्या घटना शेवटपर्यंत लिहीत आलो आहे. यथावकाश माझ्या लेखनाची पद्धत व आवड पाहून श्रीगुरुदेवांनी १५/२० आठवणी वेळोवेळी तोंडी सांगून त्या व्यवस्थित लिहून काढावयास सांगितले. मी आठवड्याच्या सुटी दिवशी नेहमी निंबाळला जात असे तेव्हा श्रीगुरुदेव आठवणींच्या लिखाणाचे काम पहात असत व त्यात काही सुधारणा असल्यास सांगत. मी पुन्हा पुढच्या

खेपेला लिहून आणून दाखवित असे. असे करत असल्यामुळे त्यांच्याशी माझे 'दर्शन-स्पर्शन-संभाषण' वरचेवर वाढून माझा पारमार्थिक व अध्यात्मिक पाया पक्का झाला. पुढे श्रीगुरुदेवांनी मला श्रीमहाराजांच्या आवक-जावक पत्रांच्या कॉपी (नकला) काढण्याचे काम दिले. तसेच काही पत्रांची टिपणे लिहिण्यास सांगितले होते.

अशा प्रकारे त्यांनीच अप्रत्यक्षपणे माझ्याकडून श्री महाराजांच्या व श्री अंबूरावमहाराजांच्या पारमार्थिक वाङ्मयीन साहित्याचा जणू अभ्यासच करून घेतला. त्यांच्याच प्रेरणेने व आशीर्वचनाने मला काही पारमार्थिक अनुभव आले. त्यामुळे मला पुढे संतवाङ्मयाची गोडी लागली.

## १) गुरुबोध

श्रीगुरुदेवांच्या बैठकीतील (सिटिंग्ज) चर्चेची जी टिपणे घेतली त्यातील काही महत्त्वपूर्ण आठवणी पुढे दिल्या आहेत. त्यात त्यांनी केलेला पारमार्थिक उपदेश अंतर्भूत आहे.

माझी व श्रीगुरुदेवांची ज्या पत्रावरून जवळीक वाढली व श्रीमहाराजांच्या (प. पू. श्रीभाऊसाहेब महाराज) पत्राचा अभ्यास करावयास मिळाला. त्या पत्रापासूनच मी आठवणी देऊ इच्छितो.

## २) ते 'महत्त्वपूर्ण' पत्र

श्री. नारायणराव काळे यांनी आपले मन चंचल असल्याने हातून परमार्थ होत नाही अशा आशयाची तक्रार श्रीभाऊसाहेब महाराज यांना एक ओवीबद्ध पत्र लिहून केली होती. त्याचे उत्तर श्री महाराजांच्या सांगण्यावरून श्रीगुरुदेवांनीही पद्यमय पत्र लिहूनच दिले होते. ते पुढीलप्रमाणे –

*'श्रावणमासीचा सप्ता । आनंदे चालिलासे सर्वथा ।*
*क्षणक्षणासी चित्ता । समाधान वाटे ॥*
*भक्त मंडळी मिळाली बहुत । नामस्मरणी झाली रत ।*
*शरीर कष्ट नाठवोनी सत्य । प्रेमरंगे रंगली ॥*
*त्यांचा प्रेमचंद्र पाहोनी । मनः समुद्र येई उचंबळोनी ।*
*ती अपार भरती देखोनि । सुखर संतोषले ॥*
*असो, मन देखोनि चंचल । तुम्हास लागलीसे तळमळ ।*
*हा वृत्तांत वाचोनी सकळ । मज आनंदची वाटतसे ॥*
*मन जई होई चंचळ । तईच लागतसे हळहळ ।*
*हळहळीचे पोटी केवळ । सद्गुणची निपजती ॥*
*तळमळ न लागता सर्वथा । सद्गुण न येति हाता ।*
*ऐसे जाणोनी तत्त्वता । समाधान राखावे ॥*
*कल्पनेसी कल्पना मारी । जैसे चोरासी चोर धरी ।*
*अथवा कंटकेची कंटक निर्धारी । बाहेर निघे ॥*
*एवं कुकल्पना त्यजावयासी । सुकल्पना आणावी वेगेसी ।*
*परि हे साधावयासी । अभ्यासबळ पाहिजे ॥*
*अभ्यासे कुकल्पना मोडे । सुकल्पना हाती घडे ।*
*सुखाची वाट सापडे । निर्धारिसी ॥*
*सुखाने निश्चय उपजे । निश्चयाने ज्ञान निपजे ।*
*ज्ञान होताची सहजे । शांती बाणे ॥*
*सुकल्पना आणि कुकल्पना । बद्ध स्थितीत असती जाणा ।*
*मुमुक्षु स्थितीत सुकल्पना । एकलीच असे ॥*
*परि मायेची अघटित रचना । साधकी येते कुकल्पना ।*
*ती कुकल्पना मोडिता जाणा । सिद्ध होइजे निर्विकल्प ॥*
*म्हणोनि कुकल्पना येता जाणा। साधके न भ्यावे नारायणा ।*
*दृढ आश्वासोनी मना । अभ्यास करावा ॥'*

## ३) प्रचिती ही 'बॅरॉमीटर'

श्रीमहाराज (प.पू. श्रीभाऊसाहेब महाराज); श्री बाबा (प.पू.श्री अंबूराव महाराज) व श्री शिवलिंगव्वा (श्रीगुरुदेवांच्या गुरुभगिनी) यांच्या पत्रासंबंधी वाचन चालू असताना श्री गुरुदेव म्हणाले, 'श्री शिवलिंगव्वांचा पत्र-व्यवहार श्री अष्टेकरांनी लिहून ठेवला आहे. श्री बाबांच्या पत्रव्यवहारासंबंधी त्यांनी चांगले काम केले. त्यांच्या बद्दलची निष्ठा-भक्ती त्यांना माहीत नव्हती असे नव्हे. पण त्यांच्या काही डायऱ्या, पत्रे गहाळ झाली याचे बरे वाटत नाही. श्रीमहाराजांच्या डायऱ्यांचे काम उत्तम रीतीने श्री. कस्तूर मास्तरांनीही केले. श्री जगन्नाथानेही केले आहे. श्री महाराजांच्या फोटोचा अल्बम तयार होत आहे. एकंदरीत चालू असलेले काम ही ईश्वराची कृपाच खरी ! असा परमार्थ काशीपासून रामेश्वरापर्यंत आहे कां? असे लिंगप्पा सावळगी (श्री गुरुदेवांचे गुरुबंधू) विचारत ते खरे. परमार्थातील भक्ती टिकणे ही देवाचीच कृपा ! एवढेच काय, 'खऱ्या संतांचे दर्शन मिळण्यासही देवाची कृपा लागते' असे श्री गुरुवर्य म्हणत असताना त्यांच्या चेहऱ्यावर भक्ताविषयीची वत्सल-माया व निरतिशय प्रेमभाव ओसंडून वहातोय असे मला वाटले.

श्री गुरुदेव पुढे म्हणाले, 'पहा, मला तुम्ही आज पूर्वीच्या साधकांची ओळख परत करून दिलीत. असे झाल्याने भक्ती वाढते, नेम चांगला होतो. एकेक पत्र वाचावे व नेम करावा अशी उत्तम पत्रे आहेत. नेमाची गुणवत्ता वाढते. वेळ तितकाच असला तरीही हरकत नाही. गुणवत्तेनेच परमार्थ वाढतो.

अशीच चर्चा पुढे चालू असताना मी प्रश्न केला, 'पूर्वीच्या लोकांत अशी शिथिलता पुढे आली याचे कारण नेम करीत नव्हते असा घ्यायचा का?' श्रीगुरुदेव तात्काळ उत्तरले, 'अनुभवाबद्दलची श्रद्धा वाढावी लागते. प्रचिती केवढीही असो प्रथमपासून शेवटपर्यंत एकच असली तरी ती सातत्याने रहावी. जितकी प्रचिती असते तितक्याच प्रमाणात आपली परमार्थातील प्रगती समजावी. प्रचिती ही 'बॅरामीटर' आहे. भक्तीचा परमार्थ मार्गातील प्रगतीचा निर्देश - Index प्रचितीने दर्शविला जातो. तो नेमाने अंतःकरणपूर्वक भक्ती केल्याने टिकतो.'

## ४) नामस्मरण

नामस्मरणाविषयी एकदा चर्चा चालू असताना श्रीगुरुदेव म्हणाले, 'नासाग्रदृष्टी, श्वासोच्छ्वासाबरोबर नाम घेणे एवढ्यावरच भागत नाही. परंतु या क्रियांची मदत होऊ शकते. मन हे श्वापद अत्यंत चंचल व दुष्ट असल्याने त्याला बांधून ठेवावे लागते. त्याला वरील शारीरिक दृष्टीने बांधून ठेवण्यासाठी नासाग्रदृष्टी ठेवावी लागते. अत्यंत महत्त्वाचा भाग नामस्मरणात जर कोणता असेल तर तो 'भाव' होय. अंतःकरणपूर्वक कुटस्थापासून अर्थात भावाने दहा मिनिटांचे नामस्मरण हे दोन तास नामस्मरणाहून जास्त श्रेयस्कर ठरेल. १०००/२००० नामस्मरणाच्या

संख्येपेक्षा भावपूर्ण नामस्मरण श्रेष्ठ आहे. God is attained by quality and not by quantity'

श्री महाराजांच्या (प. पू. श्री भाऊसाहेब महाराज) एका पत्रात, 'एक महिन्यात प्रचित येईल' असे आश्वासन आहे. तेव्हा श्री गुरुदेवांनी ते पत्र काढून वाचून घेतले आणि 'याचाही भावपूर्ण नामस्मरणाशी संबंध आहे' असे म्हटले आहे.

श्री कोकटनूर यांचे पत्रात सकाळ, दुपार, संध्याकाळ असे तीनदा १०/१० मिनिटे नामस्मरण केले तरी पुरे असा उल्लेख आला असता 'त्याचाही वरील प्रमाणे संदर्भ घ्यावा' असे गुरुदेवांनी म्हटले आहे.

श्री. नागपूरकरांनी चालू ठेवलेली बोटाची पद्धत बरी आहे असे त्यांचेबद्दल प्रशंसोद्गार श्री गुरुदेवांनी काढले. श्री.नागपूरकर हाताच्या अंगठ्यावर दुसरे बोट ठेऊन मणी ओढताना जसे होते तसे सतत करत.

## ५) जो प्रभू किन्हो

'आपले आचरण शुद्ध असले तर अनवाणी चालून काटाही मोडणार नाही. म्हणून काहीही दुःख झाले म्हणजे नुसता काटा मोडला तरी आपले आचरण कोठे चुकते ते पहावे.' असे श्री निंबरगी महाराजांचे (प.पू. भाऊसाहेब महाराजांचे गुरु) वचन आहे. यावरून श्री. काकासाहेब तुळपुळे यांनी गुरुदेवांना म्हटले, 'निंबरगी महाराजांचे हे वचन वाचण्यापूर्वी आलेले भोग हे प्रारब्धाचे असे वाटून आम्ही सहन करीत होतो. ते भोग अंगावर येण्यात या जन्मी आम्ही काही चूक केली आहे असे वाटत नव्हते. परंतु हे वचन वाचल्यावर भोगाच्या दुःखाला आणखी एक माझ्या दोषामुळे हे उत्पन्न झाले हे शल्य निर्माण झाले. बरे, आपले आचरण कुठे चुकले याचा विचार करावा तर तेही समजत नाही. ही एक अडचणच उत्पन्न झाली आहे.' हे ऐकून श्रीगुरुदेव अगदी कळवळून म्हणाले, 'नका, नका, नका, आपल्या परमार्थावर एवढा बोजा टाकू नका. आलेले भोग आपल्या आचरणामुळे येतात असे वाटणे ही फार उच्च पारमार्थिक पातळीवरची गोष्ट आहे. श्रीनिंबरगी महाराजांसारख्या पुरुषाच्या बाबतीत हे सत्य आहे. तुम्ही-आम्ही 'जो प्रभू किन्हो सो भला कर मानो' - देव करतो तेच चांगले असे मानून नेम करीत राहावे. हीच वृत्ती सामान्य साधकाला योग्य.'

## ६) श्रेष्ठ साधक

पत्र व्यवहाराचे वाचन चालले असता एका पत्रात लिहिलेल्या साधक मंडळींबाबत श्रीगुरुदेव म्हणाले, 'रामू ममदापूरकर यांनी महाराजांच्या (प.पू. श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर) पत्राचे काम फार केले आहे. ते श्रेष्ठ साधक होते. हल्लीपैकी बसप्पा, (सोलापूर) करबसप्पा, केस्ती हे श्रेष्ठ साधक होत. विजापूरचे विरक्तप्पा हे ही बऱ्यापैकी साधक आहेत.' याच वेळी आणखी काही पारमार्थिक मंडळींची चर्चा झाली. तेव्हा श्रीगुरुदेव पुढे म्हणाले, 'सर्व लोकांची भक्ती श्रेष्ठ असली तरीही त्यात शेवटपर्यंत टिकणारा कठीण. 'गुरुवे कडियायिसु तंदे' देवानीच यातून पार करावे. 'नमो नमो एंबे' म्हणून देवालाच शरण जावे. श्रेष्ठ भक्ती शेवटपर्यंत टिकणे, पथ्य शेवटपर्यंत सांभाळणे फारच कठीण असते. याला काय कमी उदाहरणे आहेत? श्रीमहाराज म्हणत असत, 'अरे बाबा, या देहातून प्राण गेल्यावर, त्याचे दहन झाल्यावर त्या राखेतूनसुद्धा वासना राहण्याचा संभव आहे.' म्हणून नेहमी जागरूक राहून देवाला शरण जावे.'

'धन आणि दारा यातून बचाव करणारे महाभाग फारच कमी. त्यामुळे परमार्थात आडकाठी निर्माण होते. या बाबतीत श्री. बाबासारखे (श्रीअंबूमहाराज इंचगेरी) महान श्रेष्ठ सत्पुरुष असणे विरळाच ! बाबांनाच ते शक्य होते. इतरांना नाही.' (श्रीअंबू महाराज हे श्री गुरुदेवांचे गुरुबंधू होत.)

श्रीगुरुदेव पुढे म्हणाले, 'हे सर्व का सांगायचे तर, जे निंद्य आहे ते सर्वस्वी टाकून द्यावे. परमार्थास केव्हा, काय, कसे-कसे बाधक होईल याची पूर्ण जाणीव यावी. एवढाच यातील उद्देश आहे. त्याच प्रमाणे खरा भक्त व खरा परमार्थ म्हणजे काय हे कळून येईल.'

एवढे बोलणे झाल्यावर श्रीगुरुदेवांनी मधु कुमठेकर यांना झालेल्या बेंडा (गळू) विषयी विचारले. बेंड पिकले आहे का? ठणका आहे का? त्रास होतो का? झोप येते का? इ. सविस्तर चौकशी केली. त्या वेळी चटकन् माझ्या मनात विचार आला देवाचे प्रेम मातेच्या प्रेमापेक्षा कितीतरी पटीने श्रेष्ठ आहे, उदात्त आहे. आमच्या ऐहिक-शारीरिक वेदनांची देवालाच आमच्यापेक्षा जास्त काळजी वाटते आणि म्हणूनच आमची दुःखे दूर होतात.

आमच्या पारमार्थिक उन्नतीकरिता देव कसे अहोरात्र कष्ट करत असतो हे पाहून मन भरून येते आणि आनंद वाटतो. एवढे होऊनसुद्धा आम्हाला आमचे कल्याण करून घेता येत नाही याचे वाईट वाटते. भीती वाटते. यातूनच देवाला शरण जावे असा भाव उत्पन्न होऊन देवाच्या विषयी आदर व श्रद्धा वाढते.

श्रीगुरुदेवांच्या सान्निध्यातील दीड-दोन तासांच्या बैठकीचा मी असा निष्कर्ष काढतो की, परमार्थ-भक्ती यांचा श्रेष्ठपणा व साधकांनी आपली तृप्ती कशी ठेवावी, भक्तीत येणारी विघ्ने कोणती याचा सारासार विचार करून आपला परमार्थ उज्ज्वल करावा. आपल्या सद्गुरुंची कीर्ती वाढवावी. परंतु त्याला गालबोट लागेल असे कोणतेही कृत्य करू नये. परमार्थात सतत जागरूक राहून देवाला शरण जावे.

## ७) ईश्वरी सत्ता

सोलापूरच्या साधकापैकी डॉ. पारिपत्येदार, श्री. शामराव कुमठेकर, डॉ. आरोसकर, दादा कामधेनुवाडीकर इ. कुणीही निंबाळला जाऊन आले की माझ्या घरी जमून निंबाळला काय-काय घडले, श्री गुरुदेव काय म्हणाले, त्यांचा काही निरोप इ. चर्चा होत असे. श्री. कुमठेकर व मी शेजारीच रहात होतो व आमची घरे रेल्वेस्टेशनच्या अगदी जवळच होती. त्यामुळे कुणी निंबाळहून आले की, साहजिकच माझ्या घरी पारमार्थिक चर्चा वरचेवर होत असे.

इ. स. १९५३ / ५४ मध्ये श्रीगुरुदेवांच्या घरावर निंबाळला वीज पडली होती. त्या दिवशी डॉ. पारिपत्येदार; दादा कामधेनुवाडीकर तेथेच होते. त्यांनी वीज घरात कुठून आली, कुठे-कुठे ती फिरली, कुठून बाहेर गेली हे सर्व प्रत्यक्ष पाहिले होते. नंतर ते दोघे सोलापुरी माझ्या घरी येऊन त्यांनी तेथील विजेचा साद्यंत समाचार मला ऐकवला. तत्क्षणी माझ्या मनात ज्ञानेश्वरीतील 'पर्वती बैसका न संडावी । समुद्री रेखा नोलांडावी ।' या ओळी आठवल्या आणि ईश्वरी सत्तेपुढे पंचमहाभूतेही कशी निष्प्रभ ठरतात, ईश्वरी सामर्थ्यच श्रेष्ठ याची प्रचिती येऊन मन भरून आले. मी

लगेच ज्ञानेश्वरी काढून तो समास संपूर्ण वाचला आणि आम्ही कापूर लावला.

दुसरे दिवशीच मी निंबाळला गेलो. मलाही हे सर्व प्रत्यक्ष बघण्याची तीव्र इच्छा होतीच. श्रीगुरुदेवांच्या घरात सोप्यावर महाराजांच्या फोटोसमोर नेहमी प्रमाणे गुरुदेवांची वाट पहात उभा होतो. तेवढ्यात श्रीगुरुदेव आले आणि माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हणाले, 'मसलेकर चला मी वीज कशी कशी आली ते दाखवतो. माझ्या बरोबर येऊन वीज कुठल्या खांबाजवळून आत आली, त्या खांबाच्या विजेमुळे काळा झालेला भाग, महाराजांच्या फोटो जवळून पाण्याच्या खोलीकडे कशी गेली, तेथून स्वयंपाकघराच्या खिडकीतून कशी बाहेर पडली हे दाखविले. जवळच्या महाराजांच्या फोटोला साधा तडासुद्धा गेला नसल्याचे त्यांनी माझ्या निदर्शनास आणून दिले. त्या वेळच्या त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव, आनंद, उत्साह, त्यांचे शब्द आजही मला जसेच्या तसे आठवतात व मी भारावून जातो. 'मांजर जसे प्रत्येक खोलीतून हिंडावे तशी वीज प्रत्येक खोलीतून गेली.' असे गुरुदेव म्हणाले. घरातील सगळ्या काचेच्या वस्तू फुटल्या होत्या परंतु श्री महाराजांच्या फोटोला साधा धक्का सुद्धा लागला नव्हता. केवढे हे आश्चर्य !

त्यानंतर श्रीगुरुदेवांना मी काल माझ्या घरी सोलापूरला घडलेली, निंबाळच्या विजेची हकीकत ऐकल्यावर ज्ञानेश्वरी वाचून कापूर लावणे, माझ्या मनात आलेले विचार इ. सविस्तर हकीकत ऐकवली. 'पर्वती बैसका नसंडावी... ही माझी आज्ञा.' अशा प्रकारे सर्व सत्ता ईश्वराचे स्वाधीन आहे तर पंचमहाभूते (वीज) काय करू शकणार? 'जा.' अशी ईश्वरी आज्ञा झाल्याने धोका पोहोचलेला नाही, असे मला वाटले म्हणून सांगितले. हे सर्व ऐकून श्रीगुरुदेवांनीही मला ज्ञानेश्वरीवचनामृतातील वरील समास दोनदा वाचावयास लावला. मी कसे बरोबर ओळखले याचा गुरुवर्यांच्या चेहऱ्यावर कौतुक मिश्रित आनंद ओसंडत होता. आमच्या मनात एकाच वेळी ईश्वर सत्तेची श्रेष्ठता म्हणजे काय किंवा ती कशी असते याची प्रत्यक्षच प्रचिती निदर्शनास आल्याचे भान चेहऱ्यावर उन्मळून आले होते. मी वाचत असल्यामुळे श्रींच्या चेहऱ्याकडे मला नीट न्याहाळून पहाता आले नाही. परंतु माझ्याकडून तोच समास दोनदा वाचून घेतल्यामुळे मला मनस्वी आनंद झाला होता.

## ८) 'नवल अहंकाराची गोठी'

दिनांक १३ ऑगस्ट १९५५ – वेळ सकाळी ८ ते १०.

साधक व इतर मिळून ५०/५५ मंडळी या बैठकीस उपस्थित होती. श्री. नरहर कनमाडीकरांचे (विजापूर) पत्र वाचन चालू असताना 'अहंकारामुळे सत्वास जय नाही' असे श्री महाराजांचे (प.पू. श्रीभाऊसाहेब) वाक्य आले तेव्हा श्री. काका कारखानीसांनी विचारले, 'अहंकाराचे ठिकाणी सत्व संभवत नाही. सत्वाचे ठाई अहंकार नसतो. तर हे श्रीमहाराजांच्या वाक्याचे स्पष्टीकरण कसे?' श्रीगुरुदेव म्हणाले, 'मी चांगले काम करतो, मी ज्ञानी आहे. मी नेम करतो. मी ज्ञानेश्वरी सांगतो हा अहंकार सत्वामध्ये आहे.'

'मग हा तामसिक अथवा राजसिक गुण होईल. सत्व होणार नाही. असे वाटते' असे काका म्हणाले. याला उत्तर देताना श्रीगुरुदेव म्हणाले, 'म्हणूनच भगवत्गीतेत शुद्ध-सत्व निस्त्रैगुण्य असे गुणांचे वर्णन आहे. ज्ञानेश्वरीतील 'नवल अहंकाराची गोठी । विशेषे न लगे अज्ञानापाठी । सज्ञानाचे झोंबे कंठी...।' असे आहे. देवामध्ये हा अहंकार नसता तर जग उत्पन्नच झाले नसते.'

'श्रीराम व श्रीकृष्ण यांची तुलना करताना कुडली शंकराचार्य रामाला देव म्हणतात. पण कृष्णाच्या बाबतीत त्यांचे म्हणणे विचार करण्यासारखे आहे.'

'अलाहाबादेस एका जबलपूरच्या विद्यार्थ्याने पीएच.डी. चा थिसीस म्हणून - The egoism of Shrikrushna - हा विषय घेतला होता. भगवद्गीतेत 'मी' व 'माझे' असे सुमारे दोनशे वेळा श्रीकृष्णाने म्हटले आहे. हा अहंकार रामाला नाही.

## ९) सद्गुरु कृपा

ही गोष्ट होर्ती मुक्काम ईश्वरप्पा पाटलांच्या घरी इ.स. १९१२/१३ साली दुपारी एकच्या सुमारास घडली.

श्रीमहाराज (प.पू.भाऊसाहेब महाराज), कन्नूर मास्तर व एक थोटा (हात नसलेला) वृद्ध गृहस्थ जेवायला बसले असता श्रीमहाराजांनी कन्नूर मास्तरांना सांगितले, 'आपणच जेवतो आहे असे वाटेल अशा रीतीने त्याला जेवायला घाल. त्याला हाताने भरव.' कन्नूर मास्तरांनी महाराजांच्या आज्ञेप्रमाणे थोट्या वृद्ध-गृहस्थाला जेवण भरवले. जेवण संपल्यावर श्रीमहाराज म्हणाले, 'तू त्याला एका हाताने जेवायला घातलेस तर आता तुला देव दोन्ही हातांनी देईल.'

वरील आठवण कन्नूर मास्तर जेव्हा स्वतः सांगत तेव्हा सद्गुरुंच्या थोर कृपेची आठवण येऊन दर खेपेस त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू पाझरत असत.

## १०) भरवसा नाही

दिनांक ५ डिसेंबर १९५३ निंबाळ मुक्कामी दुपारी दोनचे सुमारास डॉ. करमरकरांच्या खोलीत बैठक (Sitting) भरली होती. सुरुवातीला नवीन आलेल्या साधक मंडळींचा परामर्श घेऊन श्रीमहाराजांच्या आवक जावक पत्रासंबंधी बोलणे सुरू झाले. श्री. रामराव होर्ती यांनी श्रीमहाराजांना लिहिलेल्या पत्राचा सारांश मी सांगितला. श्रींनी ओरिजनल (मूळ प्रत) वाचावयास सांगितले. ते वाचून होताच श्रीगुरुदेवांनी जवळ बसलेल्या श्री. केतकर यांच्याकडे सहजच पहात सर्वच साधकांकडे दृष्टिक्षेप टाकत म्हणाले, 'परमार्थ मरेपर्यंत केला तरच तो खरा परमार्थ.' श्रीमहाराज म्हणत असत, 'मेल्यानंतर तीन दिवसांनी देहाच्या राखेतूनसुद्धा वासना असू शकते. या संबंधी भरवसा ठेवता येणार नाही. परमार्थात केव्हा अधोगती होईल याचा नेम नाही. कोणावरही सोळा आणे (शंभर टक्के) विश्वास ठेऊ नये. आपल्याला येईल तेवढाच अनुभव (प्रचिती) खरा बाकी सर्व थोड्या फार प्रमाणात संशयितच असावे. नाही, असे नाही. आहे असेही नाही. निश्चिती कोणतीच सांगता येणार नाही.' असे बोलून श्री. रामराव होर्ती यांच्या आठवणी निघाल्या. पुढे श्रीगुरुदेव म्हणाले, 'श्रीमहाराज असताना हे उत्तम भक्तिमान होते. त्यांची निष्ठा मोठी होती. विजापुरी मी त्यांच्या खोलीवर गेलो होतो. पण त्यानंतर १९१४ ते १७ या तीन वर्षात ते तसे राहिले नाहीत. श्रीबाबांनी (श्रीअंबुराव महाराज) या तीन वर्षात कोणालाही नाम दिले नाही. पण श्रीरामराव होर्ती यांनी श्रीबाबांना पत्र लिहून कळविले, 'मला स्वप्नात नाम देण्याचा अधिकार

मिळाला व मी नाम दिले.' यावर श्रीबाबांनी, 'स्वप्नात नामाचा अधिकार मिळाला आहे तर स्वप्नातच नाम देत जावे.' असे सांगितले.

वरील उदाहरण श्रीमहाराजांच्या वक्तव्याची सत्यता पटविण्यास पुरेसे बोलके आहे.

## ११) शंभर अपराध

विजापूरचे बॅरिस्टर अंकलीकर एकदा श्रीगुरुदेवांना म्हणाले, 'पापी लोकांना आम्ही शिक्षा केलीच पाहिजे ना?'

त्यावर श्रीगुरुदेव म्हणाले, 'नाही, आपणाकडून नाही. देव शिक्षा करतो.'

बॅरिस्टर श्री. अंकलीकर म्हणाले, 'देव काय, केव्हा तरी शिक्षा करेल.' गुरुवर्य म्हणाले, 'छे ! छे ! तसे नव्हे. शिशुपालाचे शंभर अपराध भरल्यावर त्याला देवाने शिक्षा केली. बोटीला एक छिद्र पडले म्हणून काही बोट बुडत नाही. तर पाणी भरत असताना शेवटच्या एका बिंदूनेच बोट बुडते.'

## १२) कीर्ति सातासमुद्रापार

फ्रान्सचे दि मार्केट सत् पुरुषाच्या शोधार्थ भारतात सपत्नीक आले होते. तेव्हा त्यांना प्रो. रा. द. रानडे हे एक तत्त्वज्ञ व साक्षात्कारी संत आहेत असे कळले होते. ते दोघेही तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर असून पीएच.डी प्राप्त सुविद्य होते.

दिनांक २२ डिसेंबर १९५४ या दिवशी श्री. व सौ. दि. मार्केट निंबाळला श्रीगुरुदेवांना भेटण्यास आले होते. आता त्यांचे पाश्चात्य रहाणीमान आणि भारतातल्या निंबाळसारख्या खेडेगावातले राहणीमान यात जमीन-आस्मानाचा फरक असतानासुद्धा ते दोघे चांगले आठ दिवस निंबाळला मोठ्या आनंदाने राहिले. श्रीगुरुदेवांनी त्यांच्या खाण्या-पिण्याकडे विशेष लक्ष पुरवून त्यांचे तेथील वास्तव्य सुखकर केले होते. या मुक्कामात त्यांनी विविध विषयावर श्रीगुरुदेवांशी सखोल चर्चा केली. गुरुदेवांचे दैनंदिन जीवन त्यांनी अगदी जवळून सूक्ष्म रीतीने जाणून घेतले. श्रीगुरुदेवांच्या जीवनाचे त्यांना आश्चर्य वाटून हेच खरे पारमार्थिक संतत्व, हेच खरे साक्षात्कारी पुरुष ह्याची खात्री पटली आणि खऱ्या परमार्थाबद्दल अत्यंत आदर वाटून आपण यांनाच आपले पारमार्थिक गुरु करावेत असे वाटले. मि. मार्केट यांनी श्रद्धायुक्त प्रेमाने श्रीगुरूदेवांना 'नाम' देण्यास विनविले व लगेच त्यांना अनुग्रह मिळालाही. परंतु त्यांच्या पत्नीने नंतर 'नाम' घेतले. तोपर्यंत त्या काही शंका विचारीत असत. त्यांनी एक महत्त्वाची शंका श्रीगुरूदेवांना विचारली. (पुण्यस्मृति पान ११) 'नाम घेऊन नैतिक प्रगतीचा वेग वाढवायचा ना? मग ते कार्य अन्य मार्गानेही करता येईल.' गुरूदेव उत्तरले, 'नैतिक प्रगतीचा वेग वाढवायचा एवढेच नामाचे कार्य नसून ईश्वराचे दर्शन घेणे हे त्याचे कार्य आहे.' या उत्तराने त्यांचे समाधान झाले. ही प्रश्नोत्तरे श्रीगुरूदेवांनी पुढे सांगितली तेव्हा ते म्हणाले, 'पण नामस्मरणाशिवाय अन्य मार्गाने नैतिक प्रगतीचा वेग वाढवणे शक्य तरी होईल का? केवळ साक्षात्कारानेच नीतिला पूर्णता येऊ शकेल.'

दोघांनी अनुग्रह घेतल्यावर श्रीगुरूदेवांनी त्यांना 'मूळपीठास' म्हणजे निंबर्गीला जाऊन समाधीचे दर्शन घेण्यास सांगितले. त्याप्रमाणे उभयता जाऊन समाधीचे दर्शन घेऊन आले. निंबाळच्या वास्तव्यात राहून त्यांचे पूर्ण समाधान झाल्यावर परत जाण्यासंबंधी त्यांनी गुरुदेवांना विचारून दिवस निश्चित केला.

दि मार्केट गावाला निघण्याच्या दिवशी दुपारी एक/दीडचे सुमारास श्रीगुरूदेवांनी आम्हा सर्व साधकांनाही दि मार्केट यांच्या बरोबर सहभोजनास बोलावले होते. अर्थात शेवट गोड म्हणून मिष्टान्नाचे भोजन होते. दि मार्केट उभयता सर्वार्थाने तृप्त होऊन निघाले होते.

शेवटचा निरोप घेण्यासाठी ते दोघे ध्यान मंदिरात आले. तेव्हा पुढे घडलेला सोहळा आजही माझ्या नजरेसमोर जसाच्या तसा साकारतो. अत्यंत श्रद्धायुक्त अंतःकरणाने, वाकून एक गुडघा जमिनीवर टेकवून दि मार्केट यांनी श्रीगुरुदेवांना नमस्कार केला तेव्हा गुरूदेव भिंतीवरील जवळच्या खुंटीला एक हात धरून उभे होते. अतिशय नम्रपणे त्यांनी त्यांच्या पद्धतीने नमस्कार करून ते म्हणाले, 'I want your blessings' असे म्हणताच, I have alredy bleesed you. (नाम दिले आहे) असे श्रीगुरुदेव उत्तरले. याच वेळी मिसेस् मार्केट यांनीही श्रद्धापूर्ण नमस्कार केला व ते दोघेही निरोप घेऊन प्रवासास निघाले.

इ.स. १९०७ साली गुरूदेवांबद्दल श्रीमहाराजांनी वर्तवलेली भविष्यवाणी, 'नागप्पा, हा रामराया तुझ्या आजोबांची कीर्ती सातासमुद्रापलीकडे नेईल' आज १९५४ साली प्रत्यक्षात खरी ठरली. हे स्वतः मी डोळ्यांनी पाहून, श्रवणेंद्रियाने ऐकून धन्य धन्य झालो !

**नारायण रामचंद्र मसलेकर**
३/१२, आशिर्वच, समर्थ नगर, सिव्हिल हॉस्पिटलच्या पूर्वेस,
सोलापूर ४१३००३.

# शरणागती

**प्रा. डॉ. मा. वि. पाटणकर**

*स्थापत्य अभियांत्रिकीत पीएच.डी. १९९५ मध्ये प्राध्यापक म्हणून निवृत्त. गेले ५४ वर्ष संप्रदायाशी संबंध. १९५९ पासून संप्रदायाच्या वाङ्मयाचे श्रवण, वाचन, मनन व साधना. सध्या गुरुदेव रानडे तत्त्वज्ञानावर प्रवचने.*

## प्रस्तावना

गुरुदेव रानडे यांच्या संप्रदायात चार महत्त्वाची सूत्रे मानली जातात. ती म्हणजे सद्गुरु, सबीज नाम, सत्संगती आणि शरणागती ही होत. आचरणयोगात शरणागती हा भाग मुख्य असल्याने त्या संबंधी गुरुदेवांचे विचार, त्यावरील संत वाङ्मयातील संदर्भ, त्या अनुषंगाने गुरुदेवांच्या आठवणी आणि शेवटी साधकाचा दृष्टिकोन यासंबंधी थोडी चर्चा या लेखात करण्याचे योजिले आहे. लेखास आधारभूत असे मुख्य संदर्भ ग्रंथ याची यादीपण शेवटी वाचकांच्या माहितीसाठी दिलेली आहे.

## व्याख्या

एका बैठकीत गुरुदेवांनी केलेली शरणागतीची व्याख्या हे या लेखाचे सूत्र आहे. ते म्हणतात, शरणागती म्हणजे Perfect surrender to the will of God in supreme faith in His benevolence and omnipotence that whatever He does is for my ultimate good. (देवाचा परमकृपाळूपणा आणि सर्व शक्तिमानता या गुणावर अत्यंत श्रद्धा ठेवून त्याच्या इच्छेला संपूर्ण शरण जावे कारण तो जे कांही करतो ते आपल्या अंतिम हिताचे असते.) या व्याख्येनुसार येणाऱ्या मुद्द्यांचे थोडक्यात विवरण करावयाचे.

परमार्थाचा उपयोग काय ? असा प्रश्न अनेक जण विचारतात. संपूर्ण आयुष्य कसे जगावे याची दिशा देण्याचे सामर्थ्य या एका वाक्यात आहे. ताणविरहीत जीवन जगावे असा उपदेश सध्या जगात सर्वत्र केला जातो पण त्याला उपाय काय व ते कसे जगावयाचे याबद्दल कोणी सांगत नाही. या उपायावरचे मार्गदर्शन वरील एका वाक्यात आहे.

## संपूर्ण शरणागती

प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यात अनेक घटना घडत असतात, प्रसंग येत असतात. विविध गोष्टींना तोंड द्यावे लागते. यापैकी काही गोष्टी, काही प्रसंग, काही घटना या मनास कमी-जास्त समाधानकारक ठरतात तर पुष्कळदा या इच्छेविरुद्ध न पटणाऱ्या, तर्क लढवता न येणाऱ्या अशा असतात. जरी कांही गोष्टी मनासारख्या घडल्या तरी त्याबद्दल सर्वसाधारण समाधानाची वृत्ती नसेल, अवास्तव अपेक्षा असतील तर शांती लाभणे हे कठीण जाते. यापेक्षा अधिक चांगले झाले असते तर बरे झाले असते असा सतत विचार येतो. उदाहरणार्थ परीक्षेत मिळणारे गुण, नोकरीतील बढती, संसारातील अनेक गोष्टी यामध्ये येतात.

पण ज्या वेळी मनाविरुद्ध गोष्टी घडतात त्या वेळी मनुष्याला राग, संताप येतो. अस्वस्थता वाटते, निराशा येते, मनावरचा तोल जाण्याचा संभव असतो. याचे कारण म्हणजे माणसाची देहबुद्धी, देहतादात्म्य, देहभाव, मी-माझे या कल्पनेत येतो. माझ्या वाट्याला हे का ? मी कुणाचे वाईट केले? माझ्या प्रयत्नाला हेच फळ काय? माझी हीच किंमत काय? अशी टोकाची भूमिका घेणारे अनेक प्रश्न मनात येतात; व त्याची उत्तरे बहुतांशी त्याच व्यक्तिला शोधावी लागतात. संत, वडिलधाऱ्या व्यक्ती, नातेवाईक, हितचिंतक, मित्र हे यावर काही प्रमाणात वैचारिक, शारिरीक, आर्थिक मदत करतील पण शेवटी ज्याचा त्यानेच मार्ग काढावयाचा असतो. यालाच प्रारब्ध, दैव, नशीब किंवा देवाची इच्छा असे म्हणतात.

संत असे सांगतात की या मनाविरुद्धच्या गोष्टीला आनंदाने, समभावाने, धैर्याने शरण जा म्हणजे त्या मान्य करा (प्रयत्न सोडून नव्हे). कारण त्याशिवाय दुसरा उपायच नाही. स्वतःच्या मनाविरुद्धची गोष्ट म्हणजे आपल्या व देवाच्या इच्छेमधील फरक. हा फरक जितका कमी करता येईल तितके सुख, समाधान, शांती व आनंद मिळेल. या मधूनच निष्काम कर्माचा उगम होतो.

पुष्कळ डॉक्टर लोक सांगतात की ते जेव्हा एखाद्या ज्येष्ठ व्यक्तीला तपासणी करावयास सांगतात आणि त्या तपासणीत त्यांना मधुमेह आढळतो त्या वेळी ती व्यक्ती प्रथमतः तो रोग मान्यच करत नाही. मला हा रोग होईलच कसा ? माझे काय चुकले? मी तर नेहमीसारखाच आहे. मला काही त्रास होत नाही. इत्यादी प्रश्न बराच काळ निर्माण होतात. पण तपासणीचा अहवाल मान्य करून त्याप्रमाणे आहारावर नियंत्रण ठेवून, योग्य तो व्यायाम करून, डॉक्टरांनी सांगितलेली औषधे वेळेवर घेणे यातच या व्यक्तीचे कल्याण आहे. पण ते पटत नाही. कारण आपले प्रेम देहावर फार आणि मनाला बंधनकारक जीवन नको असते. स्वैराचार हवा असतो.

## देवाची इच्छा

शरणागतीमध्ये देवाची इच्छा हा सर्वात महत्त्वाचा भाग होय. यामध्ये देवाची इच्छा म्हणजे काय ? ती कशी कळणार? आपली इच्छा आणि देवाची इच्छा यामध्ये फरक असल्यास आपले वर्तन कसे असावे? इत्यादी अनेक प्रश्न निर्माण होतात.

प्रयत्न करूनसुद्धा, एखादा प्रसंग, एखादी गोष्ट, काही परिस्थिती, काही घटना घडतात यालाच देवाची इच्छा असे म्हणावयाचे. गुरुदेवांच्या मते सर्वसाधारणपणे देवाची इच्छा, देवाची योजना कळतच नाही. पण काही लोकांना काही वेळा स्वप्न, दृष्टांत, एखादी शकुनी किंवा अपशकुनी घटना, देवाचे शब्द, या द्वारा देवाची इच्छा कळते. देवाची इच्छा कळत नाही म्हणूनच माणसाने आपले प्रयत्न, उपाय विविध मार्गाने करावयाचे.

ऑक्टोबर १९४७ साली सांगलीला गुरुदेवांनी, सांगलीचे राजेसाहेब यांच्या आर्थिक आणि इतर मदतीने अध्यात्मिक विद्यामंदिर याची स्थापना केली. त्या वेळी गुरुदेवांचे एक गुरुबंधू श्री गणपतराव उर्फ काकासाहेब तुळपुळे हे त्या वेळी नुकतेच सांगलीस निवृत्तीनंतर स्थायिक झाले होते. त्यांनी गुरुदेवांना विचारले आता यापुढे काय काय करावयाचे ते सांगा.

यावर गुरुदेवांनी दिलेले उत्तर फार मार्मिक होते. ते म्हणाले, 'गणपतराव तुम्हाला असे का वाटते की यापुढे काय काय करावयाचे याची योजना करून देव आकाशातून आपल्याकडे पाठवितो. God speaks through the events. (ज्या ज्या गोष्टी घडतात त्यामधून देव सुचवित असतो.)'

बेळगावचे गोविंदराव केळकर हे गुरुदेवांचे डेक्कन कॉलेजमधील (१९०७) स्नेही. केळकरांनी गुरुदेवांना त्यांच्या कठीण परिस्थितीत सर्व प्रकारे मदत केली होती. १९२२-२३ साली त्यांनी गुरुदेवांना नाम देण्याची विनंती केली होती. गोविंदरावांना नाही म्हणणे गुरुदेवांना अवघड गेले. त्याच सुमारास गुरुदेवांना त्यांच्या ध्यानामध्ये गोविंदरावांना नाम देवू नये असे शब्द ऐकू आले. त्याप्रमाणे त्यांनी नाम दिले नाही. त्यानंतर पुन्हा २५ वर्षांनी म्हणजे १९४७-४८ साली गोविंदरावांनी गुरुदेवांनी नाम द्यावे अशी विनंती काकासाहेब तुळपुळे यांचेतर्फे केली. त्या वेळी काकासाहेब म्हणाले आता पूर्वीच्या गोष्टीला २५ वर्षे झाली आहेत, तेव्हा नाम देण्यास हरकत नाही. यावर गुरुदेव म्हणाले, देवाने पूर्वी दिलेली सूचना अद्याप बदललेली नाही. निदान देवाने मला तसे निदर्शनास आणले नाही म्हणून नाम देता येत नाही. संत देवाच्या इच्छेने वागतात कारण त्यांची देहबुद्धी ही आत्मबुद्धी झालेली असते. (देहेबुद्धी हे आत्मबुद्धी करावी - रामदास).

१९५४ साली श्रृंगेरीचे शंकराचार्य यांचा काही दिवस मुक्काम विजापुरात होता. त्यांनी गुरुदेवांच्या भेटीची इच्छा व्यक्त केली. गुरुदेवांना निंबाळहून विजापुरला घेवून येण्याकरिता शंकराचार्यांनी दोन अँबॅसिडर मोटारी दुपारी निंबाळला पाठवल्या. २-३ तास गेले. गुरुदेवांचे विजापूरला जाण्याचे निश्चित होईना. संध्याकाळी गुरुदेवांचे एक शिष्य त्यांना म्हणाले, 'आपणास जावयाचे नसल्यास तशी चिट्ठी द्या. मग मी मोटारी परत घेवून जातो.' त्याप्रमाणे गुरुदेवांनी येत नसल्याची चिठ्ठी लिहिली व म्हणाले, 'मी थोडा वेळ ध्यानास माडीवर जातो व मग परत आल्यावर तुम्ही विजापूरला जावा.' लगेच गुरुदेव ध्यानास गेले व १॥-२ तासांनी परत आले. कदाचित त्यांना ध्यानामध्ये देवाची इच्छा कळली असावी म्हणून ते म्हणाले आता विजापूरला जावयाची तयारी करा. रात्री १२ वाजता जावून त्यांनी शंकराचार्यांची भेट घेतली. या आठवणीचे थोडे अधिक विश्लेषण करणे जरूर वाटते. १९५४ साल, पूर्वी लोक वेळेबद्दल अतिशय जागरूक होते. श्रृंगेरीचे शंकराचार्य यांचे कर्नाटकात महत्त्व फार. त्यांनी मोटारी पाठवल्या. पण जाण्याचा निर्णयच नाही. कारण देवाची इच्छा बराच वेळ कळलीच नाही. गुरुदेवांची थांबण्याची तयारी, पण जवळचे लोकच अस्वस्थ, पण गुरुदेव निश्चिंत. लोक काय म्हणतील, जग काय म्हणेल, शंकराचार्य काय म्हणतील, यापेक्षा देव काय म्हणतो याला महत्त्व. हाच संत व इतर लोक यामध्ये फरक. संतांच्या वागण्याबद्दल पुष्कळवेळा अनेक लोकांचे गैरसमज होतात. कारण आपण त्यांच्या वागण्याचा विचार व्यवहाराच्या दृष्टीने करतो. संत देवाचा दृष्टिकोन काय आहे ते पाहतात.

गुरुदेवांच्या मते There is no ought for God realiser (साक्षात्कारी पुरुषाने अमक्या एक पद्धतीने वागावे असे बंधन त्याच्यावर नाही). कारण तो मुख्यतः देवाच्या इच्छेला बांधलेला असतो. इतरांच्या इच्छेला नाही म्हणून त्याची जबाबदारी देव वाहतो. सर्वसाधारण लोक आपली जबाबदारी स्वतःवर घेतात, देवावर सोडत नाहीत. हा फरक काढला म्हणजे झाले. अर्थात हे करणे अवघड आहे, पण जरुरीचे आहे आणि ते आयुष्यभर करावयाचे आहे. त्यात पूर्णता मिळेल असे नाही. पण 'हम जिती बाजी हरो' एवढे प्रत्येक वेळी झाले म्हणजे पुरे. याकरिता मनुष्याच्या प्रयत्नाबरोबर साधनाची फार आवश्यकता आहे.

## देवाचा परम कृपाळूपणा व सर्वशक्तिमानता

In Supreme faith in His benevolence and omnipotence. (त्याच्या परमकृपाळूपणा व सर्वशक्तिमानता या गुणावर आत्यंतिक विश्वास ठेवून) काय करावयाचे तर ईश्वराला शरण जावयाचे. देवाच्या या दोन गुणांचा थोडासा विचार करू.

जर देव परमकृपाळू आहे तर तो भक्तावर संकटे का आणतो? हा तार्कीक विचार झाला. पण संकटे तर येतात, घटना घडतात, मग त्याचा मेळ कसा घालायचा? हा प्रश्न पडतो. याचे उत्तर तत्त्वज्ञानातील श्रेयस व प्रेयस या कल्पनेद्वारा सहज सुटू शकते. याचा विचार थोडा नंतर करावयाचा. देव परमकृपाळू आहे हा संतांचा अनुभव आहे आणि त्यावर विश्वास ठेवावा. मग त्याचा हळूहळू अनुभव येतो. (जैसा भाव जयापाशी तैसा देव तयासी - रामदास).

देवाच्या सर्वशक्तिमानतेची अनेक उदाहरणे गीता अध्याय १०, विभुती योग यामध्ये भगवंतांनी दिलेली आहेत. त्यात आदित्यमध्ये विष्णू, प्रकाशमान वस्तूमध्ये सूर्य, नक्षत्रामध्ये चंद्र, वेदामध्ये सामवेद, देवामध्ये इंद्र, इंद्रियात मन, रुद्रामध्ये शंकर, यक्षामध्ये कुबेर, वसुमध्ये अग्नी, पर्वतामध्ये मेरू, पुरोहितामध्ये बृहस्पती अशी अनेक उदाहरणे दिली आहेत. गुरुदेवांच्या भाषेत एका वाक्यात या उदाहरणांचे सार सांगावयाचे झाल्यास Excellence is mark of spiritualisation. (ज्या ठिकाणी अती भव्यता, उत्कटता असते त्या ठिकाणी देवाचे अस्तित्व असते.) पुढे गीतेच्या मते या गोष्टी परमेश्वराच्या केवळ एक अंशानेच व्यापल्या आहेत. ज्ञानेश्वरांच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास झाडाचे पान देखील परमेश्वराच्या इच्छेशिवाय हलत नाही. विश्व तयाच्या सत्तेने चाले आणि याचा अनुभव गुरुपुत्राने घ्यावा अशी त्यांची इच्छा आहे. पण यावर प्रथम श्रद्धा, विश्वास बसावयास हवा.

## श्रेयस आणि प्रेयस

लेखाच्या सूत्र वाक्यातील शेवटचा भाग म्हणजे Whatever he does is for my ultimate good. (तो जे जे काही करतो, म्हणजे आपल्या आयुष्यात जे जे घडत जाते त्या त्या गोष्टी माझ्या अंतिम हिताच्या असतात) किंवा माझ्या अंतिम हिताचे जे जे काही असते ते ते देव करत असतो. एवढे समजले, बुद्धीने मानले, मनाला पटले आणि कृतीत आले म्हणजे आपोआप सर्व काळज्या, चिंता, फाजिल अपेक्षा संपावयास लागतील व ताणविरहीत निष्काम कर्माचे आयुष्य सुरू होईल. अर्थात कुठल्याही परिस्थितीत आपले प्रयत्न कमी पडू नयेत एवढी काळजी घेणे जरूर आहे. कारण आपल्याला देवाची काय इच्छा आहे हे कळत नाही.

तत्त्वज्ञानाच्या भाषेत याला श्रेयस व प्रेयस अशा संज्ञा आहेत (कठोपनिषद). श्रेयस म्हणजे ज्यामध्ये आपले दीर्घकालीन कल्याण आहे अशा गोष्टी व प्रेयस म्हणजे ज्यात आपले अल्पकालीन कल्याण आहे अशा गोष्टी. यामुळे श्रेयस हे प्रेयस असेल असे नाही व प्रेयस हे श्रेयस असेल असे नाही. एखाद्या घटनेचे, गोष्टीचे, प्रसंगाचे जे पहिल्यांदा अप्रिय वाटतात त्याचे अधिक विश्लेषण केल्यास आपल्या लक्षात अनेक

गोष्टी येतात व जे झाले ते ठीकच अथवा देवाने वाचविले असे कृतज्ञतेचे उद्‌गार निघतात. भावना निर्माण होते.

### शरणागती व गीता

सर्व गीता सांगितल्यावर भगवंतांनी १८ व्या अध्यायातील ६२ व्या श्लोकात अर्जुनाला सांगितले आहे ''तमेव शरणं गच्छ सर्व भावेन भारत'' याचा अर्थ त्यालाच सर्व भावाने शरण जा म्हणजे त्याचीच इच्छा मान्य कर. ह्या गोष्टी करण्याकरिता देहभावाचा त्याग व देवभावाचा संग धरला पाहिजे व हे मिळवण्यासाठी सबीज नामाचे दीर्घकाळ नैर्यंतर स्मरण हा एकच उपाय असे गुरुदेवांचे मत आहे. (न अन्यना विद्यते अयनाय, न अन्योन पंथः) गीता

### शरणागती व नानक

गुरुदेवांनी आपल्या हिंदी परमार्थ सोपान या ग्रंथात (संदर्भ-१) साधकाची नैतिक तयारी या दुसऱ्या प्रकरणात गुरूनानकांचे एक सुंदर पद - 'विसर गयी सब आप पराइ' असे उदाहरणादाखल घेतले आहे. त्यामध्ये तिसऱ्या कडव्यात 'जो प्रभु किनो । सो भल मानो ।। यहै सुमती । साधुसेपाइ ।।' असा उल्लेख आहे. यावर गुरुदेवांनी केलेले भाष्य पाहाण्याजोगे आहे. त्यामध्ये त्यांनी लायब्निझ या जर्मन तत्त्वज्ञानाचे एक वाक्य नमुनादाखल दिले आहे. तो म्हणतो, 'आपल्या आयुष्यात जे काही घडते ते चांगल्याच करता असते.' याला गुरुदेवांनी लायब्निझ याचा आशावाद असे नाव दिले आहे. त्यानंतर गुरुदेवांनी ब्राऊनिंग या तत्त्वज्ञान्याचे मत नोंदविले आहे. तो म्हणतो, 'देव स्वर्गात असून सर्व जग सुखी आहे.' याला गुरुदेवांनी जमवून घेण्याची वृत्ती (Attitude of Reconciliation) असे म्हटले आहे. शेवटी गुरुदेवांच्या मते लायब्निझचा आशावाद धरून ब्राऊनिंगची जमवून घेण्याची वृत्ती जोपासावी असा संदेश दिला आहे.

### शरणागती आणि खिस्त

मृत्यूच्या आदले दिवशी क्रुसवर येशूला टांगलेले असता त्याला आत्यंतिक वेदना होत होत्या. शेवटी त्यांनी देवाला अशी प्रार्थना केली की तुझी इच्छा असेल तर दुःख दूर कर नाहीतर तुझ्या इच्छेला येईल ते कर. Let thy will be done हे वचन फार प्रसिद्ध आहे. (संदर्भ - १)

### साधक दृष्टिकोन

इतकी तत्त्वज्ञानात्मक चर्चा झाल्यावर साधकाने कसे वागावे याबद्दल गुरुदेवांनी केलेले मार्गदर्शन पाहू. शरणागती किंवा सख्यभक्ती (दासबोध द. ४ स. ८) याप्रमाणे आचरण करावे. मान्य. मग प्रयत्न सोडावयाचा का? नाही. कारण प्रयत्न व कृपा यांची सांगड गुरुदेवांनी एकाच शब्दसमुहात केली आहे. ती म्हणजे Ascending efforts, descending Grace. (वाढते प्रयत्न व त्याद्वारा उतरणारी कृपा) पण देवाने निर्माण केलेली परिस्थिती आनंदाने मान्य करावयाची व प्रयत्नांची मर्यादा ओळखण्याकरिता 'सहज मिले तो दूधसम, माँग मिले सो पानी, कह कबीर वह रक्तसम, जाने खिंचातानी'' असा सत्त्व, रज, तम गुणात्मक आचरणातील विवेक करावयाचा. गुरुदेवांच्या मते साधकाने दीर्घकाळ निरंतर नामस्मरण केल्यास या गोष्टी आपोआप घडतील.

शेवटी ज्ञानेश्वरांच्या शब्दात,

***'सुवर्णमयी सोनिया । ये कल्लोळ जैसा पाणिया ।***
***तैसा मज धनंजया । शरण ये तु ।।***

असा भगवंताचा उपदेश मानून शरणागती मिळवण्याकरिता नामस्मरण करण्याची बुद्धी ईश्वराकडे मागावयाची.

संदर्भ ग्रंथ


1) R. D. Ranade 'Pathway to God in Hindi Literature' Adhyatma Vidya Mandir, Sangli, First Edition, (1954)

(२) रा. द. रानडे 'परमार्थ सोपान' - Source book of Pathway to God in Hindi Literature – अध्यात्म विद्या मंदिर, सांगली (१९५४), प्रथम आवृत्ती.

३) ग. वि. तुळपुळे 'श्री गुरुदेव रानडे यांचे संक्षिप्त चरित्र व त्यांची पारमार्थिक शिकवण' ॲकॅडेमी ऑफ फिलॉसॉफी ॲंड रिलिजन, बेळगाव, प्रथम आवृत्ती (१९७७).

४) शं. गो. तुळपुळे 'गुरुदेव रा. द. रानडे - चरित्र व तत्त्वज्ञान' व्हीनस प्रकाशन, पुणे. रानडे आश्रम ग्रंथमाला - १, निंबाळ (आर.एस्.) दुसरी आवृत्ती (१९६५).



**प्रा. डॉ. मा. वि. पाटणकर**
८, ईर्षा सोसायटी, कुलकर्णी मार्ग, आपटे पथाजवळ, डेक्कन, पुणे ४११ ००४. दूरध्वनी (०२०) ५५३१५१९


# गुरुदेवांचा संदेश

**या विश्वावर आहे एकच तो परमेश्वर**
**प्राप्ती त्याची मानवतेचा धर्म खरोखर**
**धर्म भेद ते असती खोटे या जगतावर**
**एकच देवहि होईल जेव्हा या अवनीवर**
**धर्म एक अन् मानवता मग दिसेल सुंदर**
**नामस्मरणी येई साधता धर्म जगावर**
**धार्मिक गोष्टी इतर सर्व त्या व्यर्थ ठरावे**
**ध्येय असावे असे पुढे की ध्येय नुरावे**
**त्या ध्येयाला ईश्वर प्राप्ती मग समजावे**
**परमार्थ अशी नसते वस्तू ती देण्याची**
**ज्याची त्याने स्वतःच आपण अनुभवण्याची**
**नामाचे ते स्मरण जणू की कृपा गुरूची**
**जये होतसे वस्तूदर्शन एकच पथ तो**
**यावीण दुसरा मार्गच कुठला जगात नसतो**

**– दि. आ. कुलकर्णी**

# नेमावतार

**सौ. सुनंदा शालिग्राम**

*स्वामी स्वरूपानंद महाराजांचे अधिकारी शिष्य स्वामी सत्यदेवानंद यांच्या शिष्या. श्रीगीता, ज्ञानेश्वरी, भागवत यांची निरूपण सेवा रविवार, बुधवार, शनिवार*

*'शब्दज्ञाने पारंगतु ।*
*ब्रह्मानंदे उल्लतु ।*
*शिष्यप्रबोधनी समर्थु ।'*

हे वर्णन तंतोतंत ज्यांना लागू पडेल असे विसाव्या शतकातील 'गुरुदेव' आहेत – गुरुदेव रानडे ! शास्त्रप्रचिती, गुरुप्रचिती आणि आत्मप्रचिती अशा त्रिवेणी संगमात सुस्नात झालेले जीवन म्हणजे गुरुदेव रानडे ! 'एका बिंदुल्याने विश्व व्यापिले' असे साक्षात्कारी ! 'साक्षात्कार – गुरुदेवांचा अत्यंत आवडता शब्द ! जे जीवनाचं प्रेरणास्थान आहे. ज्याच्यामुळे जीवन सफल होतं, उत्तुंग होतं, विशाल होतं असं ध्येय ! जीवनाला 'ध्येय' असावं अशी जाण फार थोड्यांना असते. अशा थोड्यांमध्ये 'गुरुदेव' पहिल्या रांगेत शोभतील. कारण अशी जाण आली, तरी बऱ्याच जणांना ती उमगत नाही आणि उमगली तरी प्रत्यक्ष आचरणात उतरत नाही. प्रत्यय येण्यातच खरी सार्थकता ! कोणता प्रत्यय हेही महत्त्वाचं ! अनुभवाची गुणवत्ता आधी ध्येयावर अवलंबून ! इतर ध्येये जीवनाचा 'अंश' व्यापतात; पण परमार्थ सारं जीवनच व्यापतो म्हणून अनुभवही जीवनव्यापी असतात. पण ते कशाच्या बळावर प्राप्त होतात? नेमाच्या आणि नेम देणाऱ्या मार्गदर्शक गुरुच्या ! रानडे यांचे जीवन म्हणजे अशी नेमनिष्ठा आणि गुरुनिष्ठा !

जमखिंडी हे त्यांचे, तसेच त्यांच्या परमार्थाचे जन्मस्थान. निंबर्गी संप्रदायातील श्रीभाऊसाहेब उमदीकर महाराज यांच्याकडून २५-११-१९०१ वैकुंठ चतुर्दशीला त्यांना 'नाम' मिळाले वयाच्या पंधराव्या वर्षी. बालमित्र नामधारक कल्लाप्पा भोकरे याला 'दिवसा नक्षत्रे दिसतात' हा अनुभव ऐकून जिज्ञासेने गुरुदेव श्रीमहाराजांच्या दर्शनाला व प्रवचनाला कल्लूबरोबर गेले, तिथे रोज नियमितपणे भगवंताच्या नामाचे स्मरण केल्यास परीक्षेत वरील क्रमांक मिळवता येईल' हे त्यांचे शब्द ऐकून अनुग्रहाची तीव्र इच्छा झाली. मॅट्रिकला असताना रोज रात्री दहा ते अकरा स्मरणीच्या बारा माळा ते करीत. 'आपले सद्‌गुरु जर खरोखर 'समर्थ' असतील तर आपणास या परीक्षेत निश्चितपणे वरचा क्रमांक मिळेल' असे त्यांना वाटे. श्रीमहाराजांच्या आशीर्वादाने त्यांचा मुंबई प्रांतात दुसरा क्रमांक आला व संस्कृतची 'जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती' ही मिळाली.

इथेच गुरुदेवांचे अनन्यसाधारण वैशिष्ट्य दिसून येते की त्यांनी नामाला 'संसाराचे साधन' बनविले नाही. त्याचे महत्त्व त्यांनी ओळखले आणि तेच त्यांचे जीवनसर्वस्व झाले.

पुण्यात डेक्कन कॉलेजमध्ये आल्यावर 'नेमास बसणे' म्हणजे काय हे त्यांना गुरुबंधु श्रीलिंगप्पा सावळगी व श्रीमल्हारपंत जोशीकडून कळले. प्रथम ते माळ वापरीत. पण पुढे हळूहळू ती सुटली. आता वेळ लावून ते नेम करू लागले. 'सातत्य' हे महत्त्वाचे सूत्र त्यांनी ध्यानी घेतले होते. त्यांना पारमार्थिक अनुभव येण्यास सुरुवात झाली. श्री. भाऊराव आपटे यांच्या घरी नेमास बसले असताना त्यांना दिव्य अशा मोत्याच्या हाराचे दर्शन झाले.

जमखिंडीहून पुण्यास येताना शिवालयाच्या शिखरावर लखलखत्या 'चित्सूर्या'चे त्यांना दर्शन झाले.

एकदा ध्यानमग्न असताना त्यांना 'मृतांच्या लोकांतून वडिलांची तार आली – 'मी इथे सुखरूप आहे.' रानडे लगेच रामदुर्गला गेले. तेथे त्यांना वडिलांच्या निधनाची वार्ता कळली.

एम.ए.च्या निकालापूर्वी 'First Class First Chancellor's Medal' अशी तार आल्याचे त्यांनी स्वप्नात पाहिले आणि प्रत्यक्षात तसेच घडले.

डेक्कन कॉलेजमध्ये क्रिकेटची मॅच पाहताना आलेला विश्वव्यापी बिंदूचा अनुभव, नीलवर्ण चंद्राची कधी कधी भासणारी कोर, ध्यानात एकसारखा ऐकू येणारा घंटानाद, सबंध आकाशच्या आकाश डोळ्यांसमोर उतरल्याचा अनुभव 'अध्यात्मभवना'त हनुमान जयंती दिवशी चहुकडे दिसलेले हनुमानाचे झळझळीत रूप, पुण्याहून आळंदीला टांग्यातून जाताना सबंध वाटभर

*'कृष्णा हाल का रे*
*कृष्णा डोल का रे'*

या अभंगात वर्णिलेल्या अनुभवाचा प्रत्यय, सारे विश्व आपणाकडे रोखून पाहणाऱ्या दोन डोळ्यांनी कोंदाटून गेल्याचा अनुभव, असे अनुभव येत असले तरी खरे तर त्यांच्या 'नेमाचे व्यवस्थापन' ते १९१० मध्ये इंचगेरीस गेल्या वेळी त्यांचे सद्‌गुरु श्रीमहाराजांनी करून दिले आणि यापुढे त्यांचा नेम आखून दिल्याप्रमाणे होऊ लागला. इंचगेरीस येण्यास कारणही तसेच घडले. गुरुदेवांना 'मेंदूचा क्षयरोग' झाला. प्रकृती ढासळली. या वेळी 'नाम घेण्यास व नेम चालविण्यास समर्थ करण्यास सद्‌गुरुवाचून कोणी नाही' असा विचार करून ते इंचगेरीस आले. इथे त्यांची गुरुनिष्ठा शतपटीने वाढली. गुरुंनी त्यांच्या पारमार्थिक अनुभवांवर शिक्कामोर्तब केले. रात्रीचे भजन चालू असताना 'तुम्हास दिवसा दिसणारी 'वस्तू' आता दिव्यावर दिसते काय?' असे महाराजांनी विचारताच आपणास येणारी प्रचिती खरी असा विश्वास गुरुदेवांना वाटू लागला. सद्‌गुरुंच्या सान्निध्यात त्यांचा 'नादानुभव' ही पुष्कळच वाढला. एकाच वेळी अनेक वाद्यांचा अनुभव त्यांना आला. विविध रंगांचा प्रकाश त्यांनी पाहिला. प्रकृतीतही लक्षणीय सुधारणा झाली. जाताना ते जेव्हा सद्‌गुरुंना म्हणाले, 'इंचगेरीची हवा चांगली आहे.' तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, 'इंचगेरीत प्रकृती सुधारली ती हवेमुळे नाही तर नामस्मरणामुळे !'

महिनाभराच्या सद्‌गुरुसहवासामुळे रामभाऊंची मनोभूमिकाच पालटली. यापूर्वी ते आयुष्य परमार्थासाठी वेचण्याची भाषा बोलत होते. ती येथून पुढे कृतीत उतरली.

फर्ग्युसन कॉलेजमध्ये ४० रु. वर नोकरीस असताना गदगची १०० रु. ची हेडमास्तरांची नोकरी मिळत असताना 'परमार्थ हे मुख्य ध्येय असल्यामुळे त्यांनी गदगची नोकरी स्वीकारली नाही. कारण ज्या नोकरीमुळे साधनावरील लक्ष पार उडून जाऊन केवळ उद्योगात दंग

होण्याचा संभव आहे, अशा प्रकारची नोकरी नको.' 'उद्योगसुद्धा होता होईल तो परमेश्वर भक्तीस धरून असावा' असे विचार त्यांनी गुरुंना लिहिलेल्या पत्रात व्यक्त केले आहेत. त्यांचा परमार्थ कसा जीवनव्यापी होत चालला होता याचेच हे द्योतक आहे.

एकदा गुरुदेव श्रीमहाराजांना म्हणाले, 'आपली कृपादृष्टी असावी.' त्यावर महाराज म्हणाले, 'कृपाकरून दृष्टी ठेवा म्हणजे कृपादृष्टी आहेच !'

गुरुकृपा होण्यास तीव्र साधन पाहिजे; गुरुकृपेला शिष्याच्या 'नेमा'चेच अधिष्ठान हवे; हा आशय गुरुदेवांच्या लक्षात आला आणि ते झडझडून साधनास लागले.

'नेम' परावाणीने, एकाग्रतेने, दीर्घकाल, निरंतर व सत्कारपूर्वक म्हणजे निष्ठापूर्वक कसा होईल यासाठी ते दक्ष राहू लागले. त्याचबरोबर तनमनधन गुरुसेवेला वेचण्याचे त्यांनी आजन्म व्रतच घेतले. आपला एक किंवा दोन महिन्यांचा संपूर्ण पगार ते गुरुसेवेसाठी खर्च करीत. कोणतीही नवीन वस्तू किंवा पगार ते प्रथम सद्गुरुंपुढे ठेवून, कापूर लावून मगच घेत. सद्गुरुंच्या निर्याणीची पूर्वसूचना त्यांना स्वप्नदृष्टान्ताच्या रूपाने मिळाली होती. स्वप्नात त्यांनी गुरुंचे अंथरूण रिकामे पाहिले. महाराजांची पत्रे ते जिवापाड जपत. त्यांच्या दृष्टीने त्या पत्राहून श्रेष्ठ वाङ्मय जगात नव्हते. महाराजांनी दिलेला 'नेम' हाच त्यांचा 'धर्म' झाला होता.

प्रपंचातील योगवियोगाकडेही परमार्थाच्या दृष्टीने पाहण्याचे बाळकडू त्यांना सद्गुरुंपासून मिळाले होते. पुत्र, पत्नी, व माता यांचे वियोग एकापाठोपाठ एक ओढवले. याप्रसंगी ३२ वर्षांचे गुरुदेव एका स्नेह्याला लिहितात –

*'बाप मेला न कळता । नव्हती संसाराची चिंता ।*
*विठो, तुझे माझे राज्य । नाही दुसऱ्याचे काज ।*
*बाईल मेली, मुक्त झाली । देवे मायाविरहित केले ।*
*माता मेली मज देखता । तुका म्हणे हरली चिंता ॥'*

दुसरे काहीही न लिहिता त्यांनी पाठविलेला हा तुकारामांचा अभंग किती बोलका होता !

पत्नी वियोगाच्या संदर्भात ते म्हणतात, 'तिला वाचवता आले असते. तसा शब्द देवाजवळ टाकला असता तर परत फिरला नसता पण तसा शब्द टाकणे योग्य नव्हे. देव करतो ते आपल्या कल्याणासाठीच करतो अशी माझी पूर्ण श्रद्धा आहे.'

आईच्या चितेवर त्यांनी शेष नाचलेला पाहिला. त्यावरून सांगितले की तिला सद्गती मिळाली. 'शेषानुभव' हा गुरुदेवांना आलेला एक अत्युच्च अनुभव. सारे अवकाश शेषाच्या वेटोळ्यांनी भरून गेलेले त्यांनी पाहिले. आपण नेमात डोलतो का? याचे उत्तर 'सात फड्यांचा नाग माझ्यासमोर डोलत होता तसा मीही डोलत होतो' असे सांगितले. 'कधी हा शेष आपल्या अंगावरून हिंडत असे', असेही त्यांनी सांगितले. शेषानुभवाविषयी गुरुदेव म्हणत 'शेष डोळ्यांसमोर स्थिर झाला की साधक योगात स्थिर झाला. मग तो सहसा च्युत होत नाही.'

'नेमा'मध्ये गुरुदेवांचे एक वैशिष्ट्य होते – 'कट्टाने नेम, निश्चयाने नेम, उत्साहाने नेम !' वेळ निश्चित करून नेम करायचा. तो काही झाले तरी मोडायचा नाही. जणू त्यांच्या या 'कट्टाच्या नेमा'ची परीक्षा पाहण्यासाठीच पुन्हा १९२१ मध्ये क्षयरोगाने त्यांना गाठले. गुरुदेव इंचेगेरीस आले, ते अशा निश्चयाने की देहाचे जे बरेवाईट होणार असेल ते गुरुचरणापाशी होवो. श्रीअंबुरावांसारख्या श्रेष्ठ गुरुबंधूंचा पवित्र सहवास होता. 'देव संसारात दुःखही देतो आणि त्या दुःखाच्या पाठोपाठ साधकाचा परमार्थही वाढवितो' हा अनुभव गुरुदेवांना या वेळी आला. प्रापंचिक व शारीरिक आपत्ती एकामागून एक आल्या. पण गुरुदेवांचे असामान्यत्व हेच की त्यांनी धैर्याने तोंड देऊन आपली 'नेमनिष्ठा' कायम राखली.

'नेमातून' 'भाव' निर्माण झाला पाहिजे आणि तो सतत टिकला पाहिजे; यासाठी गुरुदेव अंतःकरणपूर्वक तळमळीने, प्रेमाने नाम घेत. त्यामुळे चित्तात 'भाव' उदित होई व तो सदैव टिकून राहण्यासाठी नेमानंतर पोथीवाचन करीत. यामुळे मन आणि बुद्धी दोन्ही भक्तीकडे लागत. पांडित्यासाठी ग्रंथवाचन त्यांनी केले नाही तर भावाचे सातत्य टिकवण्यासाठी पारमार्थिक श्रवण केले. ज्यामुळे सदैव परमार्थाला चिकटून राहता येईल असेच ते वागत. ग्रंथलेखनही ते नेम झाल्यानंतर करीत. आधी नेम, मग वाचन, श्रवण, लेखन ! नेमाविना दिवस रिता जाऊ दिला नाही. वारा न लागेल, अशा खोलगट जागेत वा घळीत श्रीमहाराज नेमाला बसत, हे पाहून तेही फर्ग्युसन कॉलेजच्या टेकडीमागील डोंगरातील घळीत नेमाला बसू लागले. निंबाळला सारा सपाट प्रदेश म्हणून घराजवळ खोल खड्डा खणून घेतला व त्यात बसून नेम केला. वारा हे सृष्टीचे मन असून ते प्रथम हाती घेतल्यास त्या योगे आपले चंचल मन स्थिर होण्यास मदत होते असे त्यांचे म्हणणे होते. पुढे अलाहाबादला गेल्यावर ते मोटारीतून नेमाला जात. मोटारीलाच ते 'रूपांतरित गुहा' म्हणत. या गुहेत त्यांनी पंधरा वर्षे नेम केला.

त्यांच्या मते परमार्थात दैव म्हणजे 'देवाची कृपा' ती ज्या क्षणी होईल त्या क्षणी देवाचा अनुभव येईल. आणि देवाची कृपा (सद्गुरुकृपा) होण्याचा मार्ग एकच – नामस्मरण ! ते आर्ततेने, अनन्यतेने, प्रेमाने, सातत्याने जितके आपण घेऊ तितकी प्रचिती लवकर ! इंचेगिरीतील १९२०-२१ च्या मुक्कामात गुरुदेवांना हे भाग्य लाभले. वयाच्या पस्तीसाव्या वर्षी ते साधकाचे सिद्ध झाले. त्यांना नेमात अनेक नामे ऐकू येऊ लागली. नामाला नाम झाले. रामभाऊ 'गुरुदेव' झाले. श्री निंबरगी महाराजांनी ध्यानात आपल्या डोक्यावरील रूमाल गुरुदेवांच्या डोक्यावर ठेवला व गुरुपदाची प्राप्ती झाल्याचे सुचविले. श्रीभाऊसाहेब महाराजांनी ध्यानात 'ते फूल तू घे' असे सांगितले आणि प्रत्यक्षात समाधीवरील ताजे फूल प्रसाद म्हणून मिळाले. श्रीअंबुराव असेपर्यंत गुरुदेवांनी 'नाम' दिले नाही. एकदा स्वप्नात सद्गुरुंनी त्यांच्या हातावर बारा नामांची व एकदा अठरा नामांची पोची बांधली. प्रत्यक्षात रामभाऊंनी त्या वर्षी बारा जणांना व नंतर अठरा जणांना नाम दिले होते. ते श्वासावर आधारीत नाम देत. नाम देताना मुमुक्षूच्या ठिकाणी कृतिशीलता किती आहे, याची ते कसोटी पाहत. परस्त्री व परधन वर्ज्य ही अट नामधारकाला कायम होती. कारण विशुद्ध नैतिक आचरण हा त्यांच्या परमार्थाचा पाया होता. आसनाच्या संदर्भात ते म्हणत 'ज्या आसनावर बसल्याने निद्रा न येता नामस्मरण चांगले होईल ते आसन चांगले. महत्त्व आसनास नाही नामस्मरणास आहे. आसने व मुद्रा यामुळे आत्मदर्शन होत नसून आत्मदर्शनामुळे मुद्रा होतात.'

प्रत्येकाने रोज कमीत कमी तीन तास तरी नामस्मरण करावे असे त्यांचे सांगणे असे. मन देवाच्या नामावर आणि दृष्टी रूपावर जडली पाहिजे. किंबहुना रूपावर व नादावर लक्ष ठेवणे म्हणजेच दृष्टी ठेवणे होय

असे त्यांचे मत होते. ध्यानाबरोबरच त्यांनी पोथीवाचनाची पद्धत ठेवली होती. भक्तीपर पदांचे गायनही जोडीला होते. गुरुदेवांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या 'सिटींग्ज' ! परमार्थ हाच या बैठकीचा गाभा होता. या बैठकीमधील प्रत्येकजण भक्तिप्रेमाने न्हाऊन निघत असे. पण 'नेम' हाच मुख्य बाकी गौण' असे त्यांचे मत होते. पुढे १९३५ नंतर नेम त्यांच्या हातात राहिला नाही. नेमाची स्फूर्ती इतकी अनावर असे की ते केव्हाही, कितीही वेळ नेमास बसत. गुरुदेव सांगतात, 'डोळे मिटून नेम करीत असता डोळ्यातील रेटिनामधून एक 'वस्तू' बाहेर पडते. ती हालचाल करीत असल्याने तिच्यावर एकाग्रता करणे सोपे जाते. पुढे हळूहळू ही 'वस्तू' स्थिरावते व शेवटी अचल होते हा मेळ (Harmony) प्राप्त झाला की नेम संपतो.' एकदा त्यांचा नेम संपेपर्यंत डॉ. राधाकृष्णनसुद्धा भेटीसाठी थांबले होते. 'गुप्त अशा आत्मरूपाचं दर्शन घडवितो तो गुरु' असं एकदा गुरुदेव व्याख्यानात म्हणाले होते. अवतार म्हणजे त्यांच्या मते साधकाच्या डोळ्यांपुढे अवतारणारा त्याचा पारमार्थिक अनुभव ! जो अवतरतो तो अवतार ! पण तो ज्यामुळे अवतरतो तो नेम ! असा मूर्तिमंत नेमच जिथे अवतरला आहे तिथे साक्षात्काराला काय तोटा? तो चालता बोलता साक्षात्कार; नव्हे नेमावतार ! आजही आपल्याला निंबाळ आश्रमाच्या रूपानं या नेमावताराचे दर्शन घडेल.


**सौ. सुनंदा आ. शाळिग्राम**
५१२, उमाप्रसाद, ब, शनिवार पेठ, मेहुणपुरा,
पुणे ३०. फोन : ४४९१५८५

# नामभक्तीनेच ईश्वर दर्शन

**डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**

*एम.ए., पीएच.डी., मराठी विभाग प्रमुख दयानंद कॉलेज, सोलापूर.गेली २८ वर्षे अध्यापन. ८ वर्षे सोलापूर संचार व समाचारमध्ये सहसंपादक. आध्यात्मावर विपूल लेखन. १२ पुस्तके प्रकाशित. संतकृपा, सज्जनगड, प्रसाद इ. मासिकांत लेखन, व्याख्यान व प्रवचन. १९७८ पासून श्रीस्वामीसमर्थ अक्कलकोट महाराज यांचे वार्षिक पुण्यतिथीचे संयोजन. निंबर्गी संप्रदायाचे श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून अनुग्रह. अनेक पुरस्कार प्राप्त.*

## साधकावस्था : प्रपंचातून परमार्थाकडे...

संतांनी आपल्या संप्रदायातून सतत आणि सर्वत्र मानवी कल्याणाचा विचार मांडला असून त्यासाठी त्यांनी आत्मोद्धाराचा मार्ग पत्करून जगदोद्धाराचे कार्य करून दाखविले आहे. महाराष्ट्रातही नाथ, महानुभाव, दत्त, वारकरी आणि समर्थ या पाचही संप्रदायातील संतांनी वेद, उपनिषदे, गीता या प्रस्थानत्रयीच्या आधाराने साधा आणि सोपा 'साधनमार्ग' सांगितला आहे. 'भक्तिमार्ग' विशद करताना प्रामुख्याने 'नामस्मरण' हे साधन म्हणून सांगितले आहे. निंबर्गी-संप्रदायाने या सर्व संप्रदायातील नाम-भक्तीचा समन्वय साधून नाम-स्मरण हाच परमार्थ असा सिद्धांत मांडला आहे. नवनाथांपैकी रेवणनाथांपासून काडसिद्ध (सिद्धटेक); श्रीनारायणराव भाऊसाहेब उर्फ श्रीगुरूलिंगजंगम (निंबर्गी); श्रीभाऊसाहेब महाराज देशपांडे (उमदी); श्रीगुरुदेव रानडे (निंबाळ) अशी ही गुरुपरंपरा आहे. त्यात श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांनी भक्तिप्रसाराचे खूपच मोठे कार्य केले. त्यात श्री. अंबुराव कुलकर्णी (इंचगेरी) हे त्यांचे शिष्य गुरुपदवीच्या योग्यतेचे होते. श्रीमती शिवलिंगव्वा आक्का (जत) या शिष्याही आत्मसाक्षात्कारी होत्या. श्रीगुरुदेव रानडे यांनी श्रीभाऊसाहेब महाराजांच्या निर्याणानंतर श्रीअंबुरावबाबा आणि श्रीमती शिवलिंगव्वा यांचा शब्द गुरूप्रमाण मानला होता. श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर यांच्या शिष्य वर्गापैकी श्रीगिरिमल्लेश्वर महाराज (जमखंडी); श्रीप्रभाकर स्वामी महाराज (सोलापूर); श्रीतात्यामहाराज कोटणीस (सांगली); इ. नी गुरुपदवी प्राप्त करून घेऊन हा संप्रदाय खूप विस्तारला आहे.

श्रीगुरुदेवांनी केवळ पौर्वात्यच नव्हे तर पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचाही तौलनिक अभ्यास करून त्यातील साक्षात्काराच्या स्वरूपातील एकवाक्यता प्रतिपादित केली. तत्त्वज्ञानाचा पडताळा त्यांनी साधनमार्गाद्वारे स्वानुभूतीने घेतला अणि नंतर आपल्या ग्रंथांतून साक्षात्कार-शास्त्राचा पाठपुरावाही केला.

निंबर्गी संप्रदायाने सांगितलेला आणि श्रीगुरुदेवांनी आपल्या ग्रंथातून विशद केलेला 'परमार्थ-सोपान' कोणता? तिकडे सामान्य मनुष्य का व कसा वळला? भक्तिमार्गावरील साधकाची वाटचाल कशी होते? इ. चा विचार या पहिल्या लेखात केला असून श्रीगुरुदेवांनी त्यांच्या सद्गुरुंना लिहिलेली पत्रे; त्यांनी रचलेली पदे; नित्यनेमावली या उपासनेच्या भजनावलीला त्यांनी लिहिलेली विवेचक प्रस्तावना इ. च्या आधारे 'साधकावस्था' आणि प्रपंचाकडून परमार्थाकडे आपण कसे प्रवृत्त होतो?' या विषयीचा विचार मांडला आहे.

या संपूर्ण विवेचनामागे एक भूमिका अशी की, हे प्रतिपादन उपदेशकाच्या अभिनिवेशाने केलेले नाही, तर एक साधक म्हणून ते केले आहे. श्रीनिंबरगीमहाराजांनी एकाच समासावर चार ठिकाणी चार प्रकारे प्रवचन केले. हा अर्थ त्यांनी 'चत्वार अर्थ' म्हणून सांगितला. त्यात १) देवास अनुलक्षून २) श्रीसद्गुरुस अनुलक्षून, ३) श्रोत्यांस अनुलक्षून, ४) स्वतःस अनुलक्षून - अशा प्रकारे हा अर्थ सांगता येतो असे ते म्हणाले. त्यातील स्वतःस अनुलक्षून म्हणजेच आत्मशोधनासाठी अंतर्मुख होऊन हे विवेचन केले आहे; हे नम्रपणे मला नमूद करावेसे वाटते. असो.

## पत्रातून प्रकट होणारी साधक दशा

श्रीगुरुदेवांनी १९०१ साली श्रीभाऊसाहेब महाराजांकडून 'उपदेश' घेतला. १९०६ ते १९१४ (श्रीमहाराजांच्या निर्याणापर्यंत) त्यांनी श्रीमहाराजांना पत्रे लिहिली; याच काळात त्यांनी पाच पदेही लिहिली; १९१० साली नित्यनेमावली तयार करून त्यासही त्यांनीच 'प्रस्तावना' लिहिली आहे. म्हणून या काळातील त्यांच्या साधकदशेवर प्रकाश पडतो. ते साधकदशेत होते की साधकावस्थेत सिद्धपुरुष होते? असा एक प्रश्न पडतो. कारण त्यांच्या वयाच्या पाचव्या वर्षी शंभुलिंगस्वामींनी 'ते मोठे सत्पुरुष होणार आहेत', ही व्यक्त केलेली 'भविष्यवाणी' पाहिली म्हणजे ते सिद्धपुरुषच होते, असे म्हणावे लागेल. आपण 'अज्ञ साधक' आहोत असे पत्रात नमूद करून त्यांनी भाऊसाहेब महाराजांना ज्या शंका विचारल्या आहेत आणि जे मार्गदर्शन मिळविले आहे त्यावरून त्यांची साधक दशा ही इतर साधकांना मार्गदर्शन ठरणारी आहे, असेच म्हणता येईल. स्वतःस साधक म्हणवून घेऊन पारमार्थिक वाटचालीतली एकूण 'साधकस्थिती' त्यावरून कळून येते. पदात तर साधकमार्गाचा पूर्ण विचार त्यांनी प्रकट केला आहे. नित्यनेमावलीच्या प्रस्तावनेतून त्यांची परमार्थविषयक मूलभूतधारणा प्रकट झालेली दिसते. म्हणून पत्रे, पदे आणि प्रस्तावना यांचा विचार साधकदशेच्या संदर्भात पाहाणे आवश्यक ठरते. १९२० मध्ये ते गुरुपदवीचे अधिकारी झाले होते. म्हणून त्यानंतरचे ग्रंथातील विचार हे साधनमार्ग नि साक्षात्कार या संदर्भातील विवेचनाशी निगडीत केले आहेत.

साधकदशेकडे वळण्यापूर्वी परमार्थविषयक एक मूलभूत प्रश्न असा उपस्थित होतो की, सामान्य माणूस परमार्थाकडे का वळतो? तर त्याची प्रमुख कारणे १) दुःख, शारीरिक वेदना, २) व्यावहारिक जगात फजिती, ३) मृत्यूविषयीची भीतीदायक जाणीव ही होत. श्रीगुरुदेवांनी सिद्धांत मांडला आहे की, 'दुःखातून आपण देवाकडे वळतो. देव दुःखही देतो, पण त्यापाठोपाठ परमार्थही वाढवितो.' (कन्नड संतवाङ्मय परमार्थ मार्ग, प्रकरण २ रे) ज्ञानेश्वरांनी देवाकडे वळून भक्ती करणाऱ्यांचे चार प्रकार सांगितले आहेत. १) ज्ञानी, २) जिज्ञासू, ३) मुमुक्षू, ४) आर्त. श्रीगुरुदेव मात्र जिज्ञासेतून भक्तीकडे वळले. 'नामस्मरण केल्याने परीक्षाही उत्तमपणे पास होता येते.' या महाराजांच्या वचनाचा पडताळा घेण्याच्या जिज्ञासेतून त्यांनी भक्तीस आरंभ केला. त्यात यश मिळाले. त्यामुळे गुरुनिष्ठा दृढ

झाली. पुढे प्रकृती आणि प्रापंचिक या स्वरूपाची दुःखे वाढल्याने त्यांची श्रद्धा आणखी दृढावली.

पत्रे, पदे आणि प्रस्तावना यातून गुरुदेवांची साधक स्थितीतील मानसिक, बौद्धिक, भावनिक स्थिती काय होती, हेही लक्षात येते.

## (अ) सद्गुरुंची आवश्यकता

साधकाला संत आणि सद्गुरु हे अनुक्रमे मार्गदर्शक आणि पालनकर्ते असतात. संत भक्तिमार्गाने साधकाची वाटचाल चालू असताना साधकाच्या प्रपंच-परमार्थ या दोहोंची काळजी वाहतात. तसेच परमेश्वराचे स्वरूप दाखवितात. 'देवाचे गुप्त रूप दाखवितो तो सद्गुरु. सद्गुरु हे देवाशी गुप्त रूपाने ऐक्य पावलेले असतात' (जमखंडी येथील अमृतमहोत्सवप्रसंगी) असे गुरुदेवांनी म्हटले आहे. त्यामुळे सद्गुरू आणि संत या दोन्हींच्या संदर्भातील एका उल्लेखावरून सद्गुरुंची किती आवश्यकता आहे, हे ते प्रतिपादतात. 'सद्गुरु आणि संत हे कसे? तर, ते आई आणि दाईप्रमाणे असून अज्ञ साधकास गुरुमाऊली जवळ असल्याशिवाय खरे हित कोणते? ते कसे कळणार? (२३ डिसें. १९०९) संत, साधू हे दाईचे काम करतील, पण सद्गुरु हे आईप्रमाणे सांभाळतील. तिचे, माऊलीचे, सद्गुरुचे सुख हवे, अशी प्रार्थना त्यांनी पत्रात केली आहे. सद्गुरु हे साधकाच्या पारमार्थिक वाटचालीसाठी कृपारूप व्हावेत, अशा प्रकारची तळमळीची आर्जवही त्यांनी याच पत्रात केली आहे. ते म्हणतात, 'मनुष्याने साधनास नुकताच प्रारंभ केला की, त्याची स्थिती फार कठीण होते. धड ना इकडे, धड ना तिकडे असे होते. प्रपंच खरा की परमार्थ खरा, अशी शंका येते. कारण संसारावरचा विश्वास उडालेला नसतो आणि परमार्थावर श्रद्धा बसलेली नसते. म्हणून सद्गुरुंची कृपा हवी.' ही कृपा का हवी? तर संकटातच ईश्वराची आठवण होते ही गोष्ट खरी; पण ईश्वराचे 'स्मरण' आणि ईश्वराशिवाय अन्यविषयीचे 'वैराग्य' टिकले पाहिजे. अशी कृपा सद्गुरुंनी केली तरच मनुष्याचे कल्याण होते. त्यासाठी कुमती नष्ट व्हावी, अशी प्रार्थनाही त्यांनी केली आहे.

साधकाच्या दृष्टीने श्रद्धा दृढ व्हायला आणि निष्ठा बळकट व्हायला सद्गुरुंनीच कृपा करायला हवी; हा विचार कुठल्याही पंथ नि परंपरेतील साधकाच्या हिताचा आहे, हे वेगळे सांगायला नकोच.

## (ब) मनःस्थितीचे स्वरूप

मन आणि भक्ती यांचे अतूट नाते आहे. 'मन ताब्यात नाही; अत्यंत अशुद्ध आहे. मन स्वच्छ झाले की भक्ती उत्पन्न होते. तसे करवावे.' अशी प्रार्थना ते करतात. (१२ जुलै १९१०) या निमित्ताने प्रश्न निर्माण होतो की, अशुद्ध मन म्हणजे काय? तर देवाचे स्वरूप हे शुद्ध स्वरूप. म्हणून देवाशिवाय इतर येणारे विचार हे आपोआपच अशुद्ध स्वरूपाचे होत. तेव्हा अन्य विचार कमी व्हावेत म्हणजे भक्ती उत्कटतेने होऊ शकेल, असा भाव त्यांनी यात प्रकट केला आहे. भक्ती होऊन लोकांचे कल्याणही व्हायला हवे, ही तळमळही त्यांनी याच पत्रात व्यक्त केली आहे.

याच काळात श्रीगुरुदेवांपुढे एक प्रश्न उपजीविकेचाही होता. नोकरी आणि परमार्थ यात परस्पर पूरकता हवी, ही भावना त्यांच्या ठिकाणी वसत होती. या भावस्थितीचे प्रतिबिंबही एका पत्रात दिसते. 'उदरनिर्वाहासाठी उद्योग हवा, पण तो भक्तीस पूरक हवा. ज्या उद्योगाने अंगात अभिमान वाढेल, देवाकडे दुर्लक्ष होईल, परमार्थ विचारात आडकाठी येईल असा उद्योग नको.' (१८ डिसें. १९१०) अशी भावना व्यक्त करून त्याच पत्रात 'पैशाचा थाट करण्यापेक्षा नीती आणि भक्ती याने थाट करावा' अशी इच्छाही त्यांनी प्रकट केली आहे. 'नीतीमार्ग सोडून जाणे भाग पडू नये. निव्वळ पैशाकरिता नोकरी नको' ही भूमिकाही त्यांनी प्रकट केली असून 'शब्द-ज्ञानाचा उद्योग करावा' अशी इच्छा असल्याचे त्यांनी कळविले आहे. शब्द-ज्ञानाचा उद्योग म्हणजेच लेखन, वाचन, मनन, चिंतन, वक्तृत्व असे काही नोकरीचे स्वरूप त्यांच्या डोळ्यांसमोर असावे असे वाटते. या गोष्टी शिक्षकी पेशास अधिक पूरक आहेत. तेव्हा असा उद्योग आपण शोधावा, ही विचारसरणी त्यांची त्याच वेळी मनात रुजली असावी.

## (क) अपार श्रद्धाभाव

नुसत्या नोकरी उद्योगाचा विचार व्यक्त करून ते थांबले नाहीत. तर प्रकृती अस्वास्थ्याविषयी देखील त्यांनी आपल्या सद्गुरुंना अनेक बारीक-सारीक गोष्टी विचारल्या आहेत. त्यातून सद्गुरुंविषयीचा अपार श्रद्धाभाव व्यक्त होतो. साधक दशेतच नव्हे तर पारमार्थिक पथावरील संपूर्ण वाटचालीत हा श्रद्धाभाव निर्माण होणे व तो टिकून राहणे आवश्यक असते. साधक दशेची जडणघडण यातून ध्यानी येते. नोकरीसाठी प्रयत्न केव्हा करू? कुठे करू? या बरोबरच गुडघे हातपाय शेकू का? कुठपर्यंत शेकू? इ. प्रश्नही त्यांनी पत्रातून विचारले आहेत. सद्गुरुंच्या कानी सर्व गोष्टी घालाव्यात आणि त्यांच्या आज्ञेने सर्व काही करावे, ही त्यांची बुद्धी-भावना या पत्रातून प्रकट होते. 'साधन नीट होत नाही' अशी स्थिती व्यक्त करून ते नीट व्हावे याची तळमळ त्यांना लागून राहिल्याचेही आढळून येते. 'मानवी प्रयत्नांपेक्षा श्रीसद्गुरुकृपाच कितीतरी पटीने मोठी. त्यासाठी साधनबळ आणि गुरुकृपा यांचीच आवश्यकता वाटते.' (१० डिसें. १९११) असे ते लिहितात. वयाच्या विशीपंचविशीत भक्ती, सद्गुरु, साधन या विषयीची तळमळ पाहिली म्हणजे साधकास मनाशी केवढी जागृती असावयास हवी, याची कल्पना येते. इतका उत्कटभाव साधकदशेत तुमचा आमचा असतो का? या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण आहे.

'त्रिकाळ नेम व्हावा' अशी मनास लागून राहिलेली रूखरूख ते प्रकट करतात. (२१ फेब्रु. १९१२) आणि त्याच पत्रात पुढे म्हणतात की, 'प्रपंचात राहून परमार्थ करणे किती कठीण आहे हे आता थोडे थोडे कळू लागले आहे.' पारमार्थिक प्रवृत्तीचा हा विचार मानावा की, पारमार्थिक प्रगतीचा हा टप्पा मानावा? दोन्हीत परस्परपूरकता आहे एवढे मात्र खरे.

## (ड) विद्वत्ता आणि आत्मज्ञान

भक्तिमार्गात शब्द ज्ञानापेक्षा आत्मज्ञानालाच अधिक महत्त्व आहे, असे गुरुदेवांनी सर्वत्र प्रतिपादिले आहेच. पण त्याविषयीच्या विचारांची जाणीव त्यांना आपल्या साधक दशेतच झाली होती, याचेही प्रत्यंतर काही पत्रांवरून कळून येते. 'नुसत्या विद्वत्तेने गर्व होईल, म्हणून त्यामागे आत्मज्ञान हवे म्हणजे भक्तीचा डांगोरा पिटेल.' (८ मार्च १९१२) असे सांगून त्या पत्रात पुढे ते म्हणतात, 'भाऊसाहेब महाराजांना ते 'आत्मज्ञान' किंवा 'आत्मदेव' आहेत, असे म्हणून हाक मारण्यास काय हरकत आहे?' यात

सद्‌गुरुंविषयीची भावोत्कटताही दिसून येते.

'शरीर, मन, बुद्धी ही आत्मज्ञानाच्या प्रसारार्थ खर्च करावी' (७ ऑगस्ट १९१३) असा संकल्प त्यांनी व्यक्त केला आहे. परमार्थाची ही ओढ विलक्षण आहे. साधकदशेतच ही सिद्धावस्था होती, असेच त्यांच्या संदर्भात म्हणावे लागते. याच पत्रात पुढे त्यांनी सद्‌गुरुंना प्रार्थिले आहे की, 'आपली योग्यता कळण्याचे सामर्थ्य मला द्यावे.' यावरून 'अनुभव जे जाणती ते गुरुपदिचे अभिलाषी' हाच भावार्थ प्रकट होतो. साधक दशेतच त्यांची पारमार्थिक योग्यता केवढी होती, हे यावरून कळून यावे.

एका पत्रात (१२ नोव्हें. १९१२) श्रीगुरुदेवांनी 'सध्याचे काम कनिष्ठ आहे. दुसरे पाहू का?' असे महाराजांना विचारले होते. तेव्हा महाराजांनी त्यांना कळविले की, 'काशीचे पाणी व विहिरीचे (जवळील) पाणी यात श्रेष्ठ काय? तर विहिरीचे पाणी श्रेष्ठ आहे. ती देवाची इच्छा आहे.' श्रीमहाराजांचे हे उत्तर वाचून श्रीगुरुदेवांनी नंतरच्या पत्रात (१८ नोव्हें. १९१२) क्षमा मागितली आहे. आत्मज्ञानी सद्‌गुरुंचेच विचार श्रीगुरुदेवांनी सदैव शिरोधार्ह मानले.

साधन उत्तम चालावे, याविषयीचा ध्यास त्यांना लागून राहिला होता. ते म्हणतात, 'सत्संगती वाढावी, नामस्मरण वाढावे' असेच वाटते. या पत्रात ते सद्‌गुरुंना 'भूदेव' म्हणून संबोधतात. (७ ऑगस्ट १९१३) 'नामामृत ही कामधेनु असून तिचे दूध काढणे शक्य नाही' असे (११ नोव्हें. १९१३) सांगून 'भक्तिमार्ग ही सुळावरील पोळी होय' असा भक्तिमार्गातील आचरणानुभव त्यांनी विशद केला आहे.

१९१४ मध्ये श्रीभाऊसाहेब महाराजांचे निर्याण झाले. त्यानंतर त्यांच्या इतकाच दृढ श्रद्धाभाव श्रीगुरुदेवांनी श्रीअंबुरावबाबा व श्रीमती शिवलिंगव्वा यांचेवर ठेवला होता. १९३० पर्यंत शिवलिंगव्वा होत्या. १९३३ पर्यंत श्रीअंबुरावबाबा होते. त्यांचेशी झालेल्या पत्रव्यवहारातही श्रीगुरुदेवांनी भक्तिमार्ग कसा वाढेल? नामस्मरण कसे होईल? सत्संग कसा मिळेल? अनुभव कसा वाढेल? याविषयीची तळमळ व्यक्त केली आहे. एकूणतःच सद्‌गुरुंविषयीचा अपार श्रद्धाभाव आणि पारमार्थिक जीवनाची ओढ या बरोबरच नामस्मरण आणि अनुभव या विषयीची जागृती त्यांच्या पत्रातून दिसून येते.

## पदरचना व नेमावली

श्रीगुरुदेवांनी १९०६ ते १९१४ या काळात एकूण पाच पदे लिहिली. त्यातही श्रीसद्‌गुरुंची भेट, नामोपदेश, सत्संग, सद्‌गुण संपादन, नीती व वैराग्य, आत्मानुभव इ. विषयक विचार प्रकट केले आहेत. पुढील ग्रंथवैभवाच्या वैचारिकतेची जणू पायाभरणी या पदातून सूत्ररूपाने झाली आहे, असेच म्हणता येईल. ही पदे म्हणजे काव्य नव्हे, तर मनातील भावविचारांचे स्वरूपच प्रकट करणारी ही अध्यात्मसूत्रे होत. 'पद्यरचनेकडे वळू नये' असे (२१ फेब्रु. १९१३) सद्‌गुरुंनी सांगितल्यावर गुरुदेवांनी नंतर पदे केली नाहीत. तरीही शेवटचे एक पद सद्‌गुरुंच्या निर्याणानंतरचे १९१४ मधील आहे.

ही पाच पदे पुढीलप्रमाणे आहेत. १) अभंग हे नाम । त्यासी नाही भंग । नाम सर्व लोकां उद्धरीते ॥ २८ जुलै १९०९ (२) श्रावणमासीचा सप्ता ॥ १९१० (३) तापत्रये हा बहु गांजलो मी ॥ १९१० (४) अनंतरुपी आत्मा । बिंबविला डोळा ॥ १६ मे १९०९ च्या पत्रात तसा उल्लेख आहे. पुढे नंतर हे पद लिहून ठेवले असावे. (५) संपलेसे वाटे अवतार कार्य ॥ १९१४. इथे फक्त त्यातील अध्यात्मविचारांची सूत्रे नमूद केली आहेत.

'अभंग हे नाम । त्यासी नाही भंग' या पदात श्रीगुरुदेवांनी नाम हे अभंग असून सर्वांना नामाचा अधिकार आहे, त्यात उद्धाराची शक्ती आहे, सदासर्वकाळ नाम घ्यावे, नामस्मरणाबरोबरच संतसंगती मिळू दे. शांती हेच खरे सुख होय - असा भावविचार प्रकट केला आहे. 'श्रावणमासीचा सप्ता' या पदात इंचगेरी येथे सद्‌गुरुसान्निध्य लाभल्याने आनंद झाला होता. तेथून परतल्यानंतर पुन्हा साधनाची तळमळ लागून राहिली आहे - अशी भावना त्यांनी प्रकट केली आहे. मनास तळमळ लागली तरच सद्‌गुण निपजतील, कुकल्पनेचा त्याग करण्यासाठी अभ्यास बळ (नामस्मरण) हवे हे त्यांनी सांगितले आहे. 'तापत्रये हा बहु गांजिलो मी' या करुणाष्टकात त्यांनी तर पूर्ण साधनमार्गच सूत्ररूपाने सांगितला आहे. त्यात बुद्धी स्थिर व्हावी, कामभावना नसावी, विपत्ती यावी, (म्हणजे देवाची आठवण राहील) सदासर्वदा नाम घ्यावे, अनुभवाने (वस्तूने) दृष्टी भरावी, नेम (नामस्मरण) वाढावी. संतसंगती (सत्संग) वाढावा. सांसारिक तापाने (दुःखाने) मन पोळले असून त्याला निवृत्तिमार्गाने (परमार्थाने) चालवावे. सद्‌गुरुंशिवाय दुसरा कुणीही माझा रक्षणकर्ता नाही. प्रपंचातून परमार्थाकडे वाटचाल होण्यासाठी प्रवृत्त करण्याची प्रार्थनाच त्यांनी या पदात केली आहे. (हे पद निंबाळ येथील आश्रमात काकडआरतीनंतर 'प्रार्थना' म्हणून म्हणण्यात येते.)

'अनंतरुपी आत्मा । बिंबविला डोळा' या पदात शेषाचे वेटोळे, चांदण्याचा प्रकाश, मोतियांचे जाळे, नीलवर्ण चक्र या अनुभवांचा उल्लेख त्यांनी केला आहे. 'संपलेसे वाटे अवतारकार्य' या पदात (श्रीमहाराज यांच्या निर्याणानंतर गुरुदेवांनी हा अभंग केला आहे. तो 'नित्यनेमावली'त नंतर समाविष्ट करण्यात आला.) गुरुदेवांनी भक्ती चालविणारा देव (सद्‌गुरु) असून त्याविषयीची चिंता भक्तांनी करू नये. कारण देवकार्य हे देवाच्या इच्छेनुसार चालते व ते होण्याचे चुकत नाही असा विचार प्रकट केला आहे. साधकस्थिती, साधनमार्ग, साक्षात्कार ध्येय या विषयीचा अध्यात्मविचार या पदातून प्रकटला आहे.

नित्यनेमावलीच्या विवेचक नि प्रदीर्घ प्रस्तावनेतून अनेक अध्यात्मसूत्रे प्रकट झाली आहेत. 'गुरुदेवांनी नित्यनेमावलीत आपल्या साक्षात्काराचा आराखडा' मांडला आहे. पुढे ग्रंथरूपाने त्यांनी त्यात तपशील भरला. तशा आशयाची विचारणा गुरुदेवांचे शिष्य साधकश्रेष्ठ (कै.) ग. वि. तथा काकासाहेब तुळपुळे यांनी नंतर एका संभाषणात केली होती. त्या वेळी गुरुदेव म्हणाले, 'तसे म्हणण्यास हरकत नाही.' यावरून या प्रस्तावनेचे महत्त्व लक्षात यावे.

प्रस्तावनेचे महत्त्व आणखीही यासाठी की गुरुदेवांनी म्हटले आहे, 'संप्रदायाची मुख्य शिकवण कोणती हे कळावे.' 'संप्रदायाची गुरुपरंपरा रेवणनाथ-मच्छिंद्रनाथ-काडसिद्ध-निंबरगी महाराज-भाऊसाहेब महाराज इथपर्यंतचा संदर्भ देऊन त्यांनी स्पष्ट केली आहे. प्रस्तावनेत पाच सूत्रे त्यांनी प्रकट केली आहेत.

१) आत्मज्ञानी सत्पुरुषात कोणतेच भेद नसतात.

२) सद्‌गुरुंची योग्यता त्यांच्या सानिध्यात व सत्संगात राहूनच कळून येते. (श्रीभाऊसाहेब महाराज यांची योग्यता कळण्यास त्यांच्यासारखेच

झाले पाहिजे.)

३) खरा साधू कोण? शब्दज्ञानी नव्हे. आत्मज्ञानी. चमत्कारास महत्त्व नाही. 'पहावे आपणासी आपण या नाव आत्मज्ञान' असा तो खरा साधू. विद्वत्ता व आत्मज्ञान यामध्ये जमीन-अस्मानाचे अंतर आहे.

४) आत्मज्ञान केवळ सद्‌गुरुंमुळे होते. ते प्राप्त झाल्यावर देवभक्त ऐक्य होते.

५) गुरुकृपा हवी. अहर्निशी नामस्मरण हवे. सत्संग हवा. विवेकनीति-वैराग्य हवे. तरच आत्मज्ञान प्राप्त होते.

'नामस्मरण हाच परमार्थ' हे जे अध्यात्मतत्त्व गुरुदेवांनी सर्वत्र उल्लेखिले आहे त्याचा मूलाधार या प्रस्तावनेतील अध्यात्मसूत्रात आहे.

पत्रे, पदे आणि प्रस्तावना यांतील सर्वच विचारातून एक गोष्ट ध्यानी येते की, साधकाने प्रपंचातून हळूहळू परमार्थ प्रवृत्त व्हावे. ज्ञानेश्वरांनी म्हटल्याप्रमाणे, 'तरी झडझडोनी वाहिला निघ । माझे भक्तिचिये वाटे लाग । जिवा पावसी अव्यंग । निजधाम माझे ।।' अ. ९

साधक दशेतील पत्रे, पदे आणि प्रस्तावना या वेळी श्रीगुरुदेवांना श्रीभाऊसाहेब महाराजांनी प्रामुख्याने जो उपदेश केला त्यात,

१) साधकाने वृत्तीने, धीर, गंभीर असावे. २) नामदृष्टी निरंतर असो द्यावी.

हे तर सांगितलेच. पुढे एका पत्रात (ज्ञानमार्गाची पत्रे) सर्व साधकांना उद्देशून श्रीमहाराजांनी 'साधनमार्ग' सांगितला. त्यात म्हटले आहे की, 'निरंतर कंठी गुरुवाक्य जडून गेले म्हणजे मनुष्य विदेही आणि कर्तव्यातीत होतो. (श्रीमहाराजांची जावकपत्रे व टिपणे. पत्र क्र. ४५, पृ. ६३/७ सप्टें. १९०२).

जो भगवत्‌कीर्ती ऐकून आत्मोद्धाराच्या तळमळीने परमेश्वराची प्रार्थना करतो त्यास नामोपदेश होतो. तो कोणत्याही स्वरूपात वा मार्गाने होईल. पण 'नामतंत्र' हवा. तो मिळणे हीच 'गुरुकृपा'. 'नाम' देवाच्या पायरीशी मनुष्य आल्यानंतर नि त्याचे उपदेश घेतल्यानंतरच त्यास 'साधकावस्था' प्राप्त होते. नंतर 'साधनमार्ग' सुरू होतो.

## साधनमार्ग : नामस्मरणात्मक भक्तियोग

श्रीभाऊसाहेब महाराजांनी 'निरंतर नामदृष्टी असावी' या एका वाक्यातच साधनमार्ग सांगितला असून त्यांचे स्पष्टीकरण 'निरंतर कंठी गुरुवाक्य जडून गेले म्हणजे मनुष्य विदेही आणि कर्तव्यातीत होतो' या वाक्याने केले आहे. 'साधकाने धीर, गंभीर, उदार असावे' असे जे सांगितले ते सर्वच साधकांना उपकारक आहे.

१) धीर असावे - म्हणजे आहे त्यात आनंद मानावा.

२) उदार असावे - म्हणजे भक्तीकडे अंतःकरण द्यावे.

३) गंभीर असावे - म्हणजे भक्तीशिवाय अन्य विषयाकडे लक्ष नसावे.

एका पत्रात महाराजांनी श्रीगुरुदेवांना 'नेमाने आणि पथ्याने जबरदस्त असावा' असे सांगितले आहे. नामस्मरण व परधन, परस्त्रीविषयीचे पथ्य कटाक्षाने राखण्याची जबादारी घ्यावी, असे ते सांगतात. साधनमार्गाच्या वाटचालीत नामस्मरण आणि परमार्थविषयक पथ्यांचे काटेकोरपणाने पालन या दोन्ही गोष्टींची अत्यंत आवश्यकता आहे.

१९२० साली म्हणजे वयाच्या ३४ व्या वर्षी 'जेथे जातो तेथे । तू माझा सांगाती' असा श्रीगुरुदेवांचा अनुभव होता. १९२५ साली श्रीमती शिवलिंगव्वा यांनी त्यांना 'आत्मज्ञान ऐश्वर्य रामराव' असे पत्रातून संबोधिले आहे. १९३३ साली श्रीअंबुरावबाबा गेले. १९३५ पासून श्रीगुरुदेवांनी 'नाम' देण्यास प्रारंभ केला. त्यांनी स्वतः साधनमार्ग अनुभवला आणि त्या मार्गाने जाऊन देव मिळविला. आपल्या ग्रंथातून हाच 'परमार्थसोपान' त्यांनी विशद केला आहे.

थोडे प्रतीकरूपाने सांगायचे तर कोणत्याही मंदिराची रचना ध्यानी घेता येईल. मंदिराची 'पायरी', तेथून 'साधनमार्गा'ने आत येऊन 'अनुभव' मंडपात यावे, अनुभव संपन्न होऊन 'गाभाऱ्यात' प्रवेश करावा. तेथील द्वारपाल । ऋद्धी-सिद्धीदासी यांना मागे सारून थेट देवरूपाशी 'ऐक्य' पावावे. नामापासून मोक्षापर्यंतची ही वाटचाल अशी आहे, हेच सर्व संतांनी अनुभवाद्वारे सांगितले. भक्तिमार्ग, पंथराज तो हाच. त्यातील साधनमार्गाचे स्वरूप संतांनी जे विशद केले, त्याचा मागोवा घेऊ.

## आडरानातून सन्मार्गाकडे...

माणूस अनेकविध अडचणींमुळे, दुःखामुळे, निराशेमुळे, भीतीपोटी परमेश्वराकडे वळतो. परमेश्वराकडे वळण्यापूर्वी तो प्रपंचाच्या 'आडरानी' गुंतलेला असतो. आडमार्गी अशी त्याची वाटचाल असते. तुकोबांनी म्हटले आहे की, 'आडमार्गी कोण जन जे जातील । त्यातून काढील तोचि ज्ञानी ।। प्रापंचिक आडमार्गातून पारमार्थिक सन्मार्गावर मनुष्याला आणण्याचे कार्य 'ज्ञानी' करतात. हे ज्ञानी म्हणजेच संत सद्‌गुरु होत. 'ओळखा रे वस्तू (देव) सांडा रे कल्पना (प्रापंचिक) । नका आडराना जाऊ झणी' अशी विनवणी तुकोबा करतात व पुढे 'बुद्धीचा पालट नासेल कुमती । होईल सद्‌भक्ती येणे पंथे' असे सांगून 'आपुलीया जीवे शिवासि पहावे । आत्मसुख घ्यावे वेळो वेळा' ही साधनमार्गाची उद्दिष्टेही सांगतात. 'घ्यावे आत्मसुख स्वरूपी मिळावे' हाच गाभाऱ्यानंतरच्या वाटचालीत देवाशी ऐक्य पावण्याचा मोक्षविचार होय, असेही प्रतिपादन त्यांनी केले आहे.

मंदिराकडे येणारे मार्ग अनेक आहेत. न येणारे मार्गही असतात. न येणारे मार्ग हे 'आडमार्ग-आडरान' होत. येणारा मार्ग हाही असतोच. प्रापंचिक दुःख-संकटे-भय यामुळे मनुष्याला अशा मार्गाची ओढ लागते. ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे, 'ते एकवटले जिचे क्षणी । अनुसरले गा माझिये वाहाणी । तेव्हाच तयाची चिंतवणी । मजचि पडली ।।' अ. ९ वा. तो क्षण महत्त्वाचा की ज्याक्षणी या मंदिराची नि त्यातल्या देवाची महती जाणवली. ती पटणे हा भाग पुढेच आहे. असो. तेव्हा, या सन्मार्गावर आणून सोडून त्यावर वाटचाल करायला लावणारा पंथराज आहे कोणता? त्या साधनमार्गाचे स्वरूप काय? १) पायरी, २) सोपान, ३) सभामंडप, ४) गाभारा, ५) देव अशी ही पारमार्थिक पंचपदी असून वाटचाल गाभाऱ्यापर्यंत करायची असते. शेवटची देव-भक्त ऐक्याची अवस्था हीच साधनमार्गाची 'परिणती' होय.

१) 'पायरी'शी त्याला 'नाम' मिळते. सद्‌गुरुंची भेट होऊन 'उपदेश' होणे ही कृपाच होय. नाम मिळाले, उपदेश मिळाला की साधनमार्गाची 'नामस्मरणात्मक पताका' मनुष्याने आपल्या खांद्यावर घेतली नि तो 'मार्गाधारे वर्तावे' या न्यायाने वाटचाल करणारा 'साधक' झालाही ! साधकावस्था इथूनच सुरू होते.

२) नाम घेतल्यावर 'स्मरण' करायला लागणे हाच अनुभव मंडपापर्यंत

जाण्याचा 'सोपान' होय. ज्ञानेश्वरांनी नामाला 'संजीवननाम' म्हटले आहे. पुरंदरदासांनी 'दिव्यनाम' म्हटले, तर कबिरांनी 'अजरअमर नाम' असे म्हटले आहे. नामदेवांनी 'सबीजनाम' म्हटले. शिवलिंगव्वाअक्का यांनी आपल्या वचनावलीत या नामाला 'हरमंत्र' असे म्हटले आहे. 'स्मरणसातत्य' हीच या सोपानावरील शिदोरी.

३) 'सभामंडप' म्हणजे अनुभवमंडप होय. संत बसवेश्वरांनी अनुभव मंडपाचे वर्णन आपल्या वचनावलीत केले आहे. दिव्य रूप, रंग, गंध, नाद, स्पर्श या स्वरूपाचे अनेकविध अनुभव या अवस्थेत येत असल्याचे मराठी संत, कन्नड संत, हिंदी संत यांनी तर आपल्या पदातून सांगितले आहेच; पण पाश्चात्य तत्त्ववेत्यांनाही हेच अनुभव आल्याचे श्रीगुरुदेवांनी आपल्या तौलनिक अभ्यासातून लिहिलेल्या ग्रंथात नमूद केले आहे.

४) अनुभव घेत घेत भक्ताची वाटचाल हळू हळू देवाकडे शरणागत भावनेने होत राहते. त्या ठिकाणीच भक्तिसातत्यापासून साधक दूर जाईल अशा नि ऐहिक आकांक्षांची परिपूर्ती करणाऱ्या ऋद्धी-सिद्धींच्या लोभस वाटाही दिसायला लागतात. इथेच प्रश्न उपस्थित होतो की देव हवा? की देवदारीच्या दासी हव्यात? देव ज्याला हवा तो या दासींच्या मोहात अडकत नाही; फसत नाही.

५) भक्तिमार्गाच्या अरुंद वाटेतून/गाभाऱ्यातून/भक्त देवाचरणी संपूर्ण शरणागती पत्करतो. हे भक्तिसाधनेचे पर्यवसान होय. ही स्थिती होय. तीच देव-भक्त ऐक्याची अवस्था. देवळाच्या शिखराला जितके महत्त्व तितके या अवस्थेला अन्योन्य महत्त्व. भक्त इथे आनंद, सुख, शांती यांची उच्च अवस्था अनुभवीत राहतो नि अद्वैत होतो.

## 'नामस्मरणात्मक-भक्तियोग'

सर्व संत नि संप्रदायांनी हाच साधनमार्ग सांगितला आहे. फरक थोडाफार असेल तर उपासना-पद्धतीतच! असो.

श्रीगुरुदेवांनी सांगितलेल्या 'परमार्थ-सोपाना'चे स्वरूप स्पष्ट करणारी एक समर्पक व्याख्या तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक व श्रीगुरुदेवांचे भाचे प्रा. (कै.) न. ग. तथा तात्यासाहेब दामले यांनी ('परमार्थ मंदिर' या पद्यसंग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेत) केली आहे. ते म्हणतात, हा आमचा साधनमार्ग; 'ज्ञानमूलक; नीतीप्रधान, साक्षात्कार पर्यवसायी; नामस्मरणात्मक भक्तियोग' सांगणारा आहे.

१) ज्ञानमूलक : प्रपंच आणि परमार्थ यांत 'विवेक' सांगणारा. साधनमार्गाने ईश्वराचे स्वरूप पडताळून पाहणारा. 'पहावे आपणासी आपण । या नाव आत्मज्ञान' अशी खूणगाठ अनुभवणारा. गुरुदेवांनी पाश्चात्य-पौर्वात्य अशा दोन्ही तत्त्वज्ञानातील अनुभव 'पडताळून' बुद्धीच्या निकषावरही हा मार्ग... ज्ञानमार्ग... तपासून घेतला. शब्द ज्ञानापेक्षा आत्मज्ञान श्रेष्ठ. आत्मज्ञानी संत सर्व काही 'जाणू' शकतो.

२) नीतीप्रधान : निंबरगी संप्रदायाने नीतीविषयक विचार मांडताना प्रामुख्याने परधन नि परस्त्री यांपासून दूर राहण्याविषयी साधकांना बजावले आहे. नामोपदेश घेताना ही दोन पथ्ये पाळण्याची शपथच त्याने घ्यावयाची आहे. 'जेणे विठ्ठलमात्रा घ्यावी । तेणे पथ्ये सांभाळावी' हे ओघानेच आले. ही पथ्ये मोडल्यास गुरुद्रोह होतो. 'परधन-परस्त्री ही रूपे मोह-माया-लोभ' निर्माण करणारी असल्याने ती परमार्थ बुडवितात. कारण साधकाला त्याचा मोह पडून तो लुबाडला जातो. श्रीभाऊसाहेब महाराजांनी देवाशिवाय इतर जे ते सर्व अनीतिमान अशी व्याख्या केली होती. श्रीगुरुदेवांनी 'म. संतवाङ्मय, परमार्थ मार्ग' या ग्रंथात नाथांनी भागवतात दिलेल्या कथेचा उल्लेख करून आपले विचार प्रकट केले आहेत. ते सांगतात, सात्त्विक स्त्रीपासून देखील साधकाने दूर असावे. कारण स्त्रीच्या संगतीत साधकाचे मन मोहून जाण्याचा संभव असतो. भागवतात दृष्टांत दिला आहे. अग्नीजवळ तूप विरघळते. कारण अग्नीचा तो गुणधर्म आहे. मग ते तूप जुन्या मडक्यात का असेना. तसे सात्त्विक स्त्री वयाने साठीची असली तरी तिचा मोहही पडणे अशक्य नाही. नीतीकल्पनेतच वैराग्याचाही विचार केला जातो. 'विषयावर राग म्हणजे वैराग्य' असे श्रीमहाराज म्हणत असत. सद्गुण संपादन व दुर्गुण त्याग याही गोष्टी नीतीविचारात समाविष्ट आहेत. नामस्मरणाने देवाचे अनुसंधान राहू लागले की हळूहळू दुर्गुण कमी होत जातात. गळ्यात माळ घातली की लगेच कुणी सद्गुणाचा पुतळा होऊ शकत नाही. नुसती कोरडी नीती गुरुदेवांना मान्य नाही. ते म्हणतात, 'नीतीला भक्तीची जोड हवी.' 'उपनिषद्रहस्य' या ग्रंथात त्यांनी पुढे म्हटले की, 'तसे नसेल तर हॅम्लेटविना हॅम्लेट नाटक केल्यासारखे होईल.' वेगळ्या शब्दात सांगायचे तर मंडपाला छताशिवाय झालर लावल्याप्रमाणे होईल किंवा देवाशिवाय देऊळ असावे, तशाप्रमाणे होईल.

३) साक्षात्कार-पर्यवसायी : साधनमार्गाने देवाचा साक्षात्कार होतो, हा परिणाम होय. त्याचा विचार नंतर (तिसऱ्या लेखांकात) देव-भक्त ऐक्याच्या संदर्भात करू. पण दिव्य रूप, रंग, नाद, गंध, स्पर्श इ. अनुभव येऊ लागतात, असे संतांनी सांगितले आहे. त्यासाठी नामस्मरण मात्र सतत करायला हवे; हे ते पुन्हा सांगतात.

४) नामस्मरण : 'नामस्मरण हाच भक्तियोग' आहे, हे सांगताना श्रीगुरुदेवांनी सर्वत्र नि सदैव नामस्मरणालाच महत्त्व दिले आहे. ज्ञान, कर्म, उपासना, भक्ती हे वेगवेगळे मार्ग नसून, तसेच यात काही ठराविक क्रम आहे हेही मानणे बरोबर नसून, खऱ्या भक्तीचे स्वरूप म्हणजे या सर्वांचा 'समन्वय' होय, असे गुरुदेवांनी म्हटले आहे. 'ध्यानगीता' या ग्रंथात (गीता श्लोकांचे आशयानुसार स्वतंत्र वर्गीकरण करून तयार केलेल्या) श्रीगुरुदेवांनी 'चतुर्मार्ग समन्वय' असे शीर्षक देऊन त्यातील सूत्र ध्यानी आणून दिले आहे. नाम सतत घ्यावे. ते विशिष्ट ठरवून घेतलेल्या वेळेत स्मरण रूपाने घेण्याचा प्रयत्न करावा. त्यास 'कट्टाचा नेम' असे म्हणतात.

### अ) नामस्मरण हाच परमार्थ

१) मुक्ति लाभे तत्क्षणी । विश्वासिता निरूपणी ॥ (रामदास/दासबोध)

२) श्रवण आणि मनन । या ऐसे नाही साधन । म्हणौनि नित्यनूतन । केले पाहिजे ॥ (रामदास/आत्माराम/समास ४ ओवी ५ वी)

३) नवविधा भक्तीतील 'विष्णोः स्मरणम्' हीच भक्ती. बाकी उरलेल्या या भक्तीस पूरक अशा उपाधी. आत्मनिवेदन भक्ती मात्र साक्षात्कार अवस्थेशी निगडीत. ती करायची नसते. ती होते. तो साधनाचा 'परिणाम' होय.

४) म्हणे दास विश्वासिता मुक्तिभोगी (रामदास/मनाचे श्लोक)

५) जेचिक्षणी अनुभव झाला । तेचिक्षणी मुक्त झाला. (रामदास/दासबोध)

६) ज्ञानेश्वरीत सांगितले आहे : 'तरी गा ऐसे करी । आठा प्रहरा

माझारी । मोटके निमिषभरी । देतुजाय' (१२ वा अध्याय)

७) 'रोज थोडे तरी नामस्मरण करावे. किमान एक तास : सकाळ, दुपार, सायं. (त्रिकाळ नेम) - श्रीभाऊसाहेब महाराज.

८) 'चोवीस तास नामस्मरण करता आले असते तर मी तेच केले असते, पण इतका वेळ ते शक्य होत नाही. म्हणून नामस्मरणाशिवाय उरलेल्या वेळेत भजन, पोथी, प्रवचन, लेखन इ. उपाधी (भक्तीस पूरक अशा) कराव्यात' असे श्रीगुरुदेवांनीही म्हटले आहे.

९) नामस्मरण हीच एक सर्व ऐहिक, प्रापंचिक रोगावरील मात्रा आहे. (श्रीभाऊसाहेब महाराज)

१०) 'ईश्वर प्राप्तीसाठी नामस्मरण हे एकच अचूक नि फलदायी साधन आहे.' (श्रीगुरुदेव रानडे/मराठी सं.वा.प. मार्ग)

११) भक्तीस मूळ विरक्ती; ज्ञानास मूळ अग्नी, अंतःकरणास मूळ मन. (भक्तीकडे ओढा हवा, तळमळ हवी, प्रेम हवे). - तरच 'आठव तो ब्रह्म । नाठव तो भवभ्रम' असे होईल. (श्रीभाऊसाहेब महाराज) येथे विवेचन करण्याऐवजी मुद्दामच काही संदर्भ नोंदविले आहेत. सारांश असा की, 'नामस्मरण हाच परमार्थ' होय. त्यायोगेच देव मिळू शकेल, हेच सर्वांचे सांगणे आहे. 'निर्मुक्त मन' करण्याचा सिद्धांत काही तत्त्वज्ञ मांडतात, पण व्यवहारतः ही गोष्ट शक्य होईल असे वाटत नाही. रिकाम्या मनोवस्थेपेक्षा ईश्वराच्या स्वरूपाच्या अनुसंधानातच मन व्यग्र करता येणे अधिक शक्य आहे.

## सत्संगतीची जोड हवी

नामस्मरण सतत करीत राहिले पाहिजे ही गोष्ट खरी, पण ते करण्यासाठी संतसंगतीचीही आवश्यकता असते. म्हणूनच निंबर्गी संप्रदायात महिनाभर (श्रावणमास) सप्ताह, सात दिवसांचा, पाच दिवसांचा, तीन दिवसांचा अशी सप्ते करण्याची प्रथा आहे. त्या निमित्ताने साधक एकत्र येतात. नाम, नीती, सद्गुण, या सर्वांसाठी साधक मेळाव्यांची आवश्यकता असते. साधकांच्या संगतीत नामस्मरण केल्याने अनुभवही वाढतो, असा सिद्धांत आहे. दोन तंबोऱ्यांच्या जुळविलेल्या तारा असाव्यात नि एका तंबोऱ्याची तार छेडावी, तरी दुसऱ्यातून नादलहरी कंपन पावतात. तशागत ही अनुभूती येते. साधक नसतील तर संतवचने हीही सत्संगतीच होत. त्यांचे वाचन-मनन-चिंतन करावे.

## ऋद्धी-सिद्धीचा विटाळ

थोडेच नामस्मरण होऊ लागले तरी ऋद्धी-सिद्धी प्राप्त होतात. साधक त्यांच्या मोहात पडतो. ऐहिक सुखप्राप्तीच्या मोहापायी तो देवप्राप्तीचे शाश्वतसुख विसरतो. म्हणून त्यांच्यापासून दूर राहण्यावर या संप्रदायाने कटाक्ष ठेवला आहे. गुरुदेवांना समोर येणाऱ्या माणसाचे भूत-भविष्य-वर्तमान समजू लागले, तेव्हा त्यांनी 'हे मला नको. मला देव हवा' अशी सद्गुरुंच्या समाधीसमोर हात जोडून प्रार्थना केल्याचा उल्लेख आहे.

## भक्तीचे 'बेगडी-स्वरूप'

आज कित्येक वेळा भक्तीचे 'बेगडी स्वरूप' ही ध्यानी येते. देव शोधण्याऐवजी दाने दिल्याचे दगड कुठे बसविले आहेत? याच्या शोधार्थ माणसे फिरताना आढळतात. कुणी भक्तियोगाचे 'प्रदर्शन' भरवितो. इलेक्ट्रिक लाईटकडे पाहून त्याची डोळ्यात आढळणारी प्रतिमा म्हणजे 'प्रकाश' होय अशीही कुणी फसगत करतात. तीर्थक्षेत्री देहयात्राही चालू असते. देह थकतो, देव सापडत नाही हेच खरे. कुणी वस्त्रविरहीत विदेही अवस्थांचे छापील फोटो काढून वाटतात. फोटोशी निर्वस्त्र देह निगडीत असतो. आत्म्याचा कधी फोटो निघेल काय? देवदर्शनाऐवजी देवळातल्या सुखसोयींची प्रथम चौकशी होते. यातली खरी-खोटी भक्ती ज्याला त्याला ठाऊक. अंतर्मनाची साक्ष ज्याने त्याने द्यावी. पूजेत श्रद्धेऐवजी दक्षिणेवर प्राप्तव्य ठरते हाही प्रकार दिसतो.

## जीवपक्षी नि आत्मपक्षी

उपनिषदात एक कथा आहे. झाड हा देह. त्यावर दोन पक्षी. एक कर्माच्या फांदीवर बसलेला जीवपक्षी. दुसरा आत्मानंदी स्थित असा आत्मपक्षी. जीवपक्षी कर्माची कडू-गोड फळे चाखतो. थोडे कडू अनुभव, थोडे गोड. त्यावरचा त्याचा लोभ संपत नाही. गोड अनुभव येतात तेव्हा जीवपक्षी आनंदतो. पण कडूफळे चाखतो तेव्हा त्यास अपार दुःखही होते. तो वर पाहतो. आत्मपक्षी झाडाच्या शेंड्यावर बसलेला असतो. तिथे तर फळही लगडलेले नाही. तरीही तो आत्मानंदात स्थिर कसा? तेव्हा जीवपक्षी त्याला विचारतो. आत्मपक्षी त्याला साधनमार्गाधारे ही स्थिती लाभत असल्याचे सांगतो. श्रीसद्गुरुकृपेमुळे ही उच्चावस्था प्राप्त होते.

साधकाला ही आनंदावस्था प्राप्त करून देणारे सद्गुरु होते. ते ज्या गुणसमुच्चयाचे प्रतीक म्हणून वर्णिले जातात, त्याचा उल्लेख श्रीगुरुदेवांनी एकनाथवचनामृताच्या प्रस्तावनेत केला आहे. ते म्हणतात, सद्गुरु हे १) पर्वताप्रमाणे सर्वांचा भार वाहतात. २) पाण्याप्रमाणे ते सर्वांशी मृदुपणे वागतात. त्यामुळे अंतःकरण शुद्ध होते. ३) समुद्राप्रमाणे ते सदा निरहंकारी आणि प्रसन्न असतात. ४) वायुप्रमाणे ते सर्वठायी असतात. कोणाविषयी ते भेद बाळगीत नाहीत. ५) आकाशाप्रमाणे समत्व ठेवतात. त्यांचे मन निर्लेप असते. ६) वृक्ष जसा नम्र असतो (फांद्या पुन्हा खाली झुकतात) तशी नम्रता त्यांच्या ठिकाणी असते. ७) अजगर जसा शक्तीने अफाट असूनही आत्मानंदात शांत वृत्तीने पहुडलेला असतो, त्याप्रमाणे सद्गुरुही असतात.

श्रीगुरुदेवांनी उपनिषद्रहस्यात (प्रस्तावना) म्हटले आहे की, सद्गुरु हे चाचपडणाऱ्या (देवशोधनार्थ प्रयत्न करणाऱ्या भक्तास) दीपस्तंभाप्रमाणे वाट दाखवितात.

साधकाची जडणघडण सद्गुरु कशाप्रकारे करतात त्याविषयी गुरुदेवांनी म्हटले आहे की, १) हंसाप्रमाणे सद्गुरु प्रपंच-परमार्थ यातील विवेक-अविवेक, ज्ञान-अज्ञान वेगळे करून दाखवितात. नीरक्षीरन्यायाने ते मार्गदर्शन करतात. २) शिकलगार ज्याप्रमाणे शस्त्रास धार लावतो, त्याप्रमाणे सद्गुरु हे साधकाच्या बुद्धीस प्रगल्भता आणतात. त्याची बुद्धी मलीन होणार नाही, भ्रष्ट होणार नाही, याची काळजी घेतात. ३) कुंभार ज्याप्रमाणे मडके घडविताना वरून त्यास थापटतो; पण आतून एका हाताचा आधार देऊन आकार देतो, त्याप्रमाणे सद्गुरु, भक्ताला बाहेरून संकटे, अडचणी, भीती इ. गोष्टी जरी क्लेशकारक ठरू लागल्या तरी आतून त्याला, मनाला, प्रेमाच्या आंतरिक ओलाव्यांनी रक्षितात. (हिंदी संत वाङ्मय, परमार्थ मार्ग पृष्ठ २१२-१३).

साधनमार्गाच्या वाटचालीत जसजसे नामस्मरण अधिकाधिक होत जाईल तसतसे मनास सुख, आनंद, समाधान लाभत जाईल. वृत्ती शांत होईल.

जगदुद्धाराची तळमळ लागून राहील. वासनाक्षय होत जाईल 'संशय ब्रह्मांडाबाहेरी गेला । साधु वस्तु (देव) होउनि ठेला ।।' अशी स्थिति प्राप्त होईल.

## भक्ती म्हणजे शरणागतीच

साधनमार्गावरून भक्तांची वाटचाल होत राहते. त्यातील प्रगतीचे चिन्ह म्हणजे तो हळूहळू देवाविषयी शरणागत होत जातो. ज्ञान, कर्म, उपासना यात त्याला जराही सूक्ष्म अहंकार निर्माण झाला तर गाभाऱ्याशीच तो अडकून राहील. पण त्याच्या ठिकाणी शरण्यभाव निर्माण झाला तरच त्याला देवाच्या अधिकाधिक जवळ जाता येईल. देवाशी तद्रूप होत जाणे ही शरणागतीचीच अवस्था होय.

साधकदशेला जेव्हा प्रारंभ झाला, तेव्हा गीतेत भगवंतांनी अर्जुनाला 'तुला 'मोक्षधाम' प्राप्त होईल', असे सांगितले होते. ज्ञानेश्वरांनीही त्याविषयी म्हटले आहे की, 'जिवा पावसी अव्यंग । निजधाम माझे' यात निजधामाशी अव्यंगपणे पावशील याचा अर्थ काय? तर व्यंग आणि अव्यंग यांचे प्रपंच आणि परमार्थ यात नेमके उलट-सुलट अर्थ आहेत. प्रपंचात व्यंग म्हणजे वाकुडेपणा आलेला, वाकलेला, सरळ ताठपणे उभा तो अव्यंग. अहंकार हा प्रपंचात अव्यंग ठरतो. नम्रता ही व्यंगकारक मानली जाते. अशा माणसांचा उपहासही केला जातो; पण परमार्थात वाकलेला, नम्र असा जो साधक तो अव्यंग. अभिमान धरणारा, सरळ ताठ उभे असणारा तो अहंकारी. म्हणून व्यंगकारक. भक्तीत अहंकार हा विकार आहे. तर नम्रता हा सद्गुण आहे. तेव्हा 'अव्यंगपणे निजधामास पावशील' यात 'शरण्यबुद्धीनेच माझेशी येऊन मिळशील' हाच भावार्थ होय.

## उपाधी हळूहळू त्यागाव्यात

भक्ती म्हणजे नामस्मरण करीत करीत शरण्यबुद्धीने ईश्वराच्या गुणसमुच्चयाशी एकरूप होऊन जाण्याचा प्रयत्न करीत राहणे होय. भक्तीच्या वेळी इतर उपाधीही खूप असतात. कुलधर्म, कुलाचार, व्रताचरणी उपासना, पूजापाठ, पोथी, भजन इ. चा समावेश त्यात असतो. नाम घेतल्याक्षणी या सर्व उपाधींचा त्याग करता येईल काय? अर्थातच 'लगेच नव्हे' हेच त्यावरचे उत्तर होय. नामस्मरण करू लागल्यानंतर जसेजसे अनुभव येऊ लागतील, देवाविषयी पोटात प्रेम निर्माण होऊ लागेल, तसेतसे या उपाधींचा गुंतावळा हळूहळू सोडविता येईल. कारण श्रद्धा दृढ आणि एकविध झाल्याशिवाय नामस्मरणाशिवाय अनुसरत असलेल्या इतर उपाधींचा त्याग करण्यात काय अर्थ? धड नामस्मरण नाही, धड व्रताचरण नाही, असे काहीसे होईल. समर्थांनी असे म्हटले आहे की, परमार्थाची गोडी लागली की, प्रपंच फिका फिका होत जातो. त्याची प्रपंचाविषयीची आसक्ती कमी कमी होते कारण ती देवाविषयी अधिकाधिक वाढू लागते. तसेच या उपाधींचेही आहे. भक्ती (नामस्मरण) वाढेल, तसतशी उपाधी कमी कमी होत जाईल. कबीरांनी म्हटल्याप्रमाणे, 'राम हमारा जप करे । हम बैठे आराम' इतकी तल्लीनता त्यात येईल. आपोआप सतत नामस्मरणच होत राहील.

## देवाविषयीचे अनुसंधान

अशी नामभक्ती करीत असताना सतत देवाविषयी अनुसंधान असायला हवे. पोहे कांडणारी बाई ज्या प्रमाणे एका हाताने मुसळ धरून त्याने कांडत असते; आणि दुसऱ्या हाताने उखळातील पोहे बाजूला करते, त्यांची विक्री करते, मुलालाही सांभाळते. पण तिचे अनुसंधान मुसळाच्या घावावर असते. ते अनुसंधान सुटले तर दुसरा हात त्याखाली चेचलाच जाईल हे तिला माहीत असते. तशागत मूळ देवाचे अनुसंधान कायम ठेऊन इतर विहितकर्मे करीत जावीत; हा त्यातील तत्त्वार्थ.

अनुसंधान देवाविषयी जसे हवे, तशी अनासक्ती देहाविषयी हवी. घरातील मोलकरीण जरी 'हे घर माझे आहे.' असे म्हणत असली, वा घरातील मालकाच्या मुलास 'माझ्या राजा, माझा सोन्या' असे म्हणून हाक मारीत असली, वा सांभाळत असली तरी खरे मनातून तिला माहीत असते की, 'हे घर माझे नव्हे, हे मूल माझा राजा नव्हे.' तर माझे घर झोपडीत असून तेथे माझा छकुला खेळत आहे. तो माझा खरा प्रेमाचा राजा व सोन्या. त्याप्रमाणे हा देह माझा नव्हे. आत्मा हा माझा. म्हणून देहाविषयी अनासक्ती बाळगून देवाविषयी आसक्ती ठेवावी, असाच उपदेश संतांनी केला आहे.

पंथ कोणताही असो, गुरू कोणतेही असोत, भक्तीचे खरे स्वरूप हेच होय. ते न करता आयता परमार्थ कोणीही ठेवलेला नाही. कष्टाविना (साधन न करता) कोणी परमार्थ म्हणत असेल; देव दाखवित असेल तर त्याविषयी मौन पाळणे बरे !

नामस्मरण करू लागल्यानंतर हळूहळू, आपोआपच वृत्तीचा पालट होऊ लागतो. वृत्ती सन्मार्गी होते. वृत्तीपालट झाला नाही, तर त्याने परमार्थ काय केला? असेच विचारावे लागेल.

ज्ञानेश्वरांनी म्हटले आहे :

'मग जे जे का निमिख । देखेल माझे सुख । तेतुले अरोचक । विषयी घेईल' (१२ वा अध्याय) देव पाहताना त्यांच्या सुखानंदाने हळूहळू विषय, विकार, याविषयीची तुच्छता निर्माण होत जाते. हे विषय नावडू लागतात. 'तैसे भोगाआतुनि निघता । चित्त मजमाजी रिगता । हळूहळू पंडूसुता । मीचि होईल' (१२ वा अध्याय) त्याप्रमाणे गाभाऱ्यातून तू मजस्वरूप होत जाऊन मलाच येऊन मिळशील. 'मग याहिवरी पार्था । माझ्या भजनी आस्था । तयाते मी माथा । मुकुटकरी' (१२ वा अध्याय) भगवंताने भक्ताला अभिवचन दिले आहे की, तुला माझ्यायोग्य (गुरुपदवी) करीन. ती अवस्था 'देव-भक्त ऐक्य स्थिती' ची होय.

## साक्षात्कार : देव-भक्त यांची ऐक्यस्थिती

सातत्यपूर्वक नामस्मरणाने साधकाला ईश्वरी स्वरूपाचे (रूप, रंग, गंध, नाद, स्पर्श इ.) अनुभव येऊ लागतात. त्या अनुभवामुळे त्याचे पुन्हा साधन (नामस्मरण) अधिकाधिक वाढते. अनुभवात सुख, आनंद, शांतता असल्याने त्याच्या विविध नि वाढत्या-बदलत्या स्वरूपाकडे साधक सतत आकृष्ट होत राहतो. यातूनच अन्यविषयांच्या संदर्भातील (देवाशिवाय इतर सर्व अशा) त्याची आसक्ती कमी कमी होऊ लागते. प्रापंचिक विषयाबद्दलची निवृत्ती होत जाते, तस तशी आध्यात्मिकतेची प्रवृत्ती वाढत जाते. या दोन्ही गोष्टी परस्परांशी निगडीत आहेत.

अनुभव मंडपाच्या आनंद स्थितीतून साधकाची ईश्वराकडे शरणागत भूमिकेत वाटचाल सुरू होते. गाभाऱ्याच्या दाराशी असलेल्या ऋद्धी-सिद्धींना ओलांडून (तिथे न थांबता, त्याच्यावरच लुब्ध होऊन न राहता) तो पुढे

येतो. देव आणि भक्त यांचेतील अंतर कमी कमी होत जाते. संत-सद्‌गुरुंनी ही 'ऐक्यस्थितीची सुखनिद्रा आणि आनंदमुद्रा' कशी सांगितली आहे, याचा विचार या लेखात पहावयाचा आहे. तसेच साक्षात्काराचे निकष कोणते? साक्षात्काराचे स्वरूप कोणते? साक्षात्काराचा परिणाम काय होतो? इ. चा विचारही जो अनुभवसिद्ध संतांनी सांगितला आहे, त्याचाही मागोवा घ्यायचा आहे.

## शाश्वत सुखाची वाट

साधनमार्ग अनुसरत साधक हा साक्षात्काराकडे म्हणजेच देवप्राप्तीच्या शाश्वत सुखानंदाकडे वाटचाल करीत राहतो, ही गोष्ट खरी. पण व्यावहारिक जगात अशा साधनमार्गाने जाणाऱ्या आध्यात्मिक प्रवृत्तीच्या माणसांची टवाळी केली जाते, उपहास केला जातो. तेव्हा हा साधनमार्ग आणि हे व्यावहारिक जग यांच्यात काय नाते आहे? त्याकडे साधकाला कोणत्या दृष्टीने पाहता येईल? या अनुषंगिक नि आवश्यक ठरलेल्या प्रश्नांची चर्चा करून मग पुढे साक्षात्कार विषयक अध्यात्म-तत्त्वे पाहू. व्यावहारिक जग हे अशाश्वत अशा ऐहिक सुखाच्या मागे लागले असूनही त्यास प्रवृत्ती म्हटले जाते नि साधक हा शाश्वतसुखाच्या शोधार्थ नि प्राप्तीसाठी प्रयत्नशील असूनही त्याच्या वृत्तीला मात्र निवृत्ती असे म्हणून हेटाळले जाते. हीच तर मोठी गंमत आहे. अज्ञान-बुद्धीचा तो एक खेळ आहे. पण त्या प्रकारच्या खेळांकडे बहुसंख्य मंडळी गर्दी करून आहेत. देवशोधनार्थ निघालेल्या नि साधकमार्गावरून वाटचाल करणाऱ्या साधक मंडळींची संख्या त्या मानाने अगदी कमी आहे. पण हीच स्थिती पूर्वीही होती, आजही आहे नि उद्याही राहणार आहे.

नदी असते. तिचा प्रवाह वाहत असतो. प्रवाहाचे दोन स्तर असतात. वरून पाणी खळखळ वाहात असते नि त्याखालीच गाळही असतो. प्रवाहात दोन्हीचे अस्तित्व कायमच राहणार आहे. गाळ आहे म्हणून वरून स्वच्छ पाणी खळाळत जाते. त्याला अर्थ आहे. संत परंपरेने सांगितलेल्या वचनांचा उपदेश जाणणारा साधक या प्रवाहातील अध्यात्म विचारांचे नि अनुभूतीचे उत्कटतेने प्राशन करतो. साधनमार्गाच्या ओंजळीने तो त्यातील मतितार्थाचा घोट 'तीर्थ' स्वरूप मानतो. प्रापंचिक नि ऐहिक सुखाच्या शोधार्थ जीवाचा आटापिटा करणारी माणसे याच प्रवाहात उतरतात. देहकर्मे त्यात बुचकळतात. गाळ, चिखल वर येतो. अशांची संख्या अधिक असल्याने समाजात गढूळ प्रवृत्तींची दृश्यानुभूती अधिकतेने दिसते. पण ती आहे म्हणूनच सत्प्रवृत्तींचा साधनमार्गही स्वतंत्रपणे पण त्याच पार्श्वभूमीवर पूर्वीपासून चालत आला आहे. उद्याही तो असाच चालत राहणार आहे. अगदी रामायण काळातील उदाहरण पहा. राम नि रावण यांची प्रवृत्ती काय होती? राम एकमुखी सात्त्विकतेचा असा होता तर रावण दशमुखी विकारवशतेचा होता. प्रमाण व्यस्तच आहे. दशमुखी रावणाच्या दुष्टाव्याच्या पार्श्वभूमीवरच रामाचा सत्त्वस्थ पराक्रम सिद्ध आहे. राम आणि रावण हे दोन्ही प्रवृत्तींचे प्रवाह चालत राहिलेच आहेत. त्यात व्यस्त प्रमाणात महाभारत काळातही पांडव पाचच होते आणि कौरव शंभर होते. धर्म-नीती-न्याय यांची बाजू राखण्याच्या संदर्भात दोन्ही बाजूने प्रमाण व्यस्तच होते. आजही हे प्रमाण व्यस्त रूपानेच अनुभवाला आले तर त्यात नवल काय? नदीच्या प्रवाहातील पाणी आणि गाळ हा जसा सर्व काळात नि सर्वत्र समांतर अस्तित्वाने नि व्यस्त प्रमाणात असाच वाहात राहणार आहे, तसाच साधनमार्ग नि व्यावहारिक जग यांचेतील शाश्वतसुख नि ऐहिकसुख यांच्या प्राप्तव्यातील प्रयत्नांचे, ते करणाऱ्या प्रवृत्तींचे नि त्यामुळे निर्माण होणाऱ्या परिणामांचे स्वरूपही असेच समांतर नि व्यस्तच राहणार आहे. संत मात्र सदोदित आत्मानंदाची नि शाश्वतसुखाची वाट 'साधनमार्ग' स्वरूपात सांगत आले आहेत आणि देवाशी ऐक्य पावून 'साक्षात्कार' ही अवस्थाही त्यांनी अनुभवली आहे.

## अहर्निशी - परमार्थ

अनुभव आणि नामस्मरण या दोन्ही गोष्टी परस्परपूरक नि परस्परावलंबी आहेत. निंबर्गी संप्रदायाने नामस्मरणाला शरीरधर्माशी निगडीत करून अहर्निश परमार्थाची शिकवण दिली आहे. श्वासोच्छ्वास हा अहर्निश चालू राहणारा शरीरधर्म होय. श्वास घेताना नाम घ्यावे, श्वास सोडताना नाम घ्यावे, दोन श्वासामधील अवकाशात एखादे नाम घ्यावे म्हणजे नामस्मरण निरंतर चालू राहते. श्रीगुरुदेवांनी म्हटले आहे : नामस्मरणामुळे परमेश्वराच्या स्वरूपाचा (अनुभवाचा) थोडा प्रत्यय आला तरी साधक उद्धरतो. पण देवाची रूपे अनंत असल्याने साधकाने देह पडेपर्यंत नामस्मरण करीतच राहिले पाहिजे.

श्रीअंबुराव महाराजांना एका साधकाने विचारले होते की, बाबा नाम किती वेळपर्यंत घ्यावे? त्यावर ते उत्तरले होते की, फार नाही, फक्त देह पडेतोपर्यंत.

म्हणजेच अखंड नामस्मरण/सातत्यपूर्वक नाम घेतले जावे, हाच अहर्निश-परमार्थ होय. मग तो होत राहण्यासाठी नामाचे सतत अनुसंधान राहण्यासाठी/नामस्मरण नि श्वासोच्छ्वास यांना परस्परांशी निगडीत केले आहे. आपण श्वासोच्छ्वास करत असूनही तो करतो आहोत याची जाणीव नसते. तितके नामस्मरण सदोदित करण्याची सवय देहाला जडून गेली पाहिजे, हा त्यातील मतितार्थ.

श्रीभाऊसाहेब महाराजांनी 'निरंतर नामदृष्टी असावी' असे जे म्हटले होते, त्यात निरंतर नामाचे स्मरण राहून ते करीत असताना अनुभवाकडे (दृष्टीसमोर असलेल्या) अनुसंधान असावे, हा अर्थ विशद केला आहे. 'निरंतर कंठी = सतत नामस्मरण, गुरुवाक्य = नाम, जडून गेले म्हणजे = नामस्मरण श्वासागणिक होत राहिले, म्हणजे मनुष्य = साधक, विदेही नि कर्तव्यातीत होतो. देहावरील ममत्व संपून प्रापंचिक - पारमार्थिक कर्मापलीकडे जातो.' (मी हा देहभाव संपून तो परमेश्वर स्वरूपाशी तद्रूप होऊन राहतो. देवाच्या आधीन होतो.) हाही विचार महाराजांनी सांगितला आहे. तुकोबांनी यालाच पूर्वी 'अहर्निश-परमार्थ' म्हटले आहे. (बारा अभंग पहा) श्रीगुरुदेवांनी 'नामस्मरण हाच परमार्थ' असे म्हणण्यात हाच विचार आहे.

## पुण्य म्हणजे काय?

अनुभव येऊ लागले की, आनंद होतो. कारण अनुभव हेच 'देवाचे स्वरूप' होय. याबद्दलचा एक संवाद मोठा तत्त्वबोधक आहे. श्रीगुरुदेवांचे सद्‌गुरु श्रीभाऊसाहेब महाराज यांनी आपल्या पत्रात 'पुण्याचा गोळा गोळा होत जातो', 'पुण्याचा ठेवा होत जातो.' अशी वचने उल्लेखिली

आहेत. श्रीभाऊसाहेब महाराजांना ज्यांनी श्रीनिंबरगी महाराजांकडे नेले त्या साधुबुवा (रघुनाथप्रिय महाराज) आणि श्रीनिंबरगी महाराज यांच्यात एक संवाद झाला. रघुनाथबुवा झाडाचा पाला खाऊन रहात, उपवास करीत. ते पाहून निंबरगीमहाराजांनी त्यांना विचारले की, 'तुम्हास पुण्य दिसते का? आम्हास ते दिसते. तुम्हास ते दाखवितो.' यावर त्यांनी 'पुण्य' म्हणजे डोळ्यांपुढे आलेल्या अनुभवांचे स्वरूप, हा तत्त्वविचार स्पष्ट केला आहे. 'अनुभव' म्हणजे 'पुण्य' ही गोष्ट निश्चित झाल्यावर अनुभवाशिवाय जे काही इतर ते 'पाप' होय, हे ओघानेच आले. उपास मोडल्याला 'पाप' न मानता नामस्मरण करण्यापासून तसेच राहणे हे पाप होय असे ते सांगत.

असा पुण्याचा ठेवा वाढत चालला, नामाचा गोळा गोळा होत चालला की, आपोआपच साधकाच्या मनात ईश्वराविषयी प्रेम निर्माण होते. साधकावस्थेत मनुष्य भीतीपोटी, संकटापोटी देवाकडे वळतो. तर साधनमार्गाने अनुभव वाढत गेले की, साधक हा देवाकडे प्रेमानुभावाने, आत्मीय भावनेने खेचला जातो. त्याच्या मनात त्याक्षणी सद्गुरुंविषयी अत्यंत कृतज्ञतेचा भाव निर्माण होतो. श्रीगुरुदेवांनी म्हटले आहे की, 'माझ्यावर एवढी थोर कृपा केली त्या श्रीगुरुंचा जयजयकार असो.' (हिंदी संत वाङ्मय परमार्थ मार्ग, अनुवाद, पृष्ठ १३६) 'साक्षात्काराची ही अवस्था म्हणजे साधनमार्गाने, परमार्थ सोपानाने, चढत चढत जाऊन शिखर गाठणे होय.' असेही त्यांनी सांगितले आहे.

## साक्षात्कार : निकष, स्वरूप, परिणाम

साक्षात्कार म्हणजे शांततेने परमेश्वराच्या अनुभूतीचा सुखानंद घेणे होय. देवाचा अनुभव येऊ लागला म्हणजे त्याचे निकषही लक्षात येऊ लागतात. पारमार्थिकतेचे (साक्षात्काराच्या अनुभवांचे) हे प्राथमिक निकष होत, असे गुरुदेवांनी म्हटले आहे. हे निकष तीन होत. १) बुद्धीची तीव्रता, २) विचारांची स्पष्टता, ३) वृत्तीची स्थिरता.

या अवस्थेतील साधकास तत्त्वज्ञानाची परिभाषा शब्दज्ञानाने नसते तरी आत्मज्ञानाने कळून येते. बुद्धी प्रगल्भ होते. त्याचे विचार स्पष्ट होतात. म्हणजेच त्याच्या विचारात भ्रम, संशय राहात नाही. वृत्ती स्थिर राहते, म्हणजेच श्रद्धा दृढावते. आपले सद्गुरु, आपला साधनमार्ग आणि आपले ईश्वरप्राप्तीचे ध्येय या संदर्भात साधकाच्या सर्व वृत्ती एकाग्र होतात. पुन्हा नवा पंथ, नवे गुरु, नवे ध्येय यांचा मोह त्याला पडत नाही. असे होत राहिले तर धड एकाही मार्गाने काहीच प्राप्त होणार नाही. बुद्धी, विचार, मन यांची थोडीफार कुतरओढच होत राहील. दमणूक हाच परिणाम होऊन प्राप्तव्य हाती लागण्यापेक्षा 'फेरा' करण्यातच आयुष्य संपून जाईल. ते होऊ नये यासाठी वृत्तीची स्थिरता आवश्यक आहे. त्याबरोबरच 'शरीरभोगाचा उपशम होतो, सर्व संशयाचे निरसन होते. अनंतशक्तीची प्राप्ती होते, भयाचा नाश होऊन निर्भयता येते, अपरिमित आनंद होतो, वांछितफळाची (ईश्वराची) प्राप्ती होते' (उपनिषद्रहस्य, अनुवाद, पृ. ३१२), असाही अनुभव येतो, असे श्रीगुरुदेवांनी म्हटले आहे.

साक्षात्काराच्या अनुभवांचे स्वरूप स्पष्ट करताना गुरुदेवांनी ते पुढीलप्रमाणे सांगितले आहे : अनुभव हे रूप, रंग, गंध, नाद, स्पर्श इ. स्वरूपाचे असल्याचे सर्व संत एकमुखाने सांगतात. तेजाचाही अनुभव संतांनी सांगितला आहे. या अनुभवात १) सार्वत्रिकता असते. दिवसा, रात्री, जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी हे अनुभव येतात. २) त्यात अखंडता असते. ते सतत येत राहतात. कदाचित त्यांचे आकार बदलतील. पण काहींना काही स्वरूप सतत दिसत राहते. ३) हे अनुभव अतिंद्रिय असतात. आंधळ्याने देखिले, बहिऱ्याने ऐकिले, या प्रकारे वर्णन संतांनी केले आहे. ४) आनंदमयता असते. त्या अनुभवाने सतत आनंद मिळतो. तो मिळाला नसता वा मिळत राहात नसता तर ९-९ तास नामस्मरण कुणी केले असते? ('देखेल माझे सुख' असे ज्ञानेश्वरीतच म्हटले आहे). सुख वाटते, आनंद मिळतो, शांती मिळते. साक्षात्कारात हे सर्व मिळून एकच. त्यातही शेवटी शांती मिळते, हे अधिक महत्त्वाचे. सदा आनंदस्थिती हे शांतीचेच स्वरूप होय, असे संतांनी सांगितले आहे, ५) शांती लाभते. समाधान, तृप्ती मिळते हीच आनंदसुखाची, सुखानंदाची परमावधी होय.

'सर्व ठिकाणी देव पाहणे हीच खरी भक्ती होय' असे श्रीगुरुदेवांनी (तुकारामवचनामृत / पृ. १७) म्हटले आहे.

साक्षात्कारी साधू कसा असतो? साक्षात्काराचे परिणाम साधूंच्या ठिकाणी कसे आढळून येतात याविषयीचे विवरण गुरुदेवांनी (हिंदी संत वाङ्मय, परमार्थ मार्ग / अनुवाद / पृ. २५४) म्हटले आहे की, असा साधू १) मौन धारण करतो = बाष्कळ / वृथा बडबड करीत नाही. २) त्याच्या अंगी नम्रता येते = अहंकार नसतो. ३) समता वृत्तीने तो वावरतो = भेद मानत नाही. उद्धरण्याचा मार्ग दाखवावा, ही बुद्धी त्याच्या ठिकाणी निर्माण होते. जगदोद्धाराची प्रेरणा त्याला होते. ५) शरणागती अवस्था त्याला प्राप्त होते = त्याच्या ठिकाणी शरण्यभाव निर्माण होतो.

'शरणागती ही श्रेष्ठ मुक्ती होय' असे श्रीगुरुदेवांनी प्रतिपादिले आहे. (हिं.सं.वा.प. मार्ग / अनुवाद / पृ. ८३) 'जब हो तुम्हारी मर्जी, तब प्राण तनसे निकले' या (बहिरो) पदाचा उल्लेखही त्यांनी तेथे केला आहे. ही शरणागतीची वाटचाल करताना (संपूर्ण शरणागतीकडे जाताना) ते सांगतात की, 'पौर्णिमेचा चंद्र आणि चतुर्दशीचा चंद्र एवढे अंतर देव नि भक्तात उरते.' देहाचे बंधन असल्याने हे अंतर उरते. देह पडला की तेही अंतर संपून भक्त संपूर्णपणे देवस्वरूप होतो.

साधकावस्था नि साधनमार्ग हे दोन्ही विषय 'परमार्थ सोपान' च्या संदर्भात प्रयत्नपूर्वक होणाऱ्या वाटचालीतले आहेत. साक्षात्कार ही मात्र अवस्था होय. ती साधनमार्गाचे ध्येय होय. ती प्राप्त होते. तरीही त्याचे स्पष्टीकरण दोन पदांमधून संतांनी मांडले आहे. या दोन पदांचा आता विचार करू :

## ऐक्याची सुखनिद्रा

साक्षात्कार म्हणजे ईश्वराचे अनुभव. ते अधिकाधिक वाढत गेले नि 'सदासर्वकाळ देव सन्निध आहे' अशी जाणीव झाली की, देवरूपाशी भक्त हळूहळू ऐक्य पावत जातो.

श्रीगुरुदेवांनी नित्यनेमावलीत 'आता स्वामी सुखे निद्रा करावी अवधूता' ही शेजारती आणि 'फळले भाग्य माझे धन्य झालो संसारी' ही काकडारती समाविष्ट केली आहे. देव-भक्त ऐक्याची ही अनुक्रमे 'सुखनिद्रा' नि 'आनंदमुद्रा' होय. काकडारती वा शेजारती ही तुम्हा-आम्हा सामान्यांना

'सकाळी' नि 'रात्री' म्हणावयाची अशी पदावली वा प्रार्थना असली तरी सिद्ध / साक्षात्कारी / सत्पुरुषाला मात्र या वेळा / दिवस-रात्री / वेगळेपणाने नसतात. त्यांच्या दृष्टीने तो 'सदाजागृत' असाच असतो. त्यामुळे आनंदसुख तो अनुभवतो तेव्हा कृतज्ञतेने सद्गुरुंची आरती करतो. निद्रासुख अनुभवतो तेव्हा तो शेजारती म्हणतो. ऐक्याचीच ही अवस्था होय. असो.

('आता स्वामी सुखे निद्रा करावी अवधूता') (संपूर्ण शेजारती / नित्यनेमावली / आवृत्ती ११ वी / १९८३ / पृष्ठ ६७-६८ पहा) यात 'चिन्मय अशा सुखधामी' सिद्ध सत्पुरुष एकांतात पहुडलेला आहे - ही स्थिती वर्णन केलेली आहे. ही स्थिती प्राप्त झाली. पण ती प्राप्त व्हायला देखील साधकाला एका साधनमार्गानेच 'तयारी' करावी लागली नि मग तो या अवस्थेला 'पोहोचला'. ही तयारी कोणती? तर १) वैराग्याचा कुंचा घेऊन अंतःकरण स्वच्छ (शुद्ध) केले. २) अंतःकरणात सप्रेमाचा (भक्तिप्रेमाचा) सडा घातला. ३) नवविधा भक्तीच्या पायघड्यावरून हा साधक भक्तिपंथाची वाट चालत राहिला. ४) ज्ञान (आत्मज्ञान) आले. त्यामुळे संशय, भेद, भ्रम गळून गेला. ५) देवाविषयीचा भाव (श्रद्धा) दृढ झाला. ६) मन समर्पित केले. ७) द्वैत बुद्धी संपली. ८) दुर्बुद्धी संपली. ९) आशा-तृष्णा-कल्पना यांचा गलबला संपला. १०) क्षमा-दया-शांती या सद्गुणी दासी (वृत्ती) ईश्वराची सेवा (ध्यान) करू लागल्या. ११) उन्मनी अवस्था निर्माण होऊन १२) सद्गुरुंशी (देवाशी) ऐक्य पावला. हीच ती 'सुखनिद्रा' होय.

साधनमार्गाने साधक हा सिद्धावस्थेला पोहोचल्याची ही अनुभूती होय. ही 'निद्रा' नव्हे तर ही 'शरणागती' होय. सद्गुरुशी / देवाशी शरण्यभावनेने ऐक्य जाहले, अशी ही अवस्था होय.

## ऐक्याची 'आनंद मुद्रा'

सद्गुरुंच्या कृपेने 'नामोपदेश' मिळाला, 'साधनमार्ग' सापडला. त्यावरून 'वाटचाल' होत राहिली. 'अनुभव' आले. त्याविषयीची 'कृतज्ञता' या सिद्धावस्थेतही साधकाच्या मनात भरून राहिली आहे. म्हणून तो आनंद भावनेने ही 'थोरवी' सांगतो.

'फळले भाग्य माझे धन्य झालो संसारी । सद्गुरु भेटले हो त्यांनी धरियेले करी' (नित्य नेमावली / आवृत्ती ११ वी / १९८३ पृष्ठ ७-८ ही काकडारती 'आनंदमुद्रा' दर्शविते. यातही देव-भक्त ऐक्यस्थितीचे वर्णन निवृत्तिनाथांनी केले आहे. यात साक्षात्कार-अवस्थेचेच वर्णन आहे. १) सद्गुरुंची भेट होऊन त्यांनी कृपा (नामोपदेश) केल्याने मी धन्य झालो. त्यांनी मला परमार्थाकडे चालविले. त्यामुळे मी देवाला पाहू शकलो. त्याला पाहण्याने जी सुखानंदावस्था जाहली आहे तिचे वर्णन शब्दांनी करता येत नाही. मी देवस्वरूप झाल्याने माझे 'मी' पण / देहभाव / संपून गेला. २) ईश्वरदर्शनाच्या अवस्थेत देहभान राहिले नाही. मन उन्मन झाले. प्रपंचाची आठवण राहिली नाही. शब्दज्ञान निःशब्द झाले. देवाचे रूप पाहताना मी तटस्थ / तल्लीन झालो. ३) रज, तम, सत्त्व या गुणांनी 'प्रकाश' उजळला. त्यावर लक्ष्य खिळून राहिले. दृष्टी स्वरूपावर खिळून राहिली. या अवस्थेत दिवस-रात्र हा भेद उरला नाही. ४) विठ्ठलाची (देवाची) आरती-अंतर्मनात आत्मस्वरूप पाहिल्याने झाली. देवाचे स्वरूप आकाशातही मावेना. त्या प्रकाशरूपापुढे सूर्य-चंद्र यांचे तेजही फिके पडले. अनाहत नादाचा अनुभव आला. ५) आनंदातच मी बुडून गेलो. सुख अपार लाभले. त्या सुखानंदाविषयी / आनंदसुखाविषयी मी काय सांगू? ते शब्दाने सांगता येतच नाही. सद्गुरुंशी ऐक्य पावून वृत्ती निवृत्तीत निमाली. संपूर्ण शरणागती झाली.

संपूर्ण शरणागती झाली. मग ही स्थिती तरी कशी काय सांगता आली? असा प्रश्न कुणी उपस्थित करील. याचे उत्तर एवढेच की त्या ऐक्यस्थितीचा अनुभव आला त्याक्षणी हे स्मरण झाले. निवृत्तीनाथांनी ते साधकांकरिता लिहून ठेवले. हे या संतसद्गुरुंचे केवढे उपकार आहेत. नाहीतर या स्थितीचे थोडेही स्वरूप उपलब्ध झाले नसते. साधकापुढे देव-भक्त ऐक्यस्थितीचे ध्येय नि अवस्था निवृत्तिनाथांनी स्पष्ट केली असल्यामुळे साक्षात्कार शास्त्राच्या दृष्टीनेही अध्यात्म विचार परिपूर्ण होऊ शकला. त्यादृष्टीने या 'शेजारती' आणि 'काकडारती' यांचे महत्त्व आहे.

## अंतिम निर्णय देवाचाच !

देव-भक्त यांच्या ऐक्यस्थितीचे वर्णन उपनिषद्रहस्यग्रंथात गुरुदेवांनी (अनुवाद/पृष्ठ ३१४) युद्धभूमी, योद्धा, युद्ध हा भेद संपतो, असा दाखला देऊन केले आहे. शंकराचार्यांनीही निर्वाणषटकात 'अहं भोजनं, न भोज्यं न भोक्ता, चिदानंदरुपः शिवोऽहं शिवोऽहं' (कन्नड संत वाङ्मय परमार्थ मार्ग / अनुवाद / पृ. २५२) अशी स्थिती वर्णन केल्याचे श्रीगुरुदेवांनी उल्लेखिले आहे. समर्थांनी दासबोध ग्रंथातही आरतीचा 'नित्यनेम विवरिता स्वयं ब्रह्मचि होय' असे म्हटले आहे.

साक्षात्काराच्या उच्चावस्थेत साधक देवाच्या ताब्यात राहतो, केवळ त्याच्याच इच्छेने तो वागतो, कारण त्याला कळलेले असते की, अंतिम नि अचूक निर्णय केवळ देवाचाच असणार. तोच मानणे हिताचे आहे. देव हा बुद्धिबळातील ग्रँडमास्तरासारखा आहे. त्याची खेळी अंतिम, अचूक, निर्णायक अशी असते.

श्रीगुरुदेवांनीही प्रत्येक क्षणी देवाचा कौल प्रमाण मानला. प्रचीतीच्या रूपाने त्यांना कौल मिळत असे. अशा अवस्थेत ईश्वराविषयीच्या उत्कट प्रेमभक्तीने भक्त देवाच्या आधीन होतो.

साक्षात्काराच्या उच्चावस्थेतील भक्तीची वाट मोठी अरुंद आहे. तिथे देहसुख की आत्मसुख? यापैकी एकाचीच अंतिम निवड करावी लागते. आत्मसुखाची निवड केली तरच त्याला देवाशी ऐक्य पावता येते. अशा स्थितीपर्यंत पोहोचणारे साधकही फार थोडेच असतात.

'बाह्योपचारांनी आपण ज्याची पूजा करतो, तो देव खरा नसून, विश्वाचा व्यवस्थापक जो देव, तो आपल्याबाहेर नाही, तो अंतरात्म्यातच आहे' असे गुरुदेवांनी (उपनिषद्रहस्य/प्रस्तो) म्हटले आहे.

## आध्यात्मिक साम्यवाद

श्रीगुरुदेवांनी सदैव नि सर्वत्र समन्वयाची दृष्टी ठेवूनच अध्यात्मतत्त्वज्ञानाची चर्चा, स्पष्टीकरण नि विशदीकरण केले आहे. पंथ, संप्रदाय, गुरु यांचे संदर्भात अभिनिवेश न ठेवता त्यातले रोकडे-अध्यात्मतत्त्व कोणते, याविषयीच त्यांनी उहापोह केला आहे. सगुणरूपाने सुरू होणारी भक्ती निर्गुणरूपाचा साक्षात्कार घडविते हेही स्पष्ट केले आहे. नाम-रूप-देव-सद्गुण यांची एकत्रित उपस्थिती 'नामस्मरणात्मक - भक्तियोग' यामध्येच शक्य आहे, हे त्यांनी स्वानुभवाने नि संतपरंपरेचा निर्वाळा, दाखला देऊन सांगितले. या संप्रदायाला त्यांनी 'स्वरूप-संप्रदाय' हे नामाभिधान दिले.

श्रीगुरुदेवांनी आपल्या 'परमार्थ-सोपान' मधून आध्यात्मिक-साम्यवाद सांगितला आहे. धर्मातील तत्त्वज्ञानाच्या अज्ञानामुळेच कलह आहे. खरे तर धर्मवेत्त्यांचा अनुभव एकच आहे. एक देव, एक धर्म, एक मानवता मानली तरच या आध्यात्मिक भूमिकेतूनच जगात शांती नांदू शकेल असे प्रतिपादन केले आहे. (१९५१ साली सामाजिक-राजकीय कार्यकर्ते श्री. रावसाहेब पटवर्धन यांचेशी झालेल्या संवादात नि पुढे आपल्या व्याख्यानातून त्यांनी ही भूमिका मांडली.)

साक्षात्काराच्या उच्चस्थितीचे वर्णन करताना श्रीगुरुदेवांनी म्हटले आहे की, 'आत्माच आत्म्याला पाहू शकतो. देह नव्हे.' तो कसे पाहतो? याविषयी छांदोग्यउपनिषदाचा दाखला देऊन त्यांनी म्हटले आहे की, 'सोन्याच्या मिशा व केस असलेला व आपाद सोन्यासारखा तळपणारा व सूर्यावर दिसणारा हिरण्यमय पुरुष दिसतो व 'तो मी आहे' हा अनुभव येतो.' आरशावरील धूळ, मळ पुसून टाकला म्हणजे जसा तो चकचकीत होतो व त्यामधील प्रतिबिंब स्वच्छ आणि स्पष्ट दिसते, तद्वतच आत्मानुभवाच्या शेवटी योगी आपण आपल्यास पाहून कृतार्थ होतो. दुःख संपते. आत्मतत्त्वाच्या सहाय्याने तो ब्रह्मतत्त्व पाहतो.' (मुंडकोपनिषदाचा दाखला त्यांनी देऊन) हा अनुभव उपनिषद्रहस्य, अनुवाद, पृ. ३०८ वर उल्लेखिला आहे.

श्रीगुरुदेवांचा 'परमार्थ-सोपान' बुद्धिवादी आहे. आत्मानुभवाचे प्रामाण्य ते मानतात. 'साधन करावे, स्वरूप पहावे' या अर्थाने 'मुखी नाम, हाती मोक्ष' या तुकोबांच्या वचनाचा अन्वयार्थ त्यांनी आपल्या संप्रदायात स्पष्ट करून ठेवला आहे.

**समाधीवर नाममंत्र**

निंबाळ (जिल्हा - विजापूर) येथे श्रीगुरुदेवांच्या संजीवन समाधीवर नाममंत्र घेऊन हा परमार्थ सोपान अनुसरता येतो. शेवटी पंथ, परंपरा, सद्गुरु कोणीही असोत. आर्त आक्रंदन मनाशी घडले नि अंतःकरणात तळमळ निर्माण झाली तर त्या मनुष्याला सद्गुरुही भेटतात. साधनमार्ग मिळतो. मोक्षप्राप्तीही होते. प्रश्न आहे तो मनुष्याने साधकदशेकडे वळण्याचा. साधनमार्ग अनुसरण्याचा. मग त्याच सद्गुरुंच्या कृपेने साक्षात्कारही होईल. ज्ञानेश्वरांनी सांगितल्याप्रमाणे –

*'तैसे भोगा आतुनि निगता । चित्त मजमाजी रिगता ।*
*हळूहळू पंडुसुता । मीचि होईल' ॥ (१२ वा अध्याय)*

अशी अवस्था प्राप्त होईल. जीवनाचे कल्याण होईल. त्यासाठी सद्गुरुंना प्रार्थना करू या –

*'अहंकाराचा वारा । न लागो राजसा । माझ्या विष्णुदासा । भाविकासी ॥*
*शरीर प्राणासी । करीन कुरवंडी । क्षण एक न सोडी । संग त्याचा ॥*
*नामा म्हणे तया । असावे कल्याण । ज्यामुखी निधान । पांडुरंग ॥'*

राजाधिराज सद्-गुरुनाथमहाराज की जय.

**प्रा. डॉ. नरेंद्र सदाशिव कुंटे**
प्रज्ञा - ए - ७४, आसरा सोसायटी,
होटगी रस्ता, सोलापूर - ३.

# संतांचे नामसाधन

**सौ. प्रभा करंदीकर**

*रेल्वे खात्यात ३१ वर्षे नोकरी. स्वेच्छा निवृत्ती. दासबोध अभ्यास, समर्थ विद्यापीठ, शिवथर घळ, उपासक पदवी परीक्षा उत्तीर्ण, मानिनी मासिकातून अध्यात्मिक व सामाजिक लिखाण.*

'तुला काय काय येते?'

रामदुर्गच्या शास्त्रीबुवांच्या या प्रश्नावर त्या तेजस्वी मुलाने त्यांच्यापुढे संस्कृत भाषेचा शब्दकोश टाकून उत्तर लिहिले.

'या पुस्तकातले सगळे येते, काहीही विचारा.'

आपली परीक्षा पाहण्याच्या हेतूने विचारलेल्या प्रश्नाला असे आत्मविश्वासपूर्ण उत्तर देणारा विद्यार्थी होता – जगन्नाथ शंकरशेट विजेता – रामचंद्र दत्तात्रय रानडे – म्हणजेच आपले पूज्य गुरुदेव रानडे आणि ही गोष्ट आहे १९०३ सालची.

अनेक पदव्यांनी व पारितोषिकांनी सन्मानित केले गेलेले उच्चविद्याविभूषित श्रीरानडे हे गुरुदेव रानडे म्हणून सर्वपरिचित आहेत. आपणही यापुढे त्यांचा उल्लेख गुरुदेव असाच करणार आहोत.

## परिचय

जन्म ३ जुलै १८८६ ला जमखिंडी येथे झाला. मातोश्री पार्वतीबाई यांच्या एक तपाच्या व्रतवैकल्यांचे फळ रामेश्वर कृपेने या मुलाच्या रूपात प्राप्त झाले म्हणून बाळाचे नाव रामचंद्र ठेवले. परमार्थाची आवड ही आईकडूनच आल्याने लहानपणापासून ईश्वरावर श्रद्धा होती.

किशोरवयात एका प्रसंगी मित्राने त्यांचे प्राण वाचवले. त्या मित्राच्या शब्दाखातर १९०१ मध्ये म्हणजे वयाच्या अवघ्या १५ व्या वर्षी उमदीचे संत भाऊमहाराज उमदीकर यांचेकडून कार्तिकातील वैकुंठ चतुर्दशीला नाम घेतले. खरंच साधकाच्या आयुष्यातला हा 'सोनेरी दिवस'. अनुग्रह घेतल्यावरही सुरुवातीच्या काळात मात्र भक्ती ही सकामच होती. जिज्ञासू वृत्ती व असामान्य बुद्धिमत्ता गुरुदेवांच्या ठायी एकत्र आल्याने त्यांना शिक्षणात सतत यश मिळत गेले. त्यात मॅट्रिकला जगन्नाथ शंकरशेठ मिळाल्याने त्यांचे खूप कौतुक झाले. अगदी जमखिंडीच्या राजेसाहेबांनीदेखील जमखिंडीचे नाव काढले म्हणून जातीने कौतुक केले. या यशामुळे गुरुदेवांची आपल्या सद्गुरुंवर पूर्ण श्रद्धा बसली. याच सुमारास दिवसा तारे दिसण्याचा प्रथमच इंद्रियातील अलौकिक असा अनुभव त्यांनी घेतला. खरंच अवघ्या १५ व्या वर्षी हे ऐहिक तसेच पारमार्थिक यश मिळाल्याने नामावरील व गुरुंवरील श्रद्धा दृढ झाली. यानंतर यशाची कमान चढतच गेली आणि पुढे एम.ए. ला त्यांना चान्सेलर्स मेडल मिळवून देती झाली. त्यांच्या स्वभावामुळे युरोपियन प्रोफेसर्स देखील त्यांच्यावर खूष असत.

## जीवनाने घेतलेले वेगळे वळण

१९०८ मध्ये डेक्कन कॉलेजमध्ये फेलो म्हणून नेमणूक झाली. या सुमारास एकदा त्यांना शेषरूपात आत्मदर्शन झाले. याच काळात गुरुदेव बनारसला गेले होते. तेथील मुक्कामात त्यांनी जगद्गुरु शंकराचार्यांच्या मठाला भेट दिली. तिथे आचार्यांची भक्तिपर स्तोत्रे म्हटली जात होती. ती ऐकून गुरुदेव विचार करू लागले की आचार्य अद्वैतवादी, मात्र त्यांची ही सुंदर स्तोत मात्र भक्तिरसपूर्ण म्हणजे द्वैतवादी आणि हा विचार त्यांचे मन अस्वस्थ करीत राहिला. (अर्थातच द्वैताशिवाय ईश्वरस्तुती, नमस्कार कसे होणार म्हणा !) स्वतः आत्मज्ञान प्राप्त करून घेऊन जगाला त्याची ओळख करून द्यायची हे तर गुरुदेवांचे ध्येय ठरले. पण ते स्वतः तर बुद्धिनिष्ठ तेव्हा साहजिकच तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाशिवाय हे शक्य होणार नाही हे पटले. येथेच त्यांची भेट डॉ. ॲनी बेझंट यांच्याशी झाली. त्यांच्या तोंडून आपल्या सद्गुरुंची प्रशंसा ऐकून गुरुदेवांना आनंद वाटला. या सगळ्या अनुभवांनी त्यांना तत्त्वज्ञानाची ओढ लागली आणि मग ते तत्त्वज्ञान घेऊन एम.ए. झाले. जमखिंडीचे प्रख्यात पंडित श्री. बाळशास्त्री आठवले यांच्याकडे जाऊन गीता, ब्रह्मसूत्रे, उपनिषदे यांच्या वाचनाला व चर्चेला सुरुवात झाली. पण काही काळाने गुरुदेव आजारी पडले. आजारपण वाढतच गेले. डॉक्टरांनी निदान केले – मेंदूच्या क्षयाचे – तरीही औषधांबरोबर स्वतःचा नेम, सद्गुरुंकडून आलेला प्रसाद तसेच अभयदान या सर्वांच्यामुळे हळूहळू तब्येत सुधारली पण तशी ती पुढे कायम नाजूकच राहिली. काही दिवस सद्गुरु सान्निध्यात इंचगेरीला राहिले. एवढे असूनही इच्छाशक्तीच्या बळावर नामसाधना मात्र चालू होतीच. या काळात अनेक पारमार्थिक अनुभवही त्यांनी घेतले.

१९२४ पासून गुरुदेव निंबाळ येथे राहायला आले. सोलापूर-हुबळी मार्गावरील निंबाळ हे स्टेशन आहे. तेथे जवळच गुरुदेव रानडे आश्रम आहे. गुरुदेवांची नामसाधना चालू असताना 'निंबरगी महाराज निंबाळला गेले आहेत' असे शब्द त्यांना ऐकू आले. म्हणूनही निंबाळ निवडले असावे. (Nimbus) म्हणजे प्रकाश (प्रभा). खरोखर गुरुदेवांच्या वास्तव्याने या गावाचे नावही सार्थ झाले. अनेकांना येथे 'ज्ञान प्रकाश' प्राप्त झाला.

१९२७ मध्ये गुरुदेवांना अलाहाबाद विद्यापीठाने सन्मानपूर्वक बोलवून तत्त्वज्ञान विभाग दिला. येथूनच १९४७ मध्ये ते व्हाईस चॅन्सेलर पदावरून निवृत्त झाले.

अलौकिक बुद्धिमत्तेबरोबरच पारमार्थिक अनुभवांची देणगी प्राप्त झालेल्या या साक्षात्कारी संताने अनेक जगन्मान्य ग्रंथांची निर्मिती केली. एकाहून एक सरस असे हे अनेक विद्वन्मान्य व जगन्मान्य ग्रंथ त्यांनी लिहिले. Constructive Survey of upanishadic philosophy, Mysticism in Maharashtra or Pathway to God, Bhagwatgeeta - Philosophy of God realisation या सारख्या प्रसिद्ध ग्रंथाचे लेखक म्हणून तसेच तत्त्वज्ञानाचे उत्तम प्राध्यापक म्हणून त्यांची सर्वदूर ख्याती झाली. पाश्चात्य व भारतीय तत्त्वज्ञानाचे गाढे अभ्यासक म्हणून सर्वमान्यता मिळाल्याने अनेक ठिकाणची व्याख्यानांसाठी बोलावणी येत. त्यांची कीर्ती ऐकून लोकमान्य टिळकांनीही 'केसरी'चे संपादक म्हणून काम करण्याची संधी देऊ केली. पण गुरुदेवांनी ती नाकारली. कारण त्यांचे ध्येय वेगळे होते. याच कारणासाठी 'किंग जॉर्ज

*स्कॉलरशिपसाठी' व्याख्याने देण्यासाठी आलेले आमंत्रणही त्यांनी नाकारले.*

आपल्या ग्रंथांद्वारे संप्रदायाचे तसेच सद्गुरुंच्या तत्त्वज्ञानाच्या जगप्रचाराचे त्यांचे स्वप्न त्यांनी साकार केले.

## नामसाधना

गुरुदेवांच्या जीवनात गुरुनिष्ठा आणि नेम (नामस्मरण) यांना असाधारण महत्त्व होते. कोणतीही गोष्ट त्यांच्या नेमाच्या आड ते येऊ देत नसत. प्रकृती स्वस्थ असो वा नसो नेमात काडीमात्र बदल नसे. एकूण सर्वच संतांनी नामस्मरणाला ईश्वरापर्यंत पोचण्याचा साधा व सोपा उपाय असे म्हटले आहे. वारकरी संप्रदायाची गीता म्हणजे ज्ञानदेवांचा हरिपाठ. 'हरि मुखे म्हणा हरि मुखे म्हणा । पुण्याची गणना कोण करी ।' असा सर्वांना नामाचा उपदेश केला आहे. कारण ज्ञानेश्वर माऊली म्हणतात, 'कोटी जन्मांची पापे हरिनामस्मरणाने नष्ट होतात. संत रामदास म्हणतात, 'राम चिंती मनी अहर्निश' तसेच 'नामे संकटे नासती । नामे विघ्ने निवारिती । नामस्मरणे पाविजेती उत्तम पदे ।' असा नामाचा महिमा आहे.

संत कबीर म्हणतात, 'नामस्मरणाने मन पवित्र होते. संचित कर्मे, दुष्ट वासना भस्म होतात.' विशेषतः माणसाचा अहंकार नष्ट होतो आणि इथे माझे काही नाही; सर्व सत्ताधीश तो ईश्वरमात्र आहे याची खात्री पटते. देहबुद्धी नष्ट होऊन आत्मबुद्धी प्रकट होणे हे नामसाधनेचे मर्म आहे.

प्रपंचामध्ये गुंतलेल्या मनाला भगवंताचा सारखा विसर पडतो. तो पडू नये यासाठी नामस्मरणासारखा अन्य मार्ग नाही. कारण नामाला इतर कोणत्याही बाह्य साधनाची जरूर नाही. जात, जागा, स्थळ, काळ यांचेही बंधन नाही. मात्र त्यामागे शुद्ध भाव हवा. आपल्याला सगळ्यांना ठाऊक आहेत ते मनाचे श्लोक हेच सांगतात –

***असे हो जया अंतरी भाव जैसा । वसे तो तया अंतरी देव तैसा ।***

सर्व विश्वावर त्याची सत्ता आहे. त्याच्या इच्छेनेच हे जग चालते याची जाणीव जागी असणे म्हणजे नामस्मरण. ईश्वर व आपण एकच असल्याचा साक्षात्कार नाम घडवून आणते. पुराणातून तशी उदाहरणे आहेतही आणि त्या कथा लहान वयापासून आपल्याला माहीत आहेत. देवर्षी नारद तर सतत नारायणाच्या अनुसंधानात. ध्रुव व प्रल्हाद या बालकांनी तर लहान वयातच नारायणाची प्राप्ती करून घेतली. एवढेच काय पण रामनामाने पाषाणही तरले तर मनुष्य का नाही उद्धरून जाणार.

गुरुदेवांना नामामुळे सिद्धी प्राप्त होऊ लागल्या. समोर येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचे भूत-भविष्य त्यांना स्पष्टपणे दिसे. पण त्यांना ती उपाधी नको होती. संत सत्पुरुषांना सिद्धी म्हणजे मोक्ष मार्गातील अडथळे वाटतात. त्यामुळे गुरुदेवांनी रोज आपल्या सद्गुरुंची प्रार्थना करून ही गोष्ट थांबवली. नामसाधनेने त्यांना अनेक साक्षात्कारी अनुभव प्राप्त झाले. नामसाधना सोपी वाटली तरी ती तशी सोपी नाही. त्यामागे एकाग्रता, आंतरिक तळमळ, निष्ठा, श्रद्धा, शरणागती यांची आवश्यकता असते. म्हणून तर देव भावाचा भुकेला असे म्हणतात. सत् चित् आनंद हे आत्म्याचे मूळ रूप, जे आपल्या अंतर्यामीच वसत असते. ते आपल्याला नामामुळे प्राप्त होते. मग तिथे दुसऱ्या कशालाही जागाच उरत नाही. आत्मज्ञानाच्या दिव्य प्रकाशापुढे सर्व गोष्टी दिसेनाशा होतात आणि मग 'उरलो उपकारापुरता' अशी संत तुकारामांसारखी श्रेष्ठ भावना, अत्युच्च स्थिती निर्माण होते.

गुरुदेवांकडून अनेकांनी नाम घेतले परंतु नाम देताना ते प्रत्येक वेळी सद्गुरुंनी पूर्वी संकेत दिलेलेच नाम त्यांच्या आज्ञेने देत.

अंतकाळी नाम घेतल्यास मोक्षप्राप्ती होते असे गीता सांगते पण सोपे आहे का ते? जे सतत स्मरणात असेल तेच अंती आठवणार म्हणजे नामाची सतत अखंड साधना – अभ्यास असेल तरच अंतकाळी नाम आठवेल अन्यथा प्रापंचिक गोष्टीच डोळ्यांसमोर येणार !

आज आमची सगळी जीवनपद्धतीच (Life Style) बदलली आहे. ऐहिक संपन्नतेसाठी, जीवनातील संकटे जावीत यासाठी खूपजण निरनिराळ्या मठात जातात. संतांकडे जातात, अनुग्रह घेतात, नाम घेतात पण त्यानंतर ती अनुसंधाने सांभाळायला मात्र त्यांना या धकाधकीच्या आयुष्यात वेळ मिळत नाही. नेमात सलगता, अखंडता, नियम राहत नाही. कारण त्यामागे अंतरीची तळमळ नसते. काही दिवस नाम घेतले, मनासारखे झाले नाही की सोडले. मग काय दुसरी कोठली स्तोत्रे वाचली, पोथी वाचली, उपवास, व्रते केली. देवदर्शने घेतली असे धरसोड चालू असते. आपल्या मनासारखे होत नाही. म्हणून सदैव दुःखी-कष्टीच राहणारा माणूस त्या मागची कारणे मात्र शोधायचे कष्ट घेत नाही.

वेळ नाही, वेळ नाही असे म्हणणारा माणूस सिनेमा, टीव्ही यासाठी वेळ काढू शकतो. लॉटरीचे बक्षीस लागले, असे नुसते कळले तर हातची सर्व कामे सोडून तो ताबडतोब वेळ काढतो. हे आपण सतत पाहतो. अर्थातच या गोष्टी माणसाने पूर्णपणे सोडाव्या असे नाही पण त्याचबरोबर ज्याच्या सत्तेने, कृपेने आपण दोन घास जेवतो, रस्त्याने जाता-येता सुरक्षित राहतो, दूषित हवेतही रोगापासून लांब राहू शकतो, त्या ईश्वराचे स्मरण ही आपली नैतिक जबाबदारी आहेच. दिवसाच्या चोवीस तासांपैकी १५-२० मिनिटे तरी शांत मनाने, शुद्ध भावाने आपण प्रत्येकाने नामस्मरण केले पाहिजे. लहान मुलांनाही सकाळ-संध्याकाळ ५-५ मिनिटे देवाला हात जोडायला शिकवले तर त्यांचे मानसिक बळ वाढेल. हातून वाईट गोष्ट होणार नाही. आपण सर्वांनी किमान एवढे करावे असे मला वाटते. ईश्वर जे करतो ते आपल्या भल्यासाठीच ही भावना असावी. घडणारी प्रत्येक गोष्ट ही आपल्या पूर्वकर्माचीच प्रतिक्रिया असते हे जाणून घ्यावे व चांगली प्रतिक्रिया हवी असेल तर सत्कर्माचीच जोड हवी हे विसरू नये.

## संप्रदायातील काही निवडक विचार व तत्त्वे

निंबरगी येथील निंबरगी महाराजांचे शिष्य भाऊमहाराज उमदीकर यांचे गुरुदेव हे शिष्य. हा संप्रदाय निंबरगी संप्रदाय म्हणून ओळखला जातो. गुरुदेव स्वरूप संप्रदाय असाही उल्लेख करतात. ते म्हणतात, 'या दृश्य विश्वाच्या मागे कोणते तत्त्व आहे, कुणाच्या सत्तेने येथील सर्व घडामोडी चालतात याचा माणसाने शोध घ्यायला हवा. शब्दांचा पसारा मांडणाऱ्या, विद्वानांपेक्षा, तळमळीने साधना करणारा भक्त श्रेष्ठ होय. पूर्वपुण्याईने मिळालेल्या नरदेहाचे सार्थक आत्मज्ञान प्राप्ती हे होय. मात्र त्यासाठी आंतरिक तळमळ हवी – जसे समर्थांनी सांगितले,

***'देवाच्या सख्यत्वाकारणें । आपलें सौख्य सोडून देणें ।***
***अनन्यभावें जीवें प्राणें । शरीर तेंही वेंचावें ॥ (दा. ४-८-६)***
***देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जिवलगांसी तुटी ।***
***सर्व अर्पावें सेवटीं । प्राण तोही वेचावा ॥' (दा. ४-८-८)***

अशा तळमळीतूनच जीव-शिव यांचे ऐक्य होत असते. हा शाश्वत

सुखाचा मार्ग असल्याने हेच मनुष्य जन्माचे ध्येय असायला हवे. गुरुदेव म्हणतात, ईश्वरप्राप्ती हे मानवी जीवनाचे अंतिम व उच्चतम ध्येय साध्य करण्यासाठी सद्गुरुंची कृपा, अखंड नामस्मरण व संतांची संगती यांची नितांत आवश्यकता आहे. संत सज्जनांच्या सहवासाची महतीच अशी आहे. त्यांच्या सहवासात अहंकार नष्ट होत जातो आणि मग जेव्हा 'मी माझे ऐसी आठवण । विसरले जयाचे अंतःकरण ।' अशी स्थिती प्राप्त होते. मन शुद्ध होते आणि अशा शुद्ध मनालाच ईश्वरदर्शन होऊ शकते.

समर्थांचा दासबोध हा संप्रदायाचा नित्यवाचनाचा ग्रंथ आहे. गुरुदेवांनी साक्षात्काराच्या ५ पायऱ्या सांगितल्या आहेत.

१) परमार्थ प्रवृत्ति – अर्थातच आर्त, अर्थार्थी, जिज्ञासू असे लोक वेगवेगळ्या कारणांनी परमार्थाकडे वळतात. जसे समर्थांनीही म्हटले आहे, 'जो संसारदुःखे दुखवला । त्रिविधतापे पोळला । तोचि येक अधिकारी जाला । परमार्थासी ।। (दा. ३-६-७) म्हणजे परमार्थाकडे प्रवृत्त होणे ही प्रथम पायरी.

२) सद्गुणसंपादन – आपल्यातील अवगुण ओळखून त्यांचा त्याग करणे आणि दैवी गुण, सात्त्विक गुण वाढवणे ही दुसरी पायरी.

३) देवभक्तांचे नाते – हे आई व मूल असे म्हटले तरी वावगे होणार नाही. मी देवाचा आहे (किंबहुना मी देवच आहे) ही दृढ भावना हवी. भक्ताच्या हाकेला देव धावून येणारच ही खात्री हवी. कारण जो विभक्त नाही तो भक्त असे म्हटले जाते. ईश्वर जे करतो ते माझ्या भल्यासाठीच ही भावना हवी.

(येथे हे म्हणावेसे वाटते की संतांचे बोल, विचार हे अनुभवाचे असतात. गुरुदेवांची आई गेली, पत्नी गेली, मुलगे गेले पण हे सर्व दुःख त्यांनी स्थितप्रज्ञासारखे भोगले.)

४) साधनमार्ग – सद्गुरुंनी दिलेले साधन निरंतर करीत राहणे हे आयुष्याचे ध्येय असायला हवे. सद्गुरु देखील भाग्यानेच मिळतात. शिष्यासाठी ते परब्रह्मच असतात. या भावनेने त्यांनी दिलेले साधन अत्यंत निष्ठापूर्वक करावे.

५) साक्षात्काराचे स्वरूप व त्याचे परिणाम – जसा भाव तसा देव या उक्तीनुसार साधकाला त्याच्या निष्ठेनुसार व भावानुसार अनुभव येतात. भाव दृढ नसेल तर अनुभवही चंचल असतात. भाव स्थिर, खोल असेल तर अनुभवही स्थिर, अखंड होतात. ते व्यक्तिनुसार वेगवेगळ्या स्वरूपात असू शकतात. परिणामस्वरूप अत्यंत शुद्ध व मृदू अंतःकरण होते. महत्त्वाचा परिणाम म्हणजे अशा व्यक्तिजवळ शुद्ध आनंदच आनंद भरून राहिलेला असतो. चराचरात ईश्वराचेच दर्शन घडते.

## तत्त्वज्ञानातील वैशिष्ट्ये – जसे

१) प्रपंच व परमार्थ दोन्ही ईश्वरी सत्तेनेच चालतात. हे ध्यानात ठेवले तर प्रपंच परमार्थमय व आनंदमय होतो.

२) नामस्मरण हा ईश्वरप्राप्तीचा रामबाण उपाय असला तरी तो नीतीच्या आचरणावर अधिष्ठित हवा. निरपेक्ष कर्तव्यबुद्धी श्रेष्ठ आहे.

३) सद्गुरुंनी दिलेले नाम अखंड घेतल्याने प्रारब्धाचा नाश होतो.

४) अंतःकरणात सतत नामस्मरण हे पुण्य होय.

५) आत्मज्ञान हेच खरे ज्ञान.

६) जीव-शिव ऐक्य हेच या नरजन्माचे सार्थक होय.

नामस्मरणाने जीवभावाचा शिवभाव होऊन 'मी', 'माझे' हे भाव नष्ट होतात.

अशी नैतिक आचरणावर भर देणारी अनेक वैशिष्ट्ये आहेत. १९११ साली सद्गुरु महाराजांच्या सांगण्यावरून गुरुदेवांनी नित्यनेमावली तयार केली. यात साधक मंडळींसाठी नित्य म्हणावयाचे पद-अभंग अंतर्भूत आहेत. अनेक संतांच्या अभंगांमधून वेचे काढून पहाटे, दुपारी, रात्री म्हणावयाच्या आरत्या-पदे-भजने-अभंग यांत घेतले आहेत. यांत समावेश केले गेलेले अभंग, करूणाष्टके, आरत्या, पदे इ. संदर्भ सगुणोपासनेकडून निर्गुणोपासनेकडे नेणारे आहेत. १९-१२-१९११ रोजी भाऊमहाराजांनी गुरुदेवांना या नेमावलीची प्रशस्ती कळविली.

अशा या विद्वान साक्षात्कारी संताविषयी सर्व काही या लहानशा लेखात येणे अशक्यच आहे. तरी आपण आता त्यांच्या काही आठवणी बघू या. कारण मोठ्यांचे सर्वच मोठे. त्यांच्या लहान लहान गोष्टींतून त्यांचे संतत्व दिसून येते.

१९२० च्या सुमारास गुरुदेवांना किंग जॉर्ज स्कॉलरशिपसाठी व्याख्याने देण्यासाठी आमंत्रण केले होते पण हे त्यांनी नाकारले. डॉ. राधाकृष्णन यांना ते कळले तेव्हा त्यांनी गुरुदेवांना विनंती केली की ही सुवर्णसंधी तुम्ही नाकारलीत पण त्यासाठी तुम्ही माझी शिफारस कराल का? त्या वेळी आपल्या अंतरात्म्याचा कौल घेऊन गुरुदेवांनी त्यांची शिफारस करून त्यांना शुभेच्छाही दिल्या. डॉ. राधाकृष्णन यांनी परदेशात खूप व्याख्याने दिली. आपल्या व्याख्यानात ते म्हणत, 'I speak philosophy and Prof. Ranade lives philosophy in his daily life.'

निंबाळला एकदा त्यांना विंचू चावला. तो दिसला तरी मारू दिला नाही. म्हणाले, काडेपेटीत कोंडून ठेवा. मग नंतर लांब सोडून या. एवढे बोलून नेमास गेले.

एकदा ५-६ लोक (चोर) निंबाळ स्टेशनवर उतरून रात्री ११।। च्या सुमारास जुन्या घराजवळ आले. घराच्या कट्ट्यावर बोलणे ऐकू आले तेव्हा कोण आहे असे गुरुदेवांनी विचारले. सर्वजण जोरात आत तर घुसले पण समोर या पुण्यात्म्याचे दर्शन झाले. देवांचेही दर्शन झाले तेव्हा घावरले पण गुरुदेवांनी मात्र त्यांना जेवायला घालूनच परत पाठवले. या संताच्या दर्शनाने चोरांचीही वृत्ती बदलली.

दुसरा मुलगा गेला तो आघातही स्थितप्रज्ञ वृत्तीने झेलला. ईश्वराची मर्जी एवढेच शब्द उच्चारले. अशा या विद्वान साक्षात्कारी सत्पुरुषाचे विषयी लिहावे तेवढे थोडेच. सांगलीच्या राजांच्या आग्रहावरून तिथे अध्यात्म विद्यापीठाची स्थापना गुरुदेवांच्या हस्ते झाली.

३ जुलै १९५६ ला गुरुदेवांनी ७१ व्या वर्षात पदार्पण केले. जमखिंडी या त्यांच्या जन्मगावी त्यांचा अमृतमहोत्सव करण्याची जमखिंडीतील सर्वांची खूप इच्छा होती. त्यांना मान देऊन गुरुदेवांनी संमती दिली. जवळ जवळ ३० वर्षांनी गुरुदेव जमखिंडीला आले होते. महोत्सव मोठ्या प्रमाणात सुरेख रीतीने पार पडला. गुरुदेवांचा तेव्हा तेथे महिनाभर मुक्काम राहिला. या समारंभाने अनेकांना अध्यात्मिक समाधान मिळवून दिले. अनेकांनी नाम घेतले. तब्येत तर फारशी बरी नव्हतीच. यानंतर निंबाळला परत आल्यावर प्रकृती आणखीनच बिघडली. १ जून १९५७ पासून चिंताजनक स्थिती होती. ३ तारखेपासून अन्नत्याग केला आणि अशा

स्थितीत ६ जून १९५७ रोजी रात्री १० वा. ३२ मिनिटांनी गुरुदेवांनी देहत्याग केला.

तीन दिवस निर्वाणसप्ताह झाला. दहनभूमीवर एक औदुंबराचे रोप लावले गेले.

त्यांच्यानंतर गुरुदेवांच्या पत्नी सीताबाई यांनी तर समर्पित भावनेने निंबाळच्या आश्रमाची सुंदर व्यवस्था ठेवली. आज तेथे आश्रमात भक्तांना राहण्याची, जेवण्याची सोय तर आहेच पण आश्रमातर्फे वैद्यकीय सेवाही उपलब्ध आहे. एक शाळाही चालवली जाते.

आश्रमात परदेशी विद्यार्थी देखील अभ्यासासाठी येऊन राहतात. संप्रदायाचे सप्ताहही साजरे होत असतात.

'What should be the aim of human life='

या एका साधकाच्या प्रश्नाला गुरुदेवांचे उत्तर होते –

'To achieve God for oneself and for others is and should be the aim of human life'

ते म्हणत – 'मी जसे जगतो तेच माझे तत्त्वज्ञान. ईश्वरच फक्त सत्य आहे. जो अध्यात्मिक अनुभवामध्ये स्थिर झाला त्याला स्थितप्रज्ञ म्हणावे.'

गुरुदेव रानडे यांच्यासारख्या महान व्यक्तिविषयी अशा एका छोट्या लेखांत सर्व लिहिणे अशक्य आहे हे खरे असले तरी त्यांचे अलौकिकत्व काही अंशी येथे मांडण्याचा प्रयत्न मी केला आहे. माझ्यासारख्या एका सर्वसामान्य व्यक्तीने या थोर साक्षात्कारी संताला आपल्या अल्पबुद्धीने दिलेली ही अंतःकरणपूर्वक मानवंदना.

आपले सुभाषितकार म्हणतात,

*'विद्वत्वं च नृपत्वंच नैव तुल्यं कदाचन ।*
*स्वदेशे पूज्यते राजा, विद्वान सर्वत्र पूज्यते ॥'*

या न्यायाने गुरुदेवांचे नाव थोर तत्त्वज्ञानी म्हणून तसेच महान साक्षात्कारी संत म्हणून जगभर घेतले जाते.

*'मोक्षश्रिया अलंकृत । ऐसे हे संत श्रीमंत ।*
*जीव दरिद्री असंख्यात । नृपती केले ॥ (दा. १-५-२१)*

संत म्हणजे खरोखर प्रति ईश्वरच.

अशा या महान संताला कोटि कोटि प्रणाम.

**सौ. प्रभा करंदीकर**
२२, तुळशीबागवाले कॉलनी, सहकार नगर, २. पुणे ९.

## नाम

नाम ॐ कार स्वरूप,
नाम चिन्मयी चिद्रूप,
नामीं देखिजे गा रूप —
अरूपाचें !

नाम स्वयंभू, स्वयंप्रभ,
आदिबीज - मूळारंभ,
वेद-श्रुतींचा प्रारंभ
हरिःओम् !

नाम सगुण, निर्गुण,
अमूर्ताची मूर्त खूण,
केवलानंद परिपूर्ण —
नामस्तवनीं !

नाम सत्य चिरंतन,
निर्विकल्प-निरंजन,
आर्त जीवातें संजीवन —
नामामृत !

अविनाशी, अनादि, सिंध
तत्त्व एक, नाम विविध,
संकीर्तनीं नित्य सन्निध —
राहे विभू !

नाम अगाध अनन्त,
नामीं रतले साधूसन्त,
प्रभूसी प्रिय अत्यन्त —
नामभक्ति !

ऋषी, तापसी, वेदान्ती,
परब्रह्म ज्यातें वदती,
तया 'नाम' संबोधिती —
भक्तजन !

योगीयातें योगबळें,
ज्ञानीयातें ज्ञानबळें
तेचि आकळे नामबळें —
साधकातें !

नाम मंगलाचे मांगल्य,
पूर्व सुकृताचें साफल्य,
प्राप्त जीविताचें सौभाग्य —
नामासक्ति !

नामाचा मधुरा छंद,
तुटतीं उपाधी बंध
चित्कुसुमांचा सौगंध —
दर्वळे चित्तीं !

नाम अक्षरावें निजान्तरीं,
नामीं रमावी वैखरी,
नुरे द्वैत जन्मान्तरीं —
जीव-शिव !

नामीं शांभवी चित्‌शक्ति,
स्वानन्दें बागडती मुक्ति,
अमृतत्त्वाची अनुभूति —
शब्दातीत !!

**विश्वनाथ जोशी**

- *'ईश्वराचे नाव' हे प्रत्यक्ष ईश्वर आहे - आत्म तत्त्व आहे - असे सर्व संत सांगतात. त्याचे चिंतन, स्मरण म्हणजे आत्मचिंतन होय.*
- *नाम हे दिव्यशक्तियुक्त असे ईश्वराचे प्रतीक आहे - म्हणून नामस्मरण म्हणजे ईश्वराशी एकरूप होण्याची प्रक्रिया होय.*
- *शिष्यात बीजरूपाने असलेले ब्रह्मत्व सद्गुरुमध्ये प्रकट रूपाने दिसते । म्हणजे शिष्याचे स्वतःचे पूर्णत्वाला पावलेले स्वरूप होय.*

# मन 'रामी' रंगले


## स्वामी माधवानंद

*एम.एस्सी., मायक्रॉलॉजीत पीएच.डी. आघारकर रिसर्च इन्स्टिट्यूट शास्त्र संशोधक पदावरून निवृत्त. १९८७ मध्ये वॉशिंग्टनच्या स्मिथसोनियन इन्स्टिट्यूटची फेलोशिप. लंडन येथील नॅचरल हिस्ट्री म्युझियम, जर्मनीतील म्युनिक बोटॅनिकल गार्डन येथे संशोधन अभ्यास. संशोधन लेख, देश व परदेश जर्नल्समध्ये प्रसिद्ध. पू. स्वामी माधवनाथांचे शिष्यत्व १९७४. ज्ञानेश्वरी, दासबोध, योगसूत्र या ग्रंथांचा अभ्यास व प्रवचन. स्वामी माधवानंद असे नामकरण, ध्यानधारणा, समाधी-अंतरंग समजावणे, निरनिराळ्या ठिकाणी ध्यानकेंद्रे.*


समुद्रभ्रमण करणाऱ्या एखाद्या मुसाफिराला अचानक एखादं मोठं बेट लागावं आणि त्यावर उतरून पाहिल्यावर ते अत्यंत नयनरम्य, फुलाफळांनी समृद्ध आहे, तिथे अत्यंत पवित्र आणि सुसंस्कृत ऋषींचं वास्तव्य आहे आणि आपलं तिथे स्वागत आहे, असा तो सर्वथैव 'शुचि देश' आहे असं त्या मुसाफिराच्या लक्षात यावं तसा निंबरगी महाराजांचा हा संप्रदाय अध्यात्म सागरावर विहार करणाऱ्यांना दिसतो आणि ते त्यात रमून जातात. त्यातून गुरुदेव राम दत्तात्रय रानडे यांच्या वाङ्मयात डोकावल्यावर, मन 'रामी' रंगले असा अनुभव सर्व प्रवृत्तींच्या आणि प्रकृतींच्या व्यक्तींना येतो. याचं कारण, त्यांच्या सारख्या आत्मारामी रंगलेल्यांच्या जीवनाला खरी रंगत असते आणि मनाला ती संगत सोडावी असं वाटत नाही.

न्यायमूर्ती रानडे यांनी ज्ञानेश्वरांबाबत एका ठिकाणी म्हटलंय, 'जो विद्वत्तेने मोठा असतो त्याला पंत म्हणतात. जो अंतःकरणाने मोठा असतो त्याला संत म्हणतात. पण जेव्हा संत हा पंतही असतो तेव्हा जीवन भाग्यवंत होते.'

पंत असणं म्हणजे तो अध्यात्म शास्त्राच्या बाबत सखोल अध्ययन असलेला विद्वान तत्त्वज्ञ असणं आणि संत म्हणजे त्याचा अनुभव घेणारा साक्षात्कारी असणं. तत्त्वज्ञानाचे अभ्यासक विद्वान होतात पण बऱ्याच वेळा ते त्यातच रमून राहतात आणि आत्मारामाच्या केवळ माहितीत समाधान मानतात. अंतरंगाचे अभ्यासक मात्र आत्मारामाच्या केवळ माहितीवर समाधान न मानता त्यांच्याकडे चालत राहतात. त्यांची भेट घेतात, ओळख करून घेतात, त्याच्याशी सख्य करतात आणि त्याच्यातच रमतात. तत्त्वज्ञानाचा अभ्यास आणि साक्षात्काराचा स्वाध्याय एकत्र क्वचितच येतात. गीतेमध्ये हे दोन्हीही आहेत पण त्या दोन्हींमध्ये अवगाहन करून तिला साक्षात्काराचे तत्त्वज्ञानाचा आत्मप्रत्ययपूर्वक म्हणणारे रामभाऊ, म्हणूनच 'गुरुदेव' या पदवीला प्राप्त झाले.

देवाबद्दल जिव्हाळा आणि जिज्ञासा या बरोबरच जीवन त्याच्यावरच अवलंबून आहे अशा अवस्थेमुळे, 'तनु मनुजीवे । चरणांसी लागावे । आणि अगर्वता' करावे । दास्य सकळ ।' हे ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितलेले गुरुपादसेवन, साधनरूपाने त्यांनी अगदी कट्टाने केलं. डोळे किंचित उघडे ठेऊन नासिकाग्री दृष्टी ठेवणे त्यांना सोयिस्कर नसल्याने डोळे पूर्ण मिटून आतूनच नासाग्रांवर दृष्टी ठेवून मस्तकात अवधान केंद्रित करून नामाच्या आलंबनाने ध्यान करणे म्हणजे नेम करणे ही साधना भगवद्गीता आणि भगवान पतंजलींची योगसूत्रे यांनुसारच होती. 'आठव तो ब्रह्म । नाठव तो भवभ्रम ।' ह्या त्यांच्या सद्गुरुंनी सतत सांगितलेल्या वचनानुसार अखंड स्मरण ही अवस्था नेमाच्या मध्यवर्ती साधनेतून त्यांना प्राप्त झाली होती. म्हणूनच कोणी एकाने त्यांच्या दुखण्यावर उपाय म्हणून विष्णु-सहस्त्र नामाचे पाठ करायला सांगितल्यावर 'कधीही विस्मरण नाही असे स्मरण अखंड चालू असताना परत वेगळ्या पद्धतीने स्मरण करण्याची आवश्यकता काय?' असे उद्गार त्यांनी तो गृहस्थ गेल्यावर काढले, त्या मागे साधनेचा प्रामाणिक विश्वास दिसून येतो.

रामरायावर श्रद्धा आणि साधना यांचे संस्कार अगदी लहानपणापासून व्हायला त्यांच्या आईपासूनच सुरुवात झाली. एक हजार जप करून झाल्यावर गंधाचं एक बोट देवघराच्या भिंतीवर ओढून ती तो देवाला वहात असे. त्या गंधाच्या रेषांनी देवघराच्या भिंती एवढ्या भरून गेल्या होत्या की त्या भिंतीवर अजून बोट ओढायला जागा उरली नव्हती आणि तिच्या साधनेच्या निष्ठेवरही बोट ठेवायला जागा नव्हती.

त्यांचे प्रथम गुरु महालिंगय्या या साधूंच्या दर्शनाला रामाला त्याच्या बालपणीच घेऊन त्या गेल्या तेव्हा त्यांनी 'हा मुलगा पुढे मोठा साधू होणार आहे', असं सांगितलं. घरी आल्यावर त्यांनी रामरायाला न्हाऊ घालून, ओवाळून त्याच्या पायांवर डोकं ठेवलं. त्यामागचा भाव असा की हा पुढे मोठा साधू होईल हे गुरुवचन प्रत्यक्षात येईलच; पण ते पाहायला आपण असू किंवा नसू म्हणून आताच नमस्कार करून घ्यावा. हा श्रद्धेचा जिवंतपणा गुरुदेवांमध्ये संक्रमित झाला होता.

परमार्थात श्रद्धेसहित साधनेने संक्रमण करण्याचा वारसाच त्यांना लाभला होता. हे संक्रमण ज्ञानाच्या दिशेने करायचा आध्यात्मिक वारसा त्यांना त्यांच्या गुरुपरंपरेतून लाभला होता. 'जनी जाणता भक्त होऊनी राहे' या समर्थवचनाचे प्रत्यक्ष स्वरूपच अशी ही योगज्ञानी भक्तांची दैदिप्यमान परंपरा म्हणजे सूर्यवंश असं म्हणावंसं वाटतं. त्यातून निंबर्गी महाराज, भाऊसाहेब महाराज आणि त्यांचे शिष्य रामभाऊंचे गुरुबंधू-भगिनी, अंबुराव महाराज, लिंगप्पा सावळगी, शिवलिंगव्वा हे सर्व साधनेद्वारा प्रकाश दर्शनाच्या अनुभवाचं तेज पिऊन तेजस्वी झालेले गुरुदेवांच्या शब्दात 'भूदेव' या पदवीला प्राप्त झालेले होते. त्यामुळे 'रामाचा वंश हा सूर्यवंश होता' हे रामभाऊंच्या निंबर्गी संप्रदायाबद्दलही म्हणता येईल. त्याचं आध्यात्मिक तेज प्रचंड साधनेने उजळलं आणि ज्ञान-किरणांनी ते परमार्थमार्ग प्रकाशित करीत राहिले.

भाऊसाहेब महाराजांची साधननिष्ठा विलक्षण होती. त्यांच्या नेमाच्या वेळा पाहून कोणीही आपले घड्याळ लावावे इतका त्यांचा वेळेसंबंधी कटाक्ष होता, असे गुरुदेव सांगत असत. आपल्या नेमाची वेळ झाली की त्या वेळी ते रानीवनी, घरीदारी जिथे असतील तिथे बसून 'नेम' करीत असत. एकदा ते एका गावाहून दुसऱ्या गावी घोड्यावरून निघाले होते. वाटेत सूर्यास्त होत आल्याचं पाहून, जवळच्या ओढ्यात हातपाय धुवून ते

उघड्यावर रानात नेमाला बसले आणि तीन तासांचा नेम पूर्ण करूनच ते पुढे गेले. त्या काळी श्वापदांचं आणि चोरांचं भय असे; पण चालवणारा देव सांगाती घेऊन ते त्या रात्रीच्या काळोखात निवांत होऊन गेले. त्यांच्या कडून साधनेचा दिव्य वसा त्यांच्या शिष्यांनी घेतला होता. लिंगप्पा सावळगी खोलीच्या मध्यभागी टेबल ठेवून त्यावर आसन घालून बसून जवळ जवळ रात्रभर नेम करीत असत. अंबुराव महाराजांनी रोजचा नऊ तासांचा नेम आजन्म पाळला. शिवलिंगव्वांना तर 'मुक्ताबाईनंतर एक शिवलिंगव्वाच', 'महाराजांच्या पश्चात त्यांच्यासारखा कठोर नेम करणारी विरळा !' असं गुरुदेवांनी म्हटलं होतं.

वयाच्या पंधराव्या वर्षी रामभाऊंवर सद्गुरुंचा अनुग्रह झाला. गुरुबंधू लिंगप्पा आणि मल्हारपंत यांचा नेम पाहून त्यांचा नेम त्यांच्या वयाच्या साधारण विसाव्या वर्षी जो सुरू झाला तो अंतिम विसाव्याच्या दिवसापर्यंत, पन्नास वर्षे रोज अखंडित ! या नेमानेच त्यांना विद्वत्तेच्या क्षेत्रात वावरत असूनही विद्वत्तेच्या नादी लागण्यापासून वाचवले आणि देवाच्या नादी लावले; इतकं की नादाचा अनुभव आला तरी त्याच्याही नादी न लागता मन देवातच विलीन करण्याची कला ते नेमातूनच शिकले. विद्वत्तेचे हार मिळवत बसून साधनेतर हार खाणाऱ्या अध्यात्मिक ॲकॅडेमिशिअन्सशी मैत्री ठेवूनही ते त्यांच्या रांगेत जाऊन न बसता संतांच्या मालिकेत बसले याचं कारण विद्वत्ता आली तरी तिची झूल घालून मिरवण्यात त्यांनी धन्यता मानली नाही. अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे व्हाईस चॅन्सेलर पद भूषवणारा, कन्स्ट्रक्टिव्ह सर्व्हे ऑफ उपनिषदिक फिलॉसॉफी या ग्रंथाने जगन्मान्यता पावलेला, तत्कालीन मोठ्या आणि प्रतिष्ठित लोकांत वावरणारा हा, त्या अर्थाने मोठा माणूस देवाचा प्रकट भक्त होता. लौकिक दृष्ट्या खेडेगावातल्या पंतोजींच्या शाळेपुरतंच ऐहिक शिक्षण झालेल्या आपल्या गुरुंचा प्रकट शिष्य होता. देव आणि गुरु ह्या गोष्टी मानणं हे मागासलेपण नसून न मानणं हेच अज्ञान आहे हे सुशिक्षितांना शिकवणारा होता. त्यांची भक्ती आणि शिष्यत्व प्रकट असलं तरी प्रदर्शनीय नव्हतं. सहज होतं. माणसाचं मोठेपण हे केवळ अध्यात्मिक स्थितीवर अवलंबून असतं. ते आपल्या गुरुंमध्ये किती आहे ते जाणण्याएवढे ते मोठे होते. म्हणूनच गुरुंना आत्मदेव किंवा आत्मज्ञान म्हणायला त्यांना त्यांच्या पदव्यांचा अडसर झाला नाही. गुरुंचं मोठेपण त्यांनी भावनेनं मान्य करून साधनेला सुरुवात केली. पण साधना सांभाळल्यामुळे त्यांना ते मोठेपण म्हणजे काय आणि किती ते उमजू लागलं, जाणवू लागलं आणि नुसतं मानत बसावं लागलं नाही.

***अलख पुरुष निर्वाण है ताको लखै न कोय***
***ताको तो वहीं लखै जो उस घर का होय ।***

अलक्ष पुरुषाला जाणण्यासाठी त्याच्या घरचाच व्हायला पाहिजे आणि त्याचा वारसा चालवण्याइतकं त्याच्या जवळ जाता आलं पाहिजे. ते नामाच्या आलंबनाने ध्यान करून देत असतं. परमार्थ हा भोंगळ प्रकार नाही. उलट परमार्थी माणूस अत्यंत तेजस्वी आणि उत्कृष्ट कर्म करणारा असायला हवाच. अध्यात्मिकतेची बाह्य खूण कर्मकुशलता आहे हे त्यांच्या सुंदर शब्दांत ऐकण्यासारखं आहे. Excellence is the mark of spiritualism.

पुस्तकी ज्ञानाला महत्त्व असलं तरी अध्यात्मिक उंची पुस्तकांच्या ढिगाऱ्यावर उभं राहून गाठता येत नाही. आध्यात्मिकता हेच मानवाच्या उन्नतीचं मापन आहे. ही आध्यात्मिकता म्हणजे काय हे प्रथम विचारांनी समजून घ्यावं. तिचा अनुभवाचा मार्ग साक्षात्कारी पुरुषाकडून समजून घेऊन ती साधना हाच मध्यवर्ती मार्ग धरावा. केवळ विचारापाशी थांबून जाऊ नये, हे सर्व प्रगत समाजाला आपल्या स्वतःच्या उदाहरणाने शिकवण्यासाठीच गुरुदेवांच्या रूपाने देव अवतीर्ण झाला होता असं वाटतं. यात वैयक्तिक पातळीवर काय लाभतं? असा विचार गुरुदेवांच्या आध्यात्मिक अनुभूतीचं वाचन-श्रवण झालेल्या व्यक्तीला पडणार नाही.

वयाच्या २६ व्या वर्षी मेंदूचा क्षय होऊन मरणोन्मुख झालेला शिष्य, नाम हाच प्राण धरून राहतो आणि ७१ व्या वर्षापर्यंत जगन्मान्यता आणि त्याला कारण असलेली देवमान्यता पावतो, यासारखं वीरत्व पहायला मिळणार नाही. हा आघात होण्यापूर्वी प्रकृती ठणठणीत असून बुद्धी विलक्षण वेगाने कार्य करीत असताना केवळ परमार्थालाच जीवन वाहण्याचा मनोदय आपल्या गुरूंना त्यांनी पत्राद्वारे कळवला होता. सद्गुरुंनी या आपल्या शिष्याची योग्यता ओळखली होती पण त्यांच्यातल्या सर्व शक्तींचा विनियोग भरभराट, प्रसिद्धी, मान्यता यांकडे न जाता ईश्वर प्राप्तीकडेच कसा होईल हे कटाक्षाने पाहून त्यांनी त्यांना अत्यंत निर्भीडपणे मार्गदर्शन केलं. सिद्धांतविषयक गोष्टी लिहिणं आणि नेमाविषयी कुरकुर करणं योग्य नाही, हे कळवलं. कृपादृष्टी असावी या 'विनंतीवर विनंती' करून म्हटलं, 'कृपा करून दृष्टी ठेवा म्हणजे कृपादृष्टी आहेच !' देवावर, साधनेवर आणि साधनेत मस्तकी विविक्षित ठिकाणी दृष्टी ठेवण्याची म्हणजे स्थिर करण्याची कृपा स्वतःच स्वतःवर करायला हवी. अवघड प्रसंगी डोळे मीट, कान बंद कर, तोंड मीट आणि शांतपणे नामस्मरण करून राहा. देवाच्या इच्छेने सर्व काही घडून येत आहे. हा मध्यवर्ती जीवनधारणेचा मार्ग अनुसरत राहायला गुरुंनी शिकवलं. 'नेमाविषयी प्रार्थना फार, फार, फार आहे असं विनंतीवजा शिष्याला शिकवणारे गुरुही धन्य आणि गुरुवाक्य शिरोधार्य मानून, सर्व गोष्टी उत्कृष्ट करीत असतानाही देवप्राप्तीच्या पुढे सर्व जग आणि कर्तव्य गौण मानून येचि जन्मे येणेचि काळे । संसारी होईजे निराळे । मोक्ष पाविजे निश्चळे । स्वरूपाकारे ।। हे पूर्ण करून, तुका म्हणे आता । उरलो उपकारापुरता ।। ह्या जीवन्मुक्त अवस्थेत लोकाभिमुख होऊन राहणारा शिष्यही धन्यच!

एखाद्या दोऱ्यात एखादं दुसरं फूल ओवत असताना दोरा प्रधान असतो. पुढे एकामागून एक फूलं ओवल्यावर त्या फुलांच्या सौंदर्यात दोरा असतो पण दिसत नाही. त्या सौंदर्याचा समुच्चय धारण करण्यात दोऱ्याला धन्यता यावी तसा व्यवहारात परमार्थ गुंफता गुंफता त्या पारमार्थिक अनुभूतींच्या पुष्पांना धारण करणं एवढंच जीवनव्यवहाराचं सूत्र व्हावं. व्यवहारात परमार्थ या भूमिकेपासून, परमार्थात व्यवहार या स्थितीत, रामी रंगलेल्या अनुभवांचं जीवन गुरुदेवांच्या आध्यात्मिक चरित्रात पाहता येतं. देवाला प्राधान्य म्हणजेच काय हे कळून घ्यायला गुरुदेवांचं बोट धरून थोडं चालायला हवं.

गुरुदेवांबरोबर संवाद झाल्याने आनंदित झालेल्या शंकराचार्यांनी दुसऱ्या दिवशी भेटण्याची इच्छा सांगून वेळ विचारली आणि 'ती वेळ मी आताच सांगू शकणार नाही, ते माझा नेम पूर्ण होण्यावर अवलंबून आहे.' असं गुरुदेवांनी सांगितलं. उपराष्ट्रपती असताना डॉ. राधाकृष्णन भेटायला आले तेव्हा नेमात असलेल्या गुरुदेवांना डिस्टर्ब करू नये असं त्यांनी सांगितलं. नेम संपल्यानंतर भेट घेऊन डॉ. राधाकृष्णन निघून गेले, तेव्हा

गुरुदेवांच्या जीवनातील ही ईश्वरप्रधानता आपण हरवून बसलो आहोत ही जाणीव व्यक्त करून गेले. Duty towards God is our First & Foremost duty हे जीवनाचं सूत्र गुरुदेवांनी प्रकट केलं.

निंबाळच्या नेमाच्या खोलीला 'मस्तोंका मैखाना' का म्हणत ते त्यांच्या अनुभवांकडे पाहिलं की कळेल. निंबाळच्या घरी नेम करून आनंदित झालेल्या शिवलिंगव्वा पत्रात म्हणतात, 'साधुसंतांच्या घरास, अनुभवाची आरास, जाईजुईचा सुवास । आनंदाचा हवास' सात दिवस सप्ताह श्रीरामदेवरायांचे आश्रमात असा झाला की तो आनंद गहिवर मावेना असे झाले.

रानड्यांच्या अनुभवांना अजून सुरुवातही झाली नाही असं एकानी म्हटल्यावर ते थोडे गंभीर होऊन म्हणाले, 'हे खरं नाही. सुरुवात झाली आहे पण अंत झालेला नाही. गुरुदेवांचे अनुभव खरंच अनंत होते. अनंताचे होते, अनंतात विलीन होणारे होते.

रमन्ति योगिनो यत्र स रामः । योगी जिथे म्हणजे ज्या अवस्थेत रमतात, ज्या तत्त्वात रमतात तो राम होय. त्यांच्या अनुभूतींना दोन्ही अर्थांनी 'रामानुभूति' असं म्हणता येईल. आपल्या गुरुंची विविध दर्शनं, देवता, शेष, सुवर्णपिंपळ, सुदर्शन, दिव्यचक्षु यांची अद्‌भुत दर्शनं, नादश्रवण, रसास्वादन, प्रकाश दर्शन या कित्येक अनुभूतींबाबत त्यांनी ३० वर्ष मौन पाळलं होते हे साधकांनी फार महत्त्वाची गोष्ट म्हणून लक्षात ठेवली पाहिजे. अलाहाबाद येथे देवाला अनंत रूपात पाहून अनंत अशा अनंतात, Infinity within infinity मध्ये ते बुडून गेले. हा किंवा निंबाळला 'कृष्णा हालका रे । कृष्णा डोल का रे । घडिये घडिये निजगुण बोल का रे ।' हा सतत २-३ दिवस येणारा अनुभव काका कारखानिसांना हावभाव करून पद म्हणून दाखवीत त्यांनी तो आनंदाचा अनुभव सांगितला.

पू. बाबा (केशवराव) बेलसरे यांनी त्यांना या अनुभवाबाबत विचारलं असताना गुरुदेव म्हणाले, 'माझी प्रकृती थोडी तीव्र नर्व्हज्‌ची असल्याने मला हे अनुभव अधिक येतात. पण मुख्य अनुभव नामात रंगणे हा आहे. Mark the word रंगणे.'

आत्मानंदाबाबत ते म्हणतात, you merge in God entirely... When spiritual power descends and envelopes - the whole universe appears to be full of power, peace and joy... चैतन्य, शांती आणि आनंदाने विश्व भरून गेल्याचा, मन देवात विरघळून गेल्याचा अनुभव घेऊन ते जेव्हा आत्मानंदात तल्लीन होऊन नारायण । नारायण । नारायण अशी गर्जना करीत तेव्हा ते आनंदाच्या उन्मादात असत. त्या आनंदाला दूर करायला मन समर्थ नसे. आनंद मनाचा कबजा घेत असे. या अवस्थेचं मनोहरपंत देशपांडे यांनी 'आनंद-परवशता' या सुंदर शब्दात वर्णन केलं आहे. हे 'रामी रंगणं आहे.' आपलं मन 'राम' हेच लौकिक नाव असलेल्या गुरुदेवांच्या सगुण चरित्रात रंगून जातं तसंच ते गुरुदेवांच्या सारखं 'आत्मारामी' रंगून जावं अशी त्यांना प्रार्थना करू. त्यावर ते आपल्याला त्यांच्या गुरुंच्या शब्दात सांगतील, 'यासाठी नेमाविषयी प्रार्थना फार फार फार आहे !'

हरि ॐ तत् सत्

**स्वामी माधवानंद (माधव नगरकर)**
८८५/३, भांडारकर रस्ता, गल्ली क्र. ६,
पुणे ४११००४.

# पू. गुरुदेव रानडे यांची अलाहाबाद येथील उज्ज्वल कारकीर्द

**श्री. ॐ गो दत्तोपासक**

*गेली १२ वर्षे नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ येथे संशोधन सहाय्यक, १२ विषयांत १५ शोध प्रबंधिका पूर्ण, निरनिराळ्या मासिकांत २० लेख प्रसिद्ध, पुणे आकाशवाणी केंद्रावर ७ लेखन, संभाषण कार्यक्रम, शंकराचार्यकृत विवेक चुडामणी आणि यादवकालीन मराठी संत या विषयावर पीएच.डी. प्रबंध सुरू.*

गुरुदेव रानडे यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा राजीनामा दिला. त्यानंतर त्यांच्या मनात चाललेल्या परमार्थ-प्रसारासंबंधीच्या कल्पना मूर्त स्वरूप धारण करू लागल्या. १ ऑगस्ट १९२४ रोजी त्यांनी 'अध्यात्म विद्यापीठ' 'Academy of Philosophy and Religion' या नावाने एक संस्था स्थापन केली. परमेश्वराचे गूढ उकलण्याकरिता तत्त्वज्ञानात्मक संशोधन करणाऱ्या सर्वांना एकत्र आणणे हे या अध्यात्म विद्यापीठाचे ध्येय होते. जगातील सर्व धर्मांचा व तत्त्वज्ञानाचा संशोधनात्मक रीतीने सखोल अभ्यास करून ग्रंथ निर्माण करणे हे अत्यंत अवघड कार्य संस्थेपुढे होते. संस्थेच्या योजनापत्रकाच्या प्रस्तावनेतील मजकुरावरून विश्वव्यापी दृष्टी हीच या संस्थेच्या कार्याची प्रेरक शक्ती होती, हे स्पष्ट होते. 'अध्यात्म-विद्यापीठ' स्थापन करून गुरुदेवांनी आपल्या पारमार्थिक जीवनास पोषक असे बौद्धिक कार्यक्षेत्र निर्माण केले. भारतातील नामवंत विद्वानांशी पत्रव्यवहाराने विचार-विनिमय करून निवडक अशा सन्मान्य व अनुभवी तत्त्वज्ञान्यांच्या सल्ल्याने 'भारतीय तत्त्वज्ञानाचा समग्र इतिहास' सोळा भागांत प्रसिद्ध करण्याचे ठरवून निरनिराळ्या तत्त्वज्ञ-प्राध्यापकांवर तत्त्वज्ञानातील निरनिराळ्या विभागांसंबंधी ग्रंथ लिहिण्याचे काम सोपविले. या योजनेस डॉ. आर. जी. भांडारकर यांनी पुरस्कार लिहिला.

इ. स. १९१५ च्या जुलैमध्ये बेंगलोर येथे संस्कृत विद्यापीठाच्या स्थापनेवेळी जनतेपुढे औपनिषिदिक-रहस्यावर श्रीगुरुदेवांनी जी व्याख्यानमाला गुंफली, त्यातील मुख्य विषयावर अनेक वर्षे त्यांनी आधुनिक तुलनात्मक पद्धतीने सखोल अभ्यास करून इ. स. १९२६ मध्ये A constructive Survey of Upanishadic Philosophy (being Systematic Introduction to Indian Metaphysics) 'औपनिषदिक तत्त्वज्ञानाचे विधायक समालोचन' हा ग्रंथ गुरुदेवांनी प्रसिद्ध केला. पाश्चिमात्त्य विचारसरणीच्या पद्धतीने उपनिषदांतील तत्त्वे मांडून पाश्चिमात्त्य तत्त्ववेत्त्यांनी उपनिषदांसंबंधी घेतलेल्या अनेक आक्षेपांना सडेतोड व साधार उत्तर गुरुदेवांनी या ग्रंथात दिले आहे. हा ग्रंथ शास्त्रीय पद्धतीने मांडला असल्याने या ग्रंथाचे गुणानुवाद परदेशातील अनेक विद्वानांनी गायले आहेत. या ग्रंथांमुळे साक्षात्कार शास्त्रास (mysticism) तत्त्वज्ञानाचा भक्कम पाया निर्माण करण्याचे मौलिक कार्य गुरुदेवांनी केले आहे. अलाहाबाद विश्वविद्यालयाचे त्या काळचे सुप्रसिद्ध व्हाईस चॅन्सलर पं. सर गंगानाथ झा यांनी गुरुदेवांच्या औपनिषदिक समालोचनाचा ग्रंथ वाचून त्यांना आपल्या विश्व विद्यालयात तत्त्वज्ञान शाखेचे प्रमुख म्हणून येण्यास पाचारण केले. त्यांच्या विनंतीला मान देऊन गुरुदेवांनी अलाहाबाद विश्वविद्यालयात तत्त्वज्ञान विषयाचे प्रमुख प्राध्यापक म्हणून नोकरी पत्करली आणि इ. स. १९२७ च्या डिसेंबर महिन्यात ते प्रथम अलाहाबाद येथे कामावर हजर झाले. उन्हाळ्याची सुट्टी सुरू झाल्यानंतर एप्रिल १९२८ मध्ये ते निंबाळास परत आले. नंतर ऑगस्ट १९२८ मध्ये पुनः अलाहाबादला जाताना त्यांनी आपले एक स्नेही श्री. रंगराव देशपांडे यांना आपल्या बरोबर नेले. कामावर हजर झाल्यानंतर थोड्याच दिवसांनी म्हणजे सप्टेंबर १९२८ मध्ये प्रकृतीच्या कारणास्तव त्यांनी रजा घेतली. त्यानंतर निंबाळकडे परत येण्यापूर्वी, अयोध्या, चित्रकूट, मथुरा, वृंदावन वगैरे पूर्वकालीन अवतारी पुरुषांची स्थळे त्यांनी पाहिली. चित्रकूट पर्वताच्या पायथ्याशी वाहणाऱ्या पयस्विनी नदीच्या पवित्र घाटावर संत तुलसीदासांचा पुढील दोहा गुरुदेवांना आठवला आणि ते ठिकाण एखाद्या साक्षात्कारी पुरुषाच्या चरणस्पर्शाने पावन झाले असावे असे त्यांच्या अंतःकरणास वाटू लागले.

***चित्रकूट के घाटपर भर संतन की भीर ।***
***तुलसिदास चंदन घिसै, तिलक देत रघुबीर ॥***

या दोह्याचा अर्थ गुरुदेवांनी पुढीलप्रमाणे चार प्रकारे केला. १) तीर्थक्षेत्रातील 'पंड्या' च्या सेवकासारखे व एकनाथांच्या श्रीखंड्याप्रमाणे प्रभु रामचंद्रांनी तेथे जमलेल्या संतांना टिळे लावून तुलसीदासांची सेवा केली. २) प्रभु रामचंद्रांनी तुलसीदासाने उगाळलेल्या चंदनाचा टिळा स्वतः लावून ते निघून गेले. तरीसुद्धा तुलसीदास त्यांना ओळखू शकले नाहीत. ३) स्वतः तुलसीदासांना प्रभु रामचंद्रांनी टिळा लावल्याचा अतींद्रिय अनुभव आल्यामुळे तुलसीदास दिङ्मूढ होऊन त्यांच्याकडे नुसते पाहतच राहिले. ४) संतांच्या सेवेत प्रभु रामचंद्रांनी तुलसीदासाबरोबर सहकार्य केले. तुलसीदासाने उगाळून चंदन तयार केले आणि रामचंद्रांनी ते संतांच्या भालप्रदेशी लावले. या दोह्याचा अर्थ गुरुदेवांनी स्वतःच्या अनुभवाच्या पार्श्वभूमीवर लावल्याने त्याला नवीन मोल चढले. त्यानंतर ते मथुरा-वृंदावनाला गेले. तेथे श्रीकृष्णाच्या जन्मस्थानाच्या दर्शनास गेल्यावर काही विशेष पारमार्थिक अनुभव त्यांना आल्यामुळे त्यांचे अंतःकरण भरून आले. पुढे दरवर्षी ते जुलैच्या प्रारंभी अलाहाबादला जात व विश्वविद्यालयाची उन्हाळ्याची सुट्टी सुरू झाल्यानंतर निंबाळला परत येत, असा त्यांचा अठरा वर्षे क्रम सुरू होता.

विश्वविद्यालयीन अध्यापनाच्या पहिल्या सहा-सात वर्षांत त्यांनी तत्त्वज्ञानातील निरनिराळ्या शाखा शिकविण्याची जबाबदारी स्वखुषीने पत्करून नीतिशास्त्र, मानसशास्त्र, धर्मशास्त्र, परतत्त्व शास्त्र या सर्व शास्त्रांचा सखोल अभ्यास केला. अशा तऱ्हेने तत्त्वज्ञान शाखेचे प्रमुख प्राध्यापक म्हणून नेमले गेलेले गुरुदेव त्यातील कोणत्याही शाखेच्या विषयाचे अध्यापन उत्कृष्ट रीतीने व अद्यावत माहितीने परिप्लुत असे करीत. यामुळे अलाहाबाद विश्वविद्यालयात गुरुदेव गेल्यानंतर तत्त्वज्ञान शाखेतील विद्यार्थ्यांच्या संख्येत फारच वाढ झाली. ग्रंथ लेखनातील अधिकारामुळे त्याचप्रमाणे अलाहाबाद विश्वविद्यालयातील परिणामकारी व आकर्षक अध्यापनामुळे भारतीय तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात गुरुदेवांना उच्च स्थान प्राप्त झाले. त्यामुळे इ. स. १९३७ साली त्यांना अखिल भारतीय तत्त्वज्ञान परिषदेचे तेराव्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून निवडण्यात आले. त्यांच्या अध्यक्षीय भाषणात 'आत्मतत्त्वाचे तत्त्वज्ञान' 'A Philosophy of Spirit' हा विषय त्यांनी प्रतिपादिला.

गुरुदेव अलाहाबाद येथे इ. स. १९४० पर्यंत '२ बेली रोड' या

बंगल्यात रहात होते. त्यांच्या दिनचर्येतील मुख्य कार्य म्हणजे सद्गुरुंनी दिलेल्या नामाचे सतत स्मरण करणे हे होय. घरी असताना 'नेम' व घराबाहेर मोटारीतून फिरण्यास गेले तरी ते 'नेम'च करीत. त्यांनी मोटार मुख्यतः नेमा करिताच ठेवली होती. त्यांच्या नाम साधनेमुळे पावन झालेल्या अशाच एका ठिकाणी आजकाल आपणास हरिजनांचे एक भव्य वसतीगृह व शाळा उभारलेल्या दिसतात. गंगेच्या तीरी द्रौपदी घाटाच्या सन्निध अनेक वर्षे साधन करून उच्च दर्जाचे पारमार्थिक अनुभव ज्या ठिकाणी आले अशी एक जागा त्यांनी इ.स. १९३८-३९ च्या सुमारास विकत घेतली. अशा पुनीत जागेवर इ. स. १९४० साली, त्यांनी स्वतःकरिता बंगला बांधविला व पुढे थोड्याच दिवसांत ते तेथे राहण्यास गेले. ३१ डिसेंबर १९४० रोजी गुरुदेवांना मुलगा झाला. गुरुदेवांच्या या एकुलत्या एक मुलास दुर्दैवाने इ. स. १९४१ च्या चैत्र वद्य प्रतिपदेच्या दिवशी देवाज्ञा झाली. विश्व विद्यालयातील तत्त्वज्ञान शाखेचे प्रमुख प्राध्यापक व 'डीन फॅकल्टी ऑफ आर्टस्' या जबाबदारीच्या हुद्यावरील सर्व कामे सहजतेने उरकून, राहिलेला सर्व काल ते पारमार्थिक वाचनात व मुख्यतः नामस्मरणात घालवीत. त्यांनी अलाहाबादला गेल्यापासून हिंदी संत-वाङ्मयाचा अभ्यास सुरू केला होता. 'हिंदी संतांचा परमार्थ मार्ग' हा ग्रंथ तयार करण्याची त्यांची जोराची खटपट सुरू होती. त्यांच्याकडे येणाऱ्या न्हाव्यापासून ते विश्वविद्यालयातील हिंदीच्या प्राध्यापकांपर्यंत सर्वांकडून त्यांनी हिंदी संतांचे उतारे व त्यांचे निरनिराळे अनुवाद संग्रहीत करून त्यातून स्वतःच्या पारमार्थिक निकषास उतरणारे असे सर्व वेचे निवडले. या कामी त्यांना पं. देवीप्रसाद शुक्ल यांनी शेवटपर्यंत मदत केली.

गुरुदेव इ. स. १९४५ च्या मार्च महिन्यात उपकुलगुरु झाले. ऑगस्ट १९४७ मध्ये गुरुदेवांना अहमदाबाद येथील 'गुजराथ विद्या-सभे'च्या विधमाने, व्याख्यानाकरिता पाचारण करण्यात आले. गुरुदेवांनी तेथे 'नूतन-भारतापुढील आध्यात्मिक कार्य' व 'मानवता एक कशी होईल?' या विषयांवर दोन व्याख्याने दिली. ही दोन व्याख्याने पुढे 'The Conception of Spritual life in Mahatma Gandhi and Hindi Saiints' या ग्रंथरूपाने गुजराथ विद्या सभेने इ.स. १९५६ साली गांधी जयंतीच्या प्रसंगी प्रसिद्ध केली. तत्पूर्वी मार्च १९५४ मध्ये अलाहाबाद येथे पं. मदनमोहन मालवीय महाविद्यालयात गुरुदेवांनी श्रीमद्‌भगवद्‌गीतेसंबंधी तुलनात्मक रीतीने आपले विचार मांडले. त्यांनी उपनिषदे, महाभारत, सांख्य व योग यांचा गीतेशी कोणत्या प्रकारचा संबंध येतो याचा विचार केला. गीतार्थासंबंधी निरनिराळ्या आचार्यांनी व आधुनिक तत्त्ववेत्त्यांनी प्रतिपादिलेल्या विविध विचारांचा परामर्श घेतला.

दि. १२ मार्च १९५७ रोज़ी गुरुदेव हवा पालट म्हणून अलाहाबादेस निघाले. तेथे गेल्यानंतर २२ मार्चपर्यंत त्यांची प्रकृती बरी होती. ता. २३ रोजी सकाळी त्यांच्या चहा घेण्याच्या सुमारास जवळच्या एका बंगल्यात वीज पडली. तेथील एका मुलास इजा झाली. तेव्हापासून पाऊस, वादळ, गडगडाट इत्यादींची रेलचेल झाल्यामुळे त्यांची प्रकृती अतिशय बिघडली. अशक्तपणा आला. अलाहाबादेत इतकी प्रकृती बिघडण्याची ही पहिलीच वेळ. सूर्योदयापूर्वी व नंतर अलाहाबादची हवा उत्तम असे. दररोज दुपारी मोटारीतून जाऊन आल्यावर भाजीचा रस अगर सूप घेत असत. संध्याकाळी वाटी भरून भाजीचा रस घेत असत. वरील हकीगतीवरून गुरुदेवांची प्रकृती किती बिघडली होती याची कल्पना येण्यासारखी आहे. २९ एप्रिल १९५७ रोजी ते अत्यंत क्षीण झालेल्या स्थितीत निंबाळ येथे परतले. पुढे ६ जून रोजी त्यांची आत्मज्योत परमात्म ज्योतीमध्ये विलीन झाली.

आधार ग्रंथ : श्रीगुरुदेव डॉ. रा. द. रानडे यांचे जीवन दर्शन : लेखक – शा. नी. तथा दादासाहेब देशपांडे – १९५८.

**श्री. ॐ गो दत्तोपासक**
संशोधन सहाय्यक, संत नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ

# Gurudeva Ranade And The Path of The Spirit

कै. डॉ. अरविंद विनायक आपटे

एम.ए., पीएच.डी.,

(डॉ. अरविंद कुलकर्णी, विजापूर यांनी अगत्यपूर्वक लेख पाठविला. कै. डॉ. आपटे यांनी त्यांना २-१०-६६ रोजी दिला होता.)

## INTRODUCTION

Man is born on the face of this earth and lives out his life till Death calls him away. What does man do during this his all too brief sojourn on earth? On the answer to this question depends the quality of his life, the manner of his death and his destiny thereafter.

As long as we are satisfied with the things life has to offer us, as long as we are **not** made uneasy and inquisitive by the promptings of some undefinable 'divine discontent' in our hearts, so long do we take things as they come, good and bad, without bothering about the 'why and wherefore' of things. Our philosophical queries and spiritual quest may be said to begin the moment things around us start making us restive enough to ask questions of a very fundamental nature about them, such as 'Is there any Order. any Justice in the events that occur in our life.' or 'Is there any God or Spirit governing the destiny of this world?" Such a moment marks the transition of man from the 'enslaved' **(Baddha)** state to the state of 'a seeker of Liberation' **(Mumuksu)**.

The **Mumuksu** or 'man seeking Liberation' asks further: "Is there any ultimate Freedom and Bliss for man, or is he destined only to wander endlessly in a round of multitudinous births and deaths, trapped for ever in the thraldom of the senses and the dualities of existence? And, if it be possible for man to attain such Freedom and Bliss, what is the Way to attain it?" The Mumuksu asks these questions because, unsatisfied with the finite and limited joys of worldly life which are ever tinged with sorrow, he seeks infinite joy which is free from sorrow; and, unsatisfied with the ever-fleeting and evanescent thing of the world which are prone to death and destruction, he seeks something that is stable , ever-lasting, eternal and beyond all change. Anxious in his search, he looks out for a helping hand.

## II GURUDEVA AND HIS SPIRITUAL TRADITION

It is here that Gurudeva steps into the picture. Submitting himself wholeheartedly to the unrelenting spiritual discipline insisted upon by his Spiritual Teacher, Shri Bhausaheb Maharaj, he attained 'Saksatkara' at an early age; but he was not one to rest content with just that! Till the time he surrendered his body to God in the final act of Dedication in 1957, he stood ready always to give a helping hand, by example and precept, to all those Mumuksus who cared to ask him about 'the Ultimate Destiny of man' (viz.God-realization) and the Bliss thereof'.All those hundreds, nay thousands of 'lost souls' who came to him seeking spiritual enlightenment will bear testimony to this. By giving them spiritual initiation, encouragement, guidance and help, he turned these Mumuksus into a hand of 'Sadhakas' i.e. 'Pilgrims on the path of the Spirit', seeking pure Bliss and Immortality through spiritual practice and Realisation.

Gurudeva (and the Spiritual Tradition to which he belonged) performed the ' Task of the Age ', viz. to re-live , re-interpret and re-state the Highest Spiritual Ideal of mankind in this Modern Age, wherein scientific progress outstrips itself every day and man prides himself on his rational and practical outlook on life. This line of Spiritual Teachers — Shri Nimbargi Maharaj, Shri Bhausaheb Maharaj, Shri Amburao Maharaj and Gurudeva — did not teach a thing of which they were themselves not ideal examples, and their teachings possess the following characteristics which give a rational, practical and scientific orientation to the Ancient Spiritual Ideal.

## III Spiritual Instruction : Its Outstanding Characteristics

**1) Need of Spiritual Life in Human Existence :** Gurudeva has gathered from spiritual literature in Marathi, Kannada and Hindi and wonderfully analysed the 'Incentives' which lead a man to spiritual life. Spiritual life is essential for man in every Age because it helps him to fulfil his Ultimate Destiny and thus round off human existence. It gives him that real sense of contentment and bliss, which no other thing in the world can give him. Today, the need for spiritual life is all the greater because the Advance of Science has brought greater comforts to human life and also greater mental discontent and unhappiness! What with the increased hurry and worry of modem life, man has begun to wonder whether in finding a pathway to the moon he has lost his soul! Spiritual discipline and experience give man that sense of contentment, joy and fulfilment which makes man bless the day he was born, fills his life with the joy of the Divine and enables him to great death with a cheer! Gurudeva, in all his writings, deals exclusively with the Theme Spiritual and carries conviction to the reader regarding the necessity and value of spiritual life.

**2) Accommodation of Spiritual Life as an intergral part of Normal Human Existence :** Gurudeva, like Shri Nimbargi Maharaj and Shri Bhausaheb Maharaj, first proved by personal example and then preached that one can attain the greatest spiritual heights while leading the normal, routine life of a householder in society. Shri Amburao Maharaj did not marry again, after the loss of his wife, as per his Spiritual Teacher's advice; but after attaining Realization himself, he spent a very busy life in looking after

the spiritual well-being of the huge **spiritual** family he had gathered around himself. These spiritual teachers continued to practise their spiritual austerities, without pause even after attaining Realization, and yet never shirked their duty towrards their own worldly and spiritual families.

A few exceptional human beings may find it suitable to renounce all worldly ties in order to devote themselves exclusively to spiritual life; the trouble starts and tragedy results when these men of renumciation mislead mankind by postulating 'external' renunciation as an inevitable pre-condition to lead a spiritual life. Many early 'householder' Saints and this our line of Spiritual Teachers fully explode this myth, indiscriminately spread by monks in order to claim a 'monopolistic right' to spiritual life! The genuine spiritual men of renunciation also do not subscribe to this myth. Gurudeva has said, without directly refering to hiimself (as usual!) that there is no contradiction in leading of a life of God-realization and holding the post of Vice-Chancellor in a University ! What more need be said about the positive harmony between our normal routine of life and spiritual life?

**3) Relation between Spiritual Life and the March of Science :** Gurudeva, in his Presidential Address at the Indian Philosophical Congress (1937), has clearly shown, with reference to the latest advances in the Sciences of Physics, Biology, Neurology etc. that the march of science only helps the ancient spiritual ideas and ideals to shine with all the greater effulgence; that one does not contradict the other; rather, one complements and completes the other. In the same Address, he goes on to call the first glimpse of man's spiritual experience by the term 'spiriton', similar to modern scientific terms like electron, proton etc. It is easy to see the great need of spiritual life in this modern age of astonishing scientific progress, because man can be as unhappy on the moon as on earth! So, man's journey to the moon will not make spiritual life obsolete; on the contrary, it would only mean that spiritual wisdom will have to reach the moon in order to make man **truly** happy there!

**4) Role of Human Faculties in Spiritual Life :** Gurudeva, in his Introduction to 'Pathway to God in Hindi Literature'. explains how spiritual life gives scope for the highest development of the three tradiionally accepted human faculties of (a) Thinking, (b) Feeling, (c) Willing, while a higher faculty called, d) Intuition enables us to have spiritual experience i.e. direct contact with Reality.

**a) Thinking :** Every thinking person gathers wisdom through manifold and diverse experience in the world and learns to discriminate between the right and the wrong, the good and the bad. The evanescent and sorrowful joys of the world soon disillusion him and he turns to spiritual life in search of something that is eternal and blissful. Thus the thinking, reasoning, discriminating faculty of man brings him to the Life Spiritual and sustains him in the pursuit thereof.

Gurudeva speaks of 'rational Mysticism' and insists that not only is there no contradiction in these terms, but also that it is the only kind of mysticism worthy of the name. He grants that mystical experience may transcend human reason, but maintains that it does not contradict human reason. A mystic who leads a life of the Spirit just cannot be a fool or a dullard; he needs must have intellectual power of a high order, states Gurudeva categorically.

**b) Feeling :** The faculty of feeling or emotion has a vital role to play in spiritual life. Gurudeva has assigned the most important place to 'taking the potent, Guru-given Name of God' **(Nama)** in the technique of spiritual practice, but he goes on to state that the Name of God is to be repeated continuously only in order to create a genuine, feelingful devotion **(Bhava)** to God in one's heart. He speaks of **'Bhava'** as being superior even to **'Nama'**, and says that God is never far from such intense feeling of love for Him, and reveals Himself soon to such a devotee. Here, Gurudeva strikes a note of warning that this intense feeling or emotion **must** be directed God-ward under the control of the intellect; otherwise it can lead to untold harm. There are many instances of unchecked and misdirected over-emotionalism of spiritual aspirants leading to their mental derangement and downfall.

**c) Willing :** The will to act also plays a very important role in spiritual life. The rigorous spiritual discipline which has to be pursued day after day and year after year with faith, patience and perseverance, till God-realization is attained and also thereafter, requires constant effort of the will to act spiritually. Gurudeva (and his spiritual Tradition) insists that spiritual life is nothing if not tireless spiritual practice.

**d) Intuition :** Gurudeva says that while the above three faculties play a vital role in spiritual life, it is the faculty of Intuition alone that enables us to attain a direct and immediate apprehension of God or Reality. The faculty of Intuition does not contradict the other three faculties; it rather penetrates and lies at the back of them all, says Gurudeva.

**5) The Methodology of Spiritual Life :** Gurudeva (and his Spiritual Tradition) excels in making the most **practical** suggestions for leading a spiritual life. Most problems arising in the path of the spiritual aspirant have been tackled and solutions offered. Practical hints regarding the conduct of the spiritual aspirant in private and public life have been profusely given. The difficulty of 'right ordering of loyalties', i.e. co-ordination of spiritual duties with one's normal daily activities, has been resolved by example and precept. The writer sincerely believes that such clear practical advice about the practice of spiritual discipline in its various stages, leading up to Realization and thereafter, is rarely to be found elsewhere.

The spiritual discipline consists of (i) the pricipal discipline of Meditation on Name of God, and three subordinate disciplines of (ii) Daily reading of spiritual literature, (iii) Dialy reciting of the Glory of God, and (iv) cultivation of the company of devotees of God.

(i) The principal spiritual discipline consists of 'silent, mental repetition of the Name of God (i.e. the potent **Mantra** given by the Spiritual Teacher), set to the accompaniment of the ever-present rhythm of the natural act of breathing. This is called **Nama** or **Namasmarana** or Meditation on the Name of God. By steady and long practice, such rhythmic repetition of the Holy Name becomes natural and enables the breath to flow **evenly** over a long period of time. This meditation is done in a steady, sitting posture, and the even flow of breath soothes

the nerves, calms the mind and establishes gradually psycho-physical harmony. As the steady, even flowing (in and out) of breath is sustained naturally over a long period of time by regular, daily practice of meditation, an ideal condition is established, in the quickest possible manner, for the occurrence of that 'natural suspension of breathing' which is technically called **'Kevala Kumbhaka'** in the Science of Yoga. The thought-waves in the lake of the mind tend to become still during such a 'natural breathing-pause', and when the occurrence of this state becomes frequent and more prolonged by practice, the stage may be said to be set for the manifestation of that ultimate Reality which lies beyond all thought and speech., i.e for the direct, immediate, intuitive apprehension of God.

This spiritual discipline is to be practised once a day, for a short time to begin with; then the time is to be gradually increased then it is to be practised twice a day; then, thrice a day. To practise it, any of the following times may be chosen according to convenience on waking up; in the morning; at noon; in the afternoon or evening; before sleep; at midnight. In this way,'God consciousness' is to be pactised more and more extensively, as also more intensively (ie. with devotional fervour), till it pervades and becomes co-extensive with our 'self consciousness'.

Another very important thing about this Meditation is that, when it is practised, no imaginary form of the Deity (representing the Mantra given by the Spiritual Teacher) is to be brought or kept before the, mind's eye. This helps to leave the field clear for for an actual, real manifestation of the Divine.

(ii) 'Reciting the Glory of God' **(Bhajana)** is to be done thrice a day to develop fervent devotion to God. Such feelingful devotion **(Bhava)** sustains our daily Meditation (which is also to be done thrice a day) and adds depth to it. Gurudeva, at the command of his Spiritual Teacher, edited a wonderful little book of **Bhajanas** (Nityanemavali) for the daily use of devotees.

(iii) 'Thoughtful Reading of Spiritual Literature' **(Pothi)** is also to be done thrice a day to sustain and renew our intellectual interest in spiritual life, and to provide an effective intellectual fence for protecting our daily Meditation from the disturbance caused by stray doubts, wandering illusions, passing fancies etc. Gurudeva, with his amazing powers of intellectual analysis and synthesis and with his sterling sense of the practical, has written books which provide us with selections, arranged in a spiritually constructive order, from the writing of Marathi, Kannada and Hindi Saints. These Selections form ideal material for the devotee's day-to-day spiritual reading.

(iv) 'Cultivating the Company of Devotees of God' **(Satsanga)** and of no one of else forms an essential part of the spiritual Discipline. The company we keep can make or mar our spiritual life. It is a truism to say that 'good company' reforms the evil and encourages the good to become better, while 'bad company' spoils the good and encourges the bad to become worse. Spiritual life is a plant of rare delicacy which thrives in the company of devotees of God, but is blighted by the company of the immoral and the ungodly. This 'Satsanga' may be spoken of as providing the ideal condition for the sustenance and development of the other three disciplines of 'Nema', 'Bhajana' and 'Pothi.'

It may be said that the four disciplines of 'Nema', 'Pothi', 'Bhajana' and 'Satsanga' take care of the 'intuitional', 'intellectual', 'emotional' and 'socio-ethical' aspects of an aspirant's spiritual life respectively. There is a unique spiritual experimental, made current by the Spiritual Tradition to which Gurudeva belonged, which expects the disciples to come and live with their Spiritual Teacher for the whole month of Sravana every year. Shri Bhausaheb Maharaj used to conduct such a unique 'School of Spiritual Studies', and this tradition was scrupulously maintained by Shri Amburao Maharaj and Gurudeva. Such learning of the Theory and Practice of Spiritual Life, for one month every year, in the inspiring presence of the Spiritual Teacher, provided ideal opportunity for the immediate resoulation of the intellectual doubts, emotional disturbances and spiritual problems of the disciples. Further, it enabled the disciple to strike a balance between his material life and spiritual aspirations, and taught him low to co-ordinate the two for the better development of both.

**6) Scientific Analysis of Spiritual Experiences :** Spiritual Experiences are like sign-posts on the Path of the Spirit, indicating to the Pilgrim the progress he has made God-ward. From Vedic times to this day, Saints and Mystics, endowed with exalted spiritual experiences, kept them mostly to themselves and told others that these experiences belonged to that domain which lay 'beyond the realms of thought and speech'. If they spoke about spiritual experiences at all, it was confined to the small esoteric circle of their closest disciples. This kept the rest of mankind in almost total ignorance, for centuries about the content of spiritual experiences which form the very fabric, as it were, of spiritual life. This, in turn led to the exploitation of the spiritual ignorance of mankind by charlatans and hypocrites who could, just by sitting in silence for a long time, claim to have spiritual experiences without having them at all! This went on and on for a long, long time indeed!

Gurudeva came to us in this age to enlighten us, as it were, regarding the so-called mysteries of spiritual life. He has said that he had taken to the study of Philosophy in order to find intellectual and rational justification for the spiritual life he was leading and the spiritual experiences he was having. Thus, on the one hand, he was endowed with varied, progressive and exalted spiritual experiences reaching upto God-realization and beyond, and on the other hand, the modern scientific methods of critical analysis and scholarship had been mastered by him. Thus he was uniquely qualified to apply the scientific method to the esoteric field of Spiritual Experience, and was the first to write a grammar, so to say, of spiritual life in the history of the literature of the world. He has written books on the Upanishads, the Gita and the spiritual writings of Marathi, Kannada and Hindi Saints. In these books, (i) he has

arranged the literary material at hand in a spiritully constructive order, (ii) he has discussed the genesis, growth and culmination of spiritual experience, (iii) he has analysed and classified spiritual experiences into forms like Photic, Phonic, Morphic, Olfactory etc. and discussed their relative order and merit, their varieties, their effects, and so on. The Spiritual Path has been so very clearly lighted up for the first time in the history of the human race, in order to tempt modern man to tread it with an alert mind and open heart for his own ultimate illumination and bliss and for the moral and spiritual regeneration of mankind.

**7) Spiritual Life as an 'Eternal March towards Perfection'** : The doctrine of 'Asymptotic Approximation to God' states that "one can reach God so nearly as to be only just short of Him'; that we can asymptotically approximate to God but cannot become God. Saints like Jnaneshwara and Ramadasa have spoken of this doctrine which Gurudeva upholds, renders more explicit and enunciates very clearly. This doctrine turns spiritual life into an 'Eternal march towards Perfection'; it implies that reaching the goal of God realization **(Sakeatkara)** does not mark the end of the spiritual journey at all, but rather the beginning of the **real** spiritual life and career of the God-intoxicated Saint! It further implies that as long as the Man of Realization resides in the human body, he cannot and should not be identified one hundred per cent with God; a little imperfection separates him from total God-hood, in which he completely merges the moment he gives up his body. This is not to deny that the God-realised saint, during his moments of exalted spiritual experience, merges in and attains at onement with God; during such moments the Saint is entirely bereft of body-consciousness, naturally. The doctrine is only a warning against identifying a Saint entirely with God during his earthly existence.

If this doctrine is properly studied and accepted generally in India, it will cut at the root of the spiritual humbug of all those pseudo-saints who, with little spiritual practice and experience behind them or none at all, forcibly usurp the throne of God with impunity and without authority, and exploit the spiritual hunger of credulous, gullible and ignorant people for personal profit and pleasure. Such spiritual hypocrisy renders turbid the clear stream of spiritual life in this country; it has had a field day for too long indeed! May the general understanding and acceptance of this doctrine of spiritual life being an 'Eternal march towards Perfection' mark the death-knell of false spirituality for all time !

**8) Ethics in Spiritual Life :** Gurudeva has selected and separately classified exceprts from the spiritual literature of Marathi, Hindi and Kannada Saints, which deal eloquently with the 'Necessity of Moral Preparation' in spiritual life. He never failed to underscore the important role played by moral conduct in spiritual life. His books contain a wonderful analysis and discussion of 'Virtues to be cultivated' and 'Vices to be avoided' by the spiritual aspirant.

Gurudeva and his Spiritual Tradition followed one rule without exception and it was this : At the time of spiritual initiation, the spiritual aspirant was required to make two vows before the Spiritual Teacher : (i) That he will lead a moral life which will be totally free from all blemish from the sexaul point of view **(Paradara-tyaga),** and (ii) That he will lead an in corruptible life from the monetary point of view **(Paradravya-tyaga.)** Those who frankly hesitated totake these two difficult vows were positively dissuaded from taking initiation. Woman and wealth are the two principal temptations, traditionally known, which pose constant threat to the moral purity and spiritual well being of man. No slight to womankind is intended here; all that is meant is that men and women, on entering spiritual life, have to be extra careful in their relations with the other sex because their spiritual life can be sustained only by the moral purity of their conduct. As for the lure of wealth and the attraction of the enjoyments it brings, one glance at today's money-mad world is eloquent proof of the disasters it can bring. So, the two vows taken at the time of Initiation make the spiritual aspirant permanently aware of this twin-threat to his moral and, consequently, spiritual life.

Gurudeva has often said that moral purity and spiritual elevation go well together, each helping the other to grow and dvelop, and that in a man of God-realization, moral and spiritual excellenes meet and reach thel zenith. Once all people truly understand this intrinsic relationship between Morality and Spirituality, then they will not be misled by pseudo-saints whose only Liberation consists in their licentious,ethically unfettered behaviour! Just as the wrong interpretation of the statement 'Spiritual experience transcends human reason' leads to the false equation of 'spiritual' with 'irrationality', so also the wrong interpretation of the statement 'A man of spiritual realisation transcends all laws of Morality' leads to the flse equation of 'spirituality' with 'immorality'! Nothing could be farther from the truth! Just as spiritual experience transcends human reason but does not contradict it, so also a 'Man of Realization' may transcend all moral laws but he never transgresses them.

**9) Social Value of Spiritual Life :** Gurudeva has said that a person leading a life of the Spirit can not but be useful to Society. Such a person is a living illustration of pure morol life; along with his spiritual disciplines, he performs his own worldly duties in a diligent and selfless manner and thereby helps to elevate the moral and spiritual tone of Society and to instil a sense of Duty among the people. In the world of today, whether the Society be Communist or Capitalist, there is a growing awareness of two basic conditions of human progress and prosperity : (i) The need of basic moral sense to sustain the fabric of Society and its its human institutions, and (ii) the need of the individual's awarness of his own duties and responsibilities. The Spiritual Teacher, living a life of the Spirit while pursuing his normal duties in Society, teaches both these vital lessons to all by his living example

and enlightened precept, and thus helps directly in the solution of these two vital problems facing mankind today. Further, if the spiritual discipline he teaches is practised by more and more people, it will help to offset today's growing material comforts 'without' by a greater spiritual awarness 'within' and thus restore the balance in human personality. In short, the presence of people leading a spiritual life is a 'must' for the well-being of Society.

**IV Conclusion**

To conclude : Here are some of the unique things which characterized the Life of Gurudeva Ranade : (i) He lived the normal life of a householder, worked as a Professor of Philosophy and retired as the Vice-Chancellor of Allahabad University; simultaneously, he practised intense spiritual disciplines throughout his life, attained the highest spiritual experiences and lived a Life of God-realization thereafter. He thus excelled in both worldly life **(Samsara)** and spiritual life **(Paramartha).** 2) After attaining Realisation himself, he gave spiritual initiation and help to countless aspirants seeking spiritual enlightenment, experience and bliss and also continued to practise spiritual disciplines rigorously himself. In him, thus, one could find the rare combination of a Spiritual Teacher **(Guru)** and a Spiritual aspirant (Sadhaka) ! (3) With all his spiritual sublimity and intellectual brilliance, he bathed - spiritual disciples and associates in a constant shower of boundless love and solicitude. It was this universal love of his which tied them all to him, and through him to spiritual life. He thus combined in himself the finest qualities of the Head, the heart and the soul. (4) He wrote a number of outstanding books with the sole purpose of serving an urgent spiritual need of mankind; this proved that he could move with rare ease and attain exceptional heights in both the fields of intellectual scholarship and spiritual realisation; he thus excelled in Sabdajnana as well as in Nihsabdajnana. (5) Gurudeva gathered all these exceptional achievements to his credit while, for more than half his life, he lived under the ever-present shadow of a dread disease like T.B. and continuously suffered from many other ailments too numerous to mention! And yet his face beamed with beatific spiritual joy at all times of the day and night! Further, the boundless energy and enthusiasm he displayed in all his activities kept his associates on their toes - and on the run! — at all times of the day and night! He thus combined in his person intense, cotinuous physical suffering with ever-flowing spiritual energy and bliss. (6) Gurudeva successfully managed to hide his exceptional austerities; in his talks, speeches and writings also he managed to keep himslef hidden by making a practice of always expressing himself 'through the words of another' but while keeping himself hidden, he scattered broadcast the secrets of spiritual life which were kept well-hidden for centuries. This he did to fulfill the need of this Age. Modern man and his Age owe this great Saint a debt of gratitude which they can hardly ever repay!

**कै. डॉ. अरविंद विनायक आपटे**

# 'कन्नड संत वाङ्मयातील परमार्थ मार्ग' शोध व बोध

**प्रा. म. अ. कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद**

*एम.ए., शिवाजी विद्यापीठात मराठीत सर्व प्रथम. निवृत्त. मराठी विभाग प्रमुख, डी.आर.के. कॉलेज ऑफ कॉमर्स कोल्हापूर, कथा, कविता, स्फुट लेखन निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रकाशित. सहा पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेर व्याख्याने. 'श्रीक्षेत्र-पावस' षण्मासिकाचे संपादक.*

श्री. गुरुदेव रानडे यांच्या 'Pathway to God in Kannad Literature' या ग्रंथाचा मराठी अनुवाद श्री. कृ. वें. गजेंद्रगडकर यांनी केलेला आहे. तो गुरुदेवांच्या निर्याणानंतर १९७१ मध्ये प्रसिद्ध झाला... या ग्रंथात एकूण वीस प्रकरणे असून, हा सुमारे २८० पृष्ठांचा ग्रंथ झाला आहे –

श्री. कृ. वें. गजेंद्रगडकर यांनी गुरुदेवांचे अनेक श्रेष्ठ ग्रंथ, लेख, भाषणे यांचे मराठीमध्ये अधिकारवाणीने अनुवाद केले आहेत. नामवंत शिक्षण संस्थांमध्ये उच्च अधिकारपदे त्यांनी भूषविली होती. त्यापेक्षा ते इंचगिरी संप्रदायातील एक तपस्वी साधक होते. गुरुदेवांनी स्थापन केलेल्या 'अध्यात्मभवना'त परमार्थसाधना करण्याकरिता जी मंडळी प्रथम अपूर्व श्रद्धा, निष्ठा घेऊन गुरुदेवांकडे आली त्यांपैकी ते एक ! उत्तम गुणग्राहक, प्रचीतीचा परमार्थ करणारे, गुरुदेवांचे सुहृदही होते. 'उत्कट भक्ती, उत्कट ध्यान । उत्कट चातुर्य, उत्कट भजन । उत्कट योग अनुष्ठान ।।'... साधून ज्यांनी गुरुदेवांना प्रसन्न करून घेऊन आत्मकल्याण निश्चितपणे साधले अशा निवडक भाग्यवंतांपैकी ते एक ज्येष्ठ, श्रेष्ठ गुरुसेवक होते. गुरुदेवांनी कर्नाटक संतांच्या साक्षात्कारावर लिहिलेल्या इंग्रजी ग्रंथाचे त्यांनी केलेले हे सरस मराठी भाषांतर आहे. श्री. गजेंद्रगडकरांच्या मते, 'अनुभूति शास्त्रावरचा हा गुरुदेवांचा शेवटचा ग्रंथ, सर्व ग्रंथांपेक्षा श्रेष्ठ व अद्वितीय आहे. त्यास Swan-song (म्हणजे राजहंसाचे मरणसमयीचे अत्यंत मधुर गान) म्हणता येईल' असा अनन्य साधारण ग्रंथ आहे... गजेंद्रगडकर यांनी केलेला हा अनुवाद केवळ शाब्दिक भाषांतर नसून हा गुरुदेवांचे अंतरंग प्रकट करणारा, मौलिक सिद्धांतांचे प्रत्यय देण्याचे सामर्थ्य असलेला जवळ जवळ एक स्वतंत्र ग्रंथच आहे. गुरुदेवांचे तर्कशुद्ध, बुद्धिनिष्ठ विचार सर्वांगांनी समजून घेणे व ते त्याच तोलामोलाने मराठी भाषेत अनुवादित करणे हे काम सामान्य कुवतीच्या माणसाला न झेपणारे असेच होते. गजेंद्रगडकर यांनी हे काम आपली जिज्ञासा, विवेक जागृत ठेवून फार मोठ्या कौशल्याने, समर्थपणे केलेले आहे. याबद्दल समस्त मराठी वाचकांनी त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत... याच संप्रदायामधील ज्येष्ठ साधक श्री. गणपतराव तुळपुळे यांच्याशी चर्चा करताना एकदा गुरुदेव त्यांना म्हणाले होते, 'गणपतराव, माझ्या लेखनातील एकही अनुभव किंवा एकही सिद्धांत, मला स्वतःला अनुभव आल्याशिवाय मी लिहिलेला नाही. ज्यांना तो कळेल त्यांना कळेल. एरवी मला त्याचे विशेष वाटत नाही !'... श्री. गजेंद्रगडकर यांनी या ग्रंथात 'निवेदन' म्हणून या ग्रंथाची जी वैशिष्ट्ये प्रारंभी कथन केलेली आहेत, त्यात या ग्रंथात स्वानुभवावरून श्रीगुरुदेवांनी दिलेली माहिती इतरत्र कोठेच मिळत नाही हा या ग्रंथाचा विशेष आहे. या ग्रंथात दिलेली माहिती व केलेले विवरण अत्यंत महत्त्वाचे आहे व ते इतरत्र कोठेच मिळणार नाही. 'या ग्रंथात श्रीगुरुदेवांनी आपल्या जीवनातील काही महत्त्वाच्या घटना, प्रसंग व आध्यात्मिक अनुभव अगदी सहज व मोकळेपणाने सांगितले आहेत. म्हणून हा ग्रंथ पुष्कळसा आत्मचरित्रपर आहे.' अशी वैशिष्ट्ये दिली आहेत आणि निवेदनाअखेरी, 'या ग्रंथाचे महत्त्व शब्दांनी सांगणे अशक्य आहे. त्याचा खोल अभ्यास करावा, पारायण व मनन करावे, त्यात सांगितलेल्या पद्धतीने दीर्घकाल ध्यान करून आध्यात्मिक आनंद मिळवावा, म्हणजेच य ग्रंथाचे महत्त्व कळेल.' ... असे भावयुक्त व आदरयुक्त उद्गार काढलेले आहेत. या पार्श्वभूमीवरच या ग्रंथाचा आपण परिचय करून घेतला पाहिजे.

सुप्रसिद्ध संशोधक व समीक्षक डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी गुरुदेव रानडे यांच्या तत्त्वज्ञान विवेचन-पद्धतीचे विवेचन करताना 'गुरुदेव रा. द. रानडे चरित्र आणि तत्त्वज्ञान' या ग्रंथात म्हटले आहे की, 'प्रो. रानडे यांच्या तत्त्वज्ञानास आत्मसाक्षात्काराचे तत्त्वज्ञान असे नाव देता येईल. परतत्त्वाचा साक्षात्कार हे त्यांचे ध्येय असून सुमारे अर्धशतकाच्या दीर्घ, एकनिष्ठ व उत्कट तपस्येने त्यांनी ते साध्यही केले होते. हे ध्येय व त्याच्या प्राप्तीचा मार्ग ही तर्कविरोधी नसून बुद्धीस पटणारा आहे, याची स्वतः खात्री करून घेण्यासाठी ते तत्त्वज्ञानाच्या अभ्यासास लागले व त्यात पारंगत होऊन त्यांनी स्वतःचे तत्त्वज्ञान निर्माण केले... तत्त्वज्ञान म्हणजे केवळ बुद्धीचा विलास किंवा करमणूक नसून जीवन ध्येयास दिलेले बुद्धीचे सहाय्य आहे. 'माझ्या तत्त्वज्ञानाचा उगम परमार्थात झाला व त्याची परिणती ही परमार्थातच व्हावी अशी माझी इच्छा आहे' असे गुरुदेवांनी एके ठिकाणी म्हटले होते. गुरुदेवांनी आपले तत्त्वज्ञान स्वतंत्रपणे असे कोठे मांडलेले नाही. आणखी एका प्रसंगी त्यांनी म्हटले होते, 'मला दुसऱ्याकरवी बोलणे अधिक बरे वाटते. ज्ञानेश्वर, तुकारामांसारखे मोठे लोक सांगत आहेत; मग उगीच आपण बोलून स्वतःकडे अहंकार कशाला घ्या?'... सांगण्यासारखे त्यांच्यापाशी पुष्कळ होते. परंतु ते सांगण्याची त्यांची एक विशिष्ट पद्धती होती. ही पद्धती त्यांनी प्रिंगल पॅटिसनच्या 'Idea of God' या प्रसिद्ध ग्रंथावरून घेतली असावी. डॉ. बर्नेट यांचे मूळ उतारे देऊन प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञान विशद करण्याच्या पद्धतीने त्या तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात कशी क्रांती घडवून आणली ते पाहून त्या पद्धतीने उपनिषदांतील साधनभूत उताऱ्यांची निवड, मांडणी व विवेचन आपण करावे असे त्यांना वाटले आणि त्याप्रमाणे त्यांनी ते काम अत्यंत यशस्वी रीतीने केले. ही पद्धती प्रो. रानडे यांनी पूर्णत्वास नेली होती, यात काही संशय नाही.' डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी गुरुदेवांच्या विवेचन पद्धतीचे केलेले विश्लेषणही या ग्रंथाच्या संदर्भात अभ्यासासाठी अत्यंत उपयुक्त ठरणारे आहे.

दुसऱ्यांच्या विचारांचे विधायक पद्धतीने समालोचन करून तद्द्वारे आत्मप्रकटीकरण करणारी ही पद्धत आहे. गुरुदेव हे स्वतः फ्रेंच, जर्मन, ग्रीक, लॅटिन, संस्कृत, इंग्रजी, मराठी, हिंदी अशा विविध भाषांत पारंगत होते. त्या त्या भाषेतील श्रेष्ठ विचारवंतांचे हृद्गत जाणून घेण्याइतपत

त्यांची बुद्धी आणि भावनाही तीव्र संवेदनाक्षम होत्या. बहिरंग संशोधनापेक्षा अंतरंग संशोधनास प्राधान्य देऊन ते चिंतन-मनन करीत. अफाट परिश्रम करून ते संकलन, संशोधन करीत. पूर्णपणे विषय आत्मसात झाला याची खात्री त्यांना झाली की मग परिपक्वपणे मुद्दे तयार करून त्यानंतरच ते आपले नवे समालोचन तयार करीत, लिहीत किंवा व्याख्याने देत. त्यांच्या भाषणात अथवा लेखनात पांडित्यप्रदर्शन हा हेतू नसे. वादविवाद नसे. कोणाच्या तरी खंडणमंडणार्थ ते धडपडत नसत तर त्यांचा विवेक जागृत ठेवून वाचकांना, श्रोत्यांना एखादा 'समन्वय सिद्धांत' पटवून सांगण्याचा प्रयत्न असे. सर्व शास्त्रे, सिद्धांत, धर्म, परमार्थ यांचा अभ्यास व मांडणी गुरुदेवांनी या भूमिकेनेच केलेली आहे. संत साहित्यातील विचारांच्या समालोचनाची परिपक्व, आदर्श पद्धत गुरुदेवांनी जपली, जोपासली व तिला सर्वत्र प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. ... गुरुदेवांच्या या अभ्यास व लेखनपद्धतीचे दर्शन 'कन्नड संत वाङ्मयातील परमार्थ मार्ग' या ग्रंथात पानोपानी घडते.

गुरुदेव रानडे यांनी कर्नाटक संतांच्या अनुभूतिशास्त्रावर १९५० साली धारवाड येथे एक, १९५१ मध्ये बेळगावमध्ये एक, १९५४ साली दिल्लीत एक अशी एकूण तीन व्याख्याने दिलेली होती. अनुभूतिशास्त्रात कन्नड संतांनी स्वतंत्र व विशेष भर काय घातली, हा त्यांच्या व्याख्यान-विवेचनाचा मुख्य विषय होता. एखाद्या संताचे विशेष अनुभव व्यक्त करणारे एखादे पद त्यांच्या वाचनात, किंवा ऐकण्यात आले की त्यांच्या अंतर्यामीचे कुतूहल जागे होई. गुरुदेव तसे अतिशय हळुवार मनाचेही होते. उत्कट गुरुभक्ती हा त्यांचा स्वभाव आणि जीवनविशेष होता. आपल्या संप्रदायाबद्दल त्यांना विलक्षण आदर वाटे. स्वाभाविकपणे त्या अलौकिक अनुभवाचा शोध ते घेऊ लागत. या शोध-बोध प्रक्रियेमधून त्यांना भावलेले अनुभूतिशास्त्र त्यांनी उभे केलेले आहे. सर्व तऱ्हेच्या पारमार्थिक चिंतन, मननाचे अंतिम स्वरूप - ध्येयवाद म्हणजे परमेश्वर प्राप्ती हेच आहे. या बाबतीत ते निश्चिंत झालेले होते. 'अखंड चोवीस तास ईश्वराच्या रूपांचे दर्शन व अनाहत नाद श्रवण होऊ लागले म्हणजे देवाशी अखंड संबंध जडला व खरे पारमार्थिक जीवन सुरू झाले' असे ते मानत. असे जीवन जगण्याचे प्रत्येकाचे ध्येय असावे असेही ते सांगत असत.

हे अखंड अनुसंधान कसे, कोणाशी, केव्हा घडते याची तर्कशुद्ध मांडणी त्यांनी अनेक व्याख्यानांमधून केलेली आहे. 'कन्नड संत-वाङ्मयातील परमार्थ मार्ग' या ग्रंथाच्या 'तात्त्विक प्रस्तावने'त ते सूत्ररूपाने हा विचार समजावून देतात. आत्मज्ञान्यांच्या मते (श्रीगुरुदेव व इतरही संतांच्या मते) १) योग्य गुरूकडून नाम घेऊन, २) ध्यानाचा सुदीर्घ अभ्यास केल्याने ३) आपल्या अंतःकरणात एक अतींद्रिय अनुभव उत्स्फूर्त होतो. त्यालाच अंतर्दृष्टी किंवा ज्ञानदृष्टी असे म्हणतात. ४) या ज्ञानदृष्टीवर आतूनच प्रेरणा किंवा संस्कार होतो. ती, त्यामुळे चलित होते; आणि परमेश्वरप्राप्तीचा मार्ग आक्रमणाची प्रक्रिया सुरू होते. या संदर्भात येणारे अनुभव बाह्य जगाशी संबंधित नसतात तर ते अतींद्रिय असतात. ५) असा येणारा अतींद्रिय अनुभव अखंड, सतत येणारा असाच असतो. त्यात सारखी प्रगती होत जाते. ६) देवाच्या सतत जवळ जात राहणे व अंती एकरूप होऊन जाणे हा या अनुभवाचा अंतिम विशेष आहे. (देव व साधक यांच्यामध्ये सोळा नंबर व साडेपंधरा नंबर सोन्यामध्ये जसा अत्यल्प फरक असतो तसा तो उरतोच, असा ज्ञानदेवांच्या दृष्टांताचा दाखला देऊन श्री गुरुदेव यांचाही तोच अनुभव आहे. असे ते सुचवितात !)

एखादा आध्यात्मिक अनुभव खरा की खोटा, हे ठरविण्याची तीन सुप्रसिद्ध प्रमाणे–ध्येयवाद, वस्तुस्थितीवाद व उपयुक्ततावाद ही आहेत असे गुरुदेव मानतात. एकसूत्रता, स्वतंत्रता व समाधान ही त्यांच्या खरेपणाची तीन महत्त्वाची गमके आहेत असे ते म्हणतात - व त्यांच्या चौफेर विवेचनास ते प्रारंभ करतात... परमानंदाचा आस्वाद चाखावयाचा या एकाच ध्येयाने सर्व संत–समाज एकत्र बांधला गेला आहे, असा निष्कर्षही ते मांडतात.

परमार्थास प्रवृत्त करणाऱ्या मनोवृत्ती कोणत्या ?

या मूलभूत प्रश्नाच्या चर्चेस गुरुदेव प्रारंभ करतात.

१) आपले जीवन उज्ज्वल करण्यासाठी व पारमार्थिक ध्येय संपादन करण्यासाठी परमेश्वराची प्रार्थना करण्याची अनवरत प्रेरणा ही पहिली प्रवृत्ती.

२) पूर्वजन्मीच्या अनुभवाकडे व आपल्या बालपणाकडे वळून पाहाण्याची सहजप्रवृत्ती.

३) इंद्रियजन्य ज्ञानाने मनुष्य फसतो व नाशही पावतो हे जाणून इंद्रियांवर विजय मिळवावा व त्या शक्तीचा योग्य तसाच श्रेष्ठ कार्याकडे उपयोग करण्याची इच्छा – ही प्रवृत्ती.

४) जीवनात येणाऱ्या वैफल्याला कंटाळून ईश्वराकडे त्याच्या कृपेची याचना करण्याची प्रवृत्ती.

५) दुष्ट, दुर्गुण व दुष्ट विकारांवर विजय संपादन करून पापी जीवनामधून मुक्त व्हावे व पुण्यमय जीवन प्राप्त करून घ्यावे ही नैतिक प्रवृत्ती.

या पाचांपैकी एखादी प्रवृत्ती प्रबळ असेल (किंवा यापैकी काही) तर प्रपंचापेक्षा परमार्थच अधिक उत्तम. तोच साध्य करावा ही वांछा जीवाच्या ठायी आपोआप निर्माण होते असा निष्कर्ष ते काढतात. रेवणसिद्ध, कुडलुरेश, अखंडेश्वर, गोपाळदास, पुरंदरदास, गुरुसिद्ध, कृष्णानंद इ. कन्नड संतांच्या काव्यांचा आधार घेऊन आपले समग्र विवेचन सिद्धांत रूपाने प्रथम प्रस्थापित करून ठेवतात.

६) विषयासक्तीतून सुटका व्हावी, ७) मनाची चिंताव्यग्र अवस्था संपावी, याही आणखी दोन कारणांची चर्चा पुढील प्रकरणाच्या प्रारंभी ते करतात. या चर्चेत १९४२ सालची अलाहाबाद येथील आपली मनःस्थिती ते सहजतेने सांगून जातात.

परमार्थसाधना करणाऱ्याने, तो पूर्णत्वास जाण्यासाठी नैतिक तयारीकडेही सावधपणे लक्ष दिले पाहिजे, हा गुरुदेवांचा आवडता सिद्धांत ते या व्याख्यानमालेमध्येही आग्रहाने मांडतात आणि इतर कर्नाटक संतांबरोबर या प्रकरणात श्री निंबर्गीकर महाराजांचा आदराने गौरव करतात.

१) इंद्रियांचा उपयोग ऐहिक सुखे भोगण्याकडे न करता त्यांचा उपयोग परमेश्वर सेवेकरिता करावा.

२) सद्गुरु व संतांच्या सान्निध्यात राहण्याने उत्तम मौन पाळता येते आणि शांती व समाधानाची प्राप्ती होते. 'मौन' साधल्याने साधकास ब्रह्माच्या वैभवात शिरून विरून जाता येते व तो अमर्याद ब्रह्मरूपच होऊन जातो.

३) सद्गुरूंच्या कृपेने सामान्य साधव तीव्र भक्तिभावयुक्त साधक बनतो. त्याच्या मनातील सर्व संशय, अडचणी आपोआप दूर होतात. नाठाळ मनास एक सद्गुरुच आवरू शकतात. म्हणून सद्गुरूस शरण जा. परमार्थाचा नुसता देखावा करू नका. प्रार्थना करा. अभिमान टाका. नामस्मरण करा.

४) या सर्वमान्य सिद्धांताची उजळणी करता करता श्रीगुरुदेव अनुभवाच्या खरे-खोटेपणा पारखण्याच्या तीन कसोट्या सांगतात.

अ) तो अनुभव साधकाच्या नाभिकमलात खोल शिरला पाहिजे, ब) तो वर ब्रह्मरंध्रातही शिरला पाहिजे, क) तो मेरुदंड किंवा ब्रह्मनळात भरून राहिला पाहिजे. निरूपाधिसिद्धाच्या पदाच्या आधारे, परमार्थाचा प्रवास योग्य दिशेने चालला आहे का ? या अवघड समस्येचे ते स्वानुभूतिपूर्ण उत्तर देऊन जातात. शेवटी सर्व विश्व दिव्य तेजाने भरलेले आहे ही अनुभूती ज्यास येते, त्याचा प्रवास पूर्ण होतो हे रहस्य ते सूचित करतात.

असा अनुभव देणाऱ्या सद्गुरूंची लक्षणे कोणती? किंवा कोणाकडून अनुग्रह घ्यावा? या सर्वत्र विचारल्या जाणाऱ्या प्रश्नाची चर्चा स्वाभाविकपणे ओघानेच पुढे येते. गुरू व देव एक आहेत. गुरू साक्षात ब्रह्म आहेत हा गुरुदेवांच्या परम श्रद्धेचा विषय. सद्गुरू सत्शिष्याच्या कानात दैवी मंत्र ओततो. त्यास देहभाव विसरावयास लावतो. संसार, प्रपंचापासून अलिप्त होणे व जे चिरंतन त्याचा द्रष्टा बनणे ही गुरुकृपेची प्रचीती आली पाहिजे. आत्मा व देव अथवा भक्त व देव यांचे ऐक्य प्रस्थापित झाले पाहिजे. त्याकरिता साधकाने न्यास व ध्यासपूर्वक नामस्मरण केले पाहिजे. साधकाच्या अंतःकरणात देव तसेच नामाबद्दल प्रेम आणि निष्ठा असली पाहिजे. भावयुक्त भक्ती झाली पाहिजे. मोक्षगुरूची सेवा करावी. यावर गुरुदेव रानडे विशेष भर देताना दिसतात. गुरुदेवांचे मते सद्गुरूंचे कार्य तात्त्विक, नैतिक व आध्यात्मिक अशा तीन प्रकारचे असते. माया, मोह, अहंकार इ. दुष्ट शत्रूंचे निर्दालन करून जीव व शिव यांचे ऐक्य सद्गुरूच घडवून आणतात. स्वानंदाचा लाभ करून देणं हे सद्गुरूंचे कार्य असते. ईश्वरनामाचे एकाग्र चित्ताने स्मरण, ध्यान करून सर्व तऱ्हेच्या वासनांवर विजय मिळविण्याच्या कामी सद्गुरु-शक्ती सहाय्यकारी ठरते... श्रीगुरुदेव आपल्या शिष्याची संकटे व त्याच्या मरणाचे निवारण करतात. गुरुकृपेमुळेच देवाचे दिव्यरूप शिष्यास दिसू लागते व त्याचे मन अमर्याद आनंदाने भरून जाते. शिष्य जिकडे पाहील तिकडे सर्वत्र त्यास देव दिसू लागतो, असे दर्शन होऊ लागणे हीच मुक्ती होय !

मुक्ती मिळण्यापूर्वी सर्व वासनांचा क्षय झाला पाहिजे. श्रेष्ठ सद्गुरूकडून उपदेश झाल्याशिवाय व साधकाने प्रत्यक्ष कडक साधन केल्याशिवाय आत्मज्ञान होत नाही. सद्गुरुंनी शिष्यावर केलेल्या अनंत उपकारांना सीमा नसते. दर्शन, स्पर्शन व ऐक्याचा दिव्य अनुभव देऊन सद्गुरू आपले कर्तव्य बजावत असतात. 'दर्शन' म्हणजे देवास प्रत्यक्ष पाहाणे, 'स्पर्शन' म्हणजे देवाचा प्रत्यक्ष दिव्य स्पर्श अनुभवणे आणि 'ऐक्य' म्हणजे देवात मिसळून, विरून जाणे होय !.... अशी अलौकिक देणगी सद्गुरू कृपेनेच प्राप्त होते त्यामुळे भक्त, गुरुराया संदर्भात कृतज्ञतेने अंतर्बाह्य भरून नम्रातिनम्र होऊन जातो. तो गुरूंना प्रार्थना करतो की, 'हे गुरो, जगाच्या वैभवाने व मोठेपणाने माझ्या मनास भूल पडू देऊ नकोस. उलट तुझ्या महिम्याने हे जग भरून जाऊ दे... माझ्या मनाला तुझे ध्यान व तुझी सेवा या दोन गोष्टींचा ध्यास लागो... तुझी करुणा हेच माझे अन्न, पाणी व जीवन होऊ दे. तुझ्या दयेवर, कृपेवरच मी जगू इच्छितो... तुझी कृपा हेच माझे जीवितसर्वस्व होऊ दे !... तुझ्या दिव्य, तेजोमय कृपाछत्राखालीच माझे विचार व माझी कर्मे प्रकाशित होऊ देत!' सर्व साधूसंतांनी सांगितलेल्या व मागितलेल्या सद्गुरूसत्तेचा, कृपेचा हा महिमा कन्नड संतांनीही उच्च पातळीवरून गायिलेला आहे. गुरुदेव रानडे यांची सद्गुरुनिष्ठा प्रसिद्धच आहे.

सद्गुरू पूजा/सेवा करण्याकरिता साधकाचे शरीर, मन आणि वाणी ही अत्यंत पवित्र झालेली असली पाहिजेत, हे सांगून शिष्याने साधना कशी करावी ? या महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा ते करतात. साधनमार्ग कसा आक्रमावा? योगमार्ग व साधनमार्ग यांचे परस्पर संबंध कसे असतात ? गुरुदेवांच्या मते १) साधकाने प्रथम दृढ आसन घालून बसावे. दर पाच मिनिटांनी आसन बदलता कामा नये. २) गुरुदेवांच्या मते योगापेक्षा भक्ती किंवा भाव श्रेष्ठ आहे. ३) साधकाने श्वासोच्छ्वास दीर्घ व जोराने करावा. आपला प्राणवायू वर नेऊन तो हलके सुषुम्ना नाडीतून जाऊ द्यावा; व शेवटी तो त्रिकुटात मिळून जावा. ४) साधकाने आपले मन अनेकविध अनाहतनादात गुंतवून ठेवावे. मात्र नुसते नाद ऐकून चालणार नाही, तर देवाचे रूपही पाहिले पाहिजे व आनंद उपभोगला पाहिजे. ५) नाद म्हणजे अनाहत नाद; बिंदू म्हणजे रूप आणि कला म्हणजे प्रकाश होय. देवाच्या पलीकडे निर्गुण, दिक्कालातीत सत्याचा अनुभव साधकाला आला पाहिजे !

'गुरुशिष्य संबंधाची चर्चा' या व्याख्यानमालेत त्यांनी विशेष विस्ताराने केलेली आहे. श्री निंबरगी महाराजांच्या पदाच्या आधाराने ते हा विस्तार-प्रारंभ करतात. १) साधकाने मौन पाळले पाहिजे. २) ध्यानाची कोणती तरी एक बैठक स्थिर केली पाहिजे. ३) ज्ञानप्रकाशात मनास आनंद वाटला पाहिजे. ४) व शेवटी आत्मानुभवाचे अमृत चाखले पाहिजे. या चार गोष्टी अंगी बाणण्याने ईश्वरी स्वरूपाचे अंतर्ज्ञान होण्याचा संभव आहे. कुडलूरेशाच्या एका पदाचा गौरव करताना या संदर्भात गुरुदेव म्हणतात – 'आम्ही कर्नाटक संतवाङ्मयाचा जो आढावा घेत आहो त्या सर्व वाङ्मयात हे कदाचित सर्वात उत्तम पद ठरते... पापमय जीवनापासून भक्तिपूर्ण जीवनाकडे कसे जाता येते हे पदात सांगितले आहे. शारीरिक, मानसिक, सामाजिक, राजकीय, नैतिक व पारमार्थिक अशा सहा प्रकारांनी या पदाचा अन्वय अर्थ गुरुदेवांनी कथन केलेला आहे. तो मुळातूनच वाचण्यासारखा आहे !

गुरुदेवांच्या मते परमार्थ यशस्वी होण्याकरिता गुरुकृपेबरोबरच सत्संगही तितकाच महत्त्वाचा आहे. त्या दृष्टीने 'संतांची लक्षणे' या विषयाची चर्चा अपरिहार्य ठरते. गुरुदेव ती करताना 'संतपणाचे सारसर्वस्व सर्व धर्मांस सामान्य आहे' ही गोष्ट आवर्जून लक्षात आणून देतात. गुरुदेवांच्या मते सर्वोत्तम भक्त 'उद्धव'. तो श्रेष्ठ भक्त, तत्त्वज्ञ, स्वार्थत्यागी व देवावर सर्वांतःकरणाने प्रेम करण्याच्या सर्व दृष्टींनी तो 'पूर्ण आदर्श' संत आहे. तिरूपादिसिद्ध या संत कवीच्या पदाच्या आधारे शारीरिक व मानसिक लक्षणांची चर्चा ते करतात. १) संतांच्या चेहऱ्याकडे पाहिले तर तो दीर्घ श्वास घेतो व सोडतो, २) तो अपशब्द मुळीच बोलत नाही. ३) त्याचा चेहरा चंद्र-सूर्याच्या प्रकाशासारखा तळपत असतो. ४) स्नान न करताही त्याचे शरीर स्वच्छ असते. ५) ध्यानाने संत, अंगी शक्ती संचारल्या अवस्थेत पूर्ण समाधानी दिसतो. ६) शिष्याला सद्गुरू जेव्हा जेव्हा दिसतात

तेव्हा तेव्हा त्याने एकदम स्फुर्तीने त्यांना साष्टांग नमस्कार घालावा. ७) दारू न पिता त्याचे मन मस्त असले पाहिजे. ८) तो पूर्ण जागृत असता गाढ झोपी गेला पाहिजे. ही एक प्रकारची समाधीच असते. ९) बाहेरून भगवत्गीतेत सांगितल्याप्रमाणे तो एखाद्या वेड्याप्रमाणे (जडमूढवत्) दिसावा... १०) त्याला भूत, भविष्यकाळाचे ज्ञान असावे. या नऊ-दहा लक्षणांनी युक्त तो संत, असा निष्कर्ष गुरुदेव काढतात. या संत लक्षणांची चर्चा करता करता गुरुदेव परमार्थामधल्या एका जटिल प्रश्नाकडे साधकांचे लक्ष्य वेधू इच्छितात. तो प्रश्न म्हणजे, मनुष्याला कर्मस्वातंत्र्य आहे काय, का सर्व मानव देवाधीन आहेत ? कर्मस्वातंत्र्य व देवाचे सर्व शक्तिमत्त्व यांचा संबंध काय ? या महत्त्वाच्या प्रश्नांचा ऊहापोह जगन्नाथ-दासाच्या पदाधारे करतात. कन्नड वाङ्मयात हे सर्वात 'उत्तम पद' आहे असा निर्णयही ते देतात !

**देव आणि संत यांचे परस्पर संबंध** कसे असतात या संदर्भात चार दृष्टिकोनांमधून ते विवेचन करतात. १) तात्त्विक दृष्टी, २) प्रार्थनापर दृष्टी, ३) विरोध भक्ती... दोषारोप ठेवण्याची प्रवृत्ती, ४) आध्यात्मिक आनुभविक दृष्टी.

**'ईश्वराचे स्वरूप'** हे या ग्रंथातील महत्त्वाचे प्रकरण आहे. सर्व दर्शनांचा, सर्व धर्मांचा हा प्रतिपादनाचा मुख्य विषय आहे. गुरुदेव सांगतात, 'अदमासे चाळीस वर्षे मी या प्रश्नाचा विचार व चर्चा करीत आहे...' एवढ्या प्रदीर्घ अभ्यासानंतर जवळ जवळ निर्णय देण्याचा अधिकार गुरुदेवांना प्राप्त झालेला आहे. गुरुदेव या महत्त्वाच्या विषयाची मांडणी मोठ्या चातुर्याने तशीच एकेका टप्याने पुढे नेत करतात. परमेश्वर साकार की निराकार ? याचे उत्तर त्यांनी मार्मिकपणे दिले आहे. या चर्चेस अंत नाही अशी वस्तुस्थिती प्रारंभीच सांगून ते म्हणतात, 'संतांची परमार्थात प्रगती होत जाते, त्याप्रमाणे त्यास नवीन नवीन अनुभव येतात व अनुभवांच्या आधाराने त्यास ईश्वराच्या स्वरूपाविषयी आपली कल्पना बदलावी लागते.' पुरंदरदासाच्या पदाधारे तीन वाढत्या पायऱ्यांचे स्पष्टीकरण करू जातात. १) साकार, ईश्वराची पहिली पायरी. २) साकार-निराकाराची दुसरी व ३) निराकाराची पायरी... सर्व पारमार्थिक जीवनाचे सार यात भरलेले आहे, अशी मार्मिक टिपणीही या विवेचनात ते करतात. देव साकार आहे. त्याच्या रूपाचे, सर्व निरनिराळ्या अवयवांचे वर्णन संतकाव्यात येते. देवाच्या आपादमस्तकाचे वर्णन संतांनी केले आहे. हे दर्शन प्रत्यक्ष असते तसेच स्वप्नातील सगुण दर्शनाप्रमाणे असते. स्वप्ने खरी की खोटी ? गुरुदेव स्वानुभवाने निर्णय देतात, 'कोणत्याही स्वप्नात आत्मज्ञानी संत दिसला तर ते स्वप्न खरे झाले पाहिजे !' संत व देव एकरूप असल्याने संत स्वप्नात दिसणे म्हणजे देव दिसणेच होय ! हे प्रमाण अत्यंत श्रेष्ठ व विश्वसनीय आहे – असा निर्णय ते ठामपणे देतात. साकार-निराकार 'वस्तूचे' संतांना प्रत्यक्ष दर्शन घडलेले असते यात शंका नाही असाही ते निष्कर्ष काढतात. महादेवी अक्कांना घडलेल्या दर्शनाच्या आधारे १) एकच अंतिम व आद्यशक्ती हे सर्व विश्व भरून राहिली आहे. २) आध्यात्मिक गुरू या शक्तीशी एकतानता पावून त्याचा आनंद भोगतात इतकेच नव्हे तर त्या शक्तीशी ते क्रीडा करतात व ३) याप्रमाणे देवाशी तादात्म्य पावून क्रीडा करीत असलेल्या आपल्या सद्गुरूच्या ध्यानावर शिष्याची प्रेमळ भक्ती असते... अशा ध्यानानेच सद्गुरू संतुष्ट होतात.

हे ध्यान रहस्य व सद्गुरुसेवेचे परमोच्च शिखर आहे, असे महादेवी आक्कांचे (म्हणजेच गुरुदेवांचेही) मत असल्याचा निर्णय ते सहज ओघात सुचवून जातात. पुरंदरदासाच्या पदाची चर्चा करताना आणखी एका वाद-प्रश्नाचे ते उत्तर देऊन टाकतात. - 'कित्येकांना आपल्या बुद्धिमत्तेची व बौद्धिक ज्ञानाची घमेंड असते, त्यांना देव मिळण्याची आशा नाही. **केवळ तार्किक ज्ञानाच्या आवाक्यात देव सापडत नाही.** आपण जगात फार मोठे आहोत असा काही लोकांना अहंकार असतो. परंतु देवाच्या मोठेपणापुढे त्यांचा मोठेपणा कस्पटासारखा आहे. जगातील सर्व ज्ञात्यांना मिळून जे ज्ञान आहे, त्यापेक्षा देवाचे ज्ञान अनंतपटीने जास्त आहे; व जगातील सर्व मोठ्यांपेक्षा तो मोठा आहे !... असा हा देव सर्वव्यापी आहे. ब्रह्मांडव्यापी आहे; इतकेच नव्हे तर तो सूक्ष्मतम पिंडातही भरून राहिला आहे. या श्रीकुडलूरेशाच्या मताचा आवर्जून उल्लेख आपल्या निर्णयाच्या पुष्ट्यर्थ ते देतात... 'आमच्या बालपणापासून त्यातील विचार आमच्या हाडीमांसी खिळले आहेत. निराकाराच्या आनंदाचा अनुभव शब्दांनी प्रदर्शित करणे अशक्य आहे.'... असाही स्वानुभव ते सांगतात !... जगाच्या अस्तित्वाचे कोडे उलगडावयाचे झाल्यास आपल्यास बाह्य जगाच्या इंद्रियजन्य, मर्यादित ज्ञानापलीकडे गेले पाहिजे. या प्रकारचा अनुभव मिळवावयाचा झाल्यास प्रथम सद्गुरुसेवा केली पाहिजे. त्यांच्या कृपेनेच श्रीकुडलूरेश, तुलसीदास इ. संतांनी उपनिषदांच्या धर्तीवर जी विधाने केली आहेत त्याचा अनुभव येईल, असे निर्धारपूर्वक गुरुदेवही सुचवितात !

**'नाममहिमा'** हा विषय गुरुदेवांच्या विवेचनात यावा हे स्वाभाविकच आहे. पारमार्थिक जीवनात नामाचे असणारे महत्त्व हा सर्वच संतांच्या उपदेशामधील अगदी प्राणतत्त्वाइतका महत्त्वाचा भाग. नाम व ब्रह्म म्हणजे अंतिम सत्य एकरूपच आहे. समाधानाने व समतेने, भक्तिभावाने देवाच्या नामाचे ध्यान केले असता, हृदयाच्या खोल गाभाऱ्यातून निघणारे मधुर संगीत ऐकू येते. परमेश्वराच्या प्राप्तीसाठी जपमाळ धरून जप करणे, उपवास, तपश्चर्या, देहदंडन इत्यादी बाह्यसाधनांचा काही उपयोग नाही, तर हरएक श्वासाबरोबर देवाचे नामस्मरण सदैव व मनातल्या मनात केल्याने देवाचे सहज दर्शन घडते. अत्यंत दुःखाच्या तसेच अत्यंत आनंदाच्या वेळी सारखेच नामस्मरण करावे. संतांच्या संगतीत राहून स्वतःच्या रूपाचे दर्शन घ्यावे. तोच आनंद उपभोगावा. देवाच्या नामाने विविध तापांची होळी होते. अग्नीने कापूर जळावा त्याप्रमाणे पापे जळून जातात. खाता-पिता, झोपी जाता, जागे असता नामस्मरण करावे. सर्व काळी आपण आपले चित्त देवाच्या नामावर अखंडपणे एकाग्र करावे. मृत्यूची भीती नाहीशी करण्यासाठीही केवळ हरिनामच जपावे. त्याने त्रिविध तापांचा क्षय होऊन मन पवित्र बनते. निष्पापता प्राप्त झाल्याशिवाय देवाचे रूप दिसत नाही व देवाचे रूप दिसल्याशिवाय आपले पाप नाहीसे होत नाही. या दोन्ही गोष्टी परस्परावलंबी आहेत. नामस्मरणाचे वेळी चिंता व उद्वेग यांचा पूर्ण अभाव असावा. देवावर पूर्ण विसंबून राहावे. तो सर्व शक्तिमान असून तोच अंतिम कल्याण करतो अशी दृढ श्रद्धा असावी. यालाच पूर्ण शरणांगती असे म्हणतात. नाम-स्मरणाने नामामृताचा रस म्हणजे आनंद चाखता यावा. भक्तिरसरूपी अमृतात आपले मन बुडून गेले पाहिजे. देवाचे दिव्य नाम व त्याचे रूप समव्यापक असून ती एकाच वेळी प्राप्त होतात. कल्पनाशक्तीने देवाची मूर्ती नजरेसमोर आणून नामस्मरण करणे ही ध्यानपद्धती फारशी उपयुक्त नाही. कारण अतिंद्रिय अनुभवाने देवाचे रूप प्रत्यक्ष पाहता आले पाहिजे ! डोळ्यांशिवाय पाहणे, कानाशिवाय

ऐकणे, असे होऊ लागले की देवाच्या दिव्यनामाची व त्याच्या दिव्यरूपाची प्राप्ती होऊ लागली असे समजावे... देवाचे निरंतर स्मरण हे साक्षात्काराचे एकमेव व पुरेसे साधन आहे. भक्त बुद्धिहीन असला तरी त्याकडे देव दुर्लक्ष करतो. पापी असला तरी तो दुर्लक्ष करतो. देवास पूर्ण शरण जा. भक्तिभावाने व पूर्ण शरण जाऊन, श्रद्धेने अखंड नामस्मरण करावे. म्हणजे साधकाला श्रेष्ठ प्रतीचा आध्यात्मिक अनुभव निश्चितपणे येईल.

कर्नाटकातील संत व जगातील सर्व संत यांच्या आध्यात्मिक अनुभवामध्ये पुष्कळसे आढळणारे साम्य प्रत्येक प्रकरणात आलेले आहे. **कर्नाटक संतांच्या ध्यान पद्धतीचा गुरुदेवांनी स्वतंत्र विचार केला आहे.** त्यात गुरुदेवांना मान्य असलेल्या (ते करीत असलेल्या) ध्यान पद्धतीचे रहस्य येऊन जाते. पुरंदरदासाच्या पदातील भावार्थ गुरुदेवांनी अत्यंत सखोलपणे उलगडून दाखविला आहे... व्यंकटेश, उरग गिरीवर राहतो. त्याच्या चरणी बिल्वपत्र अर्पण करावे... असे पुरंदरदास सांगतात. उरग गिरी म्हणजे आपल्या शरीरातील पाठीच्या कण्याचा स्तंभ (मेरुदंड) त्या सर्पाच्या डोक्यावर असलेले रत्न म्हणजे दिव्य आत्मप्रकाश. हा सर्प फुत्कारतो तो अनाहत नाद. बिल्वपत्र म्हणजे दोन डोळे व नाक मिळून तयार होणारी आकृती. नासिकाग्र दृष्टी ठेवून ध्यान करणे म्हणजेच बिल्वपत्र ईश्वरचरणी वाहणे होय. मग ईश्वराची कृपा होते व सभोवती दिव्य प्रकाश दिसू लागतो. प्रकाश व नाद यांचा अनुभव येऊ लागला, तर देवास तुम्हापुढे प्रकट होण्याची इच्छा होईल. तो प्रकट होऊन लगेच अदृश्य होऊ नये याकरिता आम्ही त्याजकडे शांतपणे, सतत पाहिले पाहिजे. ज्या देवाच्या दिव्यनामाचे तुम्ही ध्यान करता त्यातच नाद, प्रकाश व ईश्वराचे स्वरूप ही गुप्त रूपाने असतात. गुरुदेवांनी आयुष्यभर केलेल्या ध्यान पद्धतीचा हा सारांश मानता येईल. वासनाशून्य होऊन आत्मजीवनास प्रारंभ केला जातो. ईषणांच्या पलीकडे जा. श्वासाने श्वास बांधा. सहाही चक्रे शुद्ध करा. सुषुम्नेच्या सहाय्याने सहस्त्रार चक्रापर्यंत चढून जा. तेथे ईश्वराचे वास्तव्य असते. आंतरचक्षूंनी त्याचे दर्शन घडेल. या चर्मचक्षूंनी आम्हाला देवाला पाहता येणार नाही ! कल्पनाचक्षूनेही देवाचे दर्शन घडत नाही. अंतरचक्षूंनीच दिव्य दर्शन घडत असते. सर्व संत हेच सांगतात. त्यापैकी एकाबद्दलही संशय घेणे शक्य नाही. पुढे चर्मचक्षूंनाही देव दिसू लागतो. अंतरचक्षूंच्या सत्यतेस बाह्यदर्शनाचा दुजोरा मिळू लागतो व पूर्ण सत्य अनुभव विषय बनते. असे झाले म्हणजेच तुम्हाला आलेला ब्रह्मानुभव खरा आहे असे म्हणता येईल ! त्याही पलीकडील पूर्ण शांत अशी मनाची स्थिती प्राप्त करून घेणे हे साधकाचे अंतिम ध्येय होय !

**अध्यात्मिक अनुभव खरा की खोटा ठरविण्याची कसोटी कोणती ?** हा एक अत्यंत कठीण प्रश्न आहे. पाश्चिमात्त्य व पौर्वात्य तत्त्वज्ञानामध्ये या संदर्भात अनेक तऱ्हेचे मतभेद आहेत. भारतीय तत्त्वज्ञानात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द यांपैकी कोणते प्रमाण श्रेष्ठ मानावयाचे याबद्दल वाद आहे. तर सर्वांगीण आकलन, स्वयंप्रज्ञा, सत् व चित् ऐक्य, सर्व इंद्रियांचे संकलन व समीकरण, केवल चित् या तत्त्वांपैकी कोणते श्रेष्ठ मानावे, याबद्दल प्राचीन काळी युरोपीय तत्त्वज्ञानांमध्ये वाद माजला होता. कर्नाटक संतांच्या अध्यात्मिक अनुभवांचा परामर्श घेताना गुरुदेव या वादग्रस्त विषयाची अधिकारवाणीने उकल करतात. १) ब्रह्माविषयी केवळ तार्किक विचाराचा ऊहापोह करू नये. २) केवळ शब्दाने किंवा मनाने ब्रह्मप्राप्ती होत नाही. ३) दिक् व काल या दोन्ही दृष्टींनी ब्रह्म अनंत आहे व इंद्रिय गोचर होणाऱ्या कोणत्याही वस्तूपेक्षा अगदी निराळे म्हणून विलक्षण आहे. ४) 'सत्' म्हणजे नित्य, 'चित्' म्हणजे ज्ञानपरिपूर्ण व 'आनंद' म्हणजे सुखात्मक म्हणून ब्रह्म दिक् कालाच्या दृष्टीने अनंत, ज्ञानाची पूर्तता व आनंदरूप आहे. म्हणून ब्रह्म हे 'सच्चिदानंद' स्वरूप म्हटले जाते. सर्व श्रुती हेच सांगतात. उपनिषदे, वेदांत मताचे सार हेच होय. ५) अनुभव हा अद्वैताचा असतो. म्हणून अनुभवजन्य ज्ञान शब्दांनी प्राप्त होत नाही. साक्षात्काराचे ज्ञान सद्गुरुकडूनच मिळावावयाचे असते. "सोऽहं" हा मंत्र अनेक उपनिषदांनी मूलमंत्र म्हणून सांगितलेला आहे. त्यात अंतिम तत्त्वाचे सरळ व प्रत्यक्ष ज्ञान आहे.

अध्यात्मिक अनुभवाचा प्रारंभ आध्यात्मिक-बीज दर्शनाने होतो. चंदनाच्या किंवा बाभुळाच्या बीसारखा त्याचा आकार असतो. ते गोड व सुवासिकही असते. कधी कधी ते मोती किंवा रत्नासारखेही दिसते. त्याची कांती दिव्य असते. साधकाने आपले अंतःकरण स्थिर ठेवले की हा आपला अनुभवही स्थिर होत जातो. भक्तीत जो स्थिर होतो त्याला हे ईश्वराचे शांत व स्थिर दर्शन होते. त्यासाठी साधकाच्या पाठीशी परंपरेचे बळ असले पाहिजे... हे मोती-दर्शन काळोखातही दिसले तरच तो अनुभव खरा मानावा... हे मोत्याचे दर्शन म्हणजे प्रत्यक्ष देवाचेच दर्शन होय... साधक पूर्ण पवित्र व निष्पाप झाल्याशिवाय त्याला मोती / रत्नदर्शन होणार नाही. साधकाची जसजशी तयारी होत जाईल त्याप्रमाणे त्याच्या अनुभवात वाढ, विकास होत जातो. परमार्थ जीवनास प्रारंभ होतो, त्या वेळी बिंदू किंवा बिंदुले दिसू लागते. गुरुदेवांनी १९३७ सालच्या भारतीय तत्त्वज्ञान कॉंग्रेसच्या अध्यक्ष पदावरून बोलताना त्यास 'स्पिरिटॉन' असा नवा शब्द सुचवला होता. काहींना मोतियांचे जाळे अथवा मोत्यांची माळ दिसते. तेही परमेश्वराचेच रूप असते. वीज चमकून गेल्याचे दर्शन काही साधकांना घडते. आकार किंवा प्रकाश असा स्वतंत्र अथवा दोन्हींचा एकत्र मिश्र अनुभवही येतो. स्फटिकाप्रमाणे पारदर्शक असणारे आत्मलिंग देहात प्रगट होते. यालाही गुरुदेव, कन्नड संत, देव किंवा ब्रह्मदर्शन असेच मानतात. 'वस्तू' म्हणजे गोष्ट किंवा घटना नव्हेत तर 'सत्य स्वरूप' असा त्याचा अध्यात्मामधील अर्थ आहे. उपाधिरहित ब्रह्म म्हणजे वस्तू. 'निरबयलु' असा कन्नड भाषेत अर्थपूर्ण शब्द आहे. ते अगाध आहे. अमेय आहे. सर्वव्यापी व व्यापकतेपलीकडील असे आहे. जगाच्या कानाकोपऱ्यात ती वस्तू सर्वत्र भरलेली दिसेल. 'संतांच्या अंतःकरणात तेवत असलेला हा चिद्घन दिवाच आहे,' असे महिपती या कवीने त्याचे वर्णन केले आहे. हे वस्तुदर्शन फार महत्त्वाचे आहे. जीवनमुक्तीचे हे मूळ आहे. उच्च प्रतीच्या साधकास त्याच्या हृदयात ही अखंड लिंगपूजा चालू असलेली जाणवते. सदैव दृष्टिगोचर होणारे हे लिंग म्हणजे अंतिम परमतत्त्व होय. नादश्रवण, प्रकाशदर्शन हेही एकाच वेळी घडू शकते. कधी प्रकाशाचा महापूर येतो. त्यात अनेकविध नाद व अनंत प्रकारचे रंगही दिसतात !

परमार्थ करणाऱ्याने ऐहिक व पारमार्थिक दोन्ही गोष्टींकडे सारखेच लक्ष ठेवावे. श्रीनिंबरगी महाराजांनी या दोन्ही गोष्टींच्या समन्वयावरच भर दिला होता. संसारासाठी संसार किंवा केवळ परमार्थासाठी परमार्थ असे करू नये, या दोहोंचे एकीकरण होऊन जावे ही अपेक्षा. काहींना तेज नाद व अमृत यांचा संमिश्र अनुभव येतो. संत-सभा, वैकुंठे यांचीही दर्शने होतात. मनोहर बगीचे, भरलेली सरोवरे, भव्य राजवाडे, सोन्याची गोपुरे, यांची दर्शने हीदेखील देवाचीच दर्शने होत. दशविध नाद ऐकू येतात.

सर्वव्यापी शुभ्र चांदणे किंवा सूर्य नसता सूर्यप्रकाश दिसणे, ही सर्व देवाचीच दर्शने असतात. अशा दर्शनांसाठी देवाला जागृत करण्याची मुळीच जरुरी नाही. तो सदैव जागृतच असतो. देवाच्या दर्शनासाठी मनुष्यासच जागे करणे आवश्यक असते.

**देवाचे दर्शन म्हणजे आनंदाचा उगम आहे.** त्याच्याशी समरस होण्यात अनंत, निस्सीम सुख आहे. त्या अनुभवासाठी साधकाचे रोमरंध्र डोळे होऊन उत्सुकतेने उतावीळ होतात. अखंड दर्शनाने अपरिमित भक्तिसुख प्राप्त होते. हेच पारमार्थिक धन होय. ते साधुसंत व सद्गुरूंच्या कृपेने प्राप्त होते. ते दुसऱ्यास कितीही दिले तरी त्याचे वैभव सरत नाही... सामान्य आयुष्य क्षणभंगुर आहे. जिवंत आहात तोवरच देवाशी एकरूप होऊन जा ! धर्म, जाती यांची बंधने बाजूस सारून असा भक्त जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटतो व परमेश्वराशी एकरूप होऊन तो अखिल मानवाचा 'कल्याणकर्ता' बनतो. जीवनमुक्त महात्मा आपल्या देहाविषयी पूर्ण उदासीन असतो. देह राहिला काय किंवा नष्ट झाला काय, त्याचे सुख-दुःख त्यास काहीच वाटत नाही. जीवनमुक्ताच्या सर्व संचित कर्मांचा नाश झालेला असतो... योगिक मानसिक-नैतिक व आध्यात्मिक चिन्हांमुळे हा मुक्त आत्मा सर्व विश्व पवित्र व धवलित करतो. वस्तुतः या ऐक्याचे वर्णन व विवरण करता येत नाही... अशा साक्षात्कारी संतांचा एक स्वतंत्र समाज बनतो. त्यांना सर्व आपद्ग्रस्त व त्रस्त मानवांबद्दल अत्यंत प्रेम वाटते. म्हणून अखिल मानव्याचे कल्याण व्हावे व त्यांचे जीवन सुखी व्हावे एवढ्याचकरिता ते जिवंत राहतात व ईश्वराचा शुभ संदेश या ध्रुवाच्या टोकापासून त्या ध्रुवाच्या टोकापर्यंत, अनादिकालापासून अनंत कालापर्यंत, आकाशात घनगर्जना करीत परिभ्रमण करणाऱ्या एखाद्या मेघाप्रमाणे ते जगास गर्जून सांगतात. गुरुदेवांनी अशा मार्मिक शब्दांत जीवनमुक्त महात्म्यांच्या अवतारकार्याचे रहस्य व प्रयोजन गौरविलेले आहे !

स्वामी विवेकानंदांनीही जवळ जवळ अशाच शब्दांत अवतारी सत्पुरुषांच्या संदर्भात विचार मांडलेले आहेत. 'अशा सत्पुरुषांच्या ठायी अशी काही शक्ती वसत असते की, ते जेव्हा बोलू लागतात तेव्हा अलम दुनियेला त्यांचे म्हणणे ऐकावेच लागते. त्यांच्या बोलण्यातील शब्दन् शब्द थेट हृदयातच जाऊन भिडतो. ऐकणाऱ्या प्रत्येकाला स्तंभित करून त्याच्यावर ते प्रचंड प्रभाव गाजवितात. सत्याचा संचार करण्यासाठी, जगाला काही देण्यासाठीच आलेले ते ईश्वराचे दूत असतात !'

गुरुदेव रानडे यांचे जीवन-चरित्र हेच मुळी अशा योग्यतेचे होते. विसाव्या शतकामध्ये 'भारतीय ऋषि-मुनी, आचार्य' म्हणून गुरुदेव रानडे यांचा गौरव करावा लागेल. असाधारण कोटीतील ते महापुरुष संत होते. देव, नाम, गुरू यावरील त्यांची श्रद्धा अतिशय दृढ होती. त्यांनी आयुष्यभर साधना, उपासना केली. पौर्वात्य आणि पाश्चात्त्य, श्रेष्ठ तत्त्वज्ञानी विचारवंतांच्या मौलिक ग्रंथांचे अवलोकन करून स्वतंत्र बुद्धीने काढलेल्या निष्कर्षावर त्यांचा विलक्षण आत्मविश्वास होता. हा प्रदीर्घ व्यासंग आणि जीवनभर केलेली समर्थ साधना यांच्या आधारावर त्यांनी परमार्थमार्गाची व्यवच्छेदक व सर्वमान्य लक्षणे शोधून काढली. त्यांचे वैयक्तिक जीवन साक्षात्काराच्या दिव्य प्रकाशाने तर उजळून गेलेले होतेच पण त्यांच्या लेखन, मार्गदर्शनाने भारतीय तत्त्वज्ञानाचा परिसरही पुन्हा नव्याने तेजाळून निघाला ! त्यांचा सत्संग जसा साधक, उपासकांना नवनवी स्फूर्ती, प्रेरणा देई तसेच त्यांचे संशोधनही नित्यनव्या उन्मेषांनी प्रगट होत राही. अध्यात्मपर लेखनक्षेत्रात गुरुदेवांनी आपल्या चतुरस्र विद्वत्तेने एक नवे पर्व सुरू केले! त्यातले परमोच्च शिखरही तेच ठरले. कन्नड, मराठी, हिंदी संतांच्या वाङ्मयावर आधारित त्यांचे ग्रंथ तसेच A constructive survey of upanishadic philosophy, History of Indian Philosophy, The Bhagavadgita as a Philosophy of God realisation - यां सारखे त्यांचे इंग्रजी ग्रंथ म्हणजे प्राचीन परमार्थ क्षेत्रातल्या स्वर्गात प्रवेश करण्यासाठी उघडून दिलेली द्वारेच आहेत ! स्वहित तसेच जनहितकारक परमार्थ कसा आचरावा, याचे आदर्श उदाहरण म्हणजे गुरुदेव रानडे यांचे जीवन आणि लेखन, संकलन, संपादनही आहे ! संतहृदय कसे समजून घ्यावे, स्थूलातून सूक्ष्माकडे व सूक्ष्मापासून सूक्ष्मतर विचारांकडे जात जात अंतिम लक्ष्य जे पूर्णत्व ते कसे प्राप्त करून घ्यावे हे गुरुदेवांनी सदैव अधिकारवाणीने सांगितले आहे !

गुरुदेव नेहमीच सॉक्रेटिस, हिरॅक्लायटस, कांट, प्लेटो, कार्लाइल, बर्ग सॉं, यांच्याबरोबरच विचार करीत असत. मात्र गुरुदेवांचा सत्संग रेवणसिद्ध, पुरंदरदास, मुप्पिनमुनी, कुडलरेश, अखंडेश्वर, निंबरगी महाराज, उमदीकर महाराज, गुरुलिंग जंगम महाराज यांचेशी चाललेला असे. तसाच एकनाथ, ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, बसवेश्वर, निजगुण शिवयोगी, यांचेशीही जमून गेलेला असे... कधी कधी तुलसीदास, सूरदास, रैदास, शरीफसाहेब यांच्याशीही त्यांची बैठक असे. उपनिषदे, गीता, ब्रह्मसूत्रे, रामायण, महाभारत, श्रीमद् भागवत यातील महत्त्वाच्या सिद्धांतावर ते याज्ञवल्क्य, मध्वाचार्य, व्यास यांच्याशी वादविवाद करीत असत. अशा आगळ्या परिवारात वावरणाऱ्या, रमणाऱ्या गुरुदेवांचे कल्पनाचित्र आपण आपल्या नजरेसमोर आणू शकलो तरच आपल्याला त्यांच्या योग्यतेची किंचितशी कल्पना येईल. त्यांचा दृष्टिकोन आणि व्यासंग समजला तरच त्यांचे समग्रतेने दर्शन घेता येईल. त्यांनी जी गूढ रहस्ये उकलली आणि जो ध्यास घेतला त्याचा परिचय झाला तर त्यासारखे भाग्य आणि धनप्राप्ती अन्य कोणतीही नाही. गुरुदेवांची श्रद्धा, भक्ती, तर्क, ज्ञान, दर्शन, उपदेश या साऱ्याच गोष्टी थक्क करणाऱ्या तशाच थेट सत्याशी-ईश्वराशी नाते जोडून देणाऱ्या आहेत. अंतरशुद्ध, ज्ञानशील अशा त्या ईश्वरी पुरुषास सादर प्रणाम !

'कन्नड संत वाङ्मयातील परमार्थ मार्ग' हा ग्रंथ गुरुदेवांचेही विलोभनीय दर्शन घडवतो !

**प्रा. म. अ. कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद**
२६३, चैतन्य अपार्टमेंट, इ, ताराबाई पार्क, कोल्हापूर ३.

## • साधकांची पंचसूत्री •

| | | |
|---|---|---|
| १) कर्तव्य | - | नामदृष्टी सतत ठेवणे |
| २) सत्संग | - | पारमार्थिक सहजीवन |
| ३) स्वधर्म | - | निष्ठावंत भाव |
| ४) कसोटी | - | परमार्थाची ओढ, नेमाचा काळ व नेमातील आनंदाचे प्रमाण |
| ५) मुक्ती | - | परमेश्वरी वैभव, सामर्थ्य, ज्ञान व आनंदात सहभागी होणे |

# पू. गुरुदेव रानडे व कन्नड संत

**श्री. कृष्णा शिवराम हेगडे**

*गेले २३ वर्ष महाराष्ट्रातील कन्नड माध्यमाच्या प्राथमिक स्तरावरील कन्नड मातृभाषा पाठ्यपुस्तके तयार करण्याचे काम पहातात. १९९४ पासून पाठ्यपुस्तक मंडळात विद्या सचिव (भाषा) पुणे येथील कन्नड-मराठी स्नेहवर्धन केन्द्राचे संस्थापक, १९८९ पासून सचीव. ४ पुस्तके प्रकाशित. 'श्रम हाच देव' या पुस्तकाला कर्नाटक चिल्ड्रेन्स ॲकॅडमीचा पुरस्कार १९९४.*

प्रस्तुत लेख लिहिण्यासाठी होकार दिल्यानंतर मी थोडाफार चिंतेत पडलो. कारण श्रीगुरुदेव रानडे यांच्याबद्दल फार पूर्वी अभ्यास केला होता. त्यांचा ग्रंथ 'अ पाथ वे टू गॉड इन कन्नड लिटरेचर' याचे दोनदा वाचन केले होते. परंतु गुरुदेव कुठेही एका प्रांताची व्यक्ती होती असे आढळले नाही. कारण ते जन्माने भारतीय असले तरी विचाराने 'विश्वमानव, देवमानव होते.' 'परमेश्वर एकच आहे व त्याची प्राप्ती करून घेणे हा अखिल मानवतेचा धर्म एकच आहे, धर्मभेद खोटे आहेत.' असे ते म्हणत. 'सध्या एक जग आहे' अशी घोषणा सुरू आहे, पण देव एकच आहे असे कुणीच म्हणत नाही. 'एक देव' असे झाल्यावाचून एक जग व एक मानवता कशी एक होणार ? एक देव, एक धर्म, एक मानवता असे श्रीगुरुदेव स्पष्टपणे सांगत. दैवी राज्याची स्थापना केली तरच विश्वशांती प्रस्थापित होऊ शकते अशी त्यांची धारणा होती. अशी थोर व्यक्ती एका प्रांताची किंवा भाषेची होऊ शकत नाही.

३ जुलै १८८६ रोजी कर्नाटकातील जमखंडी येथे जन्मलेले रामचंद्र दत्तात्रय रानडे इ. स. १९०१ मध्ये इंग्रजी शाळेत शिकत असतानाच विजापूरच्या उमदीचे थोर साक्षात्कारी संत पुरुष श्रीभाऊसाहेब महाराज यांच्याकडून त्यांना अनुग्रह मिळाला. या अनुग्रहामुळे सुरुवातीपासून त्यांच्या कुशाग्र बुद्धीची चमक दिसून आली. शिक्षणाच्या सर्वच स्तरातील वर्गात ते प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झाले व पुणे येथे फर्ग्युसन कॉलेजमध्ये इंग्रजी निबंध शिक्षक म्हणून अर्धवेळ रु. ४०/- पगारावर नोकरी पत्करलेले श्रीगुरुदेव तद्नंतर स्वतःच्या योग्यतेने अलाहाबाद विश्वविद्यालयाचे उपकुलगुरुसारख्या मोठ्या पदावर पोहोचले.

श्रीगुरुदेव यांनी श्रेष्ठ ग्रंथकार म्हणून जगात प्रसिद्धी मिळण्यापूर्वी एक अष्टपैलू निबंधकार म्हणून नाव कमावले होते. ग्रीक तत्त्वज्ञानावरील त्यांचे विद्वत्तापूर्ण व संशोधनात्मक लेख जगातील सर्व विद्वानांना खूप आवडले होते. गुरुदेवांनी लिहिण्याकरता प्रथम लेखणी उचलली ती आपल्या सांप्रदायातील गुरु परंपरेच्या सद्गुरुंना म्हणजे श्रीनिंबरगी महाराजांना अनन्यभावे वंदन करून. त्यांची मूळ प्रेरकशक्ती म्हणजे श्रीभाऊसाहेब महाराज उमदीकर. त्यांच्या श्रेष्ठ ग्रंथामध्ये १) नित्यनियमावली, २) बोधसुधा, ३) उपनिषदातील तत्त्वज्ञानाचे विधायक समालोचन, ४) महाराष्ट्रातील संतांचा आत्मसाक्षात्कार, ५) हिंदी साहित्यातील परमार्थपद, ६) भगवद् गीतेतील साक्षात्काराचे तत्त्वज्ञान, ७) कन्नड साहित्यातील परमार्थपद, वेदान्त, रामदास वचनामृत, तुकाराम वचनामृत, भारतीय तत्त्वज्ञानाचा कळस इ. चा समावेश होतो.

या व्यतिरिक्त श्रीगुरुदेवांनी आत्मज्ञान, तत्त्वज्ञान, उपनिषद, वेदान्त इत्यादी अनेक विषयांवर शोधनिबंध सादर केले आहेत. परंतु या लेखात यासंबंधी उल्लेख न करता श्रीगुरुदेवांनी कन्नड संतांबद्दल व कन्नडमध्ये उपलब्ध असलेल्या त्यांच्या साहित्याबद्दल व्यक्त केलेले विचार मी थोडक्यात येथे मांडीत आहे.

सन १९१५ साली बंगलोर येथे संस्कृत ॲकॅडेमीच्या प्रस्थापनेच्या वेळी उपनिषदांवर काही व्याख्याने देण्याकरिता श्रीगुरुदेवांना निमंत्रण देण्यात आले. ही व्याख्याने बडोद्याचे सुविद्य व सुसंस्कृत महाराज श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखाली झाली. ही व्याख्याने पुढे १९२६ साली प्रसिद्ध झालेल्या औपनिषदक तत्त्वज्ञानावरील त्यांच्या ग्रंथाची पूर्वतयारी ठरली. हा ग्रंथ भारतीय तत्त्वज्ञानाचा आमूलाग्र अभ्यास प्रकट करणारा आहे. हा कन्नडमध्ये अनुवादित व्हावा ही गुरुदेवांची इच्छा होती. त्यांचे भाषण ऐकून प्रभावित झालेले कन्नडचे थोर अभ्यासक डॉ. रंगनाथ दिवाकर, ज्ञानपीठ प्रशस्ति विजेते दत्तात्रय रामचंद्र बेंद्रे व श्रेष्ठ विचारवंत शंकरबाळा जोशी यांनी संपूर्ण ग्रंथ 'उपनिषद रहस्यवू' अथवा 'भारतीय अध्यात्मशास्त्रद पीटीकेयु' या नावाने अनुवादित केला आहे.

या ग्रंथात गुरुदेव रानडे यांनी उपनिषदाचे एका वेगळ्या पद्धतीने विवेचन केले आहे. आध्यात्मिक अनुभूतीच्या दृष्टीने हा ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्राचीन व आधुनिक पाश्चात्त्य तत्त्वज्ञान आणि साक्षात्कार शास्त्राच्या अभ्यासामार्फत तुलनात्मक रीतीने मांडलेला ग्रंथ कन्नडमध्ये अनुवादित होऊन कन्नड सारस्वतासाठी एक अमूल्य निधी मिळाला आहे. स्वतः श्रीगुरुदेवांनी हा ग्रंथ मूळ इंग्रजी ग्रंथापेक्षा उत्तमरीतीने अनुवादित झाला आहे, असे उद्गार काढले आहेत. श्रीगुरुदेव रानडे समाधी ट्रस्ट, निंबाळ, विजापूर यांनी केलेला हा अनुवाद प्रयोग अतिशय महत्त्वाचा आहे.

कर्नाटक विश्वविद्यालयाच्या विद्यमाने गुरुदेवांनी 'कर्नाटकातील आत्मानुभव' या विषयावर दोन व्याख्याने दिली. पहिले व्याख्यान धारवाड येथे दि. २६ ऑगस्ट १९५० रोजी तर, दुसरे व्याख्यान बेळगाव येथे २५ नोव्हेंबर १९५१ रोजी देण्यात आले. ही दोन्ही व्याख्याने साहित्यिकांना खूप आवडल्याने श्रीगुरुदेवांनी या विषयावर सर्व समावेशक अशी एक व्याख्यानमाला द्यावी अशी कर्नाटक विश्वविद्यालयाचे तत्कालीन कुलगुरु डॉ. डी. सी. पावटे यांनी विनंती केली व ही व्याख्याने ग्रंथरूपाने प्रसिद्ध करण्याचे आश्वासन दिले.

श्रीगुरुदेवांनी डॉ. डी. सी. पावटे यांचे आमंत्रण आनंदाने स्वीकारले आणि या विषयावर एकूण २० व्याख्याने देण्याचे मान्य केले. त्याप्रमाणे त्यांनी १२ व्याख्याने धारवाड येथे तर दोन व्याख्याने विजापूर येथे दिली. पण दुर्दैवाने राहिलेली ६ व्याख्याने देण्यापूर्वीच भगवंताने आपल्या या 'प्रेषिताला' आपल्याकडे बोलावून घेतले. तद्नंतर कुलगुरु डॉ. डी. सी. पावटे यांनी श्रीगुरुदेवांचा हा महान ग्रंथ पूर्ण करण्याकरता श्री. रंगनाथ दिवाकर यांच्या अध्यक्षतेखाली एक त्रिसदस्यीय समिती स्थापन केली. या समितीने गुरुदेवांच्या टिपणांच्या आधारे व्याख्यानमालेतील अपुऱ्या राहिलेल्या ६ व्याख्यानांचाही समावेश केला.

कर्नाटक विश्वविद्यालयाच्या सूचनेनुसार मुंबईच्या भारतीय विद्याभवन या संस्थेने हा ग्रंथ सन १९६० मध्ये प्रकाशित केला. मुंबईच्या भारतीय विद्याभवनाच्या या मूलग्रंथाचा आधारग्रंथ 'परमार्थ सोपान' या नावाने

प्रसिद्ध झाला व याचे परीक्षण रंगनाथ दिवाकर यांनी केले. या ग्रंथाचा कन्नड अनुवाद श्री. मनोहर देशपांडे यांनी केला. व ही दोन्ही पुस्तके कर्नाटक विश्वविद्यालयामार्फत प्रसिद्ध करण्यात आली.

या ग्रंथाच्या ध्येयोद्देशाबद्दल श्रीगुरुदेव रानडे म्हणतात, 'कर्नाटकातील हे श्रेष्ठ अनुभवी संत शैव व वैष्णव या दोन पंथांचे अनुयायी आहेत. पण खरा अनुभवी शैवही नसतो, वैष्णवही नसतो. आम्ही इथे त्यांच्यातील समान पारमार्थिक अनुभवांबद्दल विचार करणार आहोत त्यांच्यातील मतीय भिन्नतेबद्दल नव्हे. त्यांनी आत्मसाक्षात्कार तत्त्वज्ञानाच्या वाढीला आपल्या स्वतःच्या अनुभवाद्वारे कशा प्रकारे सहाय्य केले एवढेच आम्हाला इथे सांगावयाचे आहे.'

## आदरभाव

श्रीगुरुदेव यांना कर्नाटकातील संतांबद्दल अत्यंत आदरभाव होता. हे संत हिंदी संत व महाराष्ट्रीय संतांपेक्षा कोणत्याही दृष्टीने कमी नाहीत एवढेच नव्हे तर काही बाबतीत ते इतर भारतीय संतांपेक्षा वरचढ आहेत असे गुरुदेवांचे म्हणणे होते. ते लिहितात, 'कर्नाटकातील या संतांनी (Mystics) जगातील संतांमध्ये अतिशय उन्नत असे स्थान मिळवले आहे. त्यांनी जागतिक आत्मज्ञान तत्त्वाला उल्लेखनीय अशी देणगी दिली आहे.'

श्रीरानडे यांनी कर्नाटकातील संत आणि जगातील इतर प्रमुख संत यांच्यामध्ये केलेली तुलना पाहण्यासारखी आहे. ते म्हणतात, 'ग्रीक तत्त्वज्ञानांपैकी सॉक्रेटिस हे अल्लंप्रभुसारखे; प्लेटो बसवेश्वरांसारखे आणि फीडो चेन्नबसवेश्वरांसारखे वाटतात. सर्वज्ञ हा हिरोक्लिटससारखा वाटतो. ख्रिश्चन संतांशी तुलना होईल असेही संत कर्नाटकात आहेत. अल्लंप्रभूची येशू ख्रिस्ताशी; बसवेश्वरांची संत पॉलशी आणि चेन्नबसवेश्वरांची मार्टिन लूथरची तुलना होऊ शकते. महाराष्ट्रातील संतांच्याकडे वळल्यास तेथेही अशा प्रकारच्या तुलनेला बराच वाव आहे. बसवेश्वर हे तुकाराम महाराजांना समान असे संत आहेत. संघटना सामर्थ्य व भक्तिप्रसाराच्या दृष्टीने पाहिल्यास चेन्नबसवेश्वर आणि समर्थ रामदास हे दोघेही सारखे वाटतात. जगन्नाथदास व निजगुण शिवयोगी हे दोघे ज्ञानसंपदा आणि साहित्यनिर्मिती या क्षेत्रात संत एकनाथ महाराजांसारखे वाटतात. कनकदास हे एका दृष्टीने कर्नाटकातील चोखामेळाच आहेत. काव्यनिर्मिती व अनुभवांच्या क्षेत्रात या दोघांमध्ये अंतर आहेच हे जरी खरे असले तरी हे दोघेही मोठे विद्वान, श्रेष्ठ कवी व महान आत्मसाक्षात्कारी पुरुष होते.'

श्रीगुरुदेव हे हिंदी व कन्नड संतांचीही तुलना करतात. ते म्हणतात, 'अशाच प्रकारची समानता हिंदी व कन्नड संतांमध्येही पहावयास मिळते. हिंदी साहित्यात तुलसीदासांना असलेले स्थान, कन्नड साहित्यात पुरंदरदासांना आहे. साहित्याच्या दृष्टीने दोघेही सारखे असले तरी पारमार्थिक अनुभवांच्या क्षेत्रात पुरंदरदास हे तुलसीदासांपेक्षा वरचढ आहेत. तुलसीदासांप्रमाणे पुरंदरदासांनीसुद्धा आपल्या साधनास सगुण भक्तीने प्रारंभ केला असला तरी पुढे ते अत्यंत श्रेष्ठ असे योगी झाले. अशा काही स्वरूपात कन्नड संत शिशुनाळ शरीफ साहेबांची तुलना संत कबीरदासांशी व कनकदासांची तुलना संत रोहिदासांशी व कन्नडचे सर्पभूषणांची तुलना चरणदासांशी होऊ शकते.'

कर्नाटकातील प्रत्येक संतांचा अभ्यास श्रीगुरुदेव यांनी अत्यंत बारकाईने केलेला आहे.

**श्री. कृष्णा शिवराम हेगडे**
विद्यासचिव, भाषा व संकीर्ण, पाठ्यपुस्तक मंडळ, पुणे ४.

# परमार्थाचा सोपान : गुरुदेवांचे योगदान

**डॉ. मधुसूदन बोपर्डीकर**

*बी. ए. (ऑनर्स) संस्कृत, मराठी, एम.ए. संस्कृत, मराठी, एम.ए. अर्धमागधी, पाली, एम.ए., प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती. पीएच.डी. संस्कृत, अ. भा. गांधर्व महाविद्यालय एम.ए. (संगीत अलंकार) एम.ए. संस्कृत यार्दी वेदान्त पारितोषिक. ३४ वर्षे अध्यापन व प्राचार्य म्हणून निवृत्त. संस्कृत, अर्धमागधी व प्राचीन भारतीय संस्कृती अध्यापन व संशोधन मार्गदर्शक. मराठी विश्वकोश व मराठी तत्त्वज्ञानकोश कार्यात सहभाग, लेखन, संपादन व प्रकाशन, संगीत नाटक दिग्दर्शन, सार्थसंगत ऋग्वेद, स. ह. कुलकर्णी, ज्ञान प्रबोधिनी पुरस्कार व निरनिराळ्या संस्थांवर सल्लागार. पुणे, नगर, मुंबई आकाशवाणी संगीत विषयक कार्यक्रम व व्याख्यानांचे प्रक्षेपण.*

आधुनिक भारतीय तत्त्वज्ञानाच्या परंपरेत गुरुवर्य डॉ. रा. द. रानडे या नावाला वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. त्यांनी सांगितलेला साक्षात्कार वाद एकूण भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासात युगप्रवर्तक ठरला आहे. आद्य शंकराचार्य, इतर आचार्य, श्रीज्ञानेश्वर यांच्याप्रमाणेच भारतीय तत्त्वज्ञानाचा साक्षात्कारवादी अन्वयार्थ साधार लावणारे गुरुदेव खरोखरीच क्रांतदर्शी जागतिक कीर्तीचे तत्त्वचिंतक ठरतात. उपनिषदे आणि गीतेप्रमाणेच महाराष्ट्रीय संतवाङ्मयाचाही त्यांनी साक्षात्कारवादी अर्थ लावला असून श्रीज्ञानेश्वरांपासून श्रीतुकारामांपर्यंतच्या ५ शतकातील महाराष्ट्रातील परमार्थाचाही साक्षात्काराच्या दृष्टिकोनातून विचार केला असून या प्रकारच्या अनुभूतीसाठी 'नामस्मरण हाच परमार्थ' हा एकमेव सोपा मार्ग असल्याचे सिद्ध केले आहे. त्यासाठी महाराष्ट्रीयन संत-युगाचे चार कालखंड कल्पिले असून या चारही कालखंडांचा सूक्ष्म व स्थूल अभ्यास करून आढावा घेतला आहे. ते ४ कालखंड असे –

१) श्रीज्ञानेश्वरांचा कालखंड, २) श्रीनामदेव व अन्य संतांचा कालखंड, ३) एकनाथांचा कालखंड व ४) तुकाराम-रामदासांचा कालखंड. या ४ कालखंडातील प्रत्येक संत, त्याचा प्रत्येक ग्रंथ यांचा मूलगामी सूक्ष्म अभ्यास त्यांनी केला आणि एकूण ५०० वर्षातील परमार्थाच्या वाटचालीचा तौलनिक व चिकित्सक परामर्षही घेतला आहे. हे सर्व करण्यासाठी संपूर्ण संतसाहित्याचा सखोल व डोळस अभ्यास करून महत्त्वाच्या सर्व ग्रंथातील सारभूत वचनांची निवड करून 'वचनामृतांचे' ५ ग्रंथ साकार केले. त्यात ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास आणि संत वचनामृतांचा समावेश होतो.

हे पाच ग्रंथ संकलनात्मक आहेत हे खरे. पण मुळात हजारो ओव्या-अभंगांचे आलोकन करायचे व त्यातून निवडक भाग संकलीत करायचा. एक प्रकारे दुधातून नवनीत काढायचे हेही काम वाटते तितके सोपे नाही. हे कार्य करूनच परमार्थाचा अवघड सोपान, गुरुदेवांनी जनसामान्यांसाठी सोपा करून ठेवला. हेही एक अपूर्व योगदानच ठरते.

पण एवढे करूनच गुरुदेव थांबले नाहीत. त्यांनी प्रत्येक वचनामृताला लिहिलेली प्रस्तावना इतकी अभ्यासपूर्ण आहे की, केवळ निवडक वेच्यांचाच नव्हे तर विशिष्ट संत आणि ग्रंथ यांचे हृदय उकलून दाखविणारे हे प्रास्ताविक म्हणजे त्या संताचे आणि ग्रंथाचे विश्वरूप दर्शन घडविणारे गवाक्ष आहे असेच म्हणावे लागते.

या लेखांत, गुरुदेवांच्या ५ वचनामृतांच्या प्रास्ताविकांचा अभ्यास करून, महाराष्ट्रीय तत्त्वज्ञानाचा ५०० वर्षांचा इतिहास, विशिष्ट संतांच्या तत्त्वज्ञानाचे, कार्याचे मूल्यमापन, काही संत व ग्रंथ यांचे तौलनिक परीक्षण, व्यक्ती, तत्त्व, इतिहास याबद्दल चिकित्सक चर्चा हे सर्व गुरुदेवांचे कार्य, शक्यतो त्यांच्याच शब्दात (मूळ आधारासह) वाचकांच्या निदर्शनास आणून देण्याचा प्रयत्न आहे. गुरुदेवांच्या या ज्ञानकोशसदृश कार्यामुळे महाराष्ट्रीय परमार्थमार्गाचा सोपान, सोपा झाला असून संतवाङ्मयाकडे डोळस नजरेने पाहण्याची प्रेरणा गुरुदेवांच्या योगदानातून लाभणार आहे.

## १. संतांच्या तत्त्वज्ञानाचे मूल्यमापन

श्री ज्ञानेश्वरांपासून श्रीतुकारामांपर्यंत महाराष्ट्रीय संतांनी सांगितलेल्या तत्त्वज्ञानाचे भारतीय तत्त्वज्ञानाच्या इतिहासातील नेमके स्थान गुरुदेव साक्षेपाने सांगतात ते असे –

अ) रामानुज, आनंद हा ईश्वराचा गुण मानतात तर शंकराचार्य ईश्वर आनंदरूप मानतात. परमात्म स्वरूपाविषयी ज्ञानेश्वरांनी व्यक्त केलेले विचार शंकराचार्यांच्या मताशी ताडून पहाण्यासारखे आहेत. जग म्हणजे चिद्विलास किंवा 'जग असकी वस्तुप्रभा' हा सिद्धांत मांडताना ज्ञानेश्वर म्हणतात की, जगद्रूपाने प्रकट होण्यात त्या स्वयंप्रकाश परमात्म्याच्या एकत्वास यत्किंचितही बाधा येत नाही. (ज्ञानेश्वरवचनामृत पृ. ९).

आ) नामदेवरायांसारखा भक्त निर्माण झाला नसता तर आजचे विठ्ठल भक्तीचे विस्तीर्ण स्वरूपही लोकांच्या नजरेस पडले नसते. नामदेवराय हे विठ्ठल भक्तीचा पाया होत असे म्हणण्यास काही हरकत नाही. (संतवचनामृत, पृ. २४). नामदेवांसारखा भक्त झाला नसता तर पंढरीचे माहात्म्यही वाढले नसते. (तत्रैव, पृ. २५.)

इ) देवास जाणण्याची कला ही एक निसर्गदत्त देणगी आहे, असे नामदेवांचे मत आहे. (तत्रैव, पृ. ३२) (उपजताचि फुल मोगऱ्याच्या माथा। त्यासी परिमलता कोणे लावियेली ।।

– नामदेवांचा अभंग १३५, पृ. ४.

(ई) त्यांच्या (एकनाथांच्या) प्रपंचाविषयी बोलायचे तर तो केव्हाच परमार्थरूप होऊन गेला होता. (एकनाथवचनामृत, पृ. ५.)

उ) तुकारामांचे अभंग म्हणजे त्यांचे एक व्यावहारिक व पारमार्थिक आत्मचरित्रच होय. (तुकाराम वचनामृत, पृ. ३).

ऊ) तुकाराम स्वानुभवाधिष्ठित झाल्यावर त्यांच्या तोंडचे जे शब्द निघाले त्यांची किंमत विशेषच आहे. ज्या मनुष्याची निरहंकारी वृत्ती झाली त्याच्या तोंडचे शब्द हे त्याचे नसून त्याच्या तोंडून ते देव बोलवितो असे तुकारामांनीच सांगितले. (तत्रैव, पृ. १३).

ए) नामदेवांनंतर तुकारामांसारखा साक्षात्कारी कीर्तनकार झाला असेल किंवा नाही याची शंकाच आहे. (तत्रैव, पृ. १६).

ऐ) संतांची लक्षणे सांगण्यास तुकारामांइतका अधिकारी कोण आहे? (तत्रैव, पृ. २०).

ओ) ज्या संतांस परमार्थाचे बिकट वर्म कळते त्या संतांस व्यवहार कळणार नाही, असे कधी होणे शक्य नाही. तुकारामांइतके मोठे सत्पुरुष होते, तथापि त्यांचे व्यवहारचातुर्य फार अलौकीक होते. (तत्रैव पृ. २५).

औ) रामदासांसारखे कर्मयोगी रामदासच होत. परमार्थाचा अनुभव घेऊन जगात योग्य रीतीने वर्तणूक करण्याचे भाग्य थोड्या साधूसंतांना लाभते. विशेषकरून त्यांच्या दासबोध ग्रंथात पारमार्थिक कर्मयोग्याची वर्तणूक कशी असावी याबद्दल त्यांनी जे विचार प्रकट केले आहेत, ते आपल्या स्वतःच्याच अनुभवांवरून केले आहेत. (रामदासवचनामृत, पृ. २३).

अं) रामदास इतके बुद्धिवादी होते तथापि त्यांच्या अंतःकरणात करुणेचा पाझर होता, हे त्यांच्या असंख्य करुणाष्टकांवरून सिद्ध होते. करुणाष्टकातील करुणावचनांवरून ज्ञान व भक्ती यांची रामदासात किती उत्तम सांगड होती हे दिसून येईल. (तत्रैव, पृ. २७-२८).

## २. विविध संतांच्या कार्याची तुलना

गुरुदेवांनी विशिष्ट संतांच्या कार्याचे व तत्त्वज्ञानाचे मूल्यमापन केले नसून वेगवेगळ्या युगातील संतांच्या योगदानाची तुलनाही केलेली आहे. ही तुलना कुणाला श्रेष्ठ-कनिष्ठ ठरविणारी नसून, एकमेकांच्या कार्याच्या संदर्भात प्रत्येकाचे वेगळेपण सहज ध्यानात यावे यासाठी गुरुदेवांनी केली आहे. वास्तविक ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम यांसारख्या विभूतींची तुलना होऊच शकत नाही. परंतु गुरुदेवांसारखा अधिकारी व्यक्तीच हे धाडस करू शकतो व त्यामुळे आपणासारख्या सामान्यजनांना अनायासेच फायदा होतो. वानगीदाखल गुरुदेवांचे काही उतारे या संदर्भात पहाण्यासारखे आहेत.

अ) ज्ञानदेवांमध्ये वैराग्ययुक्त बोल फारसे दिसत नाहीत. नामदेव-तुकारामांच्या अंतःकरणात देवाच्या प्राप्त्यर्थ ज्याप्रमाणे खळबळ उडून राहिली, अगर देवाची कृपा होण्याकरिता ज्याप्रमाणे रामदासांनी असंख्य करुणाष्टके केली त्याप्रमाणे वैराग्ययुक्त बोल ज्ञानेश्वरांमध्ये फारच थोडे आढळतात. ज्ञानेश्वरांस ईश्वर प्राप्त्यर्थ फारच थोडे श्रम पडले असावेत असे वाटते. त्यांच्या सर्व ग्रंथांत येथपासून तेथपर्यंत आनंदाची व अधिकाराची वाणी दिसते.

संतवचनामृत, पृ. १४.

आ) चांगदेव व ज्ञानदेव यांचा संबंध म्हणजे हठयोग व राजयोग यांचा संबंधच होय. (तत्रैव, पृ. २०).

इ) विठ्ठलभक्तीचा प्रसार दीर्घकाल करण्याचे श्रेय ज्ञानेश्वरांस जरी लाभले नाही तथापि त्यांच्या नंतर पन्नास वर्षे राहून नामदेवांनी विठ्ठलभक्तीचा वृक्ष फारच विस्तीर्ण केला, हे त्यांचे भाग्य होय. (तत्रैव पृ. २४).

ई) ज्ञानेश्वर ही ज्ञानाची मूर्ती व नामदेव ही भक्तीची मूर्ती असल्याने त्यांच्या संयोगामुळे ज्ञान व भक्ती या दोहींसही महत्त्व चढले. (तत्रैव पृ. २५).

उ) सर्व भक्तांमध्ये नामदेव व तुकाराम हे अत्यंत आतूर भक्त होते. (तत्रैव पृ. २९).

ऊ) नामस्मरणाचे महत्त्व नामदेवांनी जितके गायिले आहे तितके इतर संतांनी क्वचितच गायिले असेल.

(ए) एकनाथांची जनार्दनाबद्दलची गुरुभक्ती ज्ञानेश्वरांच्या निवृत्तिनाथांबद्दलच्या गुरुभक्ती इतकीच खडतर आहे. (तत्रैव पृ. ४०.)

## ३. विशिष्ट ग्रंथांचे मूल्यमापन

महाराष्ट्रीय संतांची व त्यांच्या ग्रंथसंपदेची संख्या विपूल आहे. संतवाङ्मयाचा धांडोळा घेत असताना बहुधा सर्वच ग्रंथांचे समीक्षण गुरुदेवांनी केले आहे. ग्रंथनिर्मितीचा इतिहास, त्याचा आशय व अभिव्यक्ती व तत्त्वज्ञान व साहित्याच्या इतिहासातील त्यांचे स्थान याचे विवेचक मूल्यमापन ते करतात. त्यापैकी दोन ग्रंथांचे गुरुदेवांचे विवेचन पाहू या.

१) रुक्मिणीस्वयंवर हे शके १४९३ मध्ये लिहिलेले एकनाथांचे लोकप्रिय काव्य मराठी वाङ्मयात एका दृष्टीने अपूर्व आहे. कारण या काव्यात केवळ कृष्णरुक्मिणीची विवाहकथा सांगितलेली नसून जीवशिवाच्या ऐक्यावर रचलेले हे एक सर्वांगसुंदर व विस्तृत रूपक आहे. (एकनाथवचनामृत, पृ. ८)

२) भावार्थ रामायण म्हणजे वाल्मीकी रामायणाचा केवळ अनुवाद नाही तर त्यात एकनाथांनी रामकथेवर एक विस्तृत असे आध्यात्मिक रूपक रचिलेले असून त्यामुळे एकनाथांच्या या ग्रंथास अध्यात्म रामायण हे नाव अधिक शोभून दिसेल. त्यांनी लावलेला रामकथेचा अर्थ जसा आध्यात्मिक तसाच सामाजिकही आहे. या दृष्टीने विचार केल्यास हे भावार्थ रामायण म्हणजे एकनाथकालीन महाराष्ट्राचा पारमार्थिक उषःकालच आहे.

## ४. महत्त्वाच्या ग्रंथांची तुलना

विशिष्ट ग्रंथाचे मोठेपण सांगूनच गुरुवर्य थांबत नाहीत तर वेगवेगळ्या ग्रंथांचा तुलनात्मक अभ्यास करून त्यांच्यामधील साम्य-भेद स्पष्ट करतात. या प्रकारच्या विश्लेषणात्मक अभ्यासामुळे संबंधित ग्रंथांच्या आकलनासाठी चांगलीच मदत होते. उदाहरण म्हणून पुढील उतारे महत्त्वाचे आहेत :

अ) ज्ञानेश्वरांचे साक्षात्कारविषयक अभंग इतके उत्कृष्ट आहेत की ते त्याबाबतीत ज्ञानेश्वरीसही थोडेबहुत मागे टाकतील असे म्हणण्यास हरकत नाही. ज्ञानेश्वरीमध्ये जसे उच्च दर्जाचे तत्त्वज्ञान दिसते त्याप्रमाणे त्यांच्या अभंगांमध्ये भक्तिरस व स्वानुभव विशेषकरून दिसतात. (संतवचनामृत, पृ. १२.)

आ) (चांगदेव) पासष्टीतील जवळ जवळ प्रत्येक ओवीस ज्ञानेश्वरी अगर अमृतानुभव यांमधून समानार्थक ओवी काढून दाखविता येईल. (तत्रैव, पृ. २१)

## ५. महाराष्ट्रीय परमार्थाचा पाच शतकाचा इतिहासपट

व्यक्तिगत संत व त्यांच्या ग्रंथांचे गुरुदेवांनी केलेले मूल्यमापन पाहिल्यानंतर ज्ञानोबा ते तुकोबा पायापासून कळसापर्यंत, ५०० वर्षांच्या कालखंडात महाराष्ट्रात परमार्थाचा जो इतिहासपट निर्माण झाला त्याचे विहंगम दर्शन गुरुदेवांनी आपल्या प्रास्ताविकात घडविले आहे. त्यावरून

परमार्थाचा, भक्तिमार्गाचा शुभारंभ आणि त्यात कालाच्या ओघात घडून आलेली परिवर्तने महाराष्ट्राच्या तत्त्वज्ञानाचे स्थूल दर्शन घडविणारे आहेत. या संदर्भात गुरुदेवांची निरीक्षणे मुळातून पहाण्यासारखी आहेत –

अ) ज्ञानेश्वरांच्या काळाकडून एकनाथांच्या काळाकडे वळणे म्हणजे वैभव संपन्नतेकडून दुःखदारिद्र्याकडे वळणे आहे. (एकनाथवचनामृत, पृ. ६).

आ) गुरुदेव म्हणतात – आम्ही श्रीज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानास बुद्धिनिष्ठ साक्षात्कारवाद म्हटले आहे. कारण त्यास भगवद् गीतेतील तत्त्वज्ञानाचा पूर्ण आधार आहे. (मराठी संत वाङ्मयातील परमार्थ मार्ग, पृ. १८१).

इ) श्रीज्ञानदेवांनी (हा) अनुभूतिशास्त्राचा बुद्धिनिष्ठ मजबूत पाया घातल्यावर त्यावर भक्तिमंदिर उभारण्याचे इतर संतांचे कार्य अवघड नव्हते. (तत्रैव १८३).

ई) नामदेवांच्या काळातील सर्व संत विश्वबंधू आहेत. यांचा भक्तिमार्ग म्हणजे एक प्रकारची पारमार्थिक लोकशाही आहे. (तत्रैव पृ. २०७), या काळातील संतांनी आपला काटा सर्वव्यापी देवाच्या भक्तीकडे झुकविला. (तत्रैव पृ. २०८) एकनाथांच्या कालखंडातील संतांमध्ये प्रपंच व परमार्थ यांचा विलक्षण समन्वय आढळून येतो. (तत्रैव पृ. २५०) ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानाविषयी 'ते अंतराळात राज्य करीत होते' असे म्हणता येईल. एकनाथांचे तत्त्वज्ञान पृथ्वीतलावर आले व सामान्य लोकात मिसळून राहिले. (तत्रैव पृ. २५१).

उ) तुकारामांच्या आध्यात्मिक चरित्राचा व शिकवणीचा एकंदरीत आढावा घेतला तर आम्ही ज्याला व्यक्तिगत वैशिष्ट्यपूर्ण साक्षात्काराचा प्रकार म्हटले त्याचे हे उदाहरण आहे. (तत्रैव पृ. ३३८). श्रीज्ञानेश्वर म्हणजे डोळे दिपविणारा प्रकाश, तर श्रीतुकाराम म्हणजे आपल्या दृष्टीस जमवून घेता येईल असा शांत व हळूहळू वाढणारा प्रकाश आहे. याने डोळे दिपत नाहीत. म्हणून मानवी व व्यक्तिनिष्ठ असे गुणधर्म इतर कोणत्याही महाराष्ट्र संतांपेक्षा श्रीतुकारामांमध्ये विशेष आहेत असे आमचे मत आहे. (तत्रैव पृ.३३८)

(ऊ) कर्मयोगाचा उपदेश हा श्रीरामदासांच्या शिकवणुकीचा मुख्य विशेष आहे. ईश्वरावर निष्ठा ठेवून कर्तव्यकर्म करावे हे तत्त्व कोणत्याही महाराष्ट्रीय संतांपेक्षा जास्त तीव्रतेने श्रीरामदासांनी जनतेस शिकविले यात शंका नाही. (तत्रैव पृ. ४०२)

## ६. चिकित्सक समीक्षा

हजारो ओव्या व अभंग रचनांमधून गुरुदेवांनी यथार्थ, अर्थपूर्ण व अति महत्त्वाच्या उताऱ्यांची केवळ निवडच केली नाही व त्यांचे मूल्यमापन केले नाही तर विशिष्ट वादग्रस्त मुद्द्यांविषयी चिकित्सक समीक्षणही केले आहे. विवाद्य विषयाबद्दलचा इतर संशोधकांच्या मतांचा समतोल परामर्श घेतला असून आपले विधायक मत निर्भिडपणे मांडले आहे. अर्थातच महाराष्ट्रीय परमार्थाच्या अभ्यासाला त्यामुळे गती लाभली आहे. गुरुदेवांचे समीक्षण व संशोधन दर्शविणारे काही उतारे असे आहेत –

अ) अभंगकार ज्ञानेश्वर निराळे व ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर निराळे - या संदर्भात भिंगारकर, भारद्वाज वगैरेंची मते देऊन अभंगकार व ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर एकच असल्याचे ठाम मत गुरुदेवांनी मांडले आहे. त्यासाठी या ग्रंथातील विचारभांडार एकच असून कल्पनासाम्यही आहे हे त्यांनी साधार दाखविले आहे. (संतवचनामृत पृ. ९-१२).

आ) ज्ञानेश्वरीमध्ये विठ्ठल भक्तीबद्दल उल्लेख नाहीत या आक्षेपाचा विचार करताना गुरुदेव ज्ञानेश्वरीत १२.२१४-२१८ या ओव्या उद्धृत करतात. (ज्ञानेश्वरवचनामृत, पृ. २२) व त्या पंढरपूरच्या विठ्ठलासच अनुलक्षून लिहिल्या गेल्या असाव्यात, असे दाखवून (पृ. २३) ज्ञानेश्वरीकार विठ्ठलभक्त होते असे म्हणतात. (पृ. २५).

इ) मुकुंद राजापेक्षा 'महानुभाव पंथ' अगर 'महात्म पंथ' यातील ग्रंथकारांच्या भाषाशैलीशी ज्ञानेश्वरांची भाषा फार जुळते. (ज्ञानेश्वर वचनामृत, पृ. १४).

ई) चांगदेव १४०० वर्षे जिवंत राहिले या समजुतीचे तर्कसंगत स्पष्टीकरण गुरुदेव देतात (संतवचनामृत, पृ. २०).

उ) तुकारामांच्या अभंगांचे Psychology Mysticism च्या दृष्टीने फारसे अध्ययन कोणी केले नाही. ईश्वर साक्षात्काराच्या मार्गात मनात ज्या अनंत ऊर्मी उठतात व जे अनंत अनुभव येतात त्यांचे निरीक्षण करून ईश्वरप्राप्तीचा अंतर्मार्ग काय आहे त्याबद्दल तुकारामांच्या चरित्रापासून आपल्याला पुष्कळ बोध घेता येण्याजोगा आहे. (तुकाराम वचनामृत, पृ. ७).

ऊ) श्रीसमर्थ रामदासांच्या चरित्राविषयी विशेषतः त्यांनी शिवाजीला दिलेल्या अनुग्रहाच्या काळाच्या संदर्भात अनेक मते उद्धृत करून गुरुदेवांनी सविस्तर चर्चा केली आहे. (रामदासवचनामृत, पृ. ७-१२).

## ७. संकलनामागील गुरुदेवांची संकल्पना

प. पू. गुरुदेव रानडे यांनी संतवचने एकत्रित करून एक प्रकारे त्या त्या ग्रंथाच्या 'अवतरणिका' भावी पिढ्यांकरिता उपलब्ध करून दिल्या आहेत. हे करण्यामागील त्यांची उद्दिष्टे त्यांच्याच शब्दात पहाण्यासारख्या आहेत –

अ) प्रस्तुतच्या ग्रंथामुळे (ज्ञानेश्वर वचनामृत) मूळ ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाकडे लक्ष जाईल तर प्रस्तुत लेखकास धन्यता वाटेल. (ज्ञानेश्वरवचनामृत, पृ. ५३).

आ) सर्व ग्रंथांच्या प्रास्ताविकात 'स्थलसंकोचा'स्तव जास्त खोलात जाता येत नाही. या विषयावर अधिक संशोधन व काम होणे गरजेचे आहे असे गुरुदेव वारंवार निवेदन करतात व भावी अभ्यासाची दिशा दाखवितात.

इ) ही पाच वचनामृते तयार करून प्रो. रानडे यांनी कोणत्याही विषयाचा पद्धतशीर अभ्यास कसा करावा याचा एक नमुनाच सर्वांपुढे ठेवला. (गुरुदेव रानडे चरित्र, तत्त्वज्ञान, पृ. १८१, डॉ. शं. गो. तुळपुळे).

ई) गुरुदेवांचे पुढील उद्गारही या संदर्भात चिंतनीय आहेत :

1, I prefer to speak through others.

2) I am brief, because I want to be read.

व्यक्तिशः मीसुद्धा याच वचनांचा आधार घेऊन गुरुदेवांच्या 'वाङ्मयीन' मूर्तीचे दर्शन घडविण्याचा प्रयत्न केला आहे.

**डॉ. मधुसूदन बोपर्डीकर**

स्वरानंद, प्राध्यापक वसाहत, अहमदनगर ४१४००१.

# गुरुदेवांच्या दृष्टिकोनातून ज्ञानेश्वर

**प्रा. अजित कुलकर्णी**

*बी.ए. (तत्त्वज्ञान), एम.ए. (तत्त्वज्ञान) (समाजशास्त्र) रजिस्ट्रार बी. एम. सी. सी. कॉलेज. पुस्तके, लेखमाला प्रसिद्ध. गेली २५ वर्षे प्रवचन, कीर्तन, व्याख्यान. श्रीज्ञानेश्वरी, भागवत, दासबोध, रामकृष्ण, विवेकानंद इ. गाढा अभ्यास. शंकराचार्यांकडून गौरव पुरस्कार, पुणे महानगरपालिका आदर्श शिक्षक व गौरव पदक. धर्मभूषण पदवी - श्रीमत् जगद्‌गुरु शंकराचार्य (पुरी) १९९६.*

**ज्ञानेश्वरी –** गुरुदेव रानडे हे एक थोर तत्त्ववेत्ते होते. पाश्चिमात्य व पौर्वात्य तत्त्वज्ञानाचा त्यांनी सखोल अभ्यास केला होता. ईश्वराचा साक्षात्कार, ब्रह्मप्राप्ती व आत्मानंद प्राप्ती या विकासक्रमाने त्यांनी आपले तत्त्वचिंतन व्यक्त केले आहे आणि तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणे विश्वाचे 'गुरुदेव' बनले –

***देव पहावाया गेलो, तेथे देव होवुनी गेलो ।***
***तुका म्हणे धन्य झालो, आजी विठ्ठल भेटलो ॥***

गुरुदेवांनी ज्ञानदेव व ज्ञानेश्वरीचे चिंतन व्यक्त करताना ज्ञानदेवांचे जीवन, राजकीय स्थिती, सामाजिक जीवन याचा त्यांनी सविस्तर उहापोह केला असून, ज्ञानदेवांच्या साहित्यांवर त्याचा होणारा परिणाम लक्षात घेवून त्याचा सांगोपांग मागोवा घेतला आहे.

ज्ञानदेवांच्या काली समाजात महानुभाव पंथ व नाथसंप्रदायाच्या परंपरा प्रचलित होत्या. महाराष्ट्रात स्वातंत्र्य, सुबत्ता व शांती होती. नुसत्या वैदिक ज्ञानानी लोकांचा व समाजाचा विकास घडणार नाही व आत्मज्ञानही होणार नाही, हे ओळखून ज्ञानदेवांनी गीतेची टीका ज्ञानेश्वरी लिहिली हे गुरुदेवांचे मत होते.

पहिल्या विभागात ज्ञानेश्वरी रचना काळ सांगताना, ज्ञानेश्वर एक का दोन याचा विचार सांगून, गुरुकृपा, गुरु म्हणजे चित्सूर्य सांगून ज्ञानदेवांच्या विलक्षण नम्रतेचे कौतुक गुरुदेवांनी केले आहे.

दुसऱ्या विभागात ज्ञानेश्वरीतील तत्त्वज्ञानाचा विचार मांडला आहे. प्रकृती आणि पुरुष हा भाग घेवून एकूण २४ मथळ्याखाली चिंतन मांडले आहे. ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानाची मांडणी करताना गुरुदेवांनी प्लॉटिनस, ऑगस्टिन, एक्खार्ट यांच्या तत्त्वज्ञानाचा व अनुभूतीचा गोड समन्वय साधला आहे.

तिसऱ्या विभागात ज्ञानेश्वरीतील नीति विचार हा २४ मथळ्याखाली मांडला आहे. आदर्श कर्मयोगी कसा असावा आणि कर्म व ज्ञानाची सांगड कशी घालता येईल हे गुरुदेवांनी सांगितले आहे. गुरुदेव सांगतात, १) सामाजिक जबाबदारी म्हणून मनुष्याने कर्मे करावीत, २) ही कर्मे आसक्ती विरहीत करावीत, ३) कर्मफलाचा त्याग करावा, ४) सर्वच कर्मे ईश्वराला अर्पण करणे हा चौथा मार्ग विधायक मार्ग सांगतात आणि हे करताना दैवी गुण संपत्तीचा स्वीकार व असूर गुणांचा त्याग गुरुदेवांनी सांगितला आहे.

चवथा विभाग साक्षात्काराचा असून त्यातून जीवन विकास क्रमाचा पुरस्कार दिसतो. गुरुदेवांना वाटत होते की साक्षात्कार म्हणजे (Mysticism) अनुभूती किंवा ईश्वराचा साक्षात्कार हा मनुष्याला शांती व भक्तीपूर्ण अंतःकरणाने केलेले ईश्वराचे ध्यान किंवा मनाला संपादन करता येईल अशी श्रेष्ठ अवस्था आहे. ही ज्ञानेश्वरीतून साधकांनी कशी प्राप्त करावी यांचे चिंतन गुरुदेवांनी लिहिले आहे.

गुरुदेव म्हणत असत, ईश्वरी साक्षात्कार म्हणजे 'स्तब्धपणे ईश्वरात रममाण व लीन होणे' ही अनुभूती अनिर्वचनीय आहे. कारण अनुभूती ही इंद्रियापासून मिळणाऱ्या ज्ञानाच्या पलीकडे असते. अनिर्वचनीयता व इंद्रियातीतपणा ही दोन्ही लक्षणे ज्ञानाच्या पलीकडे आहेत. या आध्यात्मिक अनुभूतीसाठी स्वतंत्र व निराळी इंद्रिये व आकलन शक्तीची जरूर नाही. ही दोन्ही लक्षणे परस्परावलंबी व ती एकमेकांशी निगडीत झाली आहेत. त्यासाठी मनुष्याची बुद्धी, संवेदना व इच्छाशक्तीची गरज आहे. या दृष्टीने 'ज्ञानदेव हे बुद्धिप्रधान आत्मज्ञ होते' असा गौरवोद्‌गार गुरुदेव काढतात.

गुरुदेवांच्या ज्ञानेश्वरीच्या या चिंतनाचे भागात साक्षात्काराचे प्रकरण एकूण ४३ मथळ्याखाली आले आहे व ज्ञानेश्वरीचा उपसंहार व्यक्त केला आहे. गुरुदेव या चिंतनात खूपच रमलेले दिसतात.

गुरुदेव म्हणत असत, 'श्रीमद्‌भगवद्‌गीता ही एक ईश्वर साक्षात्काराचे तत्त्वज्ञान आहे.' गीतेने साक्षात्कार-तत्त्वज्ञानाचे मंदिर उभारले आहे व ज्ञानदेवांनी साक्षात्काराचे सिद्धान्तरूपी खांब ज्ञानेश्वरीत उभे केले आहेत.'

या चिंतनात गुरुदेव तत्त्वज्ञानाबद्दल म्हणतात, 'तत्त्वज्ञानातील सिद्धान्तांत जीवनाला दिव्यत्व प्राप्त करून देण्याचे सामर्थ्य किती आहे त्यावरून त्याची सत्यता व जिवंतपणा ही ठरवावयाची असतात. जीवनाला दिव्यत्व, पूर्णत्व, आनंदमयत्व कशाने येईल याचा शोध तत्त्वज्ञान करते.' त्यामुळे ज्ञानेश्वरीत, साक्षात्कार, ब्रह्मप्राप्ती व आत्मानंद याने जीवनाला दिव्यता, पूर्णता व आनंदमयता येते हा सिद्धान्त ज्ञानेश्वरीत प्रतिपादिलेला आहे.

गुरुदेवांनी या चिंतनाची मांडणी, पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या पद्धतीने केली आहे. जीवनमूल्य किंवा जीवनसाफल्य गृहीत न धरता ईश्वरप्राप्तीने जीवन कसे कृतार्थ होते ते गुरुदेवांनी अत्यंत कौशल्यपूर्ण मांडले आहे.

जीवनसाफल्यासाठी बुद्धी, भावना व क्रियाशक्ती या मानवी शक्तीचा विकास होतो, हे जाणून त्याचा आधार घेवून गुरुदेवांनी चिंतन व्यक्त केले आहे.

## साक्षात्कार

साक्षात्कार प्रकरणात गुरुदेवांना जे सांगावयाचे ते त्यांनी ज्ञानदेवांच्या शब्दात सांगून १ ते १५ प्रकरणात अतिशय जिव्हाळ्याचा विषय मांडून कुंडलिनी शक्तीवर विवेचन केले आहे.

साक्षात्काराबद्दल गुरुदेव म्हणतात –

'साक्षात्कार म्हणजे ईश्वराची प्रत्यक्ष, अपरोक्ष प्रतिभेची, अनुभूती व ईश्वराचे प्रत्यक्ष ज्ञान होवू शकते. तेच जीवनाचे ध्येय आहे हाच साक्षात्कारवाद आहे.'

मनुष्याला बुद्धीच्या पलीकडे वरची अशी प्रतिभा (Intuition) या नावाची शक्ती आहे. तिला ईश्वराचे प्रत्यक्ष ज्ञान होते. म्हणून परमार्थ साधनेत या शक्तीचा विकास कसा घडेल या विचारांच्या माध्यमातून गुरुदेवांनी मांडणी ज्ञानदेवांच्या शब्दांत केली आहे.

त्या विचारात साधकांची इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती, क्रियाशक्तीच्या समन्वयांनी, साधकांनी कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करून गुरुकृपा संपादन करून साक्षात्काराची अनुभूती घ्यावी व कुंडलिनी शक्तीही अभ्यासाने वृद्धिंगत करावी म्हणजे ब्रह्मपदाची अनुभूती येते.

## ब्रह्माची प्राप्ती

गुरुदेवांचा साधनेतील विकासक्रम पाहिला तर गुरुदेव म्हणतात त्याप्रमाणे, साक्षात्कार म्हणजे 'स्तब्धपणे ईश्वरात रममाण व लीन होणे' हे एकदा घडले तर, ब्रह्मप्राप्ती कशाला म्हणतात गुरुदेव? तर ब्रह्माची प्राप्ती म्हणजे आत्मसाक्षात्कार ही अवस्था.

असं आहे, वेद, वेदांत, उपनिषदे, तत्त्ववेत्ते आपले विचार तीन पद्धतीने मांडतात,

१) आत्मा म्हणजेच ब्रह्म.

२) आत्मा म्हणजे ब्रह्माचा अंश

३) आत्मा म्हणजे ब्रह्माचे प्रतिबिंब.

या विचारातून 'आत्मा म्हणजे ब्रह्म' या वैचारिक पातळीवरून ब्रह्माची प्राप्ती म्हणजे आत्मसाक्षात्कार हे गुरुदेव व्यक्त करतात.

या पार्श्वभूमीवर गुरुदेवांनी आपल्या ज्ञानेश्वरीच्या विचारात, १६ ते १९ मथळ्याखाली विचार व्यक्त केले आहेत. आत्मसाक्षात्काराचे वा ब्रह्माच्या अनुभूतीचे चिंतन ज्ञानदेवांच्या शब्दात गुरुदेवांनी व्यक्त केले आहे. ईश्वराचे सर्वगत ध्यान, साधकाने ईश्वराला आत-बाहेर कसे पहावे हे ते सांगतात. आत्मा हा तेजरूप कसा हे 'तेजरूप आत्मा' या मथळ्याखाली सांगत आहेत. अंतर्बाह्य आत्मदर्शन यातही आत्मज्ञानाबद्दल गुरुदेव सांगत आहेत. हेच व या गोड, सुंदर अनुभूतीतून आत्मसाक्षात्काराबद्दल गुरुदेव सांगत आहेत. आत्मसाक्षात्कार शेवटी साधकाला कसा होतो, ते तुकारामांच्या शब्दात कळते ते असे –

*तुका म्हणे विठो भरला सबाही*
*तया उणे काही चराचरी*

## आत्मानंद

ब्रह्माच्या अनुभूतीनंतर २० ते ४५ प्रकरणापर्यंत आत्मानंदाच्या अनुभूतीचे वर्णन गुरुदेव ज्ञानदेवांच्या शब्दात करीत आहेत.

'सुखाचे शिखर' या विचारात गुरुदेव सांगतात, ज्याने आत्मानंद उपभोगिला त्याची विषयसुखाची इच्छा आपोआप नाहीशी होते व केवळ सुख मिळते. तोच निखळ आत्मानंद आहे. आत-बाहेर केवळ महासुख वाट्यास येते व देवाचे सान्निध्य मिळाल्याने आनंदाचे गोड शब्द ऐकावयाला मिळतात व हीच आनंदाची परिसीमा हे गुरुदेव म्हणतात. आत्मानंदात देहभाव विसरला जातो. मन, बुद्धी, चित्त, आत्मरूपात लीन होतात. त्यांचे अस्तित्व संपले तो आनंद आहे, तो आत्मानंद आहे.

ही एक आत्मानंदपूर्ण अनुभूती असून यात आदर, आनंद, भव्यता, दिव्यता व भक्तीप्रेम या भावनांची गुंफण आहे. आत्मानंद हे शिखर आहे. यातूनच मनुष्याचे अष्टसात्त्विक भाव जागृत होतात. अंतःकरण शांत होते. आतून आनंदाचा झरा वाहू लागतो. बाहेरून इंद्रिये पांगुळी पडतात. शरीर रोमांच्यामुळे पुलकीत होते. अंतःकरणात आनंदाच्या लहरी येतात आणि केवलानंदाची अनुभूती येते.

गुरुदेव म्हणत असत, स्वरूप साक्षात्कार म्हणजे, 'आत्मवस्तु म्हणजे मीच', हे आत्मदर्शन होवून देव-भक्त ऐक्य झाल्यावर त्या आनंदातच राहणे तो आत्मानंद !

## उपसंहार

ज्ञानेश्वरीच्या प्रकरणात जो उपसंहार गुरुदेवांनी केला आहे त्यात दोन विचार मुख्य सांगून ज्ञानदेव काय म्हणतात याबद्दल विचार व्यक्त केला आहे.

१) परमेश्वर ज्याचा सहकारी झाला त्याचा विजय हा नेहमी ठरलेला असतो.

२) परमेश्वराचे विजयरूप असल्याने तो ज्या बाजूला आहे त्या बाजूला विजय निश्चित आहे.

या विचारातून गुरुदेवांनी जीवाचा क्रमविकास कसा होत जाईल हे चार वर्गीकरणात केले असून साक्षात्कार, ब्रह्मप्राप्ती (आत्मसाक्षात्कार) व आत्मानंदाचे चिंतन व्यक्त केले आहे.

आत्मानंद प्राप्तीसाठी ज्ञानेश्वरी हा पंथराज असून ज्ञान, ध्यान, कर्म आदि भक्ती याला येवून मिळतात. साक्षात्कारानंतरसुद्धा देव व भक्त यात संपूर्ण ऐक्य होत नसून पौर्णिमेच्या चंद्रात व चतुर्दशीचे चंद्रात जसा थोडा फरक तसा फरक हा राहतो. ब्रह्मपदात आत्मा साक्षात्कार असतो. पण आत्मानंद अंतिम शिखर आहे. गुरुदेव या दृष्टीने म्हणतात, ज्ञानेश्वरी म्हणजे उपमा, भाषासौंदर्य, तत्त्वज्ञान, साक्षात्कार, आत्मानंद, भक्ती व अद्वैत यांची सांगड. अलौकीक निरीक्षण शक्ती, अप्रतिहत कवित्व शैली, अलोट वाङ्मय माधुर्य या सर्व गुणांचे संमिश्रण आहे.

आत्मानंद हेच जगाचे मूलतत्त्व असे सांगणारा आत्मानंदवाद हा विचार गुरुदेव मांडतात. आत्मानंदात पूर्ण वासनाशम आहे. साक्षात्कार, ब्रह्मपर आत्मसाक्षात्कार हे विविक्षीत क्षणाला संपणारी गोष्ट ते मानतात आणि आत्मानंद हा अखंड वाहणारा प्रेमाचा आनंदाच्या स्फुलिंगाचा एक झरा आहे हे सांगणारे गुरुदेवांचे तत्त्वचिंतन आहे.

## अमृतानुभवातील एक तात्त्विक चिंतन

गुरुदेव रानडे यांनी Academy of Philosophy and Religion ही संस्था स्थापन केली होती. त्या संस्थेच्या ध्येयाबाबत गुरुदेव सांगत, 'तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोनातून संशोधन करून परमेश्वराचे गूढ उकलून पाहण्यात आस्था असलेल्या सर्वांना एकत्र आणणे हे या संस्थेचे ध्येय राहील.'

यावरून असे लक्षात येते की, गुरुदेवांची तात्त्विक बैठक तत्त्वज्ञानाची असली तरी, त्यांच्या हृदयातून परमेश्वरी कृपेचा, अंतःस्फूर्तीचा झरा वाहात होता. या परमार्थ मंदिराकडे बौद्धिक अधिष्ठानचा प्रवास ते करीत होते. म्हणून १९३२ साली Mysticism in Maharashtra हे पुस्तक गुरुदेवांनी लिहिले आणि ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इ. संतांच्या साहित्याचा परामर्श घेवून मौलिक चिंतन व्यक्त केले आहे.

ज्ञानदेवांच्या, ज्ञानेश्वरीचे चिंतन आपण पाहिले. आता गुरुदेवांनी जे अमृतानुभवावर चिंतन लिहिले आहे, ते आपण पाहू या.

गुरुदेवांनी अमृतानुभवाचे चिंतन एकूण २२ मथळ्याखाली केले आहे. या अमृतानुभव ग्रंथातून ज्ञानदेवांनी घेतलेली अमृताची अनुभूती व तत्त्वज्ञान इतक्या विलक्षण कल्पनाशक्तीच्या वैभवाने व प्रभुत्वाने मांडले आहे की, या ग्रंथाची आध्यात्मिक अनुभूती श्रीमंत आहे व त्याच्या सेवनाने (चिंतनाने) जीव मुक्त व अमृतरूप होतो, असे गुरुदेवांना वाटत होते. ज्ञानदेवांनी ग्रंथाचा मुख्य उद्देश वा या ग्रंथाचा प्रधान उद्देश व्यक्त केला आहे. ज्ञानदेव या ग्रंथात एका ठिकाणी म्हणतात की, 'आपला ग्रंथ म्हणजे अत्यंत गंभीर अशा मौनाचे प्रदर्शन आहे.' या आणि इतर विधानावर गुरुदेव म्हणतात, 'यातील (अमृतानुभवातील) अंतिम तत्त्व शब्दांनी विशद करणे अशक्य आहे.'

ग्रंथ विवरण - या विभागात गुरुदेव व्यक्त करतात ज्ञानदेवांवर सांख्य दर्शनाचा पगडा असल्याने, प्रकृती-पुरुषांचा संबंध पती-पत्नीप्रमाणे मानून, त्यांच्यापासून हे सर्व विश्व निर्माण झाले आहे व ते परस्परावलंबी आहे हा विचार मांडला असून ज्ञानदेवांचे-आत्म्यांचे वर्णन अमृतानुभवातील पाहिलेकी वेदान्तांच्या आधारे केले आहे व आत्मा स्वयंभू व सर्वज्ञ आहे हे चिंतन व्यक्त केले आहे. गुरुदेव पुढे व्यक्त करतात, 'ज्ञानदेवांच्या विचारावर शैवदर्शनाचा व सांख्यातील द्वैतवादाचा पगडा दिसून येतो. तर प्रकृती व पुरुष या द्वैत तत्त्वांचा समन्वय ब्रह्मांत होतो.' असे मत गुरुदेवांचे आहे.

'प्रकृती-पुरुष' या प्रकरणी गुरुदेव सांगतात, प्रकृती प्रकट किंवा व्यक्त झाली की पुरुष गुप्त होतो, व पुरुषाचे खरे ज्ञान झाले की प्रकृती अदृश्य होते हे ज्ञानदेव म्हणतात. पण येथे एपिडोक्लीज नामक ग्रीक तत्त्ववेत्त्यांची आठवण येते. त्यांच्या तत्त्वाप्रमाणे प्रेम व कलह ही दोन तत्त्वे एकमेकांस हुसकून ब्रह्मांडात प्रवेश करतात. तसे प्रकृती व पुरुष यापैकी एकाचे खरे ज्ञान झाले की, या दोन्ही कल्पना सापेक्ष आहेत व या दोन्हीला आधारभूत तत्त्व म्हणजे ब्रह्म होय. ज्ञानदेवांचा विचार सिद्धान्त हे गुरुदेव मांडत आहेत.

प्रकृति-पुरुषाचे ब्रह्मांत ऐक्य या चिंतनात गुरुदेवांना वाटत असे की, मिठाचा खडा पाण्यात पडल्यावर जसा एकरूप होतो, तसे ज्ञानदेव शंभू व शांभवीशी एकरूप झाले होते. त्यामुळे ब्रह्म अथवा आत्म्याबद्दल गुरुदेव म्हणतात, 'अंतिम तत्त्व म्हणजे आत्मा हा सर्वज्ञ व सर्वसाक्षी आहे. तो सत् असत्, अहंकार, इंद्रिये, मन व बुद्धी या सर्वापलिकडे आहे. शब्दांनी त्याचे वर्णन करता येणार नाही. तो इंद्रिय-जन्य व बुद्धी ग्राह्य ज्ञानापलीकडे आहे.' या प्रकारे गुरुदेव नामसाधनेच्या चिंतनातून, गुरुदेवांची वाणी, बोध व साहित्य आकार घेत होते.

सत्, प्रकाश व सुख या त्रिगुणापलीकडे ब्रह्म आहे. हा विचार गुरुदेव अमृतानुभवाच्या झरोक्यातून मांडतात. ब्रह्मामध्ये सत्, प्रकाश, व सुख हे तीन गुण संभवत नाहीत. परंतु पाश्चिमात्त्य तत्त्वज्ञ स्पिनोझा Attribute हा शब्द ज्या अर्थी वापरतो, त्या अर्थी 'गुण' शब्द येथे वापरला असे म्हणता येईल. गुण म्हणजे बुद्धीच्या एका दृष्टिकोनातून प्रतीत झालेले ब्रह्माचे स्वरूप होय. म्हणून जरी असे अनंत गुण ब्रह्मात एकाच वेळी वसत असले, तरी या गुणांच्या सहाय्याने निर्गुण ब्रह्मस्वरूपाचा निर्णय करता येणार नाही हे ज्ञानदेव व्यक्त करतात. म्हणजेच सुवर्ण म्हटलं म्हणजे कनक, काठिण्य आणि पिवळेपणा हे तिन्ही घटक मिळून सुवर्ण असते. नुसत्या एका घटकाला किंमत नाही. तसे ब्रह्म म्हणजे सत्, प्रकाश व सुख मिळून ब्रह्म आहे. यातील घटकांना स्वतंत्रपणे महत्त्व नाही. असे हे ब्रह्म सापेक्ष अस्तित्वानास्तित्वाच्या पलीकडे स्वयंपूर्ण स्थितीत असते. या चिंतनाला जर्मन तत्त्वज्ञ कांटच्या 'निर्विशेष वस्तूची' (Thing in itself) गुरुदेव तुलना करतात.

शब्दाला एक सामर्थ्य असते. परंतु आत्म्याच्या शुद्ध स्वरूपाचे ज्ञान देण्यास शब्द असमर्थ असतात. तसेच शब्द अज्ञानाचा नाश करण्यासही असमर्थ असतात. त्यामुळे शब्दात हे सामर्थ्य जरी नसले तरी मनुष्याच्या ठिकाणी ज्ञान व अज्ञान किंवा विद्या व अविद्येचा निरास झाल्याशिवाय खरे आत्मज्ञान मनुष्याला होणार नाही. यासाठी श्रीसद्गुरुंचे परमार्थात महत्त्व आहे. त्यांच्याशिवाय आत्मज्ञानाची अनुभूती मनुष्याला येत नाही. हा विचार गुरुदेव मांडतात.

## अभंग वाङ्मयाचा विचार

गुरुदेवांनी ज्ञानेश्वरी अमृतानुभवाबरोबर निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई व चांगदेव यांच्या अभंगाचेही चिंतन केले आहे. गुरुदेव सश्रद्ध थोर अभ्यासक होते. त्यामुळे सातत्याने त्यांच्या वाङ्मयात कुठे ना कुठे तौलनिक चिंतन व्यक्त होत असते.

पाश्चात्य देशातही व पौर्वात्य देशात आध्यात्मिक स्थित्यंतरे जवळ जवळ सारखी होती. भाषा भिन्न असली तरी ध्वनी एक होता. ज्ञानदेवांच्या अभंगाचे अर्थसाम्यदर्शक इंग्रजी भाषेत बरीच काव्ये होती, असे गुरुदेव सांगत. पुढे अभंग वाङ्मय प्रकाराबद्दल गुरुदेव म्हणत, 'अभंग म्हणजे जीवात्मा व ईश्वर यांच्या संबंधाविषयी वाटत असलेले, उत्कट भावनांचे उद्गार आहेत.' सर्व संतांनी सामाजिक चालीरितीचा गंभीर विचार व त्याच्या परिवर्तनासाठी त्यावर टीकाही केली आहे. परंतु अंतःकरणातील अत्यंत गूढ व तीव्र भावना व्यक्त करणे हा अभंग वाङ्मयाचा प्रधान हेतू आहे.

गुरुदेव अभंगाचे वाङ्मय मंदिर समजतात. ज्ञानदेवांनी अंतरंगातील भाव व्यक्त केले. नामदेवांनी त्यांचा विस्तार केला. तुकारामांनी सामाजिक व व्यक्तीगत जीवनाला मार्गदर्शन केले आणि अभंग वाङ्मयाचे मंदिराचे कळस बनले. पुढे अनेक संत झाले पण, तुकारामांची सर त्यांना आली नाही हे गुरुदेवांना वाटत होते.

निवृत्तीनाथांच्या एकूण १३ अभंगांचे विवरण गुरुदेवांनी केले असून त्यातून निवृत्तीनाथांची शिकवण व्यक्त केली आहे व आत्मा-साक्षात्कार व आनंदप्राप्तीची सांगड गुरुदेवांनी घातली आहे.

ज्ञानदेवांच्या अभंगाचा गुरुदेव परामर्श अत्यंत सखोल करतात. ज्ञानदेवांच्या शिकवणीत – नरदेहाचे माहात्म्य विदित करीत, देवदर्शनाची तळमळ कशी लागली पाहिजे हे गुरुदेव अभंगाद्वारा ज्ञानदेवांच्या शब्दांत सांगतात. यासाठी सद्गुरुचे साधकाच्या जीवनात अनन्यसाधारण महत्त्व असून निवृत्तीकृपे परमार्थात प्रगती झाली हे ज्ञानदेव जे सांगतात त्यांची गुरुदेवांनी मुक्तकंठाने स्तुती केली आहे.

गुरुदेवांनी आपल्या परंपरेत रंगाच्या अनुभूतीचे चिंतन व्यक्त केले आहे. ते रंगाचे चिंतन ज्ञानदेवांच्या अभंगातून गुरुदेव त्याचे महत्त्व जाणून सांगत आहेत. याला गुरुदेव आध्यात्मिक अनुभव विविध प्रकारचा व श्रेष्ठ प्रतीचा आहे असे म्हणतात. परमार्थ मार्गात साधकांना रंगाप्रमाणे

देवाच्या आकारदर्शनाचाही अनुभव येत असतो. त्यापुढे ज्योती प्रकाश अनुभव - मोती दिसण्याचा अनुभव, नादाचा अनुभव, आनंदाचा अनुभव अशा निरनिराळ्या अवस्थेच्या अनुभवाचे विश्लेषण ज्ञानदेवांच्या अभंगातून गुरुदेवांनी केले आहे.

सोपान, मुक्ताबाई व चांगदेवांचे अभंग तसे फार नाहीत. परंतु जे आहेत, ते ज्ञानदेवांनी व्यक्त केलेल्या चिंतनाचे अनुभव बिनचूक व खरे आहेत. नाममहात्म्य काही ठिकाणी ते विदित करतात. मुक्ताईच्या कूट अभंगाचेही गुरुदेव वर्णन करतात.

समालोचनाचे भागात गुरुदेव सांगतात की, अमृतानुभव हा तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ आहे; अभंगगाथा आध्यात्मिक अनुभवनिष्ठ आहे तर ज्ञानेश्वरीत दोहोंचा समन्वय आहे. ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानास बुद्धिनिष्ठ साक्षात्कारवाद म्हटले आहे. ज्ञानेश्वरीचा संपूर्ण अनुवाद व्हावा व जगाला हे ज्ञान मिळावे अशी इच्छाही गुरुदेव व्यक्त करतात. इंग्रजी का असावी तर, इंग्रजी ही आंतरराष्ट्रीय भाषा आहे. सर्वोतोपरी हे ज्ञान पोहोचावे, जीवनसाफल्याच्या दृष्टीने याची गरज आहे. ज्ञानदेवांनी अद्वैत व अनेक तत्त्ववादाचा समन्वय आपल्या वाङ्मयात केला आहे. फार्कूहर या तत्त्ववेत्त्याचा विचार गुरुदेव मांडतात की, 'महाराष्ट्रातील भक्ती संप्रदायाचे श्रीज्ञानदेव हे आद्य प्रवर्तक आहेत.' याचा पुरस्कार गुरुदेव करतात. चांगदेवांबद्दल गुरुदेव म्हणतात, 'प्रत्यक्ष 'देवदर्शनापुढे केवळ योगप्रधान जीवन फिके' अपुरे ठरते.' असे हे उदात्त जीवन आहे.

**प्रा. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, नवीन मराठी शाळेसमोर, पुणे ४११ ०३०.
फोन : ४४८७०३०

# संत नामदेव आणि त्यांची प्रभावळ

**डॉ. हे. वि. इनामदार**

*एम्.ए.एल्एल्.बी.; पीएच्.डी. मराठीचे अध्यापन. एस्.एन्.डी.टी. विमेन्स कॉलेज, पुणे. (१९५४ ते १९८५) कॉलेजचे प्राचार्य आणि मराठीचे विभागप्रमुख म्हणून १९८५ अखेर रीतसर सेवानिवृत्त. संतसाहित्य विषयक पंधरा स्वतंत्र आणि वीस संपादित पुस्तके प्रकाशित. विद्यापीठ पातळीवरील उत्कृष्ट शिक्षक म्हणून पुणे म.न.पा. आणि महाराष्ट्र शासन यांचे पुरस्कार, १९७९. विद्यापीठ अनुदान आयोग-नियुक्त राष्ट्रीय व्याख्याता. महिला विद्यापीठ - नियुक्त 'इमेरिटस प्रोफेसर'. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी उपाध्यक्ष 'ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानेश्वरी : डॉ. इनामदार सद्भाव ग्रंथ' १९९१ मध्ये प्रकाशित. (पृष्ठे चारशे)*

गुरुदेव प्रा. डॉ. रामचंद्र दत्तात्रय रानडे यांचा जन्म जमखिंडी या गावी दि. ०३ जुलै १८८६, शनिवार रोजी झाला. दि. ०६ जून १९५७, गुरुवार या दिवशी निंबाळ या गावी ते कालवश झाले. एक्काहत्तर वर्षांचे आयुष्य त्यांना लाभले. आपल्या या जीवित काळात त्यांनी लिहिलेल्या इंग्रजी आणि मराठी ग्रंथांची संख्या चौदाच्या आसपास आहे. याशिवाय काही वेचक शोधनिबंधही त्यांनी प्रसिद्ध केले आहेत. ही सारी साहित्यसंपदा मुख्यतः भारतीय संत आणि भारतीय तत्त्वज्ञान या विषयीची आहे.

## परमार्थ-मार्गावरील ग्रंथ

गुरुदेवांच्या समग्र ग्रंथसंपदेत 'मिस्टिसिझम इन महाराष्ट्र' हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा आहे. १९३३ साली तो प्रकाशित झाला. प्रा. कृ. वें. गजेंद्रगडकर यांनी 'मराठी संत वाङ्मयातील परमार्थ-मार्ग' या नावाने या मूळ ग्रंथाचा मराठीत उत्कृष्ट अनुवाद केला. त्याची 'सुधारित दुसरी आवृत्ती' १९९३ मध्ये सौ. मधुवंती गजेंद्रगडकर (६५ पाटील इस्टेट्स, पुणे ४११ ००५.) यांनी प्रकाशित केली. हा मराठी ग्रंथ डेमी साडेचारशे पानांचा असून त्याचे मूल्य केवळ एकशेवीस रुपये एवढे आहे.

या ग्रंथाची मांडणी चोवीस प्रकरणे आणि चार परिशिष्टे यामध्ये केलेली आहे. पहिल्या प्रकरणात 'साक्षात्कार' या संकल्पनेचे स्वरूप व व्याप्ती विशद करण्यात आली आहे. दुसऱ्या प्रकरणात भारतीय साक्षात्कार - दर्शनाचा इतिहास सुसूत्रपणे सादर केलेला आहे. त्यापुढील एकवीस प्रकरणे मराठी संतांसाठी योजलेली आहेत. त्यामध्ये ज्ञानेश्वर, नामदेव व त्यांचे समकालीन संत, भानुदास-जनार्दन स्वामी व एकनाथ, तुकाराम आणि रामदास या सर्व संतांच्या काव्य-ग्रंथांतून व्यक्त होणारे तत्त्वचिंतन साधार व सुबोध स्वरूपात स्पष्ट केलेले आहे. तसेच भारतीय साक्षात्कार दर्शनाला मराठी संतांचे योगदान किती मौलिक स्वरूपाचे आहे, याचा मागोवा घेतलेला आहे.

साक्षात्कार व कर्मयोग, श्रीरामदास व ख्रिस्ती धर्म, भक्ती व चिकित्सावाद आणि अनुभूतिशास्त्रातील तत्त्वज्ञान हे चार विषय शेवटच्या प्रकरणात विवेचिलेले आहेत. तौलनिक साक्षात्कार शास्त्र, ज्ञानेश्वरी अंतरंगाची प्रस्तावना, रामदास चरित्र व तत्त्वविवेचन प्रस्तावना आणि तुकाराम चरित्र व तत्त्वविवेचन प्रस्तावना असे चार विषय अखेरच्या चार परिशिष्टांतून मांडलेले आहेत. साक्षात्कारदर्शन हे सूत्र केंद्रवर्ती ठेवून, त्याच्या प्रकाशात मराठी संतांच्या विचारधारांचा साधार आढावा घेणारा गुरुदेवांचा प्रस्तुत ग्रंथ म्हणजे महाराष्ट्र सारस्वताचा अनन्वय अलंकार आहे.

## संत नामदेव आणि संतमेळा

प्रस्तुत ग्रंथातील दोन प्रकरणे एकंदर तेवीस पानांची असून त्यामध्ये श्रीनामदेव आणि त्यांचे समकालीन संत यांच्या परमार्थविचाराची ओळख करून दिलेली आहे. पृ. १८४ ते २०६ यामध्ये प्रकरण आठ व प्रकरण नऊ अशी दोन प्रकरणे सामावलेली आहेत. त्यामध्ये नामदेवविषयक विवेचनास प्राधान्य दिलेले असून ते रास्तच आहे. त्याबरोबरच गोरा कुंभार, विसोबा खेचर, सांवता माळी, नरहरी सोनार, चोखामेळा, जनाबाई, सेना न्हावी; आणि कान्होपात्रा या अन्य आठ संतांनी दिलेली शिकवण संक्षेपाने सांगितलेली आहे. नामदेवांच्या विचाराचा आणि कार्याचा प्रभाव यातील बहुतेक व्यक्तींवर पडलेला आहे. त्यामुळे नामदेवांच्या प्रभावळीतील ते संत आहेत, असे म्हणता येईल.

या दोन प्रकरणांतील विचार-विमर्शाचे विहंगमावलोकन करणे उद्‌बोधक ठरेल.

## विठ्ठल-संप्रदायाची ओळख

इसवी सन १२७० ते १३५० हा संत नामदेवांचा कालखंड विठ्ठल संप्रदायाच्या प्रतिध्वनीने दुमदुमलेला होता. पंढरपुरास विठ्ठल मंदिर त्यांच्या आधीही होते. पण नामदेव हे तिथल्या पांडुरंगाचे पहिले पाईक होते. पुंडलीक कन्नडभक्त होता. त्याच्या नावाने बांधलेले देऊळ भीमा नदीच्या वाळवंटात आहे. या देवळात शिवाची पिंडी आहे, हे लक्षणीय आहे. शैव-वैष्णव संप्रदायात तत्त्वतः भेद नाही. 'पांडुरंग' (पांढऱ्या देहाचा देव) हे मूळ शिवाचे नाव विठ्ठलास लावण्यात आले असे डॉ. पी. आर. भांडारकरांनी मार्मिकपणे म्हटले आहे.

विठ्ठल व रखुमाई यांचा इ.स. १२०९ चा शिलालेख आळंदीस आहे. तसेच इ. स. १२३७ मधला शिलालेख पंढरीस विठ्ठल मंदिरात आहे. 'भीमरथी नदीच्या काठी, 'पंडरिगे' या गावी सोमेश्वर नावाच्या राजाने आपल्या सैन्याचा तळ दिला होता. पुंडलीक मोठा साधू होता' असे या शिलालेखात लिहिले आहे.

या देवळातच इ. स. १२७३ चा दुसरा शिलालेख आहे. त्यात श्रीरामदेवराव जाधव व त्यांचा मुख्य प्रधान हेमाडपंत यांचे उल्लेख आहेत. यावरून पंढरीचा विठ्ठल संप्रदाय ज्ञानदेव-नामदेवांच्या पूर्वी अनेक वर्षे प्रचलित होता, असे दिसते. गुजरात-कर्नाटक-तेलंगण-तामीळनाडू अशा अनेक राज्यांतून पंढरीस यात्रेकरू मोठ्या संख्येने येत असत. त्यांना परमार्थ विचार समजून सांगण्यासाठी कीर्तनाची पद्धत संतांनी सुरू केली असावी, असे मत गुरुदेव रानडे यांनी व्यक्त केले आहे. तसेच ज्ञानदेव व नामदेव हे दोघे समकालीन होते आणि दोघांनी मिळूनच तीर्थयात्रा केली, याचाही खुलासा गुरुदेवांनी केला आहे.

## नामदेवांचे जीवनवृत्त

बाबाजी नावाच्या ब्राह्मणाने नामदेवांची कुंडली लिहून त्यांचे भविष्य

वर्तविले. त्या संबंधीच्या नामदेवांच्या अभंगावरून पाहता, ते इ. स. १२७० मध्ये जन्मले.

नामदेव जातीने शिंपी होते.

दामाशेठ हे नामदेवांचे वडील नरसिंगपुरात राहात होते, असे गुरुदेवांनी लिहिले आहे. त्यांची ही माहिती बरोबर नसल्याचे नंतरच्या संशोधनावरून सिद्ध झाले आहे. यदूकोट हे नामदेवांचे सहावे पूर्वज (बहे किंवा कोळे) नरसिंहपूर या कराड जवळच्या कृष्णा नदीच्या तीरी असलेल्या गावी राहायला गेले होते. मात्र नामदेवांचे वडील दामाशेटी पंढरपूरला राहात होते. 'आदि ठाणे पंढरपूर ।... पोटी आले नामदेव । दामाशेटी हरुषला । दासी जनीस आनंद झाला ।।' हा जनाबाईचा अभंग याची साक्ष देतो.

पंढरीस संतमेळ जमला असताना, गोरा कुंभारांनी नामदेवांचे 'मडके कच्चे' असल्याचा निर्वाळा दिला. त्यानंतर नामदेवांनी आंवढ्यास जाऊन विसोबा खेचरांचा अनुग्रह घेतला. नामदेव श्रेष्ठ प्रतीचे कीर्तनकार होते. इ. स. १३५० मध्ये विठ्ठल मंदिराच्या महाद्वाराजवळ नामदेवांनी समाधी घेतली. तीच 'नामदेवांची पायरी' होय. विष्णुदासनामा हा ब्राह्मण कवी आपल्या नामदेवांनंतर दोन शतकांनी जन्मला असावा. नामदेवगाथ्यात त्याचे अभंग मिसळले गेले आहेत. गुरुदेवांनी लिहिलेले हे मुद्दे महत्त्वाचे आहेत.

## नामदेवांची उत्कट-आतुर भक्ती

नामदेवांच्या अभंगांच्या आधारे गुरुदेवांनी देवाच्या भेटीसाठी झालेली नामदेवांच्या हृदयाची तीव्र तळमळ वर्णिली आहे. 'जीवात्म्याची घनघोर रात्र' ('डार्क नाइट ऑफ दि सोल') नामदेवांनी अनुभवली.

नामदेव म्हणतात, 'देवा, मला अनाथ, पतित, दीन व आर्त म्हणतात. तुझे वर्णन, अनाथांचा नाथ, पतितपावन, दीनानाथ व आर्तपरायण असे केले जाते. तरी तू मला एकदा भेटून स्वतःचे ब्रीद खरे कर. एवढ्याशा खोट्या प्रपंचाने तुझ्यासारख्या सर्वव्यापकाला झाकून टाकले आहे. करुणाघना, तू मला लवकर भेट. मेघाने चातकाची तहान भागवली, तर मेघाचे थोरपण सरेल काय ? तू माझ्या हरिणी आहेस. मी तुझे पाडस आहे. माझ्या प्रेमफासा तुझ्या गळ्यात घालून, मी तुला धरून ठेवीन. 'सोऽहम्' या शब्दांचा मारा केला की तू काकुळतीला येशील. ज्या बोलण्याने विठ्ठल डोलेल, असे बोल आम्ही उच्चारू. कीर्तनाच्या रंगात आम्ही गातो व नाचतो. आम्ही जगात ज्ञानदीप पाजळतो.'

## नामदेवांनी वर्णिलेला नाममहिमा

अन्य सर्व संतांपेक्षा श्रीनामदेवांचा नामस्मरणाविषयीचा आग्रह अधिक 'जोरदार' आहे, असे गुरुदेव म्हणतात. त्यासाठी नामदेवांच्या काही अभंगांचा भावार्थ त्यांनी पुढीलप्रमाणे दिला आहे. ''देवा, तुझ्या नामस्मरणात खंड पडला, तर माझ्या जिभेचे तुकडे होतील. नामसंकीर्तनास काळवेळ लागत नाही. तिथे उच्च-नीच भावनेस थारा नाही. नामापुढे सर्व भक्षक अग्नीचे बळ चालत नाही. नामाचे स्मरण केल्यावर पेटलेल्या लाखाघरातून पांडव वाचले. असत्याचे मळ नामामृताने धुतले जातात. नाम व रूप यांत भेद नाही. देव लपला तरी नाम कुठे नेईल? तेच आम्ही सतत गाऊ. वदनी त्याचे मंगल नाम व हृदयी अखंडित प्रेम असेल. परब्रह्म एका नामस्मरणानेच सापडते. हाती वीणा घेऊन, देवळात उभा राहून, हरिनाम घेत मी कीर्तन करीन.''

## नामदेवांचे समाज चिंतन

नामभक्तीच्या अनुषंगाने नामदेवांनी सभोवतीच्या समाजस्थितीचे वर्णन केले आहे, असे गुरुदेव सांगतात.नामदेव म्हणतात, ''वीतभर पोट सर्वांच्या पाठी लागले आहे. त्याकडे माणसाचे सर्वांत जास्त लक्ष असते. आपण केलेली पापे आपल्या दुःखास कारण आहेत, हे माणूस विसरतो. सजीव प्राण्याला लाथा हाणायच्या आणि निर्जीव दगडाच्या देवाच्या पायांवर डोके ठेवायचे, हे चमत्कारिक नव्हे काय ? पर नारीचा संग खोटा; त्यामुळे या देहाचा नाश होतो. रावणाचे तेच झाले. सुवर्ण व परिमल, हिरा व कोमल या गोष्टी एकत्र सापडणे अशक्य आहे. निर्मल योगी, दुभता हत्ती, दयाळू धनवंत, कृपाळू वाघ, सावधान श्रोता, सुंदर पतिव्रता, ज्ञाता पुराणिक, भला लढवय्या, सुंदर व सद्गुणी पुरुष या गोष्टी दुर्मिळ आहेत.''

- स्वकालीन समाजाच्या अवलोकनातून नामदेवांनी केलेले हे वर्णन प्रत्ययकारी आहे.

## संतांची लक्षणे

नामदेवांनी संत-लक्षणे सांगितली आहेत. संत सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी वासुदेवास पाहातो. तो निरीच्छ असतो; व सोने आणि माती समान मानतो. तो कामक्रोधांना थारा देत नाही. त्याच्या मनात शांती व क्षमा स्थिरपणे राहतात. त्याच्या मुखातून सदैव हरिनाम येते. धैर्यवंत साधू मानापमान सारखे मानतात.

नामदेव म्हणतात, 'आम्ही संत खरोखर निष्णात परीट आहो. खटनटांना आम्ही शुद्ध करतो. डाग असेल तिथे बोध-साबण लावतो. शांति शिळेवर व ज्ञानगंगेच्या निर्मळ पाण्यात धुतो. संतांच्या चरणी सद्भाव धरावा. त्यामुळे देव भेटतो. संत कृपासिंधू आहेत. ते आम्हाला भक्ती, बोध व प्रेमसुख देतात. संतांच्या कृपेशिवाय परमार्थाचे रहस्य कळत नाही. देवाची अनेक नामे आहेत. पण संत-सद्गुरुंनी सांगितल्याशिवाय नामाचे ध्यान कसे करावे, हे कळत नाही. संतसंगतीचा महिमा सहजपणे समजत नाही.

## नामदेवांचे आध्यात्मिक अनुभव

देवाचे दर्शन घेण्याची शक्ती म्हणजे ईश्वरी देणगी आहे. मोगऱ्याचे फूल वेलीच्या टोकावर फुलते. त्याला सुवास कोण लावते ? त्याप्रमाणे देव पाहाण्याची शक्तीसुद्धा उपजतच असते. देवापाशी एकच गोष्ट मागावी. 'मनात सतत तुझे ध्यान राहू दे. मनाने तुझी आठवण, वाचेने तुझे नामोच्चारण व डोळ्यांनी सदा तुला पाहावे. हातांनी तुझी पूजा करावी. डोके तुझ्या पायी ठेवावे. कानांनी तुझे गुण ऐकावे.'

एका नामस्मरणाने कलिकाळ व महादोष नाहीसे होतात व देव वैकुंठात स्थिर स्थान देतो. कीर्तनाच्या सुखाने देव सुखावतो. देवाचे दर्शन मला घडले. घरोघरी ओवाळणी झाली. आम्ही आमच्या डोळ्यांनी श्रीविठ्ठल पाहिला. त्याच्या सहवासाने आमच्या हृदयात आनंद भरला.

संत नामदेवांना सांगतात, 'पैलतीरी देव आले. कोटीसूर्यांची प्रभा आकाशात एकदम झळकली. वत्साकडे धेनू धावून येते, तसे देव तुमच्याकडे

आले. गरुडाच्या पंखाच्या फडफडण्याने दाही दिशा दुमदुमून गेल्या. हरीच्या कंठातील फुलांची माळ गळून पृथ्वीवर आली. देवांनी दोन्ही हातांनी उचलून नामदेवांना हृदयाशी धरले.'

उन्मनी अवस्थेत आनंदाची झोप लागते. आत्मप्रकाशात व ज्ञानात साधक जागृत राहातो. धिम् धिम् तुरे वाजतात. अनेकविध अनाहत नाद गर्जतात. तिथे ना निद्रा, ना स्वप्न. अशा अवस्थेत सूर्य-चंद्र मावळतात. महाप्रलय काळात सप्तसागर एक झाल्यावर चोहीकडे पाणीच पाणी होते. त्याप्रमाणे ज्याला देव दिसला, त्याला देवच सर्वत्र भरलेला आहे असे प्रत्ययास येते.

भक्ताचे प्रेम फक्त देवच जाणतो. तो सदैव भक्ताजवळ राहातो. नामयाचे प्रेम केशवच जाणतो; आणि केशवाला नामयाजवळच राहायचे आहे. नामा तोच केशव आणि केशव तोच नामा, असा नामदेवांचा अनुभव आहे.

संत नामदेवांच्या परमार्थ-जीवनाचे असे समालोचन केल्यानंतर, गुरुदेव रानडे यांनी नामदेवकालीन संतांच्या मांदियाळीची धावती ओळख करून दिली आहे. गोरा कुंभार, विसोबा खेचर, सांवता माळी, नरहरी सोनार, चोखामेळा, जनाबाई, सेना न्हावी आणि कान्होपात्रा असे आठ प्रमुख संत त्यासाठी त्यांनी निवडले आहेत. गुरुदेवांच्या शब्दात या संतांचा परिचय करून घेता येईल.

## संत गोरा कुंभार

गोरोबांचा जन्म इ. स. १२६७ मध्ये झाला. ते तत्कालीन सर्व संतांमध्ये वयाने मोठे होते म्हणून सगळे संत त्यांना 'गोरा काका' असे म्हणत. ते 'तेरढोकी' या गावी राहात होते. हाती थापटणे घेऊन त्यांनी नामदेवांच्या संतत्त्वाची परीक्षा घेतली होती. ज्ञानदेव-नामदेवांच्या तीर्थयात्रेच्या वेळी ते हजर होते.

गोरोबा सांगतात, "माझे रूप माझ्या डोळ्यांत विरले. माझे ज्ञान माझ्या बुबुळांत सामावले. मी देवाकडे निरखून पाहू लागलो, तेव्हा खेचरी मुद्रा लागून गेली. सुखाने सुखाला मिठी दिली. अनाहत नादाचे जंगर वाजू लागले. तो जयजयकाराचा ध्वनी होता. श्रुतीदेखील 'नेति, नेति' असे म्हणतात; व या नादाअंती स्थिर राहतात. केशवाच्या भेटीने मला वेड लागले. माझा देहभाव नाहीसा झाला. माझ्या मनात आदिरुप भरले. कर्म व गुणधर्म, आणि पाप व पुण्य यांचा मला आता लेप लागणार नाही. मी सहज जीवन्मुक्त झालो. मी अद्वैत सुख-रूप पावलो आहे.'

## संत विसोबा खेचर

नागनाथाचे आवंढे या गावी विसोबा राहात होते. मुक्ताबाई-ज्ञानदेवांची आध्यात्मिक थोरवी विसोबांना कळल्यावर ते त्या दोघांचे शिष्य झाले. नामदेव त्यांना भेटायला गेले. विसोबांनी त्या वेळी आपले दोन्ही पाय शिवाच्या पिंडीवर ठेवले होते. नामदेवांनी विसोबांचे पाय धरून ते दुसरीकडे ठेवले. पण जिथे पाय ठेवावे, तिथे शिवलिंग उद्‌भवू लागले. या प्रमाणे विसोबांनी देव सर्वत्र आहे, याचा नामदेवांना प्रत्यय आणून दिला. ज्ञानदेव-नामदेव तीर्थयात्रेस गेले, तेव्हा विसोबासुद्धा त्यांच्याबरोबर होते. इ.स. १३०९ मध्ये विसोबा बार्शी मुक्कामी समाधिस्थ झाले.

विसोबांनी नामदेवांना पुढील शब्दांत उपदेश केला. 'नामदेवा, मी देव पाहिला, असे तू अहंकाराने म्हणशील, तर तुझा बोल खोटा आहे. मी-माझेपण जोपर्यंत जात नाही, तोपर्यंत देव भेटणे शक्य नाही. आपले सुख आपल्यामध्येच आहे; बाहेर नाही. विवेक व वैराग्य संपादन केले, म्हणजे परमेश्वर-प्राप्तीचा मार्ग कळतो. वाचेने देवाचे नाव उच्चारले म्हणजे पर्वतप्राय पापराशी जळून भस्म होतात. नामाचे साधन केले, तर प्रपंचाचे भान उरत नाही. नामदेवा, असा मार्ग तुला समजला तर तू भाग्यवान होशील.'

'सर्व विश्व देवरूप आहे', हे शब्द विसोबांनी नामदेवांच्या कानात उच्चारले. त्यांनी नामदेवांच्या डोक्यावर आपला वरद-हस्त ठेवला. त्याचा द्वंद्वभाव विसोबांनी नाहीसा केला, व आपण आत्मरूप आहो, असे ज्ञान त्यांनी नामदेवांना दिले.

## संत सांवता माळी

सोलापूर जिल्ह्यातील मोडनिंबजवळच्या अरण या गावचे हे रहिवासी. ते ज्ञानदेव-नामदेवांच्या तीर्थयात्रेच्या वेळी हजर होते. इ. स. १२९५ मध्ये त्यांनी अरण गावी समाधी घेतली.

सावतोबांच्या मनात देव पूर्ण भरून गेला होता. मळ्यात काम करताना कांदा, मुळा, भाजी हीच आपली विठाई आहे, असा प्रत्यय त्यांना येई. सुखदुःखात आपले वर्तन सारखे असावे. नामाचे बळ मोठे आहे, कीर्तनाच्या जागी वैकुंठीचा देव आणता येतो, भक्तिमार्ग धरावा, असा आग्रहाचा उपदेश सावतोबांनी सर्व लोकांना केला आहे.

## संत नरहरी सोनार

हे थोर शिवभक्त संत देवगिरीहून पंढरीस येऊन राहिले. ज्ञानदेवादी संतांच्या प्रभावाने नरहरी हे भागवत धर्माचे अनुयायी झाले. शिव व विष्णू एक असल्याचा अनुभव त्यांना एका प्रसंगाने आला. इ.स. १३१३ मध्ये ते ईशचरणी विलीन झाले.

नरहरी सांगतात, 'चितारी भिंतीवर चित्रे काढतो. त्या चित्रांप्रमाणे हे जग मिथ्या आहे. मुले मांडलेला खेळ मोडून घरी जातात. तसा हा संसार आहे. गुरू गैबीनाथ यांचा अनुग्रह मला लाभला. रात्रंदिवस मला अनाहत नाद कानात ऐकू येतो. देवाचे ध्यान सदा करावे. मी देवाचा सोनार आहे. नामरूपी सोन्याचा व्यवहार मी करतो. ज्ञानताजवा घेऊन हरिनामाची दोन्ही अक्षरे मी जोखतो. सोन्याचे पोते घेऊन मी पैलतीरी जातो.'

## संत चोखामेळा

मंगळवेढ्याचे हे संत अस्पृश्य जातीचे असल्यामुळे पंढरीस देवळाबाहेर उभे राहून त्यांना देवाची प्रार्थना करावी लागे. तरी देवाचे त्यांच्यावर फार प्रेम होते. त्यांना कर्मा नावाचा मुलगा व निर्मळा नावाची बहीण होती. तेही ज्ञानदेव-नामदेवांच्या तीर्थयात्रेच्या वेळी हजर होते. मंगलवेढ्याच्या कोटावर काम करताना कोसळलेल्या भिंतीखाली त्यांना इ. स. १२६० मध्ये मरण आले. नामदेवांनी चोखोबांच्या अस्थी आणून पंढरीस महाद्वारासमोर त्यांची समाधी बांधली.

चोखोबा म्हणतात, 'लोक मला 'दूर हो', असे म्हणतात. तेव्हा देवा, मी तुला कसा भेटू ? देवा, तू लवकर धावून ये. ऊस वाकडा असेना का,

पण रस वाकडा नाही. चोखा अस्पृश्य आहे. पण त्याचा भक्तिभाव अस्सल आहे. मी हरीचे नाव घेतो. मला भय-चिंता राहणार नाही.'

### संत जनाबाई

नामदेवांचे वडील दामाशेटी यांच्याकडे लहानग्या जनीला तिच्या वडिलांनी सांभाळायला दिले. ती नामदेवांच्या घरी मोलकरीण म्हणून जन्मभर सेवा करीत राहिली. जनाबाईच्या अभंगांत भक्तीची तीव्रता दिसून येते. ती श्रेष्ठ संत म्हणून मानली जाते.

जनाबाई म्हणतात, 'आपण पृथ्वीपेक्षा उदार, लोण्यापेक्षा मऊ व फुलापेक्षा कोमल असावे. सद्गुरुंचे चरण सेवणे हे एकच सुखाचे साधन आहे. सर्व कामे करीत असता विठ्ठलाची आठवण ठेवावी. अहो, नामदेवांच्या संगतीमुळे मला विठ्ठलाचे ज्ञान झाले. माझ्या मनात जे जे होते, ते ते सर्व देवाने मला दिले. हरी ज्याचा सखा झाला, त्याला सर्व विश्व साहाय्य करते. देव त्याला काही उणे पडू देत नाही.'

### संत सेना न्हावी

सेना महाराज बिदर येथील बादशहाच्या दरबारी नोकर होते. इ. स. १४४८ च्या सुमारास ते हयात होते. आरशात आपले प्रतिबिंब पाहावे, तसे देवाचे दर्शन घडवून देण्याचे सामर्थ्य त्यांच्यापाशी होते.

सेना महाराज म्हणतात, 'निवान्तपणे बसून एकाग्र चित्ताने विठोबाचे चिंतन करावे, म्हणजे देव भेटतो. देव भक्तांचा कैवारी आहे. जात, गुण, दोष न पाहता तो भक्तांच्या रक्षणार्थ धावून येतो. गिरि-काननास जाण्याची जरूरी नाही. नामाच्या चिंतनासारखे दुसरे साधन नाही. 'मी कृतार्थ झालो. समर्थाचे बाळ समर्थच असते. आम्ही वाकबगार न्हावी आहो. विवेकाचा आरसा दाखवून आम्ही वैराग्याचा चिमटा लावतो. कामक्रोधाची नखे काढतो. शांतीचे पाणी डोक्याला लावतो.'

### संत कान्होपात्रा

मंगळवेढे येथील श्यामा नावाच्या नायकिणीची ही कन्या सुंदर होती. पंढरीच्या विठ्ठलाची ती भक्त म्हणून राहिली. बिदरच्या बादशहाचे नोकर तिला बादशहाकडे नेण्यासाठी गेले तेव्हा तिने प्राणार्पण केले. ती इ. स. १४६८ च्या सुमारास हयात असावी.

कान्होपात्रा म्हणते, 'विठ्ठला, मी मतिहीन, दीन व पतित आहे. तुला सर्वस्वी शरण यावे, हेच मी जाणते. जन्मान्तरीचे सुकृत फळास आले, म्हणून तुझ्या पायांचे दर्शन मला घडले.'

### नामदेवांचा 'नामवेद'

संत नामदेव आणि त्यांचे समकालीन असलेले अन्य आठ संत यांच्या पारमार्थिक विचारधारेचा धावता परिचय गुरुदेवांनी करून दिला आहे. त्या त्या संताच्या अभंगसंपदेच्या आधारानेच गुरुदेवांनी हे विचारदर्शन घडविले आहे. त्यासाठी त्यांनी अभंगवाणीच्या भावार्थाचे रससंपन्न व भावपूर्ण शैलीतून विवेचन केले आहे. हे सर्वच संत नामदेवांच्या आयुर्मर्यादेच्या काळात होते, असे काटकोरपणे म्हणता येणार नाही. त्यांच्यापैकी काहीजण नामदेवोक्तर, पण नजीकच्या काळातील आहेत.

मात्र एक विशेष प्रकर्षाने जाणवतो. नामस्मरण आणि कीर्तनभक्ती यांना नामदेवांनी प्राधान्य दिले. चार वेदांचे अध्ययन-आकलन करून घेणे त्या काळात सर्वसामान्य माणसाला शक्य नव्हते. त्यामुळे नामदेवांनी नामालाच वेदाची प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. 'आकारला देव, नामरूपा आला । म्हणवुनी स्थापिला नाम-वेदीं।।' असे नामदेव म्हणतात.

नामदेवांनी प्रतिपादिलेल्या नामभक्तीचा प्रभाव या आठही संतांच्या अभंग-कवितेवर कसा दिसून येतो, हे गुरुदेव रानडे यांनी साधार व सुसूत्र स्वरूपात स्पष्ट केले आहे. म्हणूनच या सर्वांना नामदेवांच्या प्रभावळीतील संत' असे संबोधणे सार्थ ठरेल !

डॉ. हे. वि. इनामदार
'संतोष' ६०/१५ भारती निवास कॉलनी, एरंडवणे, पुणे ४.

## पदे

धन्य धन्य निंबाळ क्षेत्र हे
स्थानचि पवित्र ॥
धन्य गुरुंचा वास सदोदित
पावन सर्वत्र ॥१॥
धन्य स्थापूनि सोपा केला
आश्रमी परमार्थ ॥
धन्य साधका नामी रमवूनी
केले निजसार्थ ॥२॥
धन्य गुरुदेवांची भक्ती
गुरुनिष्ठा प्रीति ॥
धन्यचि डोळा आम्हीं देखिली
प्रेमळ गुरु मूर्ति ॥३॥
धन्यचि साधन नाम प्रचिती
नेमाचरणासी ॥
धन्य जयांची अखंड कीर्ति
नमू या चरणासी ॥४॥
धन्य जयानी अढळ शांतीचे
स्थानचि भूषविले ॥
धन्य जन्मले आत्मसुखी त्या
चिरंजीव झाले ॥५॥

श्रीमती लिलाबाई शिरवळकर

# एकनाथ वचनामृताचा 'अमृतबोध'

**डॉ. मुकुंद दातार**

*बी.ए. मराठी, एम.ए. (मराठी), एम.ए. (संस्कृत) प्रथम श्रेणी. पीएच.डी, 'संत एकनाथांची काव्य सृष्टी एक अभ्यास' ३४ वर्षे वारणा नगर विद्यालयात प्राध्यापक, मराठी विभाग प्रमुख. संतसाहित्यावर विविध लेख, ५ पुस्तके प्रकाशित. आकाशवाणी केंद्रांवर चिंतने व भाषणे. महाराष्ट्रात संस्थांमधून वाङ्‌मयीन व सांस्कृतिक विषयांवर व्याख्याने. मातृमंदिर निगडी, पुणे संस्थेचा संतसाहित्य पुरस्कार.*

### परमार्थाचे पाणिनी

श्रेष्ठ तत्त्वचिंतक डॉ. रा. द. रानडे, वर्तमानकालीन संतश्रेष्ठ रा. द. रानडे, गुरुदेव रा. द. रानडे म्हणजे परमार्थाचे पाणिनी होत. रानडे यांचे चरित्रकार सांगतात – गुरुदेव रानडे यांच्या मते भक्ती किंवा परमार्थ हेच मानवी जीवनाचे एकमेव ध्येय असून, तत्त्वज्ञानाचा उपयोग भगवद्‌भक्तीला, बुद्धीची बैठक प्राप्त करून देण्यापुरता आहे. त्यांच्या दृष्टीने तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाची परिणती भगवद्‌भक्तीत व्हायला हवी. रानडे यांची ही विचारसरणी 'साक्षात्कार वाद' या नावाने निदर्शिता येईल. रानडे हे स्वतः केवळ साक्षात्कार या विषयाचेच नव्हे, तर प्रत्यक्ष साक्षात्काराचे अभ्यासक असल्यामुळे त्यांच्या विवेचनाला स्वानुभवाचा बळकट पाया आहे. श्रेष्ठ तत्त्वचिंतक डॉ. रानडे यांनी साक्षात्कारासंबंधीचे सारे विवेचन, पराकोटीच्या तर्कशुद्ध रीतीने आणि आधुनिक दृष्टीचे समाधान होईल, अशा पद्धतीने केले आहे. त्यांनी समन्वयात्मक किंवा विधायक टीकापद्धती पूर्णत्वाला नेली आहे. कळसाला पोहोचवली आहे.

आपल्या सर्व ग्रंथांतून त्यांनी या समन्वयात्मक पद्धतीचा आश्रय करून, उपनिषदे, मराठी-हिंदी-कानडी संतवाङ्‌मय आणि भगवद्‌गीता यातील 'साक्षात्कार-मार्ग' विशद करण्याचा प्रयत्न केला आहे. यासाठीच डॉ. शं. गो. तुळपुळे सांगतात - परमेश्वरी साक्षात्काराचा हा मार्ग पूर्वीही होता, आजही आहे, परंतु त्याचे पद्धतशीर आणि तर्कशुद्ध विवेचन पूर्वी कोणी केले नव्हते ते डॉ. रानडे यांनी केले. ही त्यांची कमाई होय. म्हणूनच त्यांना 'परमार्थाचे पाणिनी' ही पदवी शोभून दिसते. महर्षी पाणिनींच्या पूर्वी भाषा होतीच. पण तिचे व्यवस्थापन करण्याचे महत्कार्य पाणिनी यांनी केले. तसेच गुरुदेव रानडे यांच्यापूर्वीही, परमार्थमार्ग होताच, पण त्याचे तर्कशुद्ध व्यवस्थापन त्यांनी करून दाखविले. परमार्थाची भूमिका, परमार्थप्रवृत्तीची कारणे, परमार्थाची साधना आणि परमार्थाचे फळ ही साक्षात्कार मार्गाची चार अंगे आणि त्यांची इतर उपांगे यांचे सोपपत्तिक विवेचन गुरुदेवांनी केले. तसेच त्यात स्वानुभवाची भर घालून त्यांनी साक्षात्काराचे स्वतंत्र शास्त्रच निर्माण केले. स्वानुभवाधिष्ठित अध्यात्मशास्त्राचे सांगोपांग विवेचन ही गुरुदेवांनी भारतीय तत्त्वज्ञान सृष्टीत घातलेली अमोलिक भर आहे.

### ग्रंथ म्हणजे भक्तिमार्गप्रदीप

गुरुदेव रा. द. रानडे यांचा गौरव करताना, प्रा.श्री. म. माटे यांनी म्हटले होते – 'न्यायमूर्ती मा. गो. रानडे यांना, पदवीधरांचे मुकुटमणी म्हटले जाई आणि ते योग्यच होते. त्यांच्या मृत्यूनंतर थोड्याच वर्षांनी, या अभिधानावर ज्यांचा तेवढाच अधिकार पोचतो, असे दुसरे रानडे निर्माण झाले. प्रा. रा. द. रानडे हे आमच्या सत्तर वर्षांच्या पिढीतील बुद्धीमत्तेचे अत्युच्च शिखर होत. परमार्थ हा आपल्या संस्कृतीचा बहुमोल वारसा असला तरी, प्रो. रानडे यांनी त्या क्षेत्रात पदार्पण करण्यापूर्वी दुर्दैवाने तो समाजाकडून उपेक्षित राहिला होता. प्रो. रानडे यांनी ऐन तारुण्यातच, परमार्थाला बौद्धिक अधिष्ठान प्राप्त करून देऊन, पुन्हा त्याला मूळची प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. गुरुदेव रानडे यांच्या दृष्टीने तत्त्वज्ञान हे खरे 'तत्त्व'ज्ञान होते. तो केवळ वाणीचा किंवा लेखणीचा विलास नव्हता. किंवा कल्पनाविलासही नव्हता. तत्त्वज्ञान प्रत्यक्ष आचरणात उतरले पाहिजे, अशी त्यांची निष्ठा होती. म्हणूनच एका प्रसंगी डॉ. राधाकृष्णन यांनी गुरुदेवांचा गौरव करताना उद्‌गार काढले की, 'आम्ही सर्वजण तत्त्वज्ञानाची भाषा बोलतो, रानडे तत्त्वज्ञान जगतात.'

गुरुदेव रानडे यांनी सांगितलेला भक्तियोग हा आचारप्रधान असून गुरुगवेषण, दुर्गुणत्याग, सद्‌गुरुसेवा, नामस्मरण आणि संतसंग ही या भक्ती योगाची प्रमुख अंगे आहेत. याच दृष्टीने रानडे यांच्या पारमार्थिक तत्त्वज्ञानाचे वर्णन, 'विवेकमूलक, नीतिप्रधान आत्मसाक्षात्कार - पर्यवसायी नामस्मरणात्मक भक्तियोग' असे प्रा. न. ग. दामले यांनी केले आहे. या मार्गाने नामस्मरण हे साधन आणि साक्षात्कार हे ध्येय आहे. ज्ञानेश्वरादी संतांनी सांगितलेला पंथराज आणि हा भक्तियोग एकच असून यालाच रानडे यांनी 'पाथ वे टु गॉड' म्हणजे ईश्वरप्राप्तीचा मार्ग असे म्हटले आहे. या भक्तिमार्गावरचे प्रदीप या दृष्टीने गुरुदेव रानडे यांनी आपली सारी ग्रंथरचना केली. किंवा डॉ. तुळपुळे यांच्या शब्दात असेही म्हणता येईल की, सारी ग्रंथरचना ही प्रो. रानडे यांची सगुणोपासना होती. निर्गुणोपासनेतून शिल्लक राहिलेला वेळ ते समर्थ रामदासांच्या शब्दांत 'देवाच्या कथावार्ता' सांगण्याकडे खर्च करीत आणि ही त्यांची सगुणोपासना ग्रंथरचनेच्या रूपाने व्यक्त होई. एका दृष्टीने ग्रंथरचना हा गुरुदेवांचा प्रपंच होता आणि तो त्यांनी परमार्थरूप करून दाखविला.

### शब्दज्ञानाकडून निःशब्द ज्ञानाकडे

इ. स. १९१९ मध्ये गुरुदेव, पुण्यात स्वतः बांधलेल्या 'अध्यात्म भवन' या घरात राहावयास गेले. त्याच सुमारास त्यांना दृष्टांत झाला आणि ज्ञानेश्वर-तुकारामांच्या ग्रंथाचा अभ्यास करण्याची सूचना त्यांना मिळाली. यातील अभिप्राय त्यांनी ओळखला व ताबडतोब ते संतवाङ्‌मयाच्या अभ्यासाला लागले. याचेच फळ म्हणजे पुढे प्रसिद्ध झालेली त्यांची 'संतवचनामृते' होत. चरित्रकार सांगतात, या निवडक ग्रंथांनी काय साधले? तर गुरुदेवांनी सुशिक्षितांना परमार्थ म्हणजे काय ते सांगून, संतवचनांच्या आधारे त्यांची मनोभूमिका तयार करण्याचे महत्कार्य केले. खरे तर 'शब्दज्ञानाकडून निःशब्दज्ञानाकडे' ते सर्वांना नेऊ पाहात होते - आणि यासाठीच गुरुदेवांनी उपनिषदे, मराठी संत या विषयांवरचे आपले ग्रंथ लिहिले. उपनिषदांवरील ग्रंथांच्या प्रस्तावनेत ते म्हणतात, 'या ग्रंथाचे अंतिम ध्येय परमार्थ आहे.' तर अध्यात्म ग्रंथमालेस लिहिलेल्या प्रस्तावनेत

ते सांगतात – 'या मालेचे मुख्य प्रयोजन म्हणजे लोकांस परमार्थाचे उज्ज्वल स्वरूप उघड करून सांगणे होय.' या मालेतील 'वचनामृतांना' लिहिलेल्या सविस्तर प्रस्तावनांतही त्यांनी त्या त्या साधूचे पारमार्थिक वर्म शक्य तितके उघड करून सांगण्याचा प्रयत्न केला आहे.

असे दिसते की – १९१८ च्या सुमारास गुरुदेव रानडे यांनी डॉ. बेलवलकर यांच्या सहकार्याने, भारतीय तत्त्वज्ञानाचा इतिहास लिहिण्याची योजना आखली. त्या वेळी या योजनेत महाराष्ट्रातील संतप्रणीत साक्षात्कार मार्गावर एक खंड ओघानेच आला. तोच पुढे १९९३ मध्ये प्रकाशित झालेला Mysticism in Maharashtra हा ग्रंथ होय. या ग्रंथाची साधने म्हणून (Source books) इ. स. १९१८ ते १९२४ पर्यंत गुरुदेवांनी मराठी संतकाव्याचा अधिक सूक्ष्मपणे अभ्यास केला. त्याचेच फलस्वरूप म्हणजे १९२६ मध्ये ज्ञानेश्वर वचनामृत, संतवचनामृत, तुकाराम वचनामृत आणि रामदास वचनामृत अशी चार वचनामृते प्रसिद्ध झाली. (पुढे १९५२, ५३ मध्ये त्यातील काहींच्या द्वितीयावृत्तीही प्रसिद्ध झाल्या.) या अध्यात्ममालेत एकनाथांवर स्वतंत्र ग्रंथ नव्हता. म्हणून १९५५ मध्ये त्यांनी 'एकनाथवचनामृत' हे पाचवे वचनामृत प्रसिद्ध केले. ही पाच वचनामृते म्हणजे संतसाहित्याच्या पद्धतशीर अभ्यासाचे आदर्शपाठ आहेत. त्यात संतसाहित्यातील भावसौंदर्य आपोआपच आविष्कृत झाले आहे.

## नाथांची सनद : भाव तेथे देव

गुरुदेवांनी आपल्या आध्यात्मिक ग्रंथांतून नामस्मरण, संतसंग आणि मुख्यतः ईश्वर शरणागती या पारमार्थिक मार्गातील मुख्य तत्त्वांचे विवेचन केले. त्यातही 'मुखी नाम । हाती मोक्ष' ही सर्वच संतांची ग्वाही आहे, असे ते आवर्जून सांगतात. याचप्रमाणे संतश्रेष्ठ एकनाथांचा 'भाव तेथे देव' हा संदेश त्यांना सर्वाधिक प्रिय होता. त्यातही संतकवी एकनाथांनी साधलेला प्रपंच आणि परमार्थाचा शांत आणि विवेकी समन्वय, त्यांना विशेष प्रिय वाटे. तसे संतकवी एकनाथांचे साधुत्व, व्यक्तित्व, कवित्व सारी साहित्यसृष्टीच गुरुदेव रानडे यांना प्रिय होती. ते सांगत – 'पंढरपूरचा मार्ग सर्वश्रेष्ठ आहे. साधकाच्या अंतःकरणात भक्तिभाव निर्माण होणे, हेच परमार्थाचे खरे वर्म आहे.' 'भाव तेथे देव' हे एकनाथांचे वचन सुप्रसिद्ध आहेच. देवाच्या रूपाहून त्याचे नाम श्रेष्ठ आणि नामाहूनही साधकाच्या अंतःकरणातील भाव श्रेष्ठ. कारण नामस्मरण हे भाव निर्माण करण्याचे साधन आहे. देवाचा अनुभव येवो किंवा न येवो, देवाचे नाम सतत स्मरणे, हा पारमार्थिकासाठी खरा निष्काम कर्मयोग आहे. 'एका जनार्दनीं भावचि कारण ।' हीच पारमार्थिक यशाची मोठी ग्वाही आहे. 'भाव तोचि देव' हेच खरे.

'एकनाथवचनामृतांच्या प्रस्तावनेत संतश्रेष्ठ एकनाथांना गौरवांजली वाहताना गुरुदेव रानडे म्हणतात, प्रपंच साधून परमार्थाचा लाहो कसा करावा, हे एकनाथांना जनार्दन स्वामींनी स्वतःच्या आचरणाने शिकविले. या गुरुशिष्यांची हृदये किती एकवटली होती याची साक्ष 'एकाजनार्दन' देत आहे. एकनाथांचे घर म्हणजे शांतिसुखाचे आगर आणि त्यांचा गृहस्थाश्रम म्हणजे जगास कित्ता होऊन बसला. परमार्थी मनुष्याने प्रपंचात कसे वागावे, याचा आदर्शपाठ त्यांच्या चरित्रातून मिळतो. एकनाथ हे शांती, दया, अक्रोध, समता यासारख्या गुणांचे मूर्तिमंत अवतार होते. तत्कालीन बहुविध आणि बहुरंगी समाजास एका भागवतधर्माच्या सूत्रात गोवून, त्याला भक्तिमार्गास लावणे हे एकनाथांचे खरे कार्य आहे. यासाठी त्यांनी सर्व प्रकारचा विरोध सोसून, सर्वांना समजेल अशा मराठी भाषेची कास धरली आणि एकाहून एक श्रेष्ठ असे ग्रंथ निर्माण केले. एकनाथ करुणा बुद्धीने समाजाच्या उद्धाराकडे वळले आणि कथाकीर्तन व वाङ्मय रचना करून हे कार्य त्यांनी तडीस नेले.

## एकनाथवचनामृताची रचना

एकनाथवचनामृत हे मार्च १९५५ मध्ये प्रथम प्रसिद्ध झाले. डिसेंबर १९६५ मध्ये त्याची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध झाली. (व्हीनस प्रकाशन पुणे - २) या 'एकनाथवचनामृताची' रचना कशी झाली हे सांगताना या ग्रंथाच्या प्रस्तावनेत, अगदी प्रारंभीच गुरुदेव रानडे सांगतात - 'अध्यात्म ग्रंथमालेच्या पहिल्याच आवृत्तीत एकनाथांवर स्वतंत्र पुस्तक नव्हते. मालेच्या 'संतवचनामृत' या दुसऱ्या भागात, एकनाथांचे काही अभंग तेवढे समाविष्ट केलेले होते. परंतु एकनाथांचे वाङ्मय फार समृद्ध आणि विविध प्रकारचे असल्यामुळे, त्यातील काही निवडक उतारे काढून, त्यांचा संग्रह स्वतंत्र ग्रंथरूपाने करावा, असे वाटल्याने, 'अध्यात्मग्रंथमाले'च्या या द्वितीयावृत्तीत, 'एकनाथवचनामृत' हा भाग आम्ही निराळा काढीत आहोत. या भागात एकनाथांच्या सर्व प्रमुख ग्रंथांतील म्हणजे भागवत एकादशस्कंध, भावार्थ रामायण, रुक्मिणी स्वयंवर व स्फुट आध्यात्मिक प्रकरणे यातील निवडक उताऱ्यांची विषयवार रचना करून, त्यावरून एकनाथांची पारमार्थिक शिकवण कोणत्या प्रकारची होती हे त्यांच्यात शब्दांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या अभंगांचा समावेश मात्र या भागात केलेला नसून तो पूर्वीच्याच भागात (म्हणजे संतवचनामृतात) आढळेल. इथे (एकनाथवचनामृतात) एकनाथांचे ओवीबद्ध ग्रंथ विचारात घेतले आहेत.

एकनाथवचनामृत (दुसरी आवृत्ती) मध्ये विषयविभाग पुढीलप्रमाणे आहेत. १) एकनाथी भागवत - ग्रंथरचनेसंबंधीचे उतारे १ ते १३, २) तत्त्वज्ञानपर उतारे - १४ ते ३२, ३) दुर्गुणत्यागाचे विवरण - उतारे ३३ ते ४३, ४) सद्गुणसंशीलन माहिती-उतारे ४४ ते ५४, ५) परमार्थाची साधने - उतारे ५५ ते ९१, ६) सद्गुरुवर्णन - उतारे क्र. ९२ ते ११०, ७) देवभक्त संबंध - उतारे क्र. १११ ते १३५, ८) पारमार्थिक अनुभव - उतारे १३६ ते १५०, ९) स्फुट प्रकरणे - उतारे १५१ ते १७२, १०) रुक्मिणी स्वयंवर - उतारे १७३ ते १७७, ११) भावार्थ रामायण उतारे - १७८ ते २०५. या सर्व उताऱ्यांची पृष्ठसंख्या २०० आहे.

## परमार्थासाठी दुर्गुणत्याग

या साऱ्या 'एकनाथवचनामृताची' रचना पारमार्थिक प्रगतीला पोषक अशी आहे. नाथभागवत ग्रंथरचनेसंबंधीच्या उताऱ्यात नाथवाणी अवतरते की, या ग्रंथाच्या वाचनाने ज्ञानी सुखी होतील, मुमुक्षू परमार्थ पावतील, साधक भवसिंधू तरून जातील - असा वर गुरु जनार्दनांनी मला दिला. तसेच याच्या पठणाने निंदाद्वेष उपजणार नाहीत. रामनामी प्रीती वाढेल आणि देवाविषयी नित्य भक्ती वाढू लागेल.

*'हेंही शिकविलें जनार्दनें । सर्वभूतीं भजावें पहाणें ।*
*प्रकृति गुणांचीं लक्षणें । सर्वथा आपणें न मानावी ॥ (ए.भा. ३१-५२०)*
*भाळेभोळे विषयी जन । याचें करितां श्रवण पठण ।*
*हरिभक्त होती जाण । सन्मार्गी पूर्ण बहुत होती ॥' (५३८)*

नाथ सांगतात – परमार्थमार्गावरील महत्त्वाचा टप्पा म्हणजे दुर्गुण त्याग. अंतःकरण शुद्ध करायचे तर, प्रथम साधकाने त्यातील सर्व दुर्गुणरूपी मळ नाहीसा केला पाहिजे. आशा किंवा वासना हा सर्वात मोठा दुर्गुण होय. कारण आशेपाशी सर्व दुःखे आणि पापे वसतात. तिच्याजवळ

महादोष आणि महाशोक उभे असतात. आशेला काळवेळ नसते. ती अधर्माचीही सेवा करविते आणि मेल्यासही सोडत नाही.

नाथ म्हणतात – उपभोगाने कामासक्ती कधीच कमी होत नाहीत ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे. एका नारायणावाचून वासना-बंधन कधीच सुटत नाही, सुटणार नाही. याचप्रमाणे परमार्थास अत्यंत विघातक असा दुर्गुण म्हणजे अभिमान. तो ज्ञानी आणि अज्ञानी या दोघांनाही सारखाच बाधक ठरतो. एकाच पाण्यातून मीठ आणि मोती तयार होतात खरे पण मोत्यांच्या अंगच्या अभिमानामुळे त्यास पाण्यात विरून जाता येत नाही आणि म्हणून त्यास मुक्तीही मिळत नाही. उलट ते स्त्रियांच्या नथ या अलंकारात अडकून पडतात. दुसऱ्या बाजूस साधे-भोळे अज्ञ जन संतकृपेने तरून जातात, तर ज्ञानाभिमानामुळे ब्रह्मादिकही बद्ध होतात. नाथ म्हणतात - अविश्वास हा तर सर्व दोषांचा राजा आहे. अविश्वासाला अभिमान भेटला की विकल्प वाढतो आणि जीव बंधनात अडकून पडतो. अविश्वासाच्या स्वारीने अनंत अनर्थ घडतात. सद्भाव पळून जातो आणि परमार्थप्रांत ओसाड पडतो. अविश्वासाचे परमार्थाशी हाडवैरच आहे.

***''पोटांतूनि जो अविश्वासी । तो सदा वेखे गुणदोषांसी ।***
***अखंड द्वेषी परमार्थासी । हा त्यापाशीं स्वभावो ॥'' (ए. भा. २३-३२२)***

## नाथकथित सद्गुणसंशीलन

परमार्थ-सोपानाचा विचार करताना कोणते दुर्गुण त्याज्य होत, याचे विवेचन हे स्वाभाविकपणे अभावात्मक स्वरूपाचे असते. यासाठी त्यापुढे जाऊन, कोणत्या सद्गुणांचे संशीलन आणि संवर्धन करणे हे परमार्थास आवश्यक आहे – याचे विवरण करणे अत्यंत महत्त्वाचे असते. ते नाथांनी सविस्तरपणे केले आहे, असे गुरुदेव रानडे यांनी दाखवून दिले आहे. मुमुक्षूस प्रथम शास्त्रार्थाची म्हणजे शास्त्रप्रचितीची किती जरूरी आहे, ते नाथांनी सांगितले आहे. शास्त्रदृष्ट्या कोणते कर्म विधीयुक्त आहे व कोणते हेय किंवा त्याज्य आहे हे कळले पाहिजे. जिज्ञासू किंवा मुमुक्षूस याची आवश्यकता तीव्रतेने भासते. त्याने विवेकाने विषय-वासना आवरली पाहिजे. परमार्थ साधावयाचा झाल्यास, विषयांचा पूर्ण त्याग केला पाहिजे. आपला कोणताही व्यवहार विषयाकार होऊ देऊ नये. अर्धघडी वाया जाऊ न देता, मुमुक्षुने परमार्थ साधावा. पमरेश्वर माझ्यावर केव्हा कृपा करील व निजबोधाचा परमानंद देऊन मला कृतार्थ करील, अशी तळमळ साधकास लागली पाहिजे.

नाथ सांगतात, खऱ्या परमार्थमार्गात अलिप्ततेचे महत्त्व फार आहे. दावाग्नीने किंवा उन्हाने आकाश पोळत नाही. त्याप्रमाणे खरा साधक, देहतापापासून अलिप्त राहतो. त्याची द्वंद्व-सहिष्णुता मोठी असते. यानंतरचा महत्त्वाचा सद्गुण म्हणजे पावित्र्य. भावबळाने, गुरुनिष्ठेने आणि गुरुवचनाने वासना धुऊन मन स्वच्छ व पवित्र करावे. बाह्य आचरण शास्त्रविधीने शुद्ध ठेवावे आणि अंतःकरण गुरु-प्रचीतीने शुद्ध करावे - म्हणजे खरे शुचित्व प्राप्त होईल. अहिंसा हा गुणही परमार्थास तितकाच महत्त्वाचा आहे. जागृती, स्वप्न आणि सुषुप्तीमध्ये कोणाही भूतमात्रावर रागावून किंचितही भुवई न चढविणे म्हणजे अहिंसा. काया-वाचा-मनाने कोणत्याही जीवास यत्किंचितही दुखविले तर त्या भूतमात्रांतील भूतेशास दुःख होईल असा ज्याचा दृढ विश्वास असतो - तेथे मूर्तिमंत अहिंसा येऊन राहते, असे एकनाथ सांगतात.

गुरुदेव रानडे यांनी नाथांच्या पारमार्थिक उपदेशावर भर देताना लक्षात आणून दिले आहे की, वनात जाऊन वनितेची चिंता करणे हे तप नव्हे. अंतःकरणात चित्त स्वरूपाचे चिंतन करणे, हे सर्वात श्रेष्ठ तप आहे. सतत पाठी लागलेला अनिवार जीवभाव जिंकणे म्हणजेच परम शौर्य होय. केवळ खरे शब्द उच्चारणे म्हणजे सत्य नव्हे, तर समब्रह्म सर्वामध्ये सतत पाहणे, हेच परम सत्य होय. अंतःकरणाच्या गाभ्यातील विकल्पाची भूमी खणून शम, दम, विरक्ती अशी तीन कुंडे तयार करावी. वैराग्याच्या पळीने रजतम द्रव्यांची आहुती द्यावी. अखेर आत्मयज्ञात जीवभावाची पूर्णाहुती द्यावी. म्हणजे यज्ञभोक्ता श्रीनारायण तृप्त होतो. नाथ सांगतात, रामनामाचे अखंड स्मरण म्हणजे महामौन होय. असा साधक सर्व जगाचा आवडता मित्र बनतो आणि तो सर्व विश्वात, एका देवालाच पाहतो.

***'अवघें जगचि मी होये । तेव्हा तो मी हे भाव जाये ।***
***ऐसा तो भजमाजीं सामाये । समसाम्य समत्वें ॥ (ए.भा. ७-१४४)***

## नाथवर्णित पारमार्थिक अनुभव –

गुरुदेव रानडे सांगतात - नाथ साहित्यात जसे इतके खोल आणि उदात्त सद्गुण-पृथक्करण आणि सविस्तर वर्णन आढळते तसे ते इतर वाङ्मयात क्वचित सापडेल. हा मराठी संतवाङ्मयाचा विशेष आहे. याचप्रमाणे नाथांनी वर्णिलेले पारमार्थिक अनुभवही अत्यंत महत्त्वाचे आहेत. आध्यात्मिक अनुभव येण्याच्या आधी आवश्यक अशा जिज्ञासादी अवस्था तसेच प्राथमिक अनुभव, ब्रह्मैक्याचा अनुभव व त्याचे परिणाम इत्यादी विषयी नाथांनी (त्यांच्या अभंगसृष्टीत विस्तृतपणे) तर एकनाथी भागवतात संयमित शब्दकलेत चित्रण साधले आहेत. उच्च अनुभवाचे शरीरावर व मनावर होणारे परिणाम यासंबंधी मात्र ते थोड्या विस्ताराने चर्चा करताना दिसतात. (भक्तश्रेष्ठ उद्धवाची भावस्थिती वर्णितानाही हे चित्रण अवतरते.)

नाथ सांगतात – गुरुकृपेने भ्रमनिरास होऊन, सबाह्य कोंदलेल्या ब्रह्माचे ज्ञान होणे हा पारमार्थिक प्रवासात अंतिम टप्पा आहे. नाथांनी आपल्या भागवतात तीन ठिकाणी अनाहत नादाचा उल्लेख केला आहे. नाथ सांगतात - श्रीजनार्दनांनी माझ्या डोळ्यांत बोधांजन घातले त्यामुळे सर्वांगी नयन निघाले आणि सर्वत्र आत्मरूप श्रीजनार्दन मला दिसू लागले. नाथांना जिकडे जावे तिकडे देवाचे सुंदर रूप दिसू लागले. सर्वत्र त्याचे चरण दिसले. त्याशिवाय दुसरे काहीच दिसेना. अशा चरणांची पूजा मी ठायीच्या ठायी केली असे नाथ सांगतात. जे मुख निमिषार्ध पाहिल्यानेही कोटी जन्मांचे दुःख नाहीसे होते व आनंद त्रैलोक्यात मावेनासा होतो ते हरीचे 'श्रीमुख' पाहून मी धन्य झालो, असे एकनाथ म्हणतात. मुकुट कुंडले घातलेली, कासेस सोन्याची मेखला कसलेली, आपाद रुळणारी घवघवीत वनमाला धारण केलेली, अशी घनश्याम सुंदर कृष्णमूर्ती म्हणजे परिपूर्ण ब्रह्मच होय. कृष्णरूप पाहण्याच्या लालसेने, डोळ्यांस वेड लागले व ते त्यास अर्धघडीही विसंबत नाहीत. कृष्णरूपाचे कौतुक पाहण्याची डोळ्यांस भूक लागली व अंतःकरणात निबिड सुख दाटले, असा पारमार्थिक अनुभव नाथांनी व्यक्त केला आहे.

नाथ सांगतात, घरी दिवा लावला म्हणजे त्याचा प्रकाश खिडक्यांतून बाहेर पडतो, त्याप्रमाणे मनात श्रीहरी प्रकटला म्हणजे त्याचा आनंद इंद्रियाद्वारे साहजिकच व्यक्त होतो. ब्रह्मानंद आवरणे शक्य नसते. हा स्वानंद ओसांडू लागला की देहपण स्फुरेनासे होते. सन्मुखपणा व पाठमोरेपणा नाहीसे होतात. देवभक्तपणाही नाहीसा होतो आणि सर्व काही सुखरूप होते. हृदयस्थ परमात्म्याशी ऐक्य प्राप्त झाले की, समरसी गाठ पडून

जीयास समाधी लागते. उद्धवाची स्थिती अशीच झाली. नूतन व्यालेल्या धेनूच्या वासरास, तिचे दूध पिऊन उल्हास वाटावा, तसे श्रीकृष्णाच्या करस्पर्शाने त्याला झाले. नाथ सांगतात –

*'जाहलिया आनंदपद प्राप्त । चिदाकाशचि दिसे समस्त ।*
*तें चिदाकाशी चित्त । अति सावचित्त ठेवावें ॥*
*तेव्हां चिदाकाश चित्त चिंतन । ठेंडी सांडूनि त्रिविध भेदज्ञान ।*
*जो मी परमानंदीं परिपूर्ण । भेदशून्य चिदात्मा ॥'*
*(ए. भा. १४-५१०, ५११)*

## ध्येय चिरंजीवपद प्राप्तीचे

संतश्रेष्ठ एकनाथांच्या साहित्यसृष्टीतील 'चिरंजीव पद' हे बेचाळीस ओव्यांचे आध्यात्मिक प्रकरण गुरुदेव रानडे यांचे अत्यंत आवडते होते. एकनाथवचनामृताची निर्मिती करताना नाथभागवत, रुक्मिणीस्वयंवर, भावार्थ रामायण व स्फुट प्रकरणे यातील निवडक भाग त्यांनी अगदी साक्षेपाने घेतला आहे. पण चिरंजीवपद प्रकरण मात्र जसेच्या तसे समग्र घेतले आहे. साधकाच्या पारमार्थिक प्रगतीच्या दृष्टीने हे प्रकरण अमोलिक आहे असे त्यांना वाटते. एकनाथवचनामृतात उतारा क्र. १५६ मध्ये हे चिरंजीवपद प्रकरण येते.

या प्रकरणाचा मतितार्थ सांगताना गुरुदेव म्हणतात – नीतिमार्गाने गेल्यासच चिरंजीवता प्राप्त होईल, असे नाथांनी आग्रहाने प्रतिपादले आहे. हा नरदेह विषयस्वार्थी लावून, हातीचा परमार्थ गमावण्यापेक्षा मृत्यू नित्य समीप आहे, हे ओळखून अनुतापयुक्त सात्त्विक वैराग्य अंगी बाणविणे हे परमार्थाचे मुख्य लक्षण आहे असे नाथांनी सांगितले आहे. तसेच शुद्ध परमार्थास जनमान हा अनर्थकारक आहे हे ओळखून, कोमल दशेतील साधकाने शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध या आत्मोन्नतीस नाडणाऱ्या पंचविषयांपासून दूर रहावे. विषयांचा सांगात सर्वस्वी टाळावा. तसेच अंगी अहंता येईल म्हणून स्वतंत्र फड न मांडता, निःसंग व निरभिमान होऊन अखंड एकांती बसावे व हरिचिंतन करावे हेच खरे सात्त्विक वैराग्य होय, असे नाथ सांगतात.

*'साधावया वैराग्य ज्ञान । मनुष्यदेही करावा प्रयत्न ।*
*सांगे एका जनार्दन । आणिक प्रयत्न असेना ॥' (ओवी क्र.४२)*

गुरुदेव रानडे यांनी याच चिरंजीवपद प्राप्तीचे मार्ग आपल्या ग्रंथरचनेतून सांगितले आहेत. 'आपण देवाचे नाम घ्यावे, तो आपले काम करतो. नाम हा स्वार असून नाद हा घोडा आहे. दैव म्हणजे देवाची कृपा. ज्याने आपादमस्तक आत्मस्वरूपच पाहिले तो खरा समर्थ. देवाचे गुप्त रूप जो दाखवून देतो तो गुरू. ज्याच्याकडे पाहिले असता देवाकडे पाहिल्याप्रमाणे वाटते तो साधू' अशी वचनामृते ज्यांच्या लेखणीतून अवतरली त्या गुरुदेवांनी पुनःपुन्हा सांगितले की, भक्ती हे एक भिंग असून त्यातून देवाचे स्वरूप स्पष्ट दिसते. यासाठी एकनाथवचनामृतात नामस्मरणाचे माहात्म्य, अनेक उताऱ्यांतून, नाथांच्या शब्दांत प्रकट करून अखेर भावार्थ रामायणाच्या आधारे गुरुदेव आपणास संदेश देतात की –

*'रामनामाचे परिपाठीं । दोष जळती आकल्पकोटी ।*
*भुक्तिमुक्ती लागे पाठीं । पावन सृष्टी रामनामें ॥ (सुंदरकांड २२-५१).*

**डॉ. मुकुंद दातार**
२, प्राध्यापक निवास, वारणा नगर, ४१६११३ (जि. कोल्हापूर)
(०२३२८) २४४३३

# तुकाराम महाराजांचे आध्यात्मिक जीवन

**श्री. आत्माराम महादेव वझे**

*बी.ए. (ऑनर्स), बी.कॉम., प्रथम श्रेणी प्राप्तिकर अधिकारी, निवृत्त १९८०, गुंतवणूक सल्लागार १९८१-१९९४. विविध सामाजिक संस्थांचे सभासदत्व. व्यावसायिक व अध्यात्मिक लेखन.*

श्रीगुरुदेव रानडे (रामचंद्र दत्तात्रय रानडे) यांनी 'अध्यात्म ग्रंथमाला' या नावाखाली पांच संतांची वचनामृते ज्ञानेश्वर वचनामृत, संत वचनामृत, तुकाराम, रामदास आणि एकनाथ. त्यापैकी पहिली चार १९२६ साली प्रकाशित झाली व पाचवे १९५५ मध्ये झाले. तिसरे पुष्प (ग्रंथ क्र. ३) 'तुकाराम वचनामृत' आहे.

तुकाराम महाराजांच्या उपलब्ध असलेया ४१००-४२०० अभंगातून गुरुदेवांनी ५०० अमृतवचने या ग्रंथात दिली आहेत. ती १८ शीर्षकाखाली दोन भागांत विभागली आहेत. पहिल्या भागात 'आत्मचरित्र' यात २२९ अभंगवचने तर दुसऱ्या भागात 'उपदेश' याखाली उरलेली २७१ वचने आली आहेत.

**गुरूपदेश** – बाबाजी चैतन्य या सत्पुरुषाने महाराजांना स्वप्नात गुरुपदेश दिला. गुरुपरंपरा 'राघव चैतन्य, केशव, चैतन्य' सांगितली. तो दिवस होता माघ शु. १० मी गुरुवार. त्यांनी एका अभंगात स्पष्टपणे हे सांगितले आहे की, 'रामकृष्ण हरी' हा मंत्र बाबाजींनी दिला.

*'सद्‌गुरुरायें कृपा केली...*
*.....मंत्र दिला रामकृष्ण हरी' (३४२७)*

या अभंगावर अभिप्राय देताना गुरुदेव रानडे म्हणतात, तुकारामांना स्वप्नात गुरुपदेश झाला आणि तेथून त्यांच्या अध्यात्मिक जीवनास सुरुवात झाली. बाबाजी चैतन्य हे सच्चिदानंद बाबा जे ज्ञानेश्वरांचे शिष्य. त्यांच्या परंपरेतील आणि ज्ञानदेव, नामदेव, कबीर व एकनाथ यांच्या शिकवणीचा त्यांच्या परमार्थ जीवनावर फार मोठा परिणाम झाला असावा असे दिसते.

नामदेवांनी ठरविलेल्या शतकोटी अभंगापैकी उरलेले अभंग तुकारामांनी पुरे केले असा समज आहे.

*'नामदेवें केलें स्वप्नामाजी जागें । सवें पांडुरंगे येऊनिया*
*प्रमाणाची संख्या सांगे शतकोटी । उरले ते शेवटी लावी तुका ।'*

शतकोटी अभंग ही संख्या काल्पनिक व अशक्य दिसते. गुरुदेवांचे मते याचा अर्थ एवढाच की नामदेवांनी जी पारमार्थिक ज्ञानाची परंपरा वाङ्मयद्वारा सुरू केली तीच पुढे तुकारामांनी चालू ठेवली.

**तुकारामांचे आध्यात्मिक जीवन** - भजन आणि कीर्तन यांच्या आवडीमुळे तुकाराम महाराज तल्लीन होऊन उत्स्फूर्तपणे अभंग रचीत असत. प्रसादपूर्ण आणि प्रसंगानुरूप शब्दरचना, परखडपणा त्यांच्या अनेक अभंगातून दृष्टोत्पत्तीस येतो. कीर्तनाचे विषय, कीर्तनकाराने कसे वागावे आणि कीर्तनापासून होणारे फायदे यासंबंधी म्हणतात, 'मनात देवाचे ध्यान धरून नामोच्चार कीर्तन केल्याने सर्व दोष क्षणात जळून जातात. कीर्तनकार स्वतःही तरेल आणि अनेक जीवांना तारील यात संशय नाही.' दुसऱ्या एका अभंगात ते म्हणतात, 'देव, भक्त आणि हरिनामाचा उच्चार हा त्रिवेणी संगम आहे आणि त्या संगमात स्नान करता यावे म्हणून शरीर व इंद्रिये निरामय असली पाहिजेत तरच त्याचा आनंद उपभोगता येतो. तुझ्या कीर्तनाचे ठिकाणी प्रीती राहू दे.'

*आयुष्य करी उणे । परी मज आवडो कीर्तन ॥ (४०२३)*

द्रव्य, पैसा घेऊन कीर्तन करणारा असू नये. इतकेच नाही तर कीर्तन ज्या ठिकाणी आहे तेथे अन्नसुद्धा घेऊ नये.

*जेथे कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥ (२२५६)*

**तुकारामांनी सांगितलेली संतांची लक्षणे** – संत कोणाला म्हणावे? कोणत्या लक्षणांवरून समाज त्यांना संत म्हणून ओळखतो. संत लक्षणाचा उल्लेख भागवतातील ११ व्या स्कंधातील २६ व्या अध्यायातील २७ व्या श्लोकांत दिला आहे.

*सन्तोनपेक्षा मच्चिताः प्रशान्ताः समदर्शिनः।*
*निर्ममा निरहंकारा निर्द्वन्द्वा निष्परिग्रहा ॥ ११।२६।२७*

१) निरपेक्षता, २) शांत म्हणजेच इंद्रियांचे शमन केलेला, ३) समबुद्धी, ४) ममत्व न बाळगणारे, ५) अहंकार रहित, ६) सुख दुःखातित आणि ७) मायापाशातून अलिप्तता.

आपली सर्व संत मंडळी या लक्षणांनी युक्त आहेत. तुकारामाच्या अनेक अभंगांतून त्याचा पडताळा आपणाला मिळतो. गुरुदेव म्हणतात, 'संतांची लक्षणे सांगण्यास तुकारामांइतका अधिकारी दुसरा कोण आहे?' सर्व आयुष्य संतांच्या मार्गात घालविण्यामुळे संत व असंत यातला फरक त्यांना निश्चितच माहीत होता.

संत हे मायबाप आहेत आणि संसारी अज्ञजनांचा उद्धार करण्याकरताच अवतरले आहेत. भक्तीभाव, धर्म वाढवावा, विठोबाचे नाम घ्यावे हे त्यांचे कार्य असते. चंदनाचा सुवास सान्निध्यात असलेल्या वृक्षांना मिळतो तेच कार्य संत महात्मे करीत असतात म्हणूनच ते संतपदाला पोचतात.

*'तुम्ही संत मायबाप कृपावंत...*
*अवतार तुम्हा धराया कारण । उद्धराचे जन जडजीव' (२४५१)*

सोनाराचे ऐरणीवर हिरा ठेवला आणि हातोडीचा घाव घातला तरी चुरा होत नाही तोच खरा हिरा. मोहरेला गुंडाळलेले सूत जळत नाही. तीच खरी मोहर असे म्हणतात. तुकाराम महाराज म्हणतात, 'जो अनेक प्रकारचे आघात सहन करतो तोच खरा संत.' असतो.

*तुका म्हणे तोचि संत । सोसि जगाचे आघात (२५)*

संतसज्जन अंतर्बाह्य लोण्याप्रमाणे मृदू असतात. निराश्रित, नोकर-चाकर यांना आपल्या मुलाप्रमाणे वागवतात. त्यांची काळजी घेतात.

'जे का रंजले गांजले' ही उक्ती प्रसिद्ध आहे.

*दया करणे पुत्रासि तेचि दासा आणि दासी ।*
*ज्यासि अपंगिता नाही त्यासी धरिजे हृदयी ॥ (२०१)*
*जेथे जातो तेथे तू माझा सांगाती*
*चालविसी हाती धरूनिया ॥१३७॥*

असा त्यांचा दृढ विश्वास होता. 'आम्ही (संतमंडळी) विष्णूदास मेणाहून मऊ आहोत. पण वेळ प्रसंगी जरूरी भासल्यास वज्राचा भेदही

करू शकू इतके आम्ही कठीण होऊ शकतो. देहबुद्धीने मरून आत्मस्थितीने जिवंत आहोत. देह संबंधाने निग्रिस्त असून आत्मसंबंधाने जागे आहोत. जे तुम्ही मागाल ते देऊ. नेसलेली लंगोटीही आनंदाने देऊ. पण नाठाळ असल्यास डोक्यावर काठीचा तडाखा देण्यास कमी करणार नाही. आई-बापापेक्षा जास्त कृपा करू आणि नाश करताना शत्रूपेक्षा जास्त करू. अमृताची गोडी किंवा विषाची कडवटता आमचेपाशी आहे. आम्ही सर्वच गोड आहोत म्हणून तुम्ही जे जे मागाल ते देऊ (५८६). गुरुदेव म्हणतात, 'अहंकार घातक आहे. पण परमार्थातील अहंकार त्यापेक्षा जास्त घातक आहे. पण त्याचे बिकट वर्म ज्यांना कळते त्यांना (संतांना) व्यवहार समजत नाही असे मानणे चूक आहे. तुकाराम मोठे सत्पुरुष होते. त्याचप्रमाणे त्यांचे व्यवहार चातुर्यही अलौकिक होते. त्याशिवाय त्यांना समाजातील अपप्रवृत्तींचे निरीक्षण अभंगातून मांडता आले नसते.

## नाम महात्म्य

नामाचे महत्त्व सांगणारे अनेक अभंग गाथेत विखुरलेले आहेत. अद्वैतापेक्षा भक्तीसाठी द्वैत महाराजांनी श्रेष्ठ मानले आहे. तुकाराम महाराज म्हणतात, 'पांडुरंगा, आम्ही जे मागू ते तुला देता येणार नाही म्हणून तू आम्हाला भीत आहेस का? तुझे ऋद्धीसिद्धी भांडवल आम्हाला नको. आम्ही तुझ्या नाम चिंतनानेच तृप्त आहोत. आम्ही वैकुंठाला चालत जाऊ आणि सुखाने राहू. पांडुरंगा तुला तुझ्या नामाची महती माहीत नाही. कमळाला स्वतःचा सुगंध समजत नाही. तो फक्त भ्रमराला समजतो.'

नामाचा उच्चार, जप करायला काही किंमत पडत नाही, कष्टही पडत नाहीत. मनातल्या मनात केल्यास ओठही हालवण्याचे कष्ट नकोत. ते समजण्यास कठीण नाही. दोनच अक्षरांचा 'राम' किंवा तीन अक्षरांचे केशव, माधव, गोविंद, विठ्ठल ही नामे अडाणी, अज्ञानी लोकांपासून महाज्ञानी पंडितांनाही ती समजण्यास सोपी आहेत.

*नाम घेता नलगे मोल । नाम मंत्र नाही खोल ।*<br>*दोचि अक्षरांचे काम । उच्चारावे राम राम ॥ (१६३१)*<br>*नाम घेता उठाउठी । होय संसाराची तुटी ॥*<br>*हाकारोनी सांगे तुका । नाम घेता राहो नका ॥ (२००८)*

'नामस्मरणाप्रमाणे कीर्तनाचे महत्त्व फार मोठे आहे. नामदेवाचे नंतर तुकारामांसारखा साक्षात्कारी झाला असेल असे वाटत नाही. तुकारामांचा पंढरी संप्रदाय असल्याकारणाने त्यांनी पंढरीचे महत्त्व साहजिकच वाढविले, असे गुरुदेव म्हणतात. आयुष्यात २-३ कठीण प्रसंगी परमेश्वराच्या नामांनी आपले संरक्षण कसे केले हे त्यांनी अभंगातून सांगितले आहे. एका साध्या, संसारी माणसाचा साक्षात्कारी संत कसा झाला हे तुकारामांच्या जीवनावरून समजते.

**सगुण-निर्गुण विचार** — तुकाराम महाराज म्हणतात, 'आम्हाला भगवद्नाम स्मरणाकरिता जन्म घ्यावयाचा आहे. म्हणून आम्ही मोक्षाची इच्छा करीत नाही. आनंदरूपी भक्तीरस आम्हाला सेवन करावासा वाटतो. आमच्या भक्ती सामर्थ्याने आम्ही त्याला सगुण साकार केला आहे. त्याला आम्ही आता निराकार होऊ देणार नाही. विटेवर असलेल्या त्या पावलांचे ठायी माझे चित्त जडलेले आहे.'

'अद्वैताच्या ठिकाणी माझे मन लागत नाही. पण चरण सेवा मला मनापासून आवडते. तुझे नाम संकीर्तनाची गोडी अवीट आहे. देव आणि भक्त असा अपूर्व सोहळा आम्हाला बघण्यास आवडतो. काही काळ तुझे स्वस्वरूप वेगळे ठेव. कधी काळी हीच देणगी मला द्या, माझी इच्छा पुरी करा.'

*'अद्वैती तो माझे नाही समाधान । गोड हे चरणसेवा तुझी ॥ (२८८४)*

हा अभंग सगुणाचा निर्वाळा देतो.

वेदांचा खरा अर्थ आम्हालाच समजला आहे असे तुकाराम महाराज ठामपणे सांगतात. बाकीचे जे स्वतःला वेद जाणणारे म्हणतात ते त्याचा फक्त भार वाहतात. पदार्थाची चव पाहण्याने कळत नाही तर चाखण्याने कळते. उत्पत्ति, पालन आणि संहार हे विश्वाचे मूळ कारण आम्हाला समजले आहे. आणि त्या परमात्म्यास आम्ही आपलासा करून घेतला आहे.

**सत्त्वपरीक्षा** — प्रसन्न आणि प्रासादिक कवित्व ऐकून दोन सनातनी ब्राह्मण रामेश्वर भट्ट व मंबाजी बुवा यांनी हरएक प्रकारे तुकाराम महाराजांना त्रास देण्यास सुरुवात केली. कुणब्यांना वेदांचा अधिकार नाही म्हणून त्यांनी कवित्व करू नये आणि केलेले अभंग स्वहस्ते नदीत बुडवावे अशी त्यांना आज्ञा केली आणि त्याप्रमाणे महाराजांनी स्वहस्ते आपल्या अभंगाच्या चोपड्या इंद्रायणीत बुडविल्या.

तुकारामांच्या अभंगामुळे त्यांची चोहोकडे कीर्ती झाली. त्याच्यापेक्षा विद्वान पंडितांना त्यांचा राग आला. सर्वांनी कट केला आणि मिळतील ते तुकारामांचे अभंग त्यांच्या शत्रूंनी इंद्रायणीत बुडविले. एका अभंगात त्यांनी त्या स्वतः बुडविल्या असे म्हटले आहे. अभंगाच्या वह्या पाण्यात बुडविल्यापासून महाराजांनी तेरा दिवस उपवास केला.

*तेरा दिवस झाले निश्चक्र करिता ।*<br>*तुका म्हणे आता मांडिले निर्वाण । प्राण हा सांडीन तुजवरी । (१७३१)*

पांडुरंगाचे प्रसादे अभंगाच्या वह्या कोरड्या राहिल्या.

पुढे महाराजांना साधू म्हणून सर्व ओळखू लागले. जनसामान्यांत अभंगाची आवड निर्माण झाली. रामेश्वर भट्टही महाराजांचे शिष्य झाले.

*याजसाठी केला होता अट्टाहास ।*<br>*शेवटचा दिस गोड व्हावा ॥*

या सारख्या अभंगातून पैलतीराला जाण्याची ओढ दिसून येते. एके दिवशी कीर्तन करीत असताना पैलतीरावर गरुडावर बसून शंखचक्र हातात घेतलेले चतुर्भुज श्रीहरी गळ्यात वैजयंती माळ घालून, पितांबराच्या प्रकाशाने दाही दिशा उजळल्या आहेत आणि ते मला न्यावयास आले आहेत.

*पैल आले हरि । शंख चक्र शोभे करी ।*<br>*तुका झालासे संतुष्ट । घरा आले वैकुंठ पीठ ॥ (३६०१)*

तुकाराम महाराजांनी निघण्याची तयारी केली आहे. श्रीहरी आम्हाला बोलाविण्यास आले आहेत. विठोबा आम्हाला अंतकाळी पावला आहे. आम्ही जातो. तुमची आमच्यावर कृपा असावी.

*आम्ही जातो तुम्ही कृपा असो द्यावी ।*<br>*अंतकाळी विठो आम्हांसी पावला । कुडीसहित झाला गुप्त तुका ॥*<br>*(३६१६)*

तुकारामांचे सदेह वैकुंठगमनाबद्दल गुरुदेव म्हणतात, इतर संतांच्या समाध्या आहेत त्याप्रमाणे तुकारामांची समाधी कोठेच बांधली गेली नाही. त्यामुळे ते सदेह वैकुंठाला गेले अशी लोकांची समजूत झाली. तात्त्विक अर्थ इतकाच की याच जन्मी ते ईश्वर दर्शनामुळे मुक्त झाले आणि आपल्या अभंगांनी संत तुकाराम महाराज वारकरी संप्रदायाचे कळस ठरले.

**श्री. आत्माराम महादेव बझे**<br>स्वरमाला सोसायटी, कर्वेरोड, पुणे ४११००४.

# गुरुदेव रानडे यांचा साक्षात्कार मार्ग आणि तुकाराम वचनामृत

**डॉ. सौ. सुनीता तांबे**

*एम.ए.एम.फिल., पीएच.डी., श्रीएकनाथ पंचक एक विवेचक अभ्यास . २४-२५ लेख व लघुकथा प्रकाशित. काही कथा बक्षीस पात्र.*

## आरंभिक

***'आपुलीया बळे नाही मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥१॥***
***साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शिकविता धनी वेगळाची ॥२॥***
***काय म्यां पामरे बोलावी उत्तरे । परि त्या विश्वंभरे बोलाविले ॥३॥***
***तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । चालवि पांगुळा पायांविण ॥४॥'***
***(तुकाराम वचनामृत २१२)***

ईशसाक्षात्कारानंतरचे संत तुकारामांचे हे बोल त्यांच्या ईश्वरविषयक अनन्यभावाचे प्रतिक आहेत. 'सर्व अर्पावे शेवटी । प्राण तोही वेचावा ।' अशी उदार भावना राखल्याने त्यांना अखेर ईश्वर दर्शन घडले. देव-भक्त संगम घडून आला. त्यांचे अवघे जीवन धन्य होऊन गेले. साक्षात्कारानंतर तुकारामांनी लोकांना जो उपदेश केला तो अमोल ठरला.

**'मरणे सायास जावे वनांतरा । सुखे येतो घरा नारायण'** असे त्यांनी स्पष्ट सांगितले आहे. आत्मानुभवाच्या वाटा कधी तरी आपल्याही जवळ असतात पण त्या शोधायला अभ्यास हवा. तप हवे. म्हणजेच जीवनाबद्दलचे अखंड चिंतन हवे. असाध्य ते साध्य करावयाचा काळ म्हणजे तप. यातूनच विश्वाचे रहस्य जाणून घेता येते.

***'ऐसा ज्याचा अनुभव । विश्व देव सत्यत्वे ॥***
***देव तया जवळी असे । पाप नासे दर्शने ॥***
***काम क्रोधा नाही चाली । भूती जाली समता ॥***
***तुका म्हणे भेदाभेद । गेले वाद खंडोनि ॥' (तु. गा. १७८)***

ईश्वर म्हणजे प्रकाश ! अंधाराचा नाश ! विठ्ठल म्हणजेच प्रकाश सोहळा ! हा प्रकाश आकाश व्यापून असणारा. त्यातूनच व्यापक अनुभव लख्ख प्रकटतो तेव्हा तो अक्षर होतो आणि याच अक्षर अनुभवांनी समृद्ध असलेले संत-महात्मेच युगायुगातून या भूतलावर अवतीर्ण झालेले आहेत.

***'धर्म स्थापनेचे नर । जे ईश्वराचे अवतार ।***
***झाले आहेत पुढे होणार । देणे ईश्वराचे ॥' (दा. १८.६.२०)***

वेदकाळापासून भारतीय भूमीत संत-माहात्म्यांची एक तेजःपुंज मालिका आपण पहात आलेलो आहोत. कालोचित असेच ते संत आहेत. मात्र त्यांचे जीवित कार्य सार्वकालीन व सार्वदेशीय होते. अशा थोर संत महात्म्यांत ज्ञानेश्वर-तुकारामादी संतांप्रमाणेच आधुनिक विद्याविभूषित तत्त्वज्ञ व संत, गुरुदेव रानडे विख्यात आहेत. इ. स. १८८६ ते १९५७ या काळात ते वावरले.

## ॥ साक्षात्कार मार्गाचे प्रणेते ॥

गुरुदेव साक्षात्कारमार्गाचे प्रणेते आहेत. Mysticism in Maharashtra 'महाराष्ट्र संतांचा आत्मसाक्षात्कार' या विषयावरील त्यांचा उद्बोधक ग्रंथ असून १९२७ साली त्यांनी प्रसिद्ध केलेले 'संतवचनामृताचे' चार ग्रंथ हे या इंग्रजी ग्रंथांचे आधारभूत मराठी ग्रंथ ! या ग्रंथात गुरुदेवांनी साक्षात्कार, शास्त्र व साक्षात्कारमार्ग यांच्या व्याख्या दिलेल्या आहेत. मनाची सुप्त प्रतिभाशक्ती जागृत झाल्यानंतर, स्वतःस प्रत्यक्ष व तात्काळ होणारे परमेश्वरी ज्ञान, आकलन करण्याच्या उच्च मनोवृत्तीचे निदर्शक असे जे शास्त्र तेच साक्षात्कार शास्त्र होय. 'साक्षात्कार शास्त्रा'ला गूढ विद्या म्हटले जाते. पण गुरुदेवांच्या मते 'ती गूढ विद्या नसून प्रकट विद्या आहे.' मात्र ज्याला आत्मानुभव आहे त्यालाच ती प्रगट आहे. आधिभौतिक शास्त्रात एखादी नवीन कल्पना गृहितकृत्य म्हणून स्वीकारली जाते. त्याप्रमाणे प्रयोग करण्यात येतात व त्यावरून ती खरी ठरली तर तिला सिद्धान्ताचे स्वरूप येते. पारमार्थिक विद्येतही संतांनी सांगितलेला साधनमार्ग असेच गृहितकृत्य म्हणून स्वीकारायचा असतो. 'ईश्वर ही एक मोठी आध्यात्मिक शक्ती आहे' असा सिद्धान्त श्रद्धापूर्वक गृहित धरून प्रत्येकाने स्वतः साधनमार्गाची वाटचाल करावी आणि जे काही स्वानुभवास येईल तेवढेच खरे मानावे. सद्गुरु त्यासाठी 'सबीज' नामाच्या सहाय्याने ईश्वर - भक्ताची केवळ गाठ घालून देतील. त्यापुढील मार्ग साधकाने स्वतःच आक्रमावयाचा असतो. श्रद्धा, भक्ती, धैर्य, परोपकार, सहिष्णुता, प्रेम, त्याग व न्याय इत्यादी सद्गुणांची जोपासना करणे या मार्गासाठी आवश्यक असते' असे गुरुदेवांनी सांगितले आहे. महाराष्ट्रीय साक्षात्कारी संत व पाश्चिमात्त्य अनुभवी सिद्ध पुरुषांची अतिशय चिकित्सक दृष्टीने तुलना करून त्यांनी लिहिले, 'सर्व देशातील व सर्व कालातील साक्षात्कारी पुरुष हे शाश्वत अशा दिव्य समाजाचे घटक आहेत. अशा महापुरुषांत राष्ट्रीय जातीय किंवा वांशिक असे भेदभाव असू शकत नाहीत. त्यांच्या शाश्वत व अनंत अशा पारमार्थिक अनुभवांना स्थलकालाचे बंधन राहू शकत नाही.' ग्रंथात उल्लेखिलेल्या संतांपैकी संत तुकारामांची संत सूसो (Suso) यांच्याशी तुलना करून दोघांतील साम्य त्यांनी दाखवून दिले आहे. त्याचप्रमाणे दुसरी महत्त्वाची गोष्ट गुरुदेव यात सांगतात, 'ईश्वराचे ज्ञान इंद्रियांना, मनाला व बुद्धीला होऊ शकत नाही. ते अपरोक्ष ज्ञान केवळ प्रतिभाशक्तीमुळेच होऊ शकते. साक्षात्कारी पुरुषाची प्रतिभाशक्ती उच्च दर्जाची असते. अशा प्रतिभाशक्तीस प्रतीत होणारे अतींद्रिय व अंतस्फूर्त ज्ञान म्हणजेच साक्षात्कार !' सद्गुरुंकडून मिळालेल्या सबीज नामाच्या अखंड स्मरणाने, देहात उत्पन्न होणाऱ्या ईश्वरी शक्तीच्या दिव्य लहरी, मेंदूतील विविध ज्ञानकेंद्रांना पोचल्यामुळे, ज्योति, नाद, रूप, रंग, रस, गंध अशा विविध प्रकारांनी प्रतीत होणारे आध्यात्मिक अनुभव येतात.' असा स्वानुभवाधिष्ठित सिद्धान्त गुरुदेवांनी या ग्रंथात मांडला असून, अशा साक्षात्काराचे निकष कोणते हेही त्यांनी स्पष्ट शब्दात सांगितले आहे. पारमार्थिक अनुभवांचा खरेपणा त्यांची अतींद्रियता, अंतःस्फूर्तता, एकरूपता, सातत्य व आनंदपूर्णता यावर अवलंबून आहे. या निकषांद्वारे गुरुदेवांनी ईश्वर साक्षात्कार घडून येणे अत्यंत अवघड व दुःसाध्य असल्याचे स्पष्ट केले आहे. गुरुदेव कृती प्रधान साधनमार्गाचे पुरस्कर्ते होते. ही कृती म्हणजेच भक्तियोग ! गुणशोधन, दुर्गुण त्याग, सद्गुण सेवन, नामस्मरण, सत्संग ही त्याची प्रधान अंगे. पैकी 'नामस्मरण' हे प्रमुख साधन आणि 'साक्षात्कार' हे ध्येय! प्रपंचविषयक अनासक्ती,

ईश्वरशरणता, भेदाभेदातीतता आणि शुद्ध अंतःकरण ही साधनमार्गातील चतुःसूत्री गुरुदेवांनी सांगितली आहे. त्यांच्या मते 'हठयोग' व 'कर्मयोग' यापेक्षा 'भक्तीयोग' श्रेष्ठ असून तो सर्व गुणांचा मुकुटमणी होय. 'अनन्यभक्ती' हा गुरुदेवांच्या तत्त्वज्ञानाचा पाया!

## आत्म्याचा अनुभव हेच आत्मज्ञान

गुरुदेवांनी 'ईश्वर' हा शब्द 'आत्मा' या अर्थी वापरला असून त्या 'आत्म्याचा अनुभव हेच आत्मज्ञान !' असे ते म्हणतात. 'आपणास आपण पहावे' हे आत्मदर्शन ! उदा. 'आत्मा वा अरे द्रष्टव्य' असे उपनिषदात म्हटले आहे. (बृहदा. २-४-५) उपासकाने सर्वत्र आत्म्याचे दर्शन करावे आणि त्याप्रमाणे क्रियाही करावी. आत्म्याचे ज्ञान झाले म्हणजे सर्वांचे ज्ञान झाले. जाणण्याजोगे काही उरलेच नाही. ज्ञानी पुरुषाला प्राप्त झालेला अनुभव म्हणजे साक्षात्कार असल्याने, असा साक्षात्कार होण्यासाठी श्रोतव्यः। मन्तव्यः। ऐकावे, चिंतन-मनन करावे असे मुद्दाम सांगण्यात आलेले आहे. 'आत्मा' हा स्वयंज्योतिने पाहतो त्यामुळे त्याने पाहिले नाही असे काहीही नाही. (बृहदा. ४:३:२३) 'आत्मा' म्हणजे ज्ञान, चैतन्य, प्रकाशाचे भांडार ! (जे तुकारामांनी भंडारा डोंगरावर अनुभवले) मानवी देहेंद्रियांना तो कर्मप्रवृत्त करतो. म्हणून मानवी देह हे आत्म्याचे साधन समजले जाते. उदा. आत्मा ज्ञानघन आहे. त्यामुळे जागृती, स्वप्न, सुषुप्ती यामध्ये त्याने जी दृश्ये पाहिली असतील ती माणूस जागा झाल्यावर त्याला आठवतात. त्यामुळे त्या संदर्भादरून गतगोष्टींचे त्याला स्मरणही होते. जागृतीत येताच आपल्या स्वप्नातील मार्गदर्शकाप्रमाणे तो कार्य करीत जातो. त्यानुसार आचार करतो. संत तुकारामांना त्यांचे गुरु बाबाजी चैतन्य यांनी स्वप्नात जागे केले आणि गुरुपदेश दिला असे बहिणाबाईंनी लिहून ठेवले आहे. तुकारामही लिहितात -

*'सद्गुरुराये कृपा मज केली । परि नाही घडली सेवा काही ॥*
*सापडविले वाटे जातां गंगास्नाना । मस्तकी तो जाणा ठेविला कर ॥*
*भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजी ॥*
*काय कळे उपजला अंतराय । म्हणोनिया काय त्वरा जाली ॥*
*राघव चैतन्य केशव चैतन्य । सांगितली खूण मालिकेची ॥*
*बाबाजी आपुले सांगितले नाम । मंत्र दिला रामकृष्ण हरि ॥*
*माघ शुद्ध दशमी पाहुनि गुरुवार । केला अंगिकार तुका म्हणे ॥ (तु. ब.१)*

गुरुदेवांच्या मते 'ईश्वरी साक्षात्कारास योग्य होणे' हेच मानवी जीवनाचे श्रेष्ठ कर्तव्य आहे.

'विविध धर्मातील संतवचने जाणून घेतल्यास, लक्षात येते की संस्कृतीची बाह्यांगे भिन्न असली तरी अंतरंग एकच असते. आचार देशकालपरत्वे भिन्न होतात आणि देह भिन्न असले तरी आत्म्यात भेद नसतो. परिणामी संस्कृतीतही भेद नाही. आज विज्ञान, तंत्रज्ञानात प्रगती होऊनही जग कलह आणि विरोधाने ग्रस्त आहे. हा कलह-भेद-द्वेष हे विश्वबंधुत्वाचे नाते निर्माण करणाऱ्या विश्वधर्मी मनोभूमिकेखेरीज नाहीसे होणारे नाहीत. संतवचनामृतातून प्रतीत होणारे आत्मानुभवाचे-एकतेचे सूत्र शोधून त्याची समाजास जाणीव करून दिल्यास विश्वबंधुत्वाची भावना वाढीस लागेल. परमेश्वराच्या साक्षात्काराचे एकच ध्येय मानवापुढे असल्यास एक देव, एक धर्म व त्यामुळे एक मानवता शक्य आहे', असे गुरुदेवांनी सांगितले आहे. (पृ. २१५).

## तुकाराम वचनामृत

गुरुदेवांच्या विचारांचा पाठपुरावा करीत 'तुकाराम-वचना'पर्यंत येऊन पोहोचणे आवश्यक होऊन बसते. कारण तुकारामांचीही झेप विश्वकल्याणाकडे होती. खरा परमार्थ जगात कसा वाढेल व जगदोद्धार कसा होईल याविषयीच त्यांना चिंता वाटत असे.

तुकारामांच्या पारमार्थिक जीवनाविषयीची भरपूर माहिती त्यांच्या गाथेतून आलेली आहे. परमार्थास प्रारंभ केल्यावर तुकारामांच्या मनाची स्थिती साधकावस्थेत कशी होती. साधन करता करता शेवटची पायरी लवकर गाठता येईना म्हणून त्यांचे अंतःकरण कसे तळमळत असे? शेवटी ईश्वरकृपेने त्यास परमार्थसाक्षात्कार कसा घडला आणि त्यानंतर सिद्धावस्थेवर आरूढ झाल्यावर त्यांनी जनास उपदेश कोणता केला? हे येथे थोडक्यात जाणून घेऊ.

गुरुदेवांच्या मते 'तुकारामांच्या अभंगातील साक्षात्काराचे मानसशास्त्र' या दृष्टीने अद्याप फारसे अध्ययन झालेले आढळत नाही. ईश्वर साक्षात्काराच्या मार्गात, मनात ज्या अनंत वृत्ती उठतात व जे अनंत अनुभव येतात त्यांचे निरीक्षण करून ईश्वरप्राप्तीचा अंतर्मार्ग काय आहे या विषयी तुकारामांच्या चरित्रापासून आपल्याला पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. तुकारामांचे अंतःश्चरित्र लिहावयाचे म्हटले म्हणजे त्याबद्दल एक स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल.' (पृ. ७)

कुठल्याही संतांच्या परमार्थ पदावर केलेल्या वाटचालीत तीन टप्पे दिसतात. त्यातील पहिला साधकावस्थेचा. या अवस्थेत प्रपंचाविन्मुख बनून परमार्थ मार्गावर पहिली-वहिली पाऊले टाकण्यास आरंभ होतो. त्या वेळी आळस व लाज सोडावी लागते. **'आता हा आळस असतो परता दुरी । नेदावी ते उरी उरी काही'** (क्र. ४४) अशी स्थिती असते. शरीरास कितीही कष्ट पडोत तुकारामांनी त्याची पर्वा केली नाही. **'विटंबो शरीर होत का विपत्ती । परि राहो चित्ती नारायण'** (क्र. ४८) अशा स्थितीत मृत्यू समोर दिसत असता परमार्थास प्रवृत्त होणे हीच शहाणपणाची गोष्ट ठरते. **'जरा कर्ण मुळी सांगो आली गोष्टी । मृत्याचिया भेटी जवळ आली'** (क्र. ५१)

त्यानंतर तुकारामांना अनुभवी संतांच्या भेटीची ओढ वाटू लागली. **'माझिये जातीचे मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया'** (६४) मागील भयाच्या आठवणीने जागरूक होऊन त्यांनी आपली साधकदशा आरंभिली. अर्थात या मार्गात भयंकर विघ्ने, नाना विकल्प, बिकट प्रसंग, शंका-कुशंका उद्‌भवून क्षणोक्षणी साधक निराशेच्या खाईकडे जात राहातो. त्यानंतरच त्याच्या लक्षात येते आपण प्रपंच व परमार्थ दोन्हींनाही मुकलो आहोत. ही साक्षात्कार मार्गातील दुसरी अवस्था. 'आत्म्याची काळोखी रात्र !' या स्थितीत जागृत राहून जो सूर्योदयाची पहाट पहातो त्यासच आपले अंतिम साध्य गाठता येते. या अवस्थेत साधक आपल्या मनाला विवेक व संयमाचा अंकुश लावतात. मन मात्र तळमळत असते; की अद्याप आपल्याला देवाची भेट का होत नाही? देवाचे भव्य रूप जरी आपल्याला दिसले नाही तरी उद्धव अक्रूरास, रुक्मांगद-प्रल्हादास जे सान रूप ईश्वराने दाखविले ते आपल्यालाही देवाने दाखवावे अशी तुकाराम देवाची करुणा भाकू लागले. (क्र. ७५)

*'तरि तू अनाथांचा दाता । मागतिया शरणागता ।*
*तुका म्हणे आता । कोड पुरवी हे माझे' ॥७५॥*

इतकी करुणा भाकूनही देवास दया येत नाही याचे त्यांना दुःख झाले. माझ्या पापांच्या अतिरेकाने तुझे दर्शन होत नाही का? असे ते देवाला विचारू लागले आणि ज्याची तुझ्यावर प्रीती आहे अशाची तरी निदान मला संगती दे असे ते विनवू लागले. **'अखंड जया तुझी प्रीती । मज दे तयाची संगती'** (१०९) इतके झाले तरी देवाचे चित्त द्रवत नाही असे पाहून तुला खूप भक्त असल्याने माझ्यासारख्या हीनदीन माणसावर तू कशाला कृपा करशील? अशा उपरोधिक शब्दात ते देवाला बोल लावू लागले. **'तुका म्हणे तुज भक्त झाले फार । म्हणोनिया थार नाही येथे ।'** (१२५) शेवटी तर तू स्वतः भिकारी असून आपल्या दासासही भिकारी करतोस. **'तुझा संग पुरे संग पुरे । संगति पुरे विठोबा । आपल्यासारिखे करिसी दासा । भिकारीसा जग जाणे ।'** (१३४) तुकाराम म्हणतात, तुझा दास म्हणवून घेण्यासही मला लाज वाटते. **'लाज येते मना तुझा म्हणविता दास'** अशा प्रकारच्या देवाविषयीच्या भावना तुकारामांच्या मनात निर्माण होत गेल्या. देवाबरोबर ते वाद घालू लागले. तुझे नाम न घेता तुझे कुळ मी बुडवीन. **'करुनी चाहाडी । अवघी बुडवीन जोडी... तुका म्हणे कुळ । तुझे बुडवीन समूळ'** (१४१) अखेरीस तर देवाची प्राप्ती होत नाही असे बघून आत्मघात करण्यासही ते प्रवृत्त झाले. (१४६)

***'कळले माझा तुझा नव्हे रे आठव । काय काज जीव ठेवू आता ।***
***तू काय करिसी माझिया संचिता । धिक् हे अनंता झाले जिणे ॥'***

अशा स्थितीत असतानाच तुकारामांना एकदम ईश्वर दर्शन घडले. गुरुदेव म्हणतात, 'देव पडो का देव जोडो ।' या भावनेने जो देवाच्या प्राप्तीचा यत्न करतो त्याचा देव अंत पहात नाही. अखेर तुकारामांना देवाचे दर्शन घडले. ब्रह्मीची छाया पडल्याने तुकारामांचा देहभाव पालटला (१४४). आता पद्मनाभ जोडल्यावर आपले भाग्य उजळल्यासारखे तुकारामांना वाटू लागले (१४९). अंगी ब्रह्मरस ठसविल्याने त्यांची स्वतःची भाषाच त्यांना अनावर झाली. (१५९) अंधार नाहीसा झाला आणि जगताकार तेजोमय होऊन गेला.

***'चकाकले जगदाकार । आंधार तो निरसला ॥***
***लपो जाता नाही ठाव । प्रगट पाहे पसारा ॥***
***वरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ॥***
***तुका म्हणे जीवेसाठी । पडिली मिठी पुरेसी ॥ (१६०)***

दिवसरात्रीतला भेद सरला. अखंड ज्योत लागून गेली. निजरूपात तुकाराम निजल्याने अनाहताचे हल्लर वाजू लागले. (१६४) तुकारामांचे शब्द हे त्यांचे नसून त्यांच्या तोंडून ते देव बोलवितो असे झाले. (१६५) जिकडे तुकाराम जातील तिकडे देव त्यांचा पाठलाग करू लागला. (१६६) जणूकाही तुकाराम स्वतःच्याच पोटी आले **'मीचि मज व्यालो । पोटा आपुलीया आलो ।'** (१७१) साक्षात्काराने – स्वस्वरूपाच्या दर्शनाने तुकारामांची वाणी पांगुळली.

***'दाता नारायण । स्वये भोगिता आपण ॥***
***आता काय उरले वाचे । पुढे शब्द बोलायाचे ॥***
***देखती जे डोळे । रूप आपुले ते खेळे ॥***
***तुका म्हणे नाद । जाला अवघा गोविंद ॥' (१७२)***

तुकारामांना आत्मप्रचीती आली. साक्षात्काराने ते धन्य होऊन गेले. ते म्हणू लागले –

***'गोविंद गोविंद । मना लागलीया छंद ॥***
***मग गोविंद ते काया । भेद नाही देवा तया ॥***
***आनंदले मन । प्रेमे पाझरती लोचन ॥***
***तुका म्हणे आळी । जेवि नुरेची वेगळी ॥१८॥***

तुकाराम स्वानुभवाधिष्ठित झाल्यावर त्यांनी लोकांस निरनिराळ्या गोष्टींविषयी उपदेश केलेला आहे. त्यात साधकाचे आचरण-वर्तन कसे असावे; अभ्यास कसा कोठे करावा? षड्रिपूंवर विजय कसा मिळवावा? त्याचबरोबर गुरु कसा असावा, साधना कशी करावी? इत्यादी सांगून, ते ज्या भक्तिमार्गाचे पुरस्कर्ते होते त्यासाठीची साधनेही त्यांनी सांगितली आहेत. त्यात 'नामस्मरण' हे महत्त्वाचे असल्याचे ते सांगतात. सद्गुरुंनी दिलेले 'सबीज' नाम साधकास ईश्वरप्राप्ती-आत्मज्ञान प्राप्ती मिळवून देते. 'रामकृष्णहरि' हा मंत्र उच्चारला असता अंतःकरणात गोपाळ निश्चयाने वसतीस येईल असे ते अभिवचन देतात. सर्व साधनात 'नामसंकीर्तन हेच सोपे साधन, त्याने जन्मांतरीची पापे जळून जातील (२६७) असे ते सांगतात. 'वेद अनंत बोलला । तरी आम्ही त्यातून एवढाच अर्थ काढला की, **'विठोबासी शरण जावे । निजनिष्ठे नाम गावे ।'** (२७१) 'नाम' साधनाने ते साक्षात्कार मार्गाचे अधिकारी पुरुष झाले असल्याने ते ठामपणे सांगतात. **'वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरांनी वहावा भार माथां'** (२७२)

नामस्मरणाने मोक्षप्राप्ती होते तसेच कीर्तनाद्वारेही ईश्वर प्राप्ती होते असे तुकारामांनी सांगितले आहे. स्वतः तुकाराम साक्षात्कारी कीर्तनकार होते. कथा-कीर्तन असे करावे की कीर्तनात रंगून देव आपल्यापुढे उभा राहील. भक्तिभावाने कीर्तन केल्यास ते आपल्याला तर तारतेच पण इतरांनाही तारण्याचे एक मोठेच साधन आहे.

***'जप तप ध्यान न लगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ॥***
***तुका म्हणे मुक्ती हरिदासांच्या घरी । बोळगती चारी ऋद्धिसिद्धी ॥' (३०३)***

तुकारामांनी 'भक्तिमार्गाला' प्राधान्य दिले. सर्व ठिकाणी देवा पाहणे हीच 'भक्ती' असे ते सांगतात. (३०४) देव सगुण नाही-निर्गुणही नाही त्याचे खरे स्वरूप अगम्य आहे. (३०६) अंतरात खरी भक्ती उत्पन्न झाल्यापासून बाह्याचार करणे मूर्खपणाचे आहे. (३१०) भक्तिमान पुरुषाने व्यवहारात न सापडता देवाकडे लक्ष द्यायला हवे असाच त्यांचा उपदेश आहे. ईश्वराजवळ जातीभेद नाही, अंत्यजादि योनीदेखील हरिभजनाने तरुन गेल्या आहेत. (३१६) आपल्या हातून पूर्वी कसलीही कर्मे झाली असली तरी अनुतापाने हरीचे स्मरण केले असता ती दूर होतात (३१८) आणि हरिनामसंकीर्तन ज्यास आवडत नाही तो ब्राह्मण असला तरी खरा ब्राह्मण नव्हे (३१९) असेच त्यांचे सांगणे आहे. ते म्हणतात –

***'ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धी । पहा श्रुतीमधी विचारूनी ॥***
***जयासी नावडे हरिनाम संकीर्तन । आणिक वर्तन वैष्णवांचे ॥***
***सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेशी वेव्हार अंत्यजांचा ॥***
***तुका म्हणे येथे मानी आनसारिखे । तात्काळ ती मुखे कुष्ठ होय ॥'***
***(३१९)***

तुकाराम वारकरी असल्याने विठ्ठल, पंढरी माहात्म्य, चंद्रभागा, पुंडलिक इत्यादींविषयीही त्यांनी आवर्जून लिहिले. ते म्हणतात – (क्र. ३३२)

***'भेद आला पंढरीस । हाती घेऊनि प्रेमपाश । पुढे नाडियेले जग । नेतो लागों नेदी मागे ॥***

***उभारोनी बाहो । दृष्टादृष्टी वेधीताहे । वैकुंठाहुनि पेणे । केले पंढरीकारणे ॥***

***पुंडलिके थारा । देऊनि आणिले या चोरा । तुका म्हणे चला । तुम्ही आम्ही धरू त्याला ॥'***

भक्तिमार्गात सगुणाला जेवढे महत्त्व असते तेवढे निर्गुणाला दिलेले दिसत नाही. तुकारामांचे विचार व स्वानुभवावरून हे लक्षात येते. आम्हास अरुपस्थितीची चाड नसून स्वरूपस्थितीची चाड आहे असे त्यांनी वारंवार म्हटले आहे. अरूपस्थितीने तू खुशाल ब्रह्मज्ञानी लोकांस वेड लाव परंतु आम्हा भक्तांविषयीचे प्रेम तू आटू देऊ नकोस असे त्यांनी देवाजवळ मागणे मागितले आहे. (३३७) आम्ही मोक्षपदावर लाथ मारली असून निराकार देवास आम्ही आकार घ्यावयास लावतो हे आमचे केवढे सामर्थ्य. (३३८) हिरा खुलून दिसावा यासाठी तो कोंदणात बसवावा लागतो. त्याप्रमाणे देवास महत्त्व येण्यास आम्हा भक्तांची त्यास जरूर आहे असे ते सांगतात.

***'हिरा शोभला कोंदणे । अलंकारी मिरवे सोने । एक असता तेणे । काय तुजे जाणावे (३४०)***

तुकारामांनी देव-भक्तांमधील संबंध अवर्णनीय स्वरूपाचा असल्याचे सांगितले. देवावर भक्ताने भार घातला असता देव त्याची उपेक्षा करीत नाही. (३६४) मात्र त्यासाठी भक्ताने सर्व लौकिकाची चाड सांडून देवास आळविण्यास तयार झाले पाहिजे. (३६६) देव ज्यास राखण्याची इच्छा करतो त्याला मारण्यास कोणीही समर्थ नाही. (३७४) **'देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडता वन ॥'** असे ते सांगतात.

तुकारामांनी 'संतलक्षणेही' सांगितली आहेत. **'संत उदार उदार । भरले अनंत भांडार'** (४०७) **संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचे काम नाही येथे ॥** (३८७)

***'जे का रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ।***

***तोचि साधु ओळखावा । देव तेथेचि जाणावा ॥' (३११)***

'देवभक्तांच्या ऐक्याविषयी' तुकारामांनी काही विचार व्यक्त केले आहेत. 'बीजाच्या पोटी तरुवर व तरुवराच्या शेवटी बीज हे नेहमी घडणारे, आपण पहात असलेले अभेदस्वरूप मात्र भक्ताबाबत **'अभेदूनि भेद राखियेला अंगी । वाढावया जगी प्रेमसुख' 'तुका म्हणे हे तो आहे तया ठावे । जिही एका भावे जाणितले ।'** (४१८)

तुकारामांनी निर्गुणासंबंधीही आपले मत व्यक्तविले. जगद्व्यापक जनार्दन हा या जगाच्या अंतर्यामामध्ये एकसूत्रच आहे असे उपनिषद्कारांप्रमाणे तुकारामांचेही मत होते (४२७). हा देह आपला नव्हे अशी ज्याची खात्री पटली, त्यासच देवाचे व आपले ऐक्य कळून येणार आहे (४२८) लोकात असता देव आहे असेच सांगावे पण अंतःस्वरूपाने (साक्षात्कारानंतर) आपणच देव बनल्यावर देवपणा निराळा नाहीच (४२९) **'आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाही ऐसा मनी अनुभवावा ।'**

तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाने निर्गुणस्थिती मांडता-सांगता वा विवरता आली तरी या स्थितीस पोहोचण्यासाठी ईश्वरसाक्षात्कारामधूनच गेले पाहिजे. देव भेटला-पाहिला पण देवाची कृपा अवश्य झाली पाहिजे. केवळ साधने हाती आली तरी त्याने ईश्वर प्राप्ती होत नाही तर त्यासाठी त्याचा वरदहस्त हवाच. असा वरदहस्त शुकशौनकादिकांना लाभला आणि सातच दिवसांत ते ब्रह्मस्वरूप झाले. तुकाराम म्हणतात, 'शेवटचा दिवस गोड व्हावा म्हणूनच आजवर इतका अट्टाहास केला.'

***'याजसाठी केला होता अट्टाहास । शेवटचा दिस गोड व्हावा ।***

***आता निश्चिंतीने पावलो विसावा । खुंटलिया धावा तृष्णेचिया ॥***

***कवतुक वाटे जालिया वेचाचे । नाव मंगळाचे तेणे गुणे ।***

***तुका म्हणे मुक्ती परिणीली नोवरी । आता दिवस चारी खेळीमेळी (४६८)***

**निष्कर्ष :** गुरुदेव रानडे हे 'तत्त्वज्ञ संत' म्हणून जगद्विख्यात आहेत. त्यांनी 'महाराष्ट्रातील संतांचा साक्षात्कार मार्ग' या विषयावर मौलिक ग्रंथ रचिला. त्यासाठी संत ज्ञानेश्वर-नामदेव-एकनाथ-तुकाराम व रामदासादी संतांच्या साक्षात्कार मार्गाचा अभ्यास करून त्यातील साम्य शोधले. ते स्वतः साक्षात्काराचे अधिकारी आहेत. परमेश्वराच्या साक्षात्काराचे एकच ध्येय मानवापुढे असल्यास एक देव, एक धर्म व त्यामुळे एक मानवता शक्य आहे' असा विचार त्यांनी मांडला. संस्कृतीची बाह्यांगे भिन्न असली तरी अंतरंगे एकच आहेत. साक्षात्कार मार्गातील बद्ध, मुमुक्षु, साधक आणि सिद्धावस्थेतील सर्वच संतांचे अनुभव एकच आहेत हे त्यांनी जगभरच्या संतांच्या अभ्यासातून शोधलेल्या साम्याद्वारे सिद्ध केले. तुकारामवचनामृतात याचाच प्रत्यय आहे. संतांची चरित्रे, त्यांचे ग्रंथ व त्यांचे विचार यांचा अभ्यास चालविणे हे ईश्वरप्राप्तीच्या साधनांपैकी एक महत्त्वाचे साधन आहे, असा त्यांना विश्वास आहे. सर्व संतांनी हाच मार्ग चोखाळला आहे.

**डॉ. सौ. सुनीता तांबे**
२, आसावरी, गणेशखिंड रोड, औंध, पुणे ७.

# रामोपासनेचा गौरव म्हणजे 'रामदासवचनामृत'

**प्रा. डॉ. ग. वा. करंदीकर**

*पीएच.डी., समर्थ रामदासांची अध्यात्मपर स्फुट प्रकरणे, एक विवेचक अभ्यास, ३३ वर्षे अध्यापन, मराठीचे प्राध्यापक, ४ पुस्तके प्रकाशित, ११ वर्ष गीता धर्म मंडळ, पुणे संस्थेचे सहकार्यवाह.*

## १) पारमार्थिक शिकवण

***मिळता प्रत्ययाचे संत । एकान्ता परित एकान्त ।***
***केली पाहिजे सावचित्त । नाना चर्चा ॥ (दास. २०.७.२४)***

सामान्य लोकांना शुद्ध परमार्थाचे स्वरूप समजावे, यासाठी गुरुदेव डॉ. रा. द. रानडे यांनी पौर्वात्य आणि पाश्चिमात्त्य जगतातील संतांच्या वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास करून बहुमोल ग्रंथरचना केली आहे. सत्पुरुषांना देश, काल, जात अशा स्वरूपाची बंधने नसतात. त्यांचा आत्मानुभव किंवा आत्मप्रत्यय एकाच तऱ्हेचा असतो. ग्रंथराज दासबोधाच्या शेवटच्या दशकातील सातव्या समासात समर्थ रामदासांनी 'आत्मनिरूपण' केले आहे. स्वतःला झालेले, वास्तविक अनुर्वाच्य असलेले असे आत्मसमाधान 'बोलिले' पाहिजे. ते बोलून दाखविले तर 'ते गमावले' असे घडत नाही ! **'न कळता वाटे कोडें । 'कळता' अवघे दिसे उघडे ॥'** म्हणून एकान्तात बसून विचार करावा (दास. २०.७.२३) जे 'प्रत्ययाचे' संत असतात. त्यांच्या वाङ्मयातील विचारधन वेचावे. त्यासाठी 'सावधान स्थिती' राखून चर्चा केली पाहिजे. याच उद्देशाने गुरुदेवांनी अध्यात्म ग्रंथमालेतील चार पुस्तके प्रसिद्ध केली आहेत. पहिल्या पुस्तकात संतश्रेष्ठ ज्ञानदेवांची पारमार्थिक शिकवण आहे. दुसऱ्या पुस्तकात तीन विभागांत मिळून ज्ञानदेवकालीन, नामदेव समकालीन आणि संत एकनाथ समकालीन संतांच्या अभंगवाणीतून व्यक्त झालेला परमार्थमार्ग स्पष्ट झालेला आहे. तिसऱ्या पुस्तकात संतशिरोमणी तुकाराम महाराजांचे अध्यात्म-दर्शन आहे. आणि चौथ्या पुस्तकात समर्थ रामदासांचा दासबोध आणि त्यांचे अन्य साहित्य यातून प्रकट झालेली पारमार्थिक आणि व्यावहारिक शिकवण आहे.

## २) प्रस्तावनेतील मशाल

परमार्थ मार्गावरून वाटचाल करीत असता काही वेळा दमछाक होते, नैराश्य येते, अंधकारमय वातावरण होते अशा वेळी संतांचे दीपस्तंभ योग्य दिशा दाखवीत असले तरी एका हातात मशाल घेऊन दुसऱ्या हाताने आपला हात धरून किंवा प्रसंगी पाठीवरून हात फिरवून, आपले मनोबल कायम टिकून राहावे यासाठी गुरुदेवांनी हे चार ग्रंथ संपादित केले आहेत. त्या ग्रंथांना विवेचक प्रस्तावना आहेत. त्या केवळ प्रस्तावना नाहीत तर गुरुदेवांच्या प्रज्ञाचक्षूने शोधलेले ते 'अमृतकण' आहेत. गुरुदेवांना भारतीय तत्त्वज्ञानाचा इतिहास लिहावयाचा होता. 'अध्यात्मविद्यापीठ' स्थापन करावे, असा त्यांचा संकल्प होता. त्या परमार्थपर अभ्यासक्रमासाठी ही अशी संत 'वचनामृते' गुरुदेवांनी 'सावचित्त चर्चा' करून सिद्ध केली आहेत.

## ३) ग्रंथाचे बाह्यरूप

गुरुदेवांनी 'रामदासवचनामृत' या ग्रंथाच्या दोन भागांतून समर्थ विचारांचे मंथन केले आहे. पहिल्या भागात पाच उपविभाग आहेत. ते पुढीलप्रमाणे आहेत – १) प्रासंगिक, २) तात्त्विक, ३) साक्षात्कार, ४) कर्मयोग, ५) उपसंहार. दुसऱ्या भागात समर्थ रामदासांनी लिहिलेली विविध स्फुट प्रकरणे, मनाचे श्लोक, करुणाष्टके, ऐतिहासिक स्वरूपाची रचना, समर्थांचे अभंग, पदे आणि व्यावहारिक शिकवण यांतील उतारे असे अकरा उपविभाग आलेले आहेत. 'कल्याण करी देवराया' या पदाने दुसऱ्या भागाचा व ग्रंथाचा समारोप केलेला आहे. या ग्रंथाला स्वतः गुरुदेवांनी तीस पानी विस्तृत प्रस्तावना लिहिली आहे. अत्यंत विशाल अशी समर्थ रामदासांची समग्र साहित्यसंपदा वेचून, त्यातील विचाररत्नांचे सुसंगत असे वर्गीकरण त्यांनी केलेले आहे. 'साक्षात्कार' आणि 'कर्मयोग' यासाठी सुमारे १००/१२५ पृष्ठे रामदासवचनामृतात आलेली आहेत. त्या दोन शब्दांनीच समर्थ रामदासांची गुरुदेवांना जाणवलेली थोरवी स्पष्ट करण्यासाठी, 'समर्थ वचनांची' निवड त्यांनी केली आहे.

## ४) वचनामृताचे अंतरंग

***'म्हणौनि नरदेह श्रेष्ठ । नाना देहांमध्ये वरिष्ठ***
***जयाचेनि चुके अरिष्ट । यमयातनेचे ॥ (दास. १.१०.२४)***
***नरदेह हा स्वाधीन । सहसा नव्हे पराधेन ।***
***परंतु हा परोपकारी झिजवून । कीर्तिरूपे उरवावा। (दास. १.१०.२५)***

हा नरदेह परोपकारासाठी आणि आत्मसाक्षात्कारासाठी प्राप्त झाला आहे. हा तत्त्वबोध, ही रामदासांच्या उपदेशांची गुरुकिल्ली आहे.

***महाद्वार ओलांडावे । मग देवदर्शन घ्यावे ।***
***तैसे दृश्य हे सांडावे । 'जाणोनिया' ॥ (दास. ८.४.५८)***

या ओवीतील 'जाणोनिया' या शब्दाकडे लक्ष वेधण्यासाठी 'रामदासवचनामृत' ग्रंथ गुरुदेवांनी सिद्ध केला आहे.

तत्त्वज्ञानी माणसांचे व सत्पुरुषांचे विचार आणि आपला अनुभव यांचा मेळ घालून, शास्त्रीय दृष्टीचा निकष लावून, पुन्हा पुन्हा स्वानुभवाचा पडताळा घेऊन, चिकित्सक बुद्धीने सामान्य लोकांसाठी परमार्थमार्ग उजळून दाखवावा, यासाठी ही 'वचनामृते' निवडलेली आहेत. चमत्काराच्या दृष्टीने संतचरित्राकडे न पाहता सर्वांच्या बुद्धीला पटेल असे संतांचे साक्षात्कारविषयक अनुभव शोधावेत, त्यासाठी या ग्रंथात संतवचनांची निवड मोठ्या साक्षेपाने केलेली आहे.

## ५) साक्षात्कार : परमार्थाची खूण

साक्षात्काराविषयी सामान्यतः बरेच गैरसमज पसरलेले आहेत. साक्षात्कार म्हणजे काहीतरी अतर्क्य, गूढ, अनाकलनीय, संदिग्ध, धूसर असे अतींद्रिय अनुभव आहेत अशीच अनेकांची समजूत असते. काही लोक साक्षात्काराला मंत्रतंत्र, जादुटोणा असेही समजतात ! समर्थ रामदासांचे विवेकप्रधान साक्षात्कारी विवेचन दासबोधात आणि त्यांच्या स्फुट प्रकरणात अनेक ठिकाणी आलेले आहे.

***उगेंचि पाहता मीपण दिसे । शोध घेता काहीच नसे ।***
***तत्त्वें तत्त्व निरसें । पुढे निखळ आत्मा ॥ (दास. १.१०.२२)***
***तें वृत्तिरूप जरी पाहिलें । तर मग काही नाही राहिले ।***

*प्रकृति निरासे अवघेंचि गेले । विकारवंत ॥ (दास. ९.१०.२६)*
*उरलें ते निखळ निर्गुण । विवंचिता तेंचि आपण ।*
*ऐसी ही परमार्थाची खूण । अगाध आहे ॥ (दास. ९.१०.२७)*

मात्र ही परमार्थाची खूण सहजी प्राप्त होत नाही. कारण समर्थ म्हणतात,

*अनंत जन्मीचें पुण्य जोडे । तरीच परमार्थ घडे ।*
*मुख्य परमात्मा आतुडे । अनुभवासी । (दास. १.९.२४)*

वयाच्या बाराव्या वर्षीच सार्‍या आप्तजनांचा वियोग सोसून पुढे बारा वर्षे समर्थ रामदासांनी कठोर तपश्चर्या केली. गायत्री पुरश्चरण आणि त्रयोदशाक्षरी रामनाम घेतले. साधकदशेतील आपल्या या अनुभवासंबंधी 'एकवीस समासी' या ग्रंथात समर्थ स्वानुभवाने लिहितात –

*'श्रीराम जयराम जयजयराम । ऐसा काही एक करुनिया नेम ।*
*जप कीजे तेणें आत्माराम । जोडेल नियमें ॥ (ए. स. १५.३८)*
*राम जपे त्याचे चित्त पाहतो । जप करितां शीण येतो ।*
*विकल्प अंतरी प्रवेशतो । तरी ढळेना, मेरू जैसा ॥ (ए.स. १५.४०)*
*कां प्रपंची होती थोर आपात । तेणें चित्त होय दुश्चित ।*
*देहासी आपदा होती अत्यंत । तरी रामासि विसरू नये ॥ (ए. स. १५.४१)*
*ऐसे अखंड नाम स्मरावें । परी दुसरियासी कळों नेदावें ।*
*चिविध्यास लागलिया राखवें । पाकिजे तात्काळ ॥ (ए.स. १५.४३)*
*काही साक्षात्कार जाला । तो सांगो नये दुसरियाला ।*
*जरी आळकपणे सांगितला । तरी पुन्हा होणार नाही ॥ (ए.स. १५.४५)*

समर्थ रामदासांनी जे जे लिहिले त्या सर्व लेखनाला त्यांनी 'रामकृपा' असेच संबोधले आहे. **'समर्थकृपेची वचने । तो हा दासबोध'** आपल्या आराध्य देवतेने आपल्यावर कृपा केली. भक्ताबद्दलचा अभिमान धरला आणि साधकाकरिता 'दासबोध' सिद्ध झाला, असे समर्थांनी नम्रपणे सांगितले आहे.

## ६) समर्थांचा कर्मयोग

बारा वर्षांच्या तपाचरणानंतर समर्थ रामदासांनी बारा वर्षे भारतभर भ्रमण केले. तीर्थयात्रेच्या निमित्ताने त्यांनी देशस्थिती पाहिली. 'तीर्थक्षेत्रें मोडिली । ब्राह्मणस्थाने भ्रष्ट जालीं । सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला॥ (७) देवधर्मगो ब्राह्मण । यांचे करावया संरक्षण । हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ॥ (८) अशा ओव्या लिहून समर्थ रामदासांनी आपल्या एका महंताबरोबर शिवाजीराजांना पत्र पाठविले. गुरुदेव रानडे यांनी 'रामदासवचनामृतां'च्या प्रस्तावनेत समर्थ रामदास आणि शिवाजी महाराज यांच्या भेटीच्या संदर्भात तपशीलाने खुलासा केला आहे. 'प्रासंगिक' या ग्रंथातील प्रारंभीच्या प्रकरणाची सुरुवात दासबोधाच्या दशक १८ च्या सहाव्या समासातील ओव्या देऊन केलेली आहे. महाराष्ट्रातील तत्कालीन राजकीय परिस्थितीबद्दल समर्थांना पूर्णपणे जाण होती. **'म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुता दिसांचे माजले बंड । याकारणे अखंड । सावधान असावें** ॥ (दास १८.६.१२) असा सावधानतेचा उपदेश करणारा हा समास शिवाजी राजांना उद्देशूनच त्यांनी लिहिला होता. आपल्या कुलदेवतेची प्रार्थना करताना **'तुझा तू वाढवी राजा । शीघ्र आम्हांसि देखता'** अशी समर्थांनी तिच्याजवळ मागणी केलेली आहे. 'आनंदवनभुवन' 'संभाजीस राजास पत्र' यातील उतारे त्यांच्या राजकारण विषयक जागृतीची साक्ष देणारीच आहेत. हे समर्थांचे वेगळेपण गुरुदेवांनी मानले होते !

## ७) समर्थांचे चरित्र आणि समर्थ संप्रदाय

समर्थ रामदासांनी तीर्थयात्रेनंतर कृष्णाकाठी येऊन आपला नवा शक्तिशाली समर्थ संप्रदाय सुरू केला. बलोपासना आणि रामोपासना समाजात दृढमूल करण्यासाठी शिष्यपरिवार वाढविला. हनुमंताची व प्रभू रामचंद्राची मंदिरे उभारली. मठस्थापना केली. त्या मठावर जाणत्या महंतांची नियुक्ती केली. वेणाबाई, आक्काबाई अशा त्यांच्या शिष्याही महंत पदवीला पोहोचलेल्या होत्या. समर्थांनी आपल्या महंतांना दासबोधात सूचना केल्या आहेत –

*उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास शिकवावे ।*
*उदंड समुदाय करावे । परी गुप्तरूपे ॥ (दास. ११.१०.१८)*
*अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावे जग ।*
*लोक समजोन मग । आज्ञा इच्छिती ॥ (दास. ११.१०.१९)*
*महंते महंत करावे । युक्तिबुद्धीने भरावे ।*
*जाणते करून विखरावे । नाना देशी ॥ (दास. ११.१०.२५)*

समर्थ रामदासांची सारी शिकवण ही अनुभवसिद्ध आहे. 'आधी केले मग सांगितले' हे त्यांच्या उपदेशाचे प्रधानसूत्र आहे ! दासबोधात आणि त्यांच्या सर्व स्फुट प्रकरणात त्यांच्या अनुभवाचेच दर्शन घडते ! 'उत्तम पुरुष निरूपण' (दास. १२ समास १०) महंत लक्षणे (दास. ११.६) शिकवण निरूपण (दास. १३.१०) विवेक निरूपण (दास. १९.१०) राजकारण निरूपण (दास. १९.९) समर्थ लक्षण (दास. १९.४) वगैरे वचनामृतात निवडलेले उतारे केवळ उपदेशप्रधान नाहीत. त्यात समर्थ रामदासांच्या चरित्रखुणा दिसतात. दासबोधातील १५ व्या दशकाचा दुसरा समास तर समर्थांचे 'आत्मचरित्र' या स्वरूपाचा आहे, असे समजण्यात येते. त्यांच्या सामर्थ्याचा 'प्रत्यय' पुढील ओव्यांतून दिसून येतो –

*त्याहीमध्ये जो तीक्ष्ण । रिकामा जाऊ नेदी क्षण ।*
*धूर्त, तार्किक विचक्षण । सकळो माने ॥ (दास. १५.२.१४)*
*नाना जिन्नस उदंड पाठ । वदो लागला घडघडाट ।*
*अक्षाटचि केली वाट । सामर्थ्यबळें ॥ (दास. १५.२.१५)*
*प्रबोधशक्तीची अनंत द्वारें । जाणें सकळांची अंतरें ।*
*निरूपणे तदनंतरें । चटक लागे ॥ (दास. १५.२.१६)*
*जनालांमध्ये जाऊन राहे । तेथे कोणीच न पाहे ।*
*सर्वत्रांचि चिंता वाहे । सर्वकाळ ॥ (दास. १५.२.२३)*
*उपासनेचा गजर । स्थळोस्थळी थोर थोर*
*प्रत्ययाने प्राणिमात्र । सोडविले ॥ (दास. १५.२.२८)*
*ऐसी कीर्ती करून जावे । तरीच संसारात यावे ।*
*दास म्हणे हें 'स्वभावें' । 'संकेतें' बोलिलों ॥ (दास. १५.२.३०)*

## ८) समर्थांची स्फुट प्रकरणे

रामदासवचनामृताच्या दुसर्‍या भागात एकवीस समासी (जुना दासबोध) मनाचे श्लोक, पंचसमासी, मानपंचक, निर्गुण ध्यान, जनस्वभावगोसावी, राममंत्राचे श्लोक, करुणाष्टके, ऐतिहासिक, सांप्रदायिक संदर्भाची कवने, अभंग, पदे वगैरे सरासरी शंभर पृष्ठांची समर्थांची रचना आलेली आहे. स्फुट प्रकरणात 'यत्न तो देव जाणावा', 'वन्हि तो चेतवावा रे', 'अभ्यासें होत आहे रे' 'मुख्य यत्न विचाराचा', वगैरे शीर्षके समर्थांच्या उपदेशाचे वेगळेपण सिद्ध करतात. त्या प्रकरणांपैकी 'खरी मैत्री आणि खोटी मैत्री' या प्रकरणांचा सारांश नित्य स्मरणात ठेवण्यासारखा आहे. त्यात समर्थ रामदास सांगतात, 'माझे ते माझे आणि तुझेही माझे', असे

मैत्री भावनेत असत नाही, तसेच 'माझे ते तुझे आणि तुझे ही तुझेच' असेही असत नाही ! परोपकाराची वृत्ती असलेली मैत्री ही खरी मैत्री होय. आशाळभूत किंवा बाहेरून मोहक, अंतरी कपटी अशी मैत्री योग्य नाही. मनात कसलाही विकल्प न ठेवता केलेली मैत्री सुखदायक असते. अविश्वास असलेली किंवा विकल्प असलेली मैत्री आत्मघातकी असते. **'संगदोषे महद्दुःखे । संग दोषे दरिद्रता । संगतीने महद्भाग्य । प्राणी प्रत्यक्ष पावती ॥'** (रामदासवचनामृत पृष्ठ २०८)

या स्फुट कवितेत 'धन्य संसार होतसे' या धृपदाचे एक अष्टक आहे. नेटक्या संसाराचे वर्म त्या अष्टकात समर्थांनी सांगितले आहे. त्यातील निवडक श्लोक पुढे दिले आहेत.

*मर्यादा न्यायनीतीची अन्याय न घडे कदा ।*
*सन्मार्ग योगदेवाचा, धन्य संसार होतसे ॥*
*पराचे जीविचे जाणें अस्तिनास्ति विचारणा ।*
*अत्यंत सर्व भूतासि धन्य संसार होतसे ।*
*नवविधा भक्ति देवाची मुख्य कोण विचारणे*
*अध्यात्म शोधिता सर्वे धन्य संसार होतसे ॥*
*पंचीकरण महावाक्य श्रवणें मननें सदा ।*
*सत्संगे निःसंग होता धन्य संसार होतसे ॥*

(रामदासवचनामृत, पृष्ठ २१६).

सोन्याच्या कोंदणामध्ये रत्ने जडवावीत तसा सुंदर शब्दांच्या कोंदणात प्रचीतीची - अनुभवाची अर्थरत्ने शोधता आली तर नेटका संसार होतो, असा विश्वास समर्थ रामदासांनी तेथे प्रकट केला आहे ! गुरुदेव रानडे यांनी सर्व संतांच्या 'अभंग'स्वरूपी अध्यात्मवाणीतील अमृतकण शोधून आपणासमोर वेचून ठेवले आहेत. विवेक, विचार, प्रयत्न, प्रबोध आणि प्रचीती यासाठी समर्थांनी साडेतीनशे वर्षांपूर्वी जो संदेश दिलेला आहे तो नव्या शतकातही सर्वांना मार्गदर्शक ठरणारा आहे. समर्थ सांगतात –

*'प्रसंग हा कठीण हो । बहुत पावले मोहो ।*
*परंतु यत्न पाहती । सुखेचि तेचि राहती ॥*
*विवेक पाहणे बरा । बरा विचार तो करा ॥*
*उपासकांसि सूचना । उपासना उपासना ।*

## १) कल्याण करी रामराया

हाच संदेश सांगावा म्हणून गुरुदेव रानडे यांनी मराठी संतांच्या साहित्यातील परमार्थमार्ग दाखविण्यासाठी हे असे ग्रंथ प्रसिद्ध केले. 'रामदास वचनामृत' हा ग्रंथ म्हणजे समर्थांचा 'सामर्थ्ययोग' प्राप्त करून देणारी दिव्यज्योत आहे ! त्या प्रकाशात समर्थ रामदासांचे अंतरंगही दिसते आणि आपले अंतरंगही उजळते ! नित्य जनहिताची चिंता वाहणाऱ्या समर्थांनी रामरायाला प्रार्थना केली आणि 'सर्वांचे कल्याण व्हावे', अशी प्रार्थना केली. त्यांच्या आराध्य देवतेने त्यांची प्रार्थना ऐकली. महाराष्ट्रात शिवकल्याण राजाची प्रतिष्ठापना झाली. समर्थांचे शब्द त्यांच्या उपासनेने खरे ठरले !

*मनीं धरावें ते होतें । विघ्न अवघेंचि नासोन जातें ।*
*कृपा केलिया रघुनाथें । प्रचीत येते ॥ (दास. ६. ७. ३०)*

समर्थ रामदासांना झालेला हा 'साक्षात्कार' हे त्यांच्या दृढ उपासनेचे फलीत होते. 'रामदासवचनामृतात' पानोपानी त्याच उपासनेचा गौरव केला आहे !

**प्रा. डॉ. ग. बा. करंदीकर**
६/ब, फ्लॅट नं. ९/१०, राहुलनगर, कोथरूड, पुणे ४११०२९.

# गुरुदेव रानडे आणि प्रमुख मराठी संत कवी

**प्रा. सतीश बडवे**

*मराठी प्राध्यापक, अहमदनगर महाविद्यालय. पीएच.डी.साठी प्रबंध लेखनाचे काम चालू आहे.*

मराठी संतवाङ्मयातील परमार्थमार्गाच्या दुसऱ्या खंडात गुरुदेव रा. द. रानडे यांनी नामदेव ते रामदास असा परमार्थ मार्गातील प्रवास मांडला आहे. मुळात अशा पद्धतीचा विचार दुर्मिळ होत चालल्याची सध्याची परिस्थिती आहे. संप्रदायांच्या चौकटी स्वातंत्र्योत्तर काळात अधिकच घट्ट होत चालल्या आहेत. दोन संप्रदायांच्या अनुयायांमधील वैचारिक मतभेद अधिकाधिक तीव्र होत आहेत. अभिनिवेशाला मोठ्या प्रमाणात प्राधान्य मिळत आहे. अशा वेळी संप्रदाय निरपेक्ष पातळीवरचा गुरुदेव रानड्यांचा विचार अधिक महत्त्वाचा वाटतो. अध्यात्माच्या पातळीवर महाराष्ट्रातील संतपरंपरा एकच असल्याचे चित्र गुरुदेवांना भावलेले दिसते. त्या त्या संतांचे संप्रदाय व त्यांचे तत्त्वज्ञान लक्षात घेऊनच गुरुदेव विचार मांडतात. पण संप्रदायाच्या चौकटीमध्ये बंदिस्त करून त्यांचा विचार पुढे जात नाही उलट **'साधु दिसती वेगळाले । परि ते स्वरूपी मिळाले । दोहो मिळोनि एकचि जाले । देहातीत वस्तु ॥'** या भूमिकेतूनच त्यांनी ही मांडणी केल्याचे दिसते.

भागवत संप्रदायातील संतश्रेष्ठांच्या परंपरेचा वारसा सांगत त्यांच्या पारमार्थिक विचारांचे निरूपण करण्यावर गुरुदेव रानड्यांचा भर दिसतो. प्रापंचिक व सामाजिक कर्तव्ये पार पाडत असताना शुद्ध व आर्त अशा भक्तिभावामुळे शाश्वत आत्मसुखाचा लाभ करून घेता येतो; हे वारकरी संप्रदायाच्या संतांच्या चरित्रावरून लक्षात येते. प्रपंच आणि परमार्थाचा समन्वय हे मध्ययुगीन संतांच्या जीवनाचे वैशिष्ट्य गुरुदेवांनी नेमकेपणाने टिपले आहे.

एखाद्या संताविषयी लिहिताना पूर्वपरंपरेशी असणारा त्याचा अनुबंध गुरुदेव सांगतात. नामदेवांविषयी प्रस्तावना करताना ते विठ्ठल संप्रदायाचा इतिहास सांगतात आणि ज्ञानदेव-नामदेवांचा अनुबंध उलगडून दाखवतात. पंढरपूरच्या सर्व संतांना शैव व वैष्णव पंथात मुळीच भेद दिसत नाहीत अशी गुरुदेवांची धारणा असल्याने 'पांडुरंग-पांढऱ्या देहाचा देव -' हे मूळ शिवाचे नाव - विठ्ठलास लावण्यात आले' या डॉ. पी. आर. भांडारकरांच्या मताचा त्यांनी पुरस्कार केलेला दिसतो. त्यांच्या मते नामदेव हे पंढरपूरच्या पांडुरंगाचे पहिले पाईक होते. (पृ.१) नामदेव ज्ञानदेवांचे समकालीन होते. तथापि विरोधकांनी ज्ञानेश्वरीची भाषा व नामदेवांच्या अभंगांची भाषा यात फरक असल्याने त्यांचा जीवनकाळ वेगळा मानला. गुरुदेवांनी या संदर्भात म्हटले आहे की, नामदेवांचे मूळ अभंग उपलब्ध नाहीत. पाठांतराने व पिढ्या न् पिढ्या हे अभंग तोंडीच परंपरागत झाल्यामुळे त्यांच्या भाषेत सारखा फरक होत राहिला. (पृ.३) या पद्धतीने नामदेवांच्या भाषेच्या आधुनिकतेचा उलगडा गुरुदेवांनी केलेला दिसतो. या बरोबरच प्रत्येकाची लेखनशैली वेगळी असल्याने असे घडणे शक्य असल्याचे मतही नोंदवतात. स्वातंत्र्यपूर्व काळातील ज्ञानदेवांच्या अनेकत्वासंबंधीच्या वादाचा अतिशय संयत परामर्श गुरुदेवांनी घेतलेला आहे. नामदेव व विष्णुदासनामा यांच्या संदर्भातील मतेही गुरुदेवांनी नोंदविली असून या दोघांपैकी संत नामदेवांचे अभंग कोणते हे ठरविण्यासाठी कल्पना सामर्थ्याची श्रेष्ठता, भाषेतील साधेपणा किंवा प्रसाद, प्राचीन भाषा किंवा शब्द यासारखी प्रमाणे उपयोजिता येतील असे त्यांचे मत आहे. गुरुदेव रानड्यांनी नामदेवांच्या प्रभावळीतील गोरोबा कुंभार, विसोबा खेचर, सावता माळी, नरहरी सोनार, चोखा मेळा, जनाबाई, सेना न्हावी, कान्होपात्रा यांच्या जीवनचरित्रातील घटनांचे विवरण केले असून गुरुदेवांचा भर आहे तो त्यांच्या शिकवणुकीवर. पण नामदेवांचा विचार करताना मात्र नामदेवांनी नामस्मरणाला दिलेले महत्त्व, त्यांचा आध्यात्मिक अनुभव, त्यांच्या सामाजिकतेची चर्चा यावर त्यांचा भर दिसतो.

भारतीय अनुभूतिशास्त्राच्या इतिहासात मध्ययुगीन संतांचे विशेष गुरुदेव रानड्यांना जाणवले आहेत. हे सर्व संत विश्वबंधू आहेत, या सर्व संतांना अंतःकरणाची तळमळ आहे आणि हे सर्व संत सर्वव्यापी ईश्वरभक्ती करतात. या तीन विशेषांची चर्चा त्यांनी केलेली दिसते. (पृ.३१) प्रपंच-परमार्थाच्या समन्वय तत्त्वाचा विचारही ते करतात.

एकनाथांच्या संदर्भातील गुरुदेवांचे विवरण भानुदास-जनार्दन स्वामी आणि एकनाथ असा अनुबंध लावीत सुरू होते. विजयनगरहून पांडुरंगाची मूर्ती पंढरपूरास आणणारे भानुदास हे नाथांचे पणजोबा आणि हिंदू व मुसलमान दोघेही ज्यांना सारखेच आदरणीय मानत असे जनार्दनस्वामी या परंपरेशी एकनाथ संबंधित आहेत. नाथांचे चरित्र सांगता सांगता त्यांचा धीमेपणा, शांती, अक्रोधता व सर्वांगीण समाधान या त्यांच्या गुणांचे वर्णन गुरुदेवांनी केले आहे. गुरुदेवांच्या या लेखनात एकनाथांच्या लेखनकार्यावर अधिक लक्ष केंद्रित असले तरी भानुदास आणि जनार्दनस्वामींच्या अभंगावर त्यांनी भाष्य केलेले दिसते. एकनाथी भागवतासंबंधात त्यांचे विवेचन आध्यात्मिक पातळीवरून केलेले जाणवते. इथे नाथांनी केलेल्या शेताच्या रूपकाचा उपयोग करून त्यांनी हे विवेचन पूर्ण केले आहे. 'श्रीभागवत म्हणजे एक मोठे शेत आहे. ब्रह्मदेवास प्रथम बी मिळाले. त्याभोवती दहा बांध घालून व्यासांनी या शेताची निगा राखली. त्यामुळे आनंदाचे असामान्य उत्तम पीक आले. या पिकाचे राखण करण्याचे काम शुक्राचार्यांनी केले. त्यांनी देवाच्या नावाची नुसती गोफण वापरून सर्व पापरूपी पक्षी उडविले. उद्धवांनी कणीस बडवून दाणे काढिले व या दाण्याची अकराव्या स्कंदरूपी रास रचिली.' हे नाथांचे रूपक गुरुदेवांनी वाचक श्रोत्यांना सांगितलेले आहे. (पृ. ५४)

एकनाथांच्या तत्त्वज्ञानावर वेदांती शंकराचार्यांचा परिणाम होता. पण ज्ञानदेवांचा आधार घेत नाथांनी तत्त्वज्ञान विशद केले असल्याचे प्रतिपादन गुरुदेव करताना दिसतात. अविद्या, विद्या आणि माया/जीवात्मा आणि परमात्मा-त्यांना नाथांनी दिलेली दोन पक्ष्यांची उपमा/जीव-शिवाचे तत्त्वतः ऐक्य / शरीर व मनाच्या सर्व अवस्थांमध्ये आत्म्याचे अस्तित्व / आत्मा अव्यय आहे स्वातंत्र्य व बंधन या दोन्ही भ्रामक कल्पना - यांचे विवरण नाथांच्या तत्त्वज्ञानाचे दाखले देत गुरुदेव रानडे करताना दिसतात. एकनाथांचे नीतिशास्त्रही गुरुदेवांनी उलगडून दाखविले आहे. 'भक्ति

म्हणजे देवासाठी तीव्र व सखोल प्रेम होय.' अशी नारदभक्तिसूत्रातील व्याख्येप्रमाणे नाथांची भक्तिकल्पना होती असे गुरुदेवांनी वर्णिले आहे. 'जगातील विषयांकडे व मानमरातबांकडे ज्याची दृष्टी वळली आहे व जो केवळ बाह्यतः देवाची पूजा करतो तो खरा भक्त नव्हे. खरा भक्त देवाच्या विचारात तल्लीन झालेला असतो.' (पृ. ७१) ही नाथांची भक्तिकल्पना गुरुदेवांनी स्पष्ट केलेली दिसते. नाथांच्या अनुभूतिशास्त्राचा विचारही त्यांनी मांडला आहे.

एकनाथांच्या कालखंडची लक्षणे गुरुदेव रानडे सांगतात तेव्हा जनार्दनस्वामींचा एकनाथांवर पडलेला प्रभाव ते स्पष्ट करतात आणि योग्य व न्याय्य निर्णयाचे तत्त्व एकनाथांनी पाळले हे सांगताना नाथांची तुलना ते ॲरिस्टॉलबरोबर करतात. नाथांच्या कालखंडातही प्रपंच व परमार्थ यांचा विलक्षण समन्वय दिसतो. या कालखंडात संतांनी वेदान्त विलक्षण लोकप्रिय केला, मराठीचा अभिमान व आदराची ज्ञानदेवांपासूनची परंपरा नाथांनी व समकालीन संतांनी कटाक्षाने पाळली – हे या कालखंडाचे विशेष त्यांना नोंदविलेले आहेत. मातृभाषेचा पुरस्कार करण्यात ज्ञानदेवांपेक्षा एकनाथ अधिक अभिमानी आहेत, या वा. ब. पटवर्धनांच्या मताचा पुरस्कार गुरुदेवांनी केलेला दिसतो. (पृ. ८६)

तुकोबांच्या संदर्भात गुरुदेवांनी जे लेखन केले आहे, त्यात त्यांचा जन्म व निर्याण काल या बाबतीतील विवेचन गुरुदेव रानड्यांनी विस्ताराने केले आहे. तुकोबांच्या चरित्राचेही ते साधार विवेचन करतात. तुकोबांच्या गाथ्यांच्या विविध आवृत्त्यांविषयीचे विचारही त्यांनी मांडले आहेत. 'दयार्द्र अंतःकरणाचे तुकाराम आणि कठोर कर्तव्यनिष्ठ रामदास यांची परस्पर भेट होऊन विचारविनिमय झाला नसेल तर आश्चर्य होय' अशी गुरुदेवांची धारणा दिसते. (पृ.९६) तुकोबांच्या शिष्यांची ही थोडक्यात माहिती त्यांनी दिलेली आढळते. तुकारामांच्या अध्यात्म-जीवनाच्या संदर्भात विवेचन करताना नामदेव-तुकाराम अनुबंध, अभंग बुडविण्याचा प्रसंग, रामेश्वरभट्टाचे मतपरिवर्तन, तुकाराम-ज्ञानेश्वर अनुबंध यांचा विचार गुरुदेवांनी केलेला दिसतो.

तुकोबांच्या साधकदशेचा गुरुदेव रानड्यांनी साकल्याने विचार केलेला आहे. नरदेहाची क्षणभंगुरता, मृत्यूविषयी त्यांनी सतत केलेले चिंतन, संतांच्या भेटीबद्दलची तुकोबांची तळमळ या विषयीचे विवेचन तुकोबांच्या अभंगांच्या आधारे त्यांनी केलेले दिसते. तथापि 'जीवात्म्याची घनघोर अंधःकारमय रात्र' या प्रकरणात तुकोबांच्या अंतःकरणाची तळमळ त्यांनी अभंगांच्या आधारे अतिशय प्रभावीपणे मांडलेली दिसते. परमेश्वर प्राप्ती होत नाही म्हणून स्वतःच्या विनाशाच्या विचारापर्यंत जाऊन पोहोचलेल्या तुकोबांचे प्रभावी दर्शन गुरुदेवांनी घडविले आहे. देवाचे लक्ष आपल्याकडे वेधण्यासाठी तुकोबांनी योजलेली युक्ती गुरुदेव विशद करतात ती अशी, 'भक्तांमुळे देव साकार झाला. आमच्यासारख्या भक्तांमुळे तुला रूप व नाव प्राप्त झाले. नाहीतर निराकार व एकाकी अशा तुला कोणीही विचारले नसते. अंधारामुळे दिव्यास शोभा येते व कोंदणामुळे माणिकास तेज चढते. धन्वंतरीला रोगी प्रसिद्धीस आणतो. विषामुळे अमृताला किंमत येते व पितळेमुळे सोने मूल्यवान ठरते. तसे आम्हा भक्तांमुळे तू देव झालास' (पृ. १३१-१३२) वैतागलेल्या तुकोबांचे हे एकत्रित दर्शन गुरुदेव घडवितात. तुकोबांची तळमळ, अगतिकता, वैफल्य, पूर्ण नकारघंटा मिळण्याची स्थिती यांचे दर्शनही यातून घडते. 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग' असे सांगणाऱ्या तुकोबांच्या जीवन प्रवासातील एक टप्पा गुरुदेव साधार उभा करताना दिसतात.

हे सारे वर्णन करून तुकारामांच्या स्वानुभवाचे उद्‌गार गुरुदेव रानड्यांनी उलगडून दाखविले आहेत. त्यांचे आनंदाचे धन्योद्‌गार, तेज व नादाचा अनुभव, आत्मदर्शन, ईश्वरदर्शनाचे परिणाम, विश्व ईश्वरमय झाल्याचा अनुभव, आत्मज्ञानाची लक्षणे, मरण डोळ्याने पाहण्याचा अनुपम सोहळा, इतर आध्यात्मिक अनुभव यांची मांडणी गुरुदेवांनी तुकोबांच्या अभंगाच्या आधाराने केलेली दिसते. त्यातून तुकोबांचे आध्यात्मिक सामर्थ्य कसे थोर होते, याचे विवेचन त्यांनी केले आहे. तुकोबांची आध्यात्मिक शिकवणही त्यांनी विस्ताराने मांडली आहे. त्यात प्रामुख्याने पारमार्थिक जीवनाची तयारी, गुरु-शिष्य संबंध, नाममहिमा, कीर्तनाचे महत्त्व, भक्तांना उपदेश, जातिविचार, सगुणविचार, संत व त्यांची लक्षणे, देव-संतांचे ऐक्य, श्रीतुकारामांची सर्वेश्वरत्वाची शिकवण, साक्षात्कार विवरण, आध्यात्मिक रूपके यांचा विचार गुरुदेवांनी केला आहे. तुकोबांवर ख्रिश्चन धर्माचा परिणाम झाला होता, या रेव्हरंड मरे मिचल यांच्या मताचा परामर्श त्यांनी घेतलेला दिसतो. 'तुकाराम व ख्रिस्त या दोघांचीही शिकवण साक्षात्काराच्या सर्वमान्य तत्त्वांशी जुळती असेल त्यामानाने ती महत्त्वाची मानावी' असा सुवर्णमध्य गुरुदेवांनी साधला आहे. डॉ. मॅक्निकॉलच्या मताचे खंडनही त्यांनी केले असून रेव्हरंड एडवर्डस् यांचेही मत गुरुदेवांनी खोडले आहे. हे सांगताना त्यांनी 'तुकाराम केवळ कवि किंवा हिंदु नसून ते साक्षात्कारी संत होते... तुकाराम हे विश्वाचे नागरिक होते, किंबहुना पारमार्थिक जगाचे ते नागरिक होते.' (पृ. १९६-१९७) असे स्पष्टीकरण दिले आहे. तुकोबांना ते सम्राट संबोधतात व त्यांच्या वाणीला ते ईश्वरी वचनाचा प्रतिध्वनी मानतात.

रामदासांच्या संदर्भातील गुरुदेव रानडे यांचे लेखनही अतिशय समतोल पद्धतीने मांडलेले दिसते. रामदासांच्या चरित्राची खात्रीलायक माहिती 'वाकेनिशी प्रकरणा'वरून देता येते असे गुरुदेवांना वाटते. त्यांच्या आधारे रामदास चरित्राची मांडणी त्यांनी केली असून श्रीरामदास व शिवाजी यांच्या संबंधाचा मुद्दा त्यांनी तत्कालीन वादाच्या आधारे चर्चिला आहे. भाटे व चांदोरकरांचे अर्वाचीन मत नोंदवून देव आणि राजवाडे यांनी त्यांना दिलेल्या उत्तराचा वेधही गुरुदेवांनी घेतला आहे. शिवरायांनी रामदासांना शके १६०० अश्विन शु. १० रोजी जी सनद दिली तीच गुरुदेवांनी या ग्रंथात दिली असून अखेरीस 'आणखी काही ऐतिहासिक पुरावा प्रसिद्ध झाल्याशिवाय याबद्दल निश्चित काही लिहिता येणार नाही' (पृ. २०८-२०९) असे म्हणून या वादावर पडदा टाकला आहे. रामदासांचे ग्रंथ आणि समकालीन संत व शिष्य यावर त्यांनी भाष्य केलेले दिसते.

रामदासांच्या दासबोधाच्या विवरणाचे एक स्वतंत्र प्रकरणच गुरुदेवांनी लिहिले आहे. ते मुळातूनच बघावे लागते. रामदासांचे तत्त्वज्ञान, रामदासांनी दासबोधातून हाताळलेले विविध विषय, रामदासांचा पारमार्थिक विचार, महंतासंबंधीच्या त्यांच्या कल्पना, साधकाची लक्षणे, भक्तियुक्त काव्य हेच प्रासादिक काव्य, नाममहिमा, सद्‌गुरुंची लक्षणे, रामदासांची मुक्तिकल्पना, सत्वगुण लक्षण इत्यादी विषयांवरील रामदासांची मते गुरुदेवांनी उद्‌धृत केलेली दिसतात. गुरुदेवांच्या मते दासबोध म्हणजे समर्थांची वचनेच आहेत. 'परमार्थाचे रहस्य अनिर्वाच्य आहे.' हे रामदासांचे मत असल्याचेही ते उलगडून दाखवितात. 'देह पंचभूतांचा आहे. आत्मा सर्वकर्ता

आहे. तेव्हा कवित्व प्रकारच तेवढा मनुष्याचा असे का मानावे? सर्व करणे जगदीशाचे आहे. देह पंचभूतांचा असल्यामुळे तो नाहीसा होतो. उगीच भ्रमाच्या फेऱ्यात सापडू नये.' (पृ. २७५) दासबोधाच्या आधारे रामदासांच्या रचनेची ही भूमिका गुरुदेवांनी मांडलेली दिसते.

रामदास आणि ख्रिस्ती धर्म या संबंधीचा विचारही गुरुदेव रानड्यांच्या लेखनात डोकावतो. मिस्टर डेमिंग यांनी 'रामदास व रामदासी' या इंग्रजी भाषेत लिहिलेल्या ग्रंथाच्या आधारे त्यांनी हा विषय हाताळला आहे. डेमिंग यांच्या मताचे साधार खंडन करण्याचा गुरुदेवांचा प्रयत्न इथे लक्षात येतो. 'रामदासांच्या शिकवणीपेक्षा ख्रिस्ती धर्माची शिकवणूक श्रेष्ठ आहे' हे डेमिंग यांचे प्रतिपादन आहे. त्याला उत्तर देताना गुरुदेव लिहितात, 'प्रथम श्रीरामदासांनी साकार व निराकार देवासंबंधी जे मत प्रतिपादन केले आहे, त्यात बराच गोंधळ आहे व साकार ही कल्पना धार्मिक असून, निराकार तात्त्विक आहे, या उपपत्तीने दोहोंमधील भेद नाहीसा करण्याचा अलीकडे प्रयत्न झाला असला तरी मि. डेमिंग धार्मिक कल्पनेस जास्त महत्त्व देतात व तात्त्विक कल्पना त्यांस मान्य नाही. परंतु अनुभूतिशास्त्राच्या दृष्टीने साकार वा निराकार देवाच्या कल्पनेस महत्त्व नसून, परब्रह्म साकार व निराकारापलीकडे आहे, व म्हणून खऱ्या अध्यात्मशास्त्रात या गोष्टीस स्थानच नाही, ही गोष्ट मि. डेमिंग विसरतात.' (पृ. २७७) मात्र असे असले तरी डेमिंग यांच्या काही मुद्द्यांबाबत गुरुदेवांनी सहमती दर्शविलेली दिसते. त्यावरून गुरुदेवांच्या समदृष्टीची साक्ष पटते.

'भक्ति व चिकित्सावाद' याचीही चर्चा गुरुदेवांनी केली असून त्यात त्यांचा रोख आहे तो प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन यांच्यावर. 'हे बुद्धिवादी या संतांच्या भक्तीची इतक्या मुक्त कंठाने स्तुती करीत असतानाही ते आपल्या बुद्धिवादास कसे चिकटून राहतात, याबद्दल आश्चर्य वाटते' (पृ. २७९) असे मत गुरुदेवांनी नोंदविले आहे. प्रोफेसर पटवर्धनांचा एक वक्तृत्वपूर्ण उताराच गुरुदेव इथे देतात व अखेरीस म्हणतात, 'सर्व चिकित्सावादात अशा प्रकारचे व भक्तीचे वक्तृत्वपूर्ण वर्णन सापडत असेल तर कोणीही चिकित्सावादी होण्यास आमची हरकत नाही.' (पृ. २८०)

नामदेवांपासून रामदासांपर्यंत अनुभूतिशास्त्राला प्राधान्य देत गुरुदेव रानडे यांनी साधार विवेचन या ग्रंथात केले असून खंडन-मंडन करीत आपले म्हणणे प्रतिपादन केले आहे. त्यांच्या या सर्व लेखनावरून काही निष्कर्षाप्रत आपण पोहोचू शकतो. ते निष्कर्ष असे :

१) संतसाहित्याच्या पारमार्थिक मांडणीच्या दृष्टीने संतवाङ्मयातील परमार्थमार्गाचे गुरुदेव रानडे यांचे विवेचन अत्यंत मोलाचे आहे.

२) अनुभूतिशास्त्राचा आधार घेत हे विवेचन वा निरूपण झाल्याने त्यात झालेली अध्यात्म विषयाची मांडणी मौलिक बनते. अर्थात असा अवसर लेखनात मोठ्या प्रमाणात त्यांना मिळालेला दिसत नाही.

३) गुरुदेवांच्या व्यापक व्यासंगाची आणि प्रचंड विद्वत्तेची साक्ष त्यांच्या लेखनातून पटते.

४) खंडन-मंडनाची गुरुदेवांची प्रवृत्ती ही त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाची व चौफेर वाचनाची खूण ठरते. आपले प्रतिपाद्य कसे मांडावे याची हातोटी गुरुदेवांकडून शिकता येते.

५) संप्रदाय निरपेक्ष अशा भूमिकेतून गुरुदेवांचे लेखन साकार झाल्याने या लेखनाची उंची अधिक वाढलेली दिसते.

६) गुरुदेव चर्चाही करतात आणि चिकित्साही करतात. पण त्यातही आटोपशीरपणा असतो. त्यांच्या लेखनाचा प्रमुख भर आहे तो आध्यात्मिक शिकवणुकीवर.

७) महाराष्ट्रातील संतपरंपरेचे नेमके भान गुरुदेवांच्या लेखनातून व्यक्त होते. पारमार्थिक क्षेत्रातील संतांचे अनुभव त्या त्या संतांच्या कालपटाच्या पार्श्वभूमीवर गुरुदेवांनी मांडलेले दिसतात.

८) गुरुदेव रा. द. रानडे यांची सत्वसंपन्न मूर्ती या लेखनातून वाचकांसमोर उभी रहाते. अध्यात्म क्षेत्रातील गुरुदेवांचा अधिकार त्यांच्या या ग्रंथामधून व्यक्त होतो.

**टीप :** या लेखात वापरलेले सर्व पृष्ठक्रमांक 'मराठी संतवाङ्मयातील परमार्थ मार्ग' (खंड २) - लेखक रा. द. रानडे, भारतीय ग्रंथभवन, मुंबई (१९६५) या पुस्तकातील आहेत.

**प्रा. सतीश बडवे**
मराठी विभाग, अहमदनगर महाविद्यालय,
स्टेशनरोड, अहमदनगर ४१४००१.

## हृदयी तू वसावा

मंगलमय नाम तुझे । गाऊं गीत देवा
सद्गुरुंच्या संगतीची । ओढ येई जीवा ॥धृ.॥

सकल देह सत्कर्मी । द्वैत भाव जावा
स्मरण तुझे भक्तीप्रेम । नित्य घडो सेवा ॥१॥

सद्गुरुंचे बोल मला । श्रवणी ऐकू यावा
आन, शब्द, बधीर कान । कर्णी तो नसावा ॥२॥

नयन, ज्योती स्वरूपीं जडो । लोचनी ठसावा
हाय, नको विषयदृष्टी । नेत्र तो मिटावा ॥३॥

नाम वदो नित्यवाणी । प्रेम बोल गावा
वाचेला मौन्य पडो । अन्य ते वदाया ॥४॥

एक आस मम चित्तीं । हृदयी तू वसावा
दे मम चिर सुखशांती । तंव पदी विसावा ॥५॥

श्रीमती लिलाबाई शिरवळकर

# हिंदी संत साहित्यातील देवप्राप्तीचा मार्ग

**श्री. नरहरी कुलकर्णी**

*बी.ई.इलेक्ट्रिकल. २० वर्षे मिलिटरी इंजिनिअरींग सर्व्हिस नोकरी व स्वेच्छानिवृत्ती. ३० वर्ष स्वतंत्र्य व्यवसाय. १९७३ साली श्रीगुरुदेवांच्या समाधीवर नाम घेतले.*

## १) ग्रंथ प्रयोजन

राष्ट्रपती भवनात मार्च १९५२ मध्ये आपल्या भाषणात श्रीगुरुदेव म्हणाले होते, 'मराठी, कानडी व हिंदी ह्या तीन भारतीय भाषा मला मूळातून येतात आणि मी त्या प्रमाणे तीन ग्रंथांचा संकल्प केला आहे. मराठी संतांचे साक्षात्कार शास्त्र प्रसिद्ध झाले आहे. त्यानंतर हा हिंदी संतांवरील ग्रंथ व कानडी संतांवर काही प्रकरणे लिहून झाली आहेत व प्रसिद्ध पण झाली आहेत. संतांच्या अनुभूतीच्या उद्यानातील सुंदर विविध रंगाच्या फुलाचा हार गुंफून ईश्वरचरणी अर्पण करण्याचा विचार माझ्या मनात अनेक दिवस घोळत होता.'

त्या प्रमाणे गुरुदेवांनी संतांचा साक्षात्कार मार्ग विषद करण्यासाठी त्यांच्या पदांचे संदर्भ ग्रंथ आधी तयार केले. मराठी संतांच्या साक्षात्कारासाठी

१) तुकाराम वचनामृत

२) ज्ञानेश्वर वचनामृत

३) रामदास वचनामृत

४) संत वचनामृत

व ५) एकनाथ वचनामृत

यांची निर्मिती केली. त्यामध्ये त्या त्या संतांच्या अभंगाचे / पदांचे वेचे विषयवार मांडले आहेत व पुस्तकांना विस्तृत प्रस्तावना पण दिली आहे.

त्याचप्रमाणे हिंदी संतांची १०० पदे व १०० दोहे निवडून विषयवार वर्गीकरण करसात. प्रस्तावना, टिप्पणी, हिंदी पदातील अलंकार शास्त्र, रसानुभूती वर विवेचन, कवींचे थोडक्यात चरित्र ह्यांनी परिपूर्ण असा हिंदी परमार्थ सोपान वरील ग्रंथ तयार केला.

ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत गुरुदेव म्हणतात 'माझ्या अलाहबादमधील २० वर्षाच्या प्रदीर्घ वास्तव्यात त्या शहराचे माझ्यावर अनेक उपकार झाल्या कारणाने मला त्या जागेचे व हिंदी भाषेचे आनृण्य साधावयाचे होते...'

## परमार्थसोपान

मन ईश्वरोन्मुख होण्यापासून त्याचे ईश्वराशी तादात्म्य घडेपर्यंतचा प्रवास हा ईश्वरप्राप्तीचा मार्ग होय. त्यावरील वाटचाल दाखविण्यासाठी हिंदी संतांची १०० पदे व १०० दोहे श्री गुरुदेवांनी निवडले. वाटचालीची विभागणी त्यांची पाच टप्प्यांत केली.

परमार्थ प्रवृत्तिची कारणे (Incentives to Spritiual Life).

मानवी मनास ईश्वराकडे वळण्यास काही गोष्टी प्रवृत्त करतात. त्या तत्त्वज्ञान मूल्यशास्त्र अथवा शरीरधर्म ह्यावर अवलंबून असू शकतात.

दुर्गुण त्याग - सद्गुण संपादन (The Necessity of Moral Preperation)

परमार्थात प्रगती होण्यासाठी नैतिक व अध्यात्मिक पूर्व तयारीची आवश्यकता असते. दुर्गुण त्याग व सद्गुण संपादन ही भौतिक तयारी होय.

देव संत संबंध (The Relation of God to Saints) अर्थात सद्गुरु प्राप्ती

ही अध्यात्मिक तयारीची पायरी आपल्या समोर वर्तनाच्या व ध्येयाच्या दृष्टीने आदर्श व्यक्ती ठेऊन त्यांच्याप्रमाणे मुमुक्षुस आपले वर्तन करावे लागते. पण ही गोष्ट साध्य करण्यासाठी ईश्वराच्या कार्याचे अशा व्यक्तीबरोबरचे स्वरूप तात्त्विक व प्रत्यक्ष कृतितील ह्याची स्पष्ट कल्पना व्हावी लागते. याप्रमाणे संत व ईश्वर यांच्यासंबंधी स्पष्ट कल्पना आल्यावर मुमुक्षुस हा मार्ग स्वतः चोखाळावा लागतो.

४) वाटचालीस प्रारंभ (The Beginings of the Piligrimage)

ईश्वरासंबंधीच्या व संतांच्या संबंधीच्या कल्पना स्पष्ट झाल्यानंतर मुमुक्षु परमार्थ मार्ग स्वतः क्रमू लागतो. पुढे बराच वेळ वाटचाल केल्यानंतर शारीरिक व मानसिक कष्ट तसेच नैसर्गिक व सामाजिक हालअपेष्टा भोगल्यानंतर मार्गावरील टप्प्यांचा किंवा खुणांचा उमज पडावयास लागतो.

५) परमोच्च चढण (Highest Ascent)

टप्पे वा खुणा दृष्टिक्षेपात येऊ लागल्यानंतर धीर भरोसा येतो व आपले उद्दिष्ट व अत्युच्च ध्येय गाठता येईल असा विश्वास उत्पन्न होतो.

ह्यानंतर गुरुदेवांनी आपल्या पुस्तकात ह्या पांच पायऱ्यांचा विचार पदांच्या व दोहांच्या आधारे वेगळा केला आहे. हे विचार एकत्रित पहाण्याचा आपण प्रयत्न करू या.

परमार्थ प्रवृत्तिची कारणे

पद विभाग : सात प्रेरणांचा विचार ह्यात गुरुदेवांनी केला आहे.

१) माया अंधता व निद्रा :

आयुष्यभर होणारा भ्रमांचा पाठलाग, सत्यज्ञानाबद्दलचा आंधळेपणा व जागे असूनही निद्रिता प्रमाणे आचरण ह्याचे दर्शन घडविताना सूरदासांचे एक पद, कबीरांचे एक पद व कृष्णानंदांचे एक पद विचारात घेतले आहे.

भ्रम मृगजळांच्या मागे धावण्याचा विचार करताना गुरुदेव म्हणतात, वैज्ञानिक दृष्टिकोनातून सर्व गोष्टींकडे पाहिल्यास वस्तूंचे सत्य-असत्य कळले असते व खोट्या गोष्टींचा पाठलाग केला नसता.

खरे ज्ञान हे ईश्वराचेच त्यासाठी बुद्धीपेक्षा वेगळ्या साधनांची प्रातिभ शक्तीची जरुरी असते हे सांगतात.

कृष्णानंदांच्या विचारांची तुलना बनियन, पायथागोरस व वर्डसुवर्थ ह्यांच्याशी करून शेवटी ईश्वराने दिलेली शरीररूपी चादर त्याच पवित्र अवस्थेमध्ये परत केली पाहिजे हे सांगतात.

२) तात्त्विक व नैतिक प्रेरणा

ईश्वराने हे जग निर्माण करण्यात व त्याचे प्रतिपालन करण्यात जे कमालीचे शिल्पकौशल्य व जी श्रेष्ठ कलात्मकता प्रगट केली आहे त्याने

स्तिमित होऊन मानव ह्या कौशल्यपूर्णत्वामागची भूमिका व विश्वनिर्माणाचे ध्येय यांचे आकलन करण्याचा प्रयत्न करतो. ह्या झाल्या तात्त्विक प्रेरणा. नैतिक प्रेरणेत कर्म व त्याचे फळ तसेच सज्जनांना घडणारा त्रास व दुर्जनांची भरभराट अशा गोष्टींचा उहापोह आहे.

३) पापाची जाणीव

जगात व समाजात दिसणारे पाप व त्याचे स्वरूप ह्यांचा विचार करताना मनुष्य परमार्थाकडे कसा वळू शकतो हे सांगितले आहे.

४) म्हातारपण व मरण

वृद्धत्व व मृत्यू ह्याचा मानवी मनावर जबरदस्त पगडा आहे. त्यामुळे मनुष्य ईश्वराकडे वळू शकतो.

५) मरणानंतर काय? आत्म्याचे उत्क्रंदन व पुनर्जन्म व दुसरा देहधारण करणे.

मरणानंतर काय ह्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी मनुष्य ईश्वरोन्मुख कसा होतो हे 'बहुरि नही आवना मा देस'' व दिवाने मन, भजन बिना दुख पैहो ह्या कबीरांच्या पदावरून विवरण केले आहे. जाता जाता इथे पायथागोरसने आपण आधीच्या एका जन्मात बैल असल्याचा उल्लेख केला असल्याचे गुरुदेव सांगून जातात.

६) मानवाची हतबलता

सर्व प्रयत्न संपल्यानंतर कित्येकदा मानव नियतीची इच्छा म्हणून आपले आलेले वैफल्य झटकण्याचा प्रयत्न करतो. गुरुदेव म्हणतात, 'Who ever, in the course of history has emerged successful except thought an alliance with God? श्रीकृष्णाने केलेल्या सख्यत्त्वामुळेच पांडवांचा विजय झाला.

७) सुटकेचा मार्ग

या सर्व प्रेरणांचा साकल्याने विचार केल्यानंतर खात्री होते की, या सर्व समर्थ परमेश्वरास शरण गेल्याशिवाय परमार्थ मार्ग धैर्याने, शांतपणे व यशस्वीपणे चोखाळता येणार नाही.

येथे ज्ञानेश्वर व कबीर ह्यांच्यातील वैचारिक साम्य गुरुदेव दाखवतात.

''या लागि शतजर्जर नावे । रिगोनि केवि निश्चित होआवे ।
तेवि लोका येऊनि सोपद्रवा । केवि न भाजेजे माते ॥
- ज्ञानेश्वर...

*'परली पार तेरा मीता खड़िया*
*उस मिलने का ध्यान न धरिया*
*टूटी नाव उपर जा बैठा,*
*गाफिल गोता खावेगा ॥'* (कबीर)

## दोहा विभाग

गुरुदेव म्हणतात पदातील परमार्थपथाची चर्चा ब्रह्मांडाशी केल्यास तीच चर्चा दोह्यामधील विचारांची म्हणजे पिंडाशी केल्याप्रमाणे होईल. कारण दोहा म्हणजे ज्यात प्रगल्भ विचार दडलेले असतात त्यास गुरुदेव Epigrammatic mysticism म्हणतात.

## परमार्थ प्रवृत्तीची कारणे

१) निरंतर बदल (Perpetual Flux)

रहिमचा दोहा मुळातच बघण्याजोगा आहे.

*'सवा नगारा कूच का, बाजत आहे जाम ।*
*रहिमत या जग आईले, को करि सका मुकाम ॥'*

नगाऱ्याच्या तालावर सैन्य सारखे कूच करते आहे. कूचचा दुसरा अर्थ – रहिम म्हणतात ह्या जगात कायम मुक्काम कोण करते?'

ह्याच चिरंतन बदलाचे सुंदर वर्णन पाती झडती ह्या प्रसिद्ध दोह्या मध्ये आहे :

*'पाती झडती देखते, हँसती कोयलियाँ ।*
*हम चली तुम भी चलिये, धीमी बावलियाँ ॥*
*फिर भी पाती यूँ कहे, सुन तरुवर एक बात ।*
*सैया ऐसा तिरजिया, एक आवत एक जात ॥*

अर्थ : कोवळी पालवी गळणाऱ्या (पिवळ्या) पानास हसते त्यास ते ती म्हणतात, 'जरा धीर धरा आम्ही चाललो. तुम्हास पण जावयाचे आहे.' वृक्षास परत पानगळ संबोधते. 'ईश्वराने सृष्टी अशी केली आहे एक येतो आणि एक जातो. (तुला पण जावयाचे आहे.)

थोडक्यात जीवनाची क्षणभंगुरता ठसवून चिरंतन सत्याचा शोध घेण्यास उद्युक्त करणारे असे ते दोहे होत.

## (८) जरा व मरण

*'हाड जरे ज्यो लाकडी, केस जरे ज्यो घास ।*
*जगत फजरता देखिके, कबिरा भया उदास ॥'*

हाडांचे लाकडाप्रमाणे जळणे, केसांचे गवताप्रमाणे भस्म होणे असे सर्व जगच अग्नीचे भक्ष्य होत असलेले बघून कबीर उदास झाला.

गुरुदेव म्हणतात, परमार्थी संताचे वर्गीकरण केल्यास कबीरास उदास संत म्हणता येईल, तर तुकाराम रडणारा व रामदासांना ओरडणारा तत्त्वज्ञ संत म्हणता येईल.

रामदास तुकाराम भेटीची ऐतिहासिक गोष्ट मग ते सांगतात. ही भेट चंद्रभागेच्या तिरी पंढरपूर मधे झाली असे म्हणतात. दोघेजण आपापल्या लव्याजम्यानिशी वेगवेगळ्या काठावर येऊन उभे ठाकले. सर्वांस प्रचंड उत्सुकता काय दिव्य संवाद घडणार आहेत म्हणून तर तुकाराम रडू लागले व रामदास ओरडू लागले. शिष्यांनी विचारल्यावर तुकाराम म्हणाले, 'डोळ्यात अश्रू आणून मी जन्मभर सांगत आलो आहे की, सर्व सोडा व ईश्वर भजनी लागा पण कोण ऐकत नाही. रामदासांनी आपल्या शिष्यांस सांगितले जन्मभर ओरडतो आहे संसार खोटा आहे त्यामागे लागू नका पण सर्व व्यर्थ.

भेट झाल्यावर रामदास तुकारामांना म्हणाले, 'तुझ्या अश्रूंचा काय उपयोग? जगाच्या व्यवहारात माझी आरडाओरड विरून जाते कोणास ऐकू येत नही.'

पुढे गुरुदेव म्हणतात : जरी कबीरास उदास, तुकारामास रडणारा व रामदासांस ओरडणारा संत म्हटले तरी हा त्यांचा मुखवटा होता. हा धारण करून तिघेही मानवतेच्या कल्याणासाठी बाहु सरसावून पुढे झाले. त्यांचे अंतःकरण ओतप्रोत भरलेले होते.

आध्यात्मिक तयारी करण्यासाठी आदर्श व्यक्ती कशी निवडावी ह्याचा निकष परमार्थ प्रवृत्तिच्या भागात गुरुदेव मांडत आहेत.

## नैतिक तयारी : (दुर्गुण त्याग / सद्गुण संपादन)

प्रथम दोहा विभागातील विचार पाहून पदातील विचाराकडे वळू या.

दोहा विभाग :

### १) ऐहिक व पारमार्थिक कल्याण

ह्या बाबतीत दोह्याच्या विचारात श्रेयस किंवा प्रेयस ह्या दोन्हीपैकी एक मार्ग साधता येईल असे विचार आहेत.

गुरुदेवांचे म्हणणे असे की परमार्थ करीत असताना ऐहिक कल्याण नाकारण्याचे कारण नाही. याज्ञवल्क्याप्रमाणे उभयमेरू सम्राट होता येते. गुरुदेवांनी पण हे करून दाखविले. ते अलाहाबादला व्हाईस चान्सेलरचे पद विभूषित असताना परमार्थाच्या शिखरावर नांदत होते.

### २) सत्संगती

सद्गुण संपादनासाठी सत्संगतीचे महत्त्व सांगताना दोह्यांत म्हणतात की चंदनाच्या खोडावर नागाच्या विषाचा परिणाम होत नाही. गुरुदेव म्हणतात, उपमा चांगली आहे पण संगतीबद्दल ही उपमा सर्वार्थी खरी ठरत नाही.

### ३) ललितकला व साक्षात्कार शास्त्र

नृत्य, गायन, वादन, इत्यादी कलाविष्कारांचा परमार्थ प्रगतीबद्दल विचार दोह्यात उलट-सुलटप्रकारे आला आहे.

गुरुदेव म्हणतात, साक्षात्काररहित संगीत एक भयंकर गोष्ट ठरेल. सुरदास व तुलसीदास त्या धोक्यातून निभावले. बेकन च्या शब्दात सर्व कलांचा उत्कर्ष बिंदू देवाच्या वैभवात व मनुष्याच्या प्रगतीत सामावला पाहिजे.

### ४) ईश्वर भक्तीचे वैयक्तिक, सामाजिक व पारमार्थिक स्वरूप

तुलसीदासांच्या पत्नीने ज्या दोह्याद्वारे त्याची कानउघाडणी केली व ईश्वर भजनाकडे लावले तो दोहा असा :

*'अस्थि चर्ममय देह मम, तामें जैसी प्रीति ।*
*तैसी जो श्रीराम मँह, होति न तो भवभीति ॥'*

माझ्या ज्या अस्थिचर्माच्या देहावर जसे तुझे प्रेम आहे तसे श्रीरामा ठिकाणी जडले तर भवसागराची भीती राहणार नाही.

गुरुदेव म्हणतात, 'दोह्यातील 'मम' शब्द काढून, 'यह' शब्द घेतल्यास दोह्यातील अर्थ प्रत्येक ईश्वरीन्मुखास लागू आहे.'

तुलसीदास दुसऱ्या दोह्यात म्हणतात, ह्या जगात आल्यानंतर प्रत्येक जणास धावत जाऊन भेटले पाहिजे. नजाणो देव समोर कोठल्या वेषात येऊन भेटेल. प्रत्येक जीवातील ईश्वर साक्षात्काराने कळल्यास ते बौद्धिक समाजापेक्षा श्रेष्ठ ठरेल असे गुरुदेव म्हणतात.

पारमार्थिक पैलू बद्दल तुलसीदास म्हणतात, 'घर सोड, जंगल सोड व देवाच्या शहरात रामप्रेमपूरात वास्तव्य कर.'

गुरुदेव म्हणतात : देवाचे नगराची निर्मिती करावी लागते. ते बांधावे लागते त्यावर छत्र धरावे लागते व जे कोणी त्यात वास्तव्यास येतील त्यास छाया व अभय द्यावे लागते व तसेच इतर भक्तांबरोबर स्वतः तेथे वास करावा लागतो.

गुरुदेवांनी असे रामप्रेमपूर निंबाळला स्थापन केले. तेथे वास्तव्य केले. अगणित शिष्यगणांना 'राम' दिला. आजही पारमार्थिक पैलूंचा विचार करताना १) दुःखामुळे देवाकडे शिडीवरून गेल्यासारखे होते. दुःख म्हणजे देवाकडे नेणारी शिडी. २) भक्तांनी आपला हात नेहमी वर ठेवावा. ३) भक्तांनी मागण्यासाठी हात खाली करू नये, जे सहज मिळते ते दुधासारखे असते. मागून घेतलेले पाण्यासारखे व तंटाबखेडा करून मिळालेले रक्तासारखे असते. असे विचार त्यांनी मांडले आहेत.

पद विभाग

सद्गुण संपादन करण्याबरोबर दुर्गुण त्यागपण सामावलेलाच आहे. 'हिंदी संतांनी केलेली ह्या बाबतीतील चर्चा म्हणजे नीतिशास्त्रात त्यांनी घातलेली नवीन विचारांची भर आहे. प्लेटो, ॲरिस्टॉटल, सिजूविक् व ग्रीन सारख्या तत्त्ववेत्त्यांच्या विचारांशी मिळती-जुळती आहे.' गुरुदेवांनी नीतीशास्त्रीय विचार मांडताना भक्ती हा सर्व सद्गुणांचा मुकुटमणी आहे हे दाखविले आहे.

सूरदास, दादू, कबीर, चरणदास, नानक व तुलसीदास ह्या हिंदी संतांनी नीतीशास्त्र मांडताना गुरुदेव प्रथम गुणांची एक यादी देतात.

### वैयक्तिक सद्गुण

१) कृत्य (activism) २) अनासक्ति
३) विवेक ४) संयम
५) धैर्य ६) सोशिकपणा
७) प्राप्त परिस्थितीचा विरोध न करता स्विकार (sufferance)
८) समदृष्टी

### सामाजिक सद्गुण

१) सत्संग २) दया ३) दानशीलपणा ४) त्याग

### दुर्गुण

१) बढाईखोरपणा २) अस्वच्छ मन ३) हाव
४) कपट / ढोंग ५) उन्मत्तपणा ६) विषयासक्ती

### आध्यात्मिक सद्गुण

१) ब्रह्मचर्य
२) तप (यम, नियम असलेले)
३) अंतर्निरीक्षण
४) तत्त्वज्ञानाचा अभ्यास
५) गुरुपद पंकज सेवा
६) मंत्रजप
७) ईश्वराच्या करणीवर अढळ विश्वास (Divine Optimism : मम भरोस)
८) सर्व भूतमात्रात परमेश्वर पहाणे

ह्या नंतर हे सद्गुण ईश्वरभक्तीची निरनिराळी रूपे कशी आहेत हे गुरुदेवांनी कसे दाखविले आहे ते पाहू.

### व्यक्तिगत सद्गुण

ईश्वरप्रेमाची व्यापकता इतकी आहे त्यामुळे इतर कोणीही त्याच्याशी स्पर्धा करून त्याच्या गादीवर हक्क सांगण्यास धजावणार नाही. ह्यामुळेच

तर ईश्वराव्यतिरिक्त सर्व निरास भासू लागले. विवेक आणि ईश्वरभक्ती जे आंधळ्या-पांगळ्यांचे नाते होय. ईश्वर भक्ती फलद्रूप होण्यास विवेकाचे मार्गदर्शन हवेच. आपल्या इंद्रियावर संयम असल्याशिवाय व मनाचे लगाम हातात असल्याशिवाय भक्ती कशी करणार? शेवटी देवाचे दर्शन घडेपर्यंत आत्यंतिक सोशिकपणा लागतोच. क्वचित प्रसंगी नैराश्य व वैफल्य येईलही.

## सामाजिक सद्‌गुण

सर्वाठाई ईश्वराच्या अनुभूतिने सर्वाठाई ते प्रेम दयेच्या रूपात प्रगट होते. दया निर्माण झाली तर त्यातून परहित पण साधले गेले पाहिजे. अंतःकरणात दयेमुळे ध्येयप्राप्तीची स्फूर्ती होण्याचे बंद झाले की, परहित पुढे करण्याची इच्छा बळावते व प्रत्यक्ष उपकारक कृत्ये घडतात. ते संत तर जगाच्या कल्याणासाठीच असतात. पारमार्थिक साम्यवादी असतात. आपल्या पारमार्थिक संपत्तीची वाटणी सदैव करत राहतात.

## आध्यात्मिक सद्‌गुण

तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानेच ईश्वराचे खरे स्वरूप काय हे समजते व स्वरूपाच्या ज्ञानामुळे त्याच्यावर प्रेम जडते.

सद्‌गुरू चरणी आत्यंतिक आदर व निष्ठा असल्याखेरिज, गुरुपद पंकज सेवेच्या किल्लीशिवाय ईश्वरप्रेम व ईश्वर दर्शनाचे डबल लिव्हरचे कुलूप उघडता येणे शक्य नाही.

मंत्रजप, ईश्वराचे नामस्मरण, गुणगान इत्यादी परस्परावलंबी गोष्टी आहेत. म्हणजे एक कारण तर दुसरे कार्य, एक कार्य तर दुसरे कारण असे त्यांचे नाते आहे.

ह्या प्रकरणाच्या अखेरीस गुरुदेव म्हणतात :

शेवटी, जर आपले ईश्वर प्रेम इतिहास व सृष्टितील प्रत्येक घटनेमागे दडलेली त्याची संमती व हाक ओळखू शकले नाही तर त्याचे मोल ते काय? त्याबरोबरच तर्कशुद्ध सबळ कारणाच्या सिद्धांताची (टीप पहा) परिणीती ईश्वराच्या करणीवरील अतूट विश्वासात साक्षात्कार पर्यावसायी झाली पाहिजे.

**टीप :** सबळ कारणाचा सिद्धांत म्हणजे – Leibnitz चा Law of Sufficient Reason ह्याच्या प्रमाणे 'जे काही आहे त्यामागे त्याच्या घडण्यामागे एक सबळ कारण दडलेले आहे.

## देव-संत संबंध

दुर्गुण त्याग व सद्‌गुण संपादन म्हणजे मुमुक्षूची नैतिक तयारी झाली. पुढे करावयाच्या प्रवासाची नैतिक शिदोरी बांधून झाली.

मुमुक्षूने आता डोळ्यांपुढे आदर्श जो ठेवायचा आहे तो भक्ताचा आहे. भक्ताच्या आचारांचा अभ्यास करावयाचा आहे म्हणून ईश्वराची भक्तसाक्षेप लक्षणे तसेच तो आपल्या भक्तासाठी काय करतो याचे तात्त्विक व आचरणात्मक ज्ञान अवश्य हवे. यात ईश्वराचे स्वरूप व त्याचे गुण, त्याच्या गुणापासून भक्ताच्या अंतःकरणात निर्माण होणाऱ्या भावना, ईश्वराचे भक्तावरील प्रेम व भक्ताची ईश्वरावरील भक्ती इत्यादी गोष्टींचा विचार गुरुदेवांनी केला आहे. मुमुक्षूस आपल्या ध्येयाचे (ईश्वराचे) स्वरूप काय, त्याचा व आपला संबंध काय, याचे ज्ञान बुद्धीला झाल्यावाचून ध्येयाबद्दल (प्रेम) भावना उत्पन्न होणार नाहीत व त्याच्या प्राप्तीसाठी प्रयत्न पण होणार नाहीत. म्हणून ध्येयाबद्दल बौद्धिक ज्ञान, त्यापासून प्रेमादरादी भावना व भावनांमुळे ध्येय प्राप्तीसाठी प्रयत्न असे घडेल तेव्हा ह्या बौद्धिक ज्ञानाची, शिदोरीची परमार्थ पथावर वाटचाल सुरू करण्याआधी जरूरी आहे.

## पदांतील देवाचे स्वरूप

प्रथम कबीरांचे गुरू रामानंदाच्या पदात आलेले ईश्वराबद्दलचे मुद्दे असे आहेत.

१) ईश्वर विश्वाच्या कानाकोपऱ्यात भरून राहिला आहे - विश्वांतर्यामित्व.

२) प्रातिभ रूपात ईश्वराचे दर्शन रंग व सुवासांच्या एकत्रित अनुभवात येते. ही एक पारमार्थिक ऊर्जा आहे.

३) ईश्वरदर्शनाने भ्रमनिरास होतो.

त्यानंतर कबीर ईश्वरास निरंजन म्हणून संबोधतात. ईश्वर प्रकाश/तेज व नाद ह्याने ओतप्रोत भरलेला आहे असा ह्या निरंजनांच्या अनुभवजन्य अर्थ गुरुदेवांनी सांगितला आहे.

मग तुलसीदास हा निरंजनरूपी देव सगुण रूप कसे धारण करतो हे सांगितले आहे, ते पद घेतले आहे. मीराबाईचे पद 'कोई स्याम मनोहरल्योरी' ज्यात लोणी विकायला गेलेली गोपी कोणी कृष्ण घेता का म्हणू लागली. कारण ती पूर्णपणे कृष्णमय झाली होती. तिला सर्व विश्व देवमय झाले होते. सगुण-निर्गुणातील विरोध नाहीसा करणारा व त्यांना एकरूप बनविणारा हा मीराबाईचा 'सामंजस्यवाद' म्हणजे गुरुदेवांनी घेतलेला प्रत्यक्ष अनुभव आहे.

त्यानंतर रैदासांच्या पदात देवास ते मोती म्हणतात व भक्तांस धागा म्हणतात. भक्तरूपी धागा देवरूपी मोत्यातून गेल्यानंतरच मोत्यास किंमत येते. रैदास म्हणतात, भक्तामुळे देवास किंमत येते ह्यास गुरुदेव उलटे अंतर्यामित्व (Invutal immanceeu) म्हणतात.

शेवटी नानकाने सांगितलेला अत्यंत महत्त्वाचा मुद्दा देवाचे दर्शन आत व बाहेर एकसारखेच घडते ह्याबद्दल गुरुदेवांनी म्हटले आहे, 'It must not be imagination; it must not be hallucination. It must be a veritable perception of God.'

ह्यानंतर दुसरा भाग म्हणजे हिंदी संतांनी आपले ईप्सित साध्य करण्यासाठी केलेली देवाची प्रार्थना होय. एक तात्त्विक स्वरूपाची प्रार्थना आहे तर दुसरी भावांनी ओथंबणारी.

तात्त्विक प्रार्थनेत संत व देवानी परस्परांना भेटण्याची आवश्यकता किती आहे हे फार अट्टाहासाने दादू वैरैदासांच्या पदात दिले आहे. तर तुलसीदास संतास जीवनरूपी नदीवरील नावाडी तर ईश्वर संसार सागरावरील सारंग म्हणतात.

भावभक्तीने ओथंबलेल्या पदात सूरदास एकात झाडावरील पक्षी ससाणा व पारधी ह्यांच्या मध्ये सापडला आहे. दुसऱ्यात महासागरातील अथांग पाण्यातल्या एका होडीच्या ईश्वररूप डोलकाठीवर एक चिमणी बसली आहे. एक आंधळा ईश्वरास खडकाळ व नागमोडी रस्त्यावरून काट्याकुट्यांतून, दरीतून आपणास सुखरूप नेण्याविषयी विनविला ही प्रार्थना रूपी पदे घेतली आहेत.

शेवटी बहिरोचे पद घेऊन ईश्वराला शरण जाण्याची आत्यंतिक गरज दाखविली आहे. बहिरो आपल्या पदांत आपले जीवन समाप्त

करण्यासाठी अनेक पर्याय मांडतो व शेवटी 'देवा तुझी मर्जी जेव्हा असेल त्या वेळेसच प्राण माझे शरीरातून जाऊ दे.' असे विनवितो. ह्यास गुरुदेवांनी शरणागयर मुक्ती म्हटले आहे.

दोहा विभाग :

प्रथम कबीर म्हणतात जसे अफूच्या शेतात एखादेच लाल बोंड असते त्याप्रमाणे संत जन्मास येणे ही किती विरळा घडणारी गोष्ट आहे.

नंतर तुलसीदासांच्या दोह्यात जशी मेहंदीची लाली पानांत दडली असते पण दिसत नाही त्याप्रमाणे ईश्वर विश्वात भरलेला आहे व ज्याप्रमाणे दगडी पाट्यावर वाटल्या नंतर चटणी दिसते त्याचप्रमाणे लोखंडाचे चणे खाल्याशिवाय देवपद दिसत नाही. ह्या अंतर्यामित्व नंतर प्रल्हादासाठी देव दगडातून बाहेर पडल्याचे सांगून ईश्वराचे बहिर्यामित्व हा नवीन सिद्धांत तुलसीदासांनी मांडला आहे.

गुरुदेवांनी या प्रकरणात पुढे तुलसीदासांनी आपल्या भक्तीच्या चढत्या-वाढत्या पायऱ्यावरून देवाचे वर्णन कसे केले आहे ह्याचा मागोवा घेतला :

१) प्रथम तुलसीदास सगुण रूप हे निर्गुणपेक्षा श्रेष्ठ म्हणतात.

२) नंतर सगुण निर्गुणात भेद नाही असे सांगतात.

३) पुढे निर्गुणातूनच सगुण रूप योग्य समयी व आवश्यकतेनुसार निर्माण होते असे सांगतात.

४) नाम हे सगुण-निर्गुण जोडणारा दुवा आहे. ते त्यांच्यावर प्रकाश टाकते. साक्षी आहे व दुभाषापण आहे.

५) नाम हे सगुण निर्गुणापेक्षा श्रेष्ठ आहे.

६) नाम रूप हे एकच आहे.

७) नाम हे रूपापेक्षा श्रेष्ठ आहे.

तुलसीदासांचे दोहे घेऊन वरील सर्व मुद्दयांचे गुरुदेवांनी सुंदर विवेचन केले आहे.

दुसऱ्या भागात ईश्वराचे भक्तांसाठी कार्य हे दोह्यातून कसे मांडले आहे हे सांगताना खालील गोष्टी दिल्या आहेत :

१) देवांच्या सान्निध्यात भक्ताचे संरक्षण होते.

२) देवांनी दिलेले मर्यादित स्वातंत्र्य.

३) एकनाथ, तुलसीदास इत्यादी संतांची देवानी केलेली सेवा.

४) संतांच्या मनात इच्छा निर्माण होण्या आधीच त्याची देवाकडून पूर्ती होते.

५) भक्तास ऐहिक व पारमार्थिक दोन्ही पातळीवरील कल्याण साध्य होते.

६) भक्ताचे ईश्वराच्या साकाररूपाशी ऐक्य झाल्यामुळे, भक्त म्हणजे निराकाराचे प्रतिबिंब असल्याकारणाने व देह त्यागानंतर ईश्वरात पूर्ण विलीनीकरण होत असल्याने हे सर्व घडते.

## परमार्थ पथावर वाटचालीस प्रारंभ

सद्गुरुशी भेट होऊन, त्यानी कृपावंत होऊन अनुग्रह दिल्यानंतर त्यांच्या आज्ञेप्रमाणे मुमुक्षूचा साधक होऊन हा मार्ग क्रमू लागतो. गुरुदेवांचे विचार पदावरील व दोह्यावरील आपण एकत्रित पाहणार आहोत.

अ) गुरुची नैतिक व पारमार्थिक वैशिष्टे (पद विभाग)

'गुरुबिन कौन बताये बाट' कबीरांनी ह्या पदात भवसागर तरून जाण्यास गुरुच्या मार्गदर्शनाची नितांत गरज असल्याचे सांगितले आहे. त्यानंतर आपल्या दोन पदात गुरुची वैशिष्ठे कबीर देतात.

१) नैतिक वैशिष्ट्यांना सदा सर्वकाळ तो आनंदात असतो व त्यातच योगाग्नी प्रज्वलित ठेवीत असतो.

२) कर्म करीत असतानाच तो निष्काम राहतो.

शारीरिक वैशिष्ठे : १) सदा सर्वदा जो त्याचा उच्च पातळीवरच्या आनंदात निमग्न असतो त्यामुळे श्वासाचा अथवा इंद्रियाचा निरोध करण्याची त्याला गरज भासत नाही ते आपोआप घडते. २) तो नेहमी सहज समाधीमध्ये राहतो. देव सदैव समोरच असतो फक्त त्याने त्याकडे पहावे.

३) 'धरती त्यागि, अकासहुँ त्यागे, अधर मडेया छावे' येथे धरती म्हणजे मूलाधार, आकाश म्हणजे पाया ह्या दोन्हीच्या मध्ये पायानसलेले. घर बांधून तो राहतो. केवळ कुंभ्यात चित्त ठेवतो.

पारमार्थिक वैशिष्ठे : १) आपले ससवित् शब्दामध्ये सामावतो 'शब्द मे सुरत समावे'

२) जिथे त्याची दृष्टी पडते तिथे त्यास देवच दिसतो.

३) त्यास दिसणारे देवाचे रूप आत बाहेर एकच असते.

शिष्यांची पारमार्थिक उन्नती

पारमार्थिक गुरुत्वाकर्षणाच्या नियमानुसार गुरुंस असलेले सर्व पारमार्थिक अनुभव शिष्यास येऊ शकतात. देवाच्या नामाचे अमृत तो तर पितोच पण इतरांस पण पाजतो. शेवटी रैदासांच्या म्हणण्याप्रमाणे गुरु 'जैसा देव तैसा गुरु'च असतो.

ब) गुरुचे स्वरूप व त्याचे कार्य (दोहा विभाग)

१) ज्याप्रमाणे हंस नीरातून क्षीर वेगळे करतो त्याचप्रमाणे गुरु आत्याची शरीरापासून सोडवणूक करतो. असा हंस व गुरु मिळणे कठीण.

२) ज्याप्रमाणे कुंभार मातीच्या गोळ्याची जडण घडण, विस्तार करतो, सुंदर आकार देतो त्याचप्रमाणे शिष्याची पुढील सर्व घडण गुरू कृपेमुळेच सुंदर होते.

३) असा गुरु वेहदच्या (अंनताच्या) मैदानावर अनंता बरोबरच क्रीडा करीत असतो. अशा गुरुच्या शिष्यांनी गुरु आज्ञेप्रमाणे पथभ्रमण केल्यास ते परत जन्म मरणाच्या फेऱ्यात पडत नाहीत.

४) शेवटी शिष्यास गुरु देवापेक्षा श्रेष्ठच वाटतो. 'गुरु गोविंद दोऊ खडे कारे लागूँ पाद !

बलिहारि गुरु आप की, गोविन्द दिस दिखाय ॥' गुरुतोच देव दाखविला असल्यामुळे प्रथम त्याच्याच चरणांचा स्पर्श करणे.

क) नाम व रूपाचा संबंध (पदविभाग)

देवाच्या नामाचे ध्यानात काय महत्त्व आहे व ह्या नामाचा रूपाशी संबंध काय ह्याचा विचार गुरुदेवांनी केला आहे.

१) कबीर म्हणतात –

साधकाने आपली जीवरूपी वात नामाच्या तेलात बुडवून देवाच्या अग्नीने पेटवायची आहे.

ह्या तऱ्हेने जीव, नाम व देव ह्यांचा संबंध प्रतिपादून, नाम हे वस्तुगत कारण (matarial cause) आहे व ईश्वर हा निमित्त कारण (instrumental cause) आहे. व ह्यामुळे आत्यातील सुप्त गुण फलद्रूप होतात असे सांगितले आहे.

नंतरच्या पदात तुलसीदास नाम व रूप हे देवरूपी ज्ञानाचे दोन पैलू

असल्याचे सांगतात. देवाच्या नामाचे ध्यान, त्यातल्या रूपाची अपेक्षा न करता करणे हे निष्काम कर्म आहे. शेवटी तुलसीदास म्हणतात, 'हे जिव्हे (देवाचे नाम घेत असल्याने) तू माझ्या कानाचीच पापे नष्ट करीत नाहीस तर मला पापाचरणापासून मुक्त करून देवाकडे नेतेस.' जिभेने केवळ आपले कर्तव्य म्हणून देवाचे नाम घेतल्याने हे सर्व घडते. हे त्यातील सार आहे.

## नामाच्या साह्याने ध्यान (दोहा विभाग)

१) कबीर सांगतात गुरुने दिलेल्या शब्दामुळेच मानसिक व पारमार्थिक अंधार दूर होऊ शकेल.

२) तुलसीदास नाम हे देवाच्या सगुण व निर्गुण स्वरूपापेक्षा श्रेष्ठ आहे हे सांगतात. ईश्वर प्राप्तीसाठी साधन हे सर्वश्रेष्ठ रामनामच आहे असे ठामपणे म्हणतात.

३) नंतर अत्यंत महत्त्वाचा प्रश्न गुरुदेव उपस्थित करतात. हे नाम कोणते असावे? कारण तुकारामांनी म्हटले आहे :

*'राम राम अवघेची म्हणती*
*कोण न जाणती आत्माराम'*

आत्माराम जाणण्यास कोठले नाम घ्यावयाचे कबीराच्या दोह्यातून त्याचे गुरुदेव उत्तर देतात.

*'राम नाम सब कोई कहे, ठग ठाकुर अस चोर ।*
*जिस से ध्रुव प्रहलाद तरे, वह नाम कुछ ओर ॥'*

गुरुदेवांचे विचार पहा – 'परमश्रेष्ठ आत्मज्ञान मिळविलेल्या खऱ्या सद्गुरुंकडून मिळणारे नामच साधकास परमार्थ मिळविण्याच्या कामी उपयुक्त ठरते. ज्या नामामुळे साक्षात परमेश्वर दर्शनाचे फळ मिळते, ते खरे नाम होय. ते अद्वितीय व अनन्यसाधारण व अव्वल व स्वतंत्र दर्जाचे असते.' (ह्यास सबीज नाम म्हणतात).

## ध्यान पद्धत : (पद विभाग)

### १) आंतरध्यान

नामाचे ध्यान, स्मरण, वैखरीने करावयाचे नाही. ते मनात पद वाणीने करावयाचे आहे. तुमचे स्मरण यशस्वी होत असल्याची खूण म्हणजे नाम, स्मरणात आपोआप बेसावध असताना त्याचा विचार पण करीत नसताना तुमच्या समोर ते प्रकट होते. चित्तास वर, त्रिकूटावर लावून तेथे इडा, पिंगळा व सा– त्रिवेणी संगमात स्नान करावयाचे आहे. तदनंतर देवाचे सुंदर रूप तुमच्या समोर प्रकट होईल, असे कबीर सांगतात.

### २) एकाग्रता

कबीर म्हणतात, ध्यानास बसून, चित्त एकाग्र करण्यास सुरुवात केल्याक्षणीच देवाचे रूप समोर उभे राहिले पाहिजे. ते ह्या एकाग्रतेची तुलना. काठी धरून तारेवर चालणाऱ्या डोंबाऱ्याच्या एकाग्रतेबरोबर, वा दंत मारणाऱ्या सर्पाची काढून ठेवलेल्या मण्यावरची एकाग्रता अथवा सती असलेल्या पती बरोबर करतात.

### ३) दीर्घकाळ

जातकांच्या मताप्रमाणे नामस्मरण आयुष्याच्या अखेरपर्यंत, शेवटच्या श्वासापर्यंत केले पाहिजे.

### ४) नैरंतर्य

जसे नामस्मरण अखेरपर्यंत करावयाचे आहे त्याचप्रमाणे ते एकही क्षण वाया न दवडता सतत करावयाचे असे नानक सांगतात.

### ५) सत्कार

नामस्मरण हे अत्यंत भक्तीने युक्त अंतःकरणाने, भावनेने केले पाहिजे हे दादू, कबीर व शरीफसाहेब ह्यांच्या पदावरून गुरुदेव सांगतात.

## दोहा विभाग

### ६) आवश्यक बाह्य गोष्टी

एक क्षण व्यर्थ न दवडता, एक श्वास वाया न घालविता मनातल्या मनात नामाचे स्मरण करावयाचे आहे.

### ७) आवश्यक मानसिक गोष्टी

साधकाने देवा व्यतिरिक्त इतर कोणत्याही गोष्टीचा मनात प्रवेश घडू न देता स्मरण करावयाचे असते.

### ८) आवश्यक नैतिक गोष्टी

आपले ईप्सित गाठण्यासाठी अथक प्रयत्न पाहिजेत. सर्व परिस्थितीमध्ये, सुख-दुःख, उद्वेग, चिंता ह्यामुळे नामस्मरण सोडावयाचे नाही. अहंकाराचा पूर्ण त्याग करून नामस्मरण केले पाहिजे.

### ९) आवश्यक आध्यात्मिक गोष्टी

दिसणाऱ्या रूपाच्या अनुसंधानाबरोबर अथवा ऐकू येणाऱ्या अनाहत नादाबरोबर म्हणजेच देवाच्या सान्निध्यात नामस्मरण करावे.

## ध्यानात योगाचे स्थान : (पद विभाग)

मत्स्येंद्रनाथाचे 'जो भी कच्छाणे कच्च्म' ह्या पदावरून ह्याचे विवेचन गुरुदेवांनी केले आहे.

योगी आसने, मुद्रा इ. करण्यात पटाईत असेल. शरीरास ओले अथवा सुके भस्म फासेल, शरीर उपवासाने काष्टवत करेल, पाण्यावर चालेल, वेदातील सर्व ज्ञान मुखोग्दात करेल, वाचा सिद्धी अथवा इतर सिद्धी परिपूर्ण असतील तरी पण तो कच्चाच आहे. मत्स्येंद्रनाथ आपल्या शिष्यास, गोरक्षनाथास म्हणतात, जोपर्यंत तो तीन गुणांच्या पलीकडे जाऊन गुरुकृपा संपादून आपण आपल्यास जाणत नाही तो पर्यंत तो कच्चाच होय.

## देवप्राप्तीच्या दोन प्रवृत्ती

### १) लढावू :

नरसी मेहताचे पद 'हरिनो मार्ग छे शूरानो' ह्या पदात सुंदरपणे मांडली आहे. किंवा कबीराच्या पदात ह्याचे वर्णन असे येते –

१) आपल्या आध्यात्मिक सेनापतीकडून आज्ञा घेऊन तिचे अर्थात पालन केले पाहिजे.

२) नंतर लक्ष्यावर (ब्रह्मावर) अचूक हल्ला चढविला पाहिजे.

३) व शेवटी देवाचा किल्ला जिंकला पाहिजे.

### २) शरणागती

ह्याची परिणीती कधी कधी आत्म्याच्या विरह अवस्थेत होते.

जसे ज्ञानेश्वर म्हणतात, 'चंदनाची चोळी माझे सर्व अंग पोळी...!'

ईश्वराकडे जाताना, गुरुंकडून अनुग्रह घेताना मनाची जी शरणागतीची भावना असते ती शेवटपर्यंत राहिली पाहिजे व दिवसेंदिवस देवावरील भक्तीप्रेम वाढत गेले पाहिजे.

## आत्म्याची अंधःकारी रात्र व पहाट (पद)

संतांच्या जीवनात, साधकाच्या प्रवासात अनेक विरोधी भावनांचे तरंग येतात. आशा, निराशा, उत्साह, विषाद, श्रद्धा, संशय, आत्मविश्वास मनोदौर्बल्य ध्येयप्राप्तीस विलंब लागला की अंतःकरण विटते. अनेक विकल्प, संशय येतात. श्रद्धा डळमळू लागते. ह्यास Dark Light of The Soul म्हणतात.

साधक ईश्वराच्या अगदी जवळ असतो. अत्यंतिक तेजामुळे अंधारी आली असते. त्या परिस्थितीत दृढ मनाने व भावाने साधन झाल्यानंतर परमार्थाची पहाट येते. चित् सूर्याची किरणे क्षितीजावर दिसू लागतात.

ह्या अवस्थेतून सर्वांना जावे लागतेच असे नाही. प्रत्येकाच्या भावभक्ती व त्याच्यावरील देवाच्या कृपेवर हे सर्व अवलंबून असते.

## परमार्थ पथावरील परमोच्च चढण

दीर्घकाळ, निरंतर भावभक्तीयुक्त नामस्मरणाने, गुरुकृपेने, ईश्वराचा साक्षात्कार होतो. त्याने जीवन आनंदमय, परमपवित्र, दिव्य, धन्य होते. साधक ईश्वरच होतो. हा साक्षात्कार म्हणजे इंद्रिय ज्ञानांसारखे, पण अतींद्रिय अंतःस्फूर्ती प्रातिभ आत्मानुभव होते.

हे अनुभव म्हणजे परमार्थ सोपानाचे शिखर, त्याचे भाग्य-दिव्य फळ, त्याचे मूळ श्रोत होय. यात गुणानुक्रमाने वाढ होते. पायऱ्या असतात. भावभक्तीच्या उत्कटतेप्रमाणे त्या समोर येतात. भाव स्थिर असल्यास उच्च अनुभवही स्थिर होतात. अन्यथा त्यांची ये-जा होत रहाते.

आत्मानुभवांचेही इंद्रिय ज्ञानासारखे पाच प्रकार आहेत :

१) रूप, तेज, रंग २) नाद
३) गंध ४) रस
५) स्पर्श

प्रथम येणारा अनुभव म्हणजे बिंदुले ज्यास गुरुदेव spiriton म्हणतात. पुढे पुढे साधकांस अनेक प्रकारचे एकत्रित अनुभव येऊ लागतात. त्यानंतर उच्चतम भव्योदात्त अनुभव पण येतात. त्यांना मर्यादा नाही.

पदविभागातील ह्या प्रकरणाच्या सुरुवातीस गुरुदेव म्हणतात :

'The chapter will be devoted to the discussion of this spritual experience under nine different heads, each containing a group of sonjs in an ascending order of spiritual experience.'

'ह्या प्रकरणात संतांच्या अनुभवांचा नऊ सदराखाली विचार करावयाचा आहे. प्रत्येक सदराखाली काही पदांचा परामर्श घेतला आहे. संतांच्या त्या त्या पदात वर्णिलेले अनुभव हे त्यांच्या त्या विशिष्ट अनुभवाचे कळस होत. आणि ही नऊ सदरांची मांडणी उत्तरोत्तर वाढत्या श्रेणीतील अनुभवांप्रमाणे केली आहे.'

ती विभागणी येणेप्रमाणे केली आहे --

१) ह्यात मीराबाई, सूरदास, तुलसीदास, गोरक्षनाथ, धर्मदास, यारी, एकनाथ व महिपती ह्यांच्या पदाद्वारे रूप, तेज इ. अनुभवांचे वर्णन घेतले आहे.

२) ह्यात चरणदासच्या पदाद्वारे अनाहत नादाचे साधकावर घडणाऱ्या नैतिक व मानसिक परिणामांचे विवरण आहे.

३) कबीरांच्या पदाद्वारे पारमार्थिक अनुभवांची भव्योदात्तता व अवर्णनियता

४) साधकास अमृत सेवनाचा अनुभव येऊन त्यास निरतिशय आनंद होतो. ह्या अमृत सेवनात दंग असणाऱ्या मानसिक स्थितीस गुरुदेव 'Flavouism' ब्रह्मरुची स्वादशास्त्र म्हणतात.

५) ह्या गटांखाली कबीर व दादू ह्यांना ह्या ब्रह्मरुचीस्वादामुळे ओढावलेल्या बेहोषीचे वर्णन आहे.

६) ह्या सदराखाली ब्रह्मरुचीस्वाद घेतल्यानंतर मायेचे निर्मूलन कसे घडते याचे वर्णन आहे.

७) ह्या गटात घडणाऱ्या या आनंदाचे स्वरूप व साधू त्याचा जगाच्या पालनासाठी कसा उपयोग करतो हा विचार घेतला आहे.

८) ब्रह्मानंद झाल्यानंतर सहज साधूंच्या मुखातून येणारे धन्योद्‌गार या सदरात विभूषतात.

९) अशा साधूचे कार्य म्हणजे जगाचे कल्याण हा साक्षात्काराचा cope stone (शेवटचा दगड) म्हणजे कळसच होय ह्याचे वर्णन येते.

या नऊ विभागासाठी गुरुदेवांनी हिंदी संतांची चौतीस (३४) पदे निवडली आहेत. निवड हिंदी त्यांना आलेल्या अनुभवांशी जुळणारे अनुभव ज्या पदात आहेत त्या पदांचीच आहे हे मुद्दाम सांगावयाचे आहे. अर्थात् ह्यांत नसलेलेही पारमार्थिक अनुभव त्यांना होते हे सांगणे नलगे.

## दोहा विभाग

ह्यात गती व स्पर्शाचे काहीसे दुर्मिळ अनुभवांचे वर्णन इतर अनुभवांबरोबर घेतले आहे.

गति :

*'मनुवा मेरो मरि गयो, दुर्बल भयो शरीर ।*
*पीछे पीछे हरि फिरैं, कहत कबीर कबीर ॥'*

अर्थ : 'माझे मन मरून गेले, शरीरपण दुर्बल झाले आहे पण देव 'कबीर, कबीर' असे म्हणत माझ्या मागे मागे फिरत आहे.

स्पर्श :

*'कबिरा देखा एक अंग, महिमा कही न जाय ।*
*तेजपुंज परसा धनी, नैनों रहा समाय ॥'*

अर्थ : कबीर म्हणतात, देवाचे मी फक्त एक अंग बघितले. त्याचे पण वर्णन करणे अशक्य आहे. तेजपुंज अशा माझ्या धन्यास मी स्पर्श केला व त्यास डोळ्यांत साठवून ठेवले आहे.

शेवटी दोह्यामध्ये वर्णिलेली ईश्वराची अनंतता त्याचे स्वरूप गुरुदेवांच्या शब्दात पाहून थांबू या.

## अनंतता (Infinitude)

'हद हद पर सब ही गया, बेहद गया न कोय ।
बेहद के मेदान में, रम कबीरा सोय ।'

अर्थ : '(परमार्थाच्या) सीमेपर्यंत अनेक गेले आहेत. सीमे पलीकडे कोणी गेले नाही. परंतु कबीर या सीमे पलीकडील प्रांगणात रममाण झाले आहेत.

(गुरुदेवांचा त्यांच्यापुरता परमार्थ १९२० साली झाला. जगाच्या कल्याणासाठी तद्‌नंतर ३७ वर्षे ह्या बेहदाच्या मैदानात वास्तव्य केले.)

**श्री. नरहरी वि. कुलकर्णी**
'अभय' २७, सावली सोसायटी, पौड रोड, पुणे ४११०३८.

# गुरुदेवांच्या मनाला भावलेले 'श्रीकृष्णस्वरूप'

डॉ. सौ. शुभदा शरच्चंद्र कोशे

*एम.ए., पीएच.डी., प्रबंध विषय 'भगवद्‌गीतेतील उपनिषदांचे आधार' गृहिणी.*

भगवद् गीतेच्या चवथ्या अध्यायात, 'परित्राणाय साधूनाम्' 'विनाशाय च दुष्कृताम्, 'धर्मसंस्थापनार्थाय', 'अभ्युत्थानमधर्मस्य', इ. हेतुंमधून 'जन्मकर्मच मे दिव्यं' अशा वचनांमधून स्वतःच्या जन्माविषयी - अवताररहस्याविषयी - वर्णन करून सांगणाऱ्या, श्रीकृष्णाभोवती, त्याच्या बालपणापासूनच एक अलौकिकतेचे वलय निर्माण झाले असल्याचे दिसते. त्याच्या बाललीलांच्या श्रवणामुळे किंवा वाचनामुळे अनेक भक्त त्याच्याकडे आकृष्ट होतात. त्याच्या या लीलांचे वर्णन अनेक भक्त, संत, कीर्तनकार, ग्रंथकार यांनी भरभरून केले आहे. दुसरी उल्लेख करण्यासारखी गोष्ट म्हणजे गोपी-श्रीकृष्ण आणि रासलीला यांचे निर्माण झालेले नाते. अनेक कथाकारांनी, ललित लेखक, कवि व ग्रंथकार यांनीही या रासलीलेविषयी आपापल्या कलाकृतींमधून वर्णने केली आहेत. म्हणूनच श्रीकृष्ण कोठे 'माखनचोर' आहे तर कोठे 'यशोदानंदन' आहे. गोकुळात राहून 'गोपाळकाला करणारा' तर कोठे 'कालियामर्दना'सारखे अद्भुत कृत्य करणारा आहे. कोठे गोपींच्या खोड्या काढणारा तर काही वेळा राधेची छेडछाड करणारा आहे. अगदी क्वचित् कोठे 'रणछोडदास' आहे तर कोठे 'भगवद् गीतेचा उद्‌गाता' आहे. भगवान श्रीकृष्णाचे व्यक्तिमत्त्व अशा अनेक पैलूंनी युक्त आहे.

परंतु जेव्हा आपण गुरुदेव रानडे यांचे विचार जाणून घ्यावयाचा प्रयत्न करतो तेव्हा असे स्पष्टपणे जाणवते की, गुरुदेवांना श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वातील वरीलपैकी कोणताही पैलू भुरळ घालत नाही. त्यांच्या मनाला आकृष्ट करून घेत नाही. याला अपवाद आहे तो फक्त 'भगवद्‌गीतेचा उद्‌गाता' या रूपाचा. कारण गुरुदेवांच्या मनाला भावलेले रूप आहे ते म्हणजे 'योगेश्वर श्रीकृष्ण' हे. एक थोर तत्त्वज्ञ, त्रिकाल ज्ञानी, योगैश्वर्य प्राप्त करून घेऊन आपल्या व्यक्तिमत्त्वाची प्रयत्नपूर्वक जडणघडण केलेला थोर पुरुष-भगवान श्रीकृष्ण.

आपण सर्वजण नित्य कथा कीर्तनांतून किंवा बालपणी ऐकलेल्या गोष्टींमधून प्रामुख्याने श्रीकृष्णाने केलेल्या बाललीलांचे आणि अद्भुत कृत्यांचेच वर्णन ऐकलेले असते. त्यात पुतनावध, शकटासूर, गोवर्धनाला करंगळीवर तोलणे अशा अनेकविध कथांचा समावेश असतो. त्यातूनही कथाकार हा जर उत्तम वक्ता व कलाकार असेल तर तो त्या सुरस कथांमधून ते ते वातावरण आपल्याभोवती निर्माण करीत असतो. या कथा आपल्याला मोहवून टाकतात.

जेव्हा आपला परिचय 'गीतेचा उद्‌गाता भगवान श्रीकृष्ण' याच्याशी होतो तोपर्यंत आपल्या मनाला वरील खोडकर कृष्णाने वेधून घेतलेले असते. त्यामुळे प्रत्यक्ष गीतेचा बारकाईने अभ्यास करू लागेपर्यंत 'श्रीकृष्णाने रणांगणावर हतबल झालेल्या अर्जुनाला गीता सांगितली' या व्यतिरिक्त आपले फारसे लक्ष श्रीकृष्णाच्या या बदलत्या व्यक्तिमत्त्वाकडे गेलेले नसते. गीतेतच आलेल्या पुढील श्लोकाचाही आपण फारसा विचार केलेला नसतो.

***'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।***
***तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥' (गी. १८.७८)***

किंवा अकराव्या अध्यायात आलेल्या 'पश्य मे योगमैश्वरम्' (श्लोक ८.) या वचनाचाही आपण फारसा विचार करत नाही. येथे श्रीकृष्णाला 'योगेश्वर' म्हटले आहे तर दुसरीकडे त्याच्या 'योगैश्वर्याचा' उल्लेख केला आहे.

अशा प्रकारे 'योगयुक्त चित्त' आणि 'भगवान श्रीकृष्ण' या विषयी सांगण्यासारखी गोष्टही आहे. भारतीय युद्ध समाप्त झाल्यानंतर काही दिवसांनी श्रीकृष्ण व अर्जुन प्रेमाने गोष्टी बोलत बसले होते. अशा वेळी भगवंताचे मुखातून पुन्हा एकदा गीता ऐकावी अशी इच्छा अर्जुनाच्या मनात निर्माण झाली. म्हणून त्याने श्रीकृष्णास विनंती केली की, 'युद्धारंभी तुम्ही केलेला उपदेश मी विसरलो; मला तो कृपा करून पुन्हा सांगा.' तेव्हा श्रीकृष्णाने उत्तर दिले ते असे – 'गीतेतील तो उपदेश मी त्या प्रसंगी अत्यंत योगयुक्त चित्ताने केला होता. त्यामुळे तो पुन्हा तसाच्या तसा सांगणे मलाही शक्य होणार नाही.' हा प्रसंग महाभारतात अनुगीतेच्या प्रारंभी आलेला आहे. (म.भा. अश्वमेधपर्व. अ. १६.१० ते १३).

अशा प्रकारे योगयुक्त अंतःकरणाने गीतोपदेश करणारा, योगेश्वर म्हणून गौरविला गेलेला, ज्याच्या योगैश्वर्याची अनुभूति अर्जुन आणि (व्यासकृपेने) संजय यांना लाभली होती, अशा कृष्णाचे स्वरूप - अशा भगवंताचे स्वरूप फारच कमी ठिकाणी वर्णिलेले दिसून येते. भगवंताच्या 'योगैश्वर्यनियुक्त' 'एक त्रिकालज्ञ', 'तत्त्वज्ञ' अशा या रूपाने गुरुदेवांच्या मनाला वेधून घेतले आहे असे दिसून येते.

म्हणूनच गुरुदेवांनी आपल्या काही ग्रंथांमधून श्रीकृष्णाचे हे स्वरूप हेतुपुरस्सर आणि मनःपूर्वक शब्दांकित केले आहे असे लक्षात येते. या वर्णनामधून त्यांनी श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वातील काही पैलू नव्याने अभ्यासकांसमोर मांडले आहेत. एवढेच नव्हे तर त्यांना श्रीकृष्णाविषयीची जी काही वर्णने आक्षेपार्ह वाटली आहेत त्याविषयीसुद्धा आपली स्पष्ट मते परखडपणे मांडली आहेत.

भागवतातील व्यक्तींचे चित्रण करताना गुरुदेवांनी प्रल्हाद, उद्धव, कुब्जा, सुदामा, अवधूत, शुकमुनी इ. चे व्यक्तिविशेष कथन केले आहेत. त्याबरोबरच श्रीकृष्ण हा एक श्रेष्ठ आत्मज्ञानी होता असेही दाखवून दिले आहे. याविषयी गुरुदेव सांगतात की –

भागवत ग्रंथातील दहाव्या आणि अकराव्या स्कंधाचा नायक श्रीकृष्ण हा एक अत्यंत श्रेष्ठ आत्मज्ञानी होता. त्याच्या अलौकिक आणि आध्यात्मिक सामर्थ्यामुळे लोकांनी त्याला परमेश्वराचा अवतार मानले आहे. त्याच्या गोपींशी जडलेल्या प्रेमासंबंधी लोकांचा फारच गैरसमज झाला आहे. सर्व

लेखकांनी त्याबद्दल भलतेच काहीतरी प्रतिपादिले आहे. वस्तुतः श्रीकृष्णाची शिकवण त्यानेच भगवद्‌गीतेत प्रतिपादन केलेल्या तत्त्वज्ञानाहून मुळीच निराळी नाही. अहंकाराच्या तावडीत सापडलेल्या आपल्या कुळाची सुद्धा त्याने पर्वा बाळगली नाही. तो अतिशय मोठा, ज्ञानोत्तर-निष्काम कर्मयोगी होता. म्हणूनच अंतकाळ समीप आला तेव्हा त्याने एका यःकश्चित पारध्यास बाण मारू दिले व याप्रमाणे हा जड देह सोडण्यास ते निमित्त शोधून काढले. परंतु खरे म्हणजे श्रीकृष्ण हा तर भागवत ग्रंथात वर्णिलेल्या आत्मज्ञांचा शिरोमणी शोभतो.

यापुढे गुरुदेवांनी श्रीकृष्ण आणि गोपी यांच्या स्नेहाविषयी प्रसृत झालेल्या मतांविषयीचा विचार करून त्या विषयी आपले मत व्यक्त केले आहे. फक्त एवढेच करून न थांबता श्रीकृष्ण-गोपी स्नेहाचा खरा अर्थही समजावून दिला आहे.

श्रीकृष्णाचे खरे आध्यात्मिक स्वरूप व त्याचे गोपींशी असलेले नाते यासंबंधी लोकांत फारच मोठा गैरसमज माजला आहे. असे आपले मत गुरुदेवांनी स्पष्टपणे मांडले आहे. पुढे ते म्हणतात की, 'गोपींना कृष्णाविषयी वाटत असलेले प्रेम हे विषयी होते. कृष्णाने मुख्यतः गोपींच्या विषयवासनाच तृप्त केल्या आणि त्याच गोष्टीला पुढे आध्यात्मिक स्वरूप देण्यात आले. म्हणून श्रीकृष्णाचा परमार्थ व कृष्णगोपींचा संबंधही वस्तुतः विषयीच होता, असे काही ग्रंथकारांचे मत आहे.' परंतु गुरुदेवांच्या मते वरील विधान हे अत्यंत मूर्खपणाचे आणि बदनामी करणारे आहे. एवढेच नव्हे तर लैंगिक प्रेमाचा अध्यात्माशी यत्किंचितही संबंध आहे ही गोष्ट आम्हास मुळीच मान्य नाही. स्त्रीपुरुषांच्या विषयी व्यवहारात खऱ्या परमार्थाचा अंशही सापडणे शक्य नाही.' असे काहीसे उद्वेगपूर्ण उद्‌गार गुरुदेवांनी काढलेले आढळतात.

याच मताचे स्पष्टीकरण करताना म्हटले आहे की, ज्याला परमार्थ साधायचा असतो त्याला विषयांशी सहकार्य कधीही करता कामा नये. याउलट त्याने विषयांवर आपले श्रेष्ठत्व प्रस्थापित केल्यानंतरच परमार्थ साधतो.

'श्रीकृष्णाचा गोपींशी कोणत्याही प्रकारे विषयी संबंध होता ही कल्पनाच अशक्य आहे. खऱ्या परमार्थाचे मुळीच ज्ञान नसलेल्या अलीकडच्या काही पुराणिकांनी ही असत्य व विपरीत कल्पना भागवतात घुसडून दिली असावी.' गुरुदेवांच्या या मतावरून त्यांची कृष्ण-गोपी संबंधाविषयीची मते स्पष्ट होतात. कीर्तनकार, पुराणिक, कवी व काही लेखक यांच्या कथनातून व्यक्त होणाऱ्या वरील मताला गुरुदेवांनी जोरदार आक्षेप घेतला असल्याचे स्पष्ट होते.

एवढ्यावरच न थांबता भागवतामध्ये परीक्षिताच्या प्रश्नांना शुकाचार्यांनी दिलेल्या उत्तरांचा उल्लेख केला असून त्यामध्ये असंबद्धता असल्याचे दाखवून दिले आहे. हे सर्व विचार त्यांच्याच शब्दात पहाणे जास्त संयुक्तिक होईल.

'... श्रीकृष्ण विषयासक्त होता ही गोष्ट खरी मानली तर तो पवित्र कसा हा परीक्षितांचा प्रश्न योग्य ठरतो. परंतु या प्रश्नास शुकाचार्यांनी दिलेली किंवा त्यांस द्यावी लागलेली उत्तरेही अगदीच विषयास सोडून आहेत. कृष्णाने व्यभिचार का केला? या परीक्षिताच्या प्रश्नास शुकाने दिलेली उत्तरे पोरकट वाटतात. १) प्रथम, सर्वच देवांनी व्यभिचार केला आहे असे विधान करून, व्यभिचारात काही पाप नाही व म्हणून श्रीकृष्ण या बाबतीत निर्दोषी ठरतो, असे शुकाचार्यांनी सांगितले आहे. (२) अग्नि सर्व पापे जाळतो व श्रीकृष्णाने काही पाप केले असले, तरी त्याचे खरे स्वरूप अग्नीसारखे असल्यामुळे ते जळून भस्म झाले असले पाहिजे, अशी दुसरी उपपत्ती शुकाचार्यांनी दिली आहे. ३) परमेश्वर पापपुण्यातीत आहे, असे मानले पाहिजे. श्रीकृष्ण परमात्मा आहे. तेव्हा त्याचे वर्तन पापपुण्यापलीकडे असले पाहिजे, ही शुकाचार्यांची तिसरी उपपत्ती होय. ४) श्रेष्ठ माणसांची कृती त्यांच्या शब्दांशी सुसंगत असलीच पाहिजे असा नियम नाही. म्हणून कृष्णाच्या कृतीने त्याच्या अत्यंत श्रेष्ठ अशा तत्त्वज्ञानावर किंवा शिकवणुकीवर काही अनिष्ट परिणाम झाला नाही. ५) लोकांची सर्व कर्मे त्यांच्या पूर्व संचिताप्रमाणे घडतात. तेव्हा श्रीकृष्णाने गोपींशी ज्या शृंगारचेष्टा केल्या त्या म्हणजे त्याच्या पूर्वकर्मांची फळे होत. म्हणून त्याबद्दल तो दोषी ठरत नाही. ६) गोपींच्याप्रमाणेच त्यांच्या पतींचे अंतरंग श्रीकृष्णाच्या दिव्य रूपाने भरून गेल्यामुळे त्यास व्यभिचाराचा दोष मुळीच लागला नाही. ७) शुकाची सातवी उपपत्ती याहीपेक्षा जास्त गंमतीची आहे. श्रीकृष्णाने आपल्या मायेने गोपीच्या पतीपुढे दुसऱ्या गोपी उत्पन्न केल्यामुळे मूळ गोपींचा उपभोग घेण्यास काहीच हरकत राहिली नाही ! ईश्वरास आपल्या पापापासून मुक्त होण्यासाठी एखाद्या मांत्रिकाप्रमाणे किंवा जादुगाराप्रमाणे हातचलाखी करावी लागते. यावरूनच वरील विचारपद्धती किती चुकीची व मूर्खपणाची आहे, हे उघड दिसते ! वरील सर्व उपपत्ती पोरकट किंवा असंबद्ध आहेत.'

गुरुदेवांचे हे विचार वाचल्यावर मनात सहजच प्रश्न उपस्थित होणे शक्य आहे. तो म्हणजे, 'तर मग कृष्ण गोपी संबंधाचा अर्थ काय असावा बरे?'' याचे उत्तरही गुरुदेवांनी आपल्या विवेचनातून दिले आहे.

ते म्हणतात की, कृष्ण आणि गोपी यांच्या सत्य स्वरूपाबद्दल प्रतिपादिलेली मानसशास्त्रविषयक उपपत्तीच थोडीबहुत विचार करण्यासारखी ठरते. श्रीकृष्ण गोपींचा संबंध म्हणजे आत्मा व इंद्रिये यांच्या परस्परसंबंधाविषयी मांडलेले रूपक होय. असा या उपपत्तीचा मथितार्थ आहे. यापुढील त्यांचे वाक्य अत्यंत परखड मत व्यक्त करणारे आहे. 'श्रीकृष्ण गोपींचा संबंध वैषयिक होता या संबंधावर आधारलेला कोणताही भक्तिपंथ म्हणजे गवताच्या खुंटावर बांधलेल्या इमारतीप्रमाणे डळमळीत राहणार, ही गोष्ट या सर्व उपपत्तींवरून सिद्ध होते.'

असे जर आहे तर श्रीकृष्ण सहवासात गोपींना आनंद लाभला तो कसा? याविषयी एक आध्यात्मिक उपपत्ती गुरुदेवांनी प्रतिपादन केली आहे.

'आत्म्याचा अनुभव घेत असता प्रत्येक गोपीपुढे श्रीकृष्ण परमात्मा प्रत्यक्ष दिसू लागला असावा व तो सर्वांपुढे एकदम एकसारखाच दिसू लागल्यामुळे त्या दर्शनाचा आनंद गोपींनी पृथक् व एकत्रित एकदम लुटला असा याचा अर्थ होणार नाही काय? पुरुषांप्रमाणेच स्त्रियांनाही ईश्वरी साक्षात्काराचा आनंद लुटता येतो. ईश्वर स्त्री-भक्तांचा पती आहे असे मानणे जितके मूर्खपणाचे आहे; तितकेच तो पुरुष भक्तांची पत्नी आहे, असे मानणेही मूर्खपणाचे आहे. ईश्वराच्या बाबतीत वैषयिक संबंध अगदी अशक्य आहे. म्हणून अध्यात्मशास्त्रात प्रणयास किंवा विषयोपभोगास मुळीच अवकाश नाही हे अक्षरशः खरे आहे.' 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि

यान्ति परां गतिम् ।' या वचनातून.

'स्त्रियासुद्धा ईश्वरी साक्षात्कार प्राप्त करून घेण्यास योग्य असतात.' हे गीतेत भगवंतांनी व्यक्त केलेले मतच गुरुदेवांनी येथे उचलून धरले आहे.

मग योगेश्वर कृष्णाचे खरे स्वरूप कसे होते बरे?

कृष्ण हा एक शूर योद्धा होता. त्याचप्रमाणे तो एक थोर साक्षात्कारी पुरुषही होता. हा साक्षात्कार हे त्याच्या साधनेचे फल होते. साक्षात्कारासाठी त्याने गंधमादन, पुष्कर सरोवर आणि बद्रिपर्वत या ठिकाणी दीर्घकाल ध्यानसाधन केले होते. या गोष्टी महाभारत व पुराणे यातील उल्लेखांवरून दिसून येतात. कृष्णाने अशा ध्यानसाधनाने प्राप्त करून घेतलेल्या साक्षात्काराकडे पुष्कळांचे लक्ष गेलेले नाही.

यापुढे गुरुदेवांनी एक दृष्टांत देऊन स्पष्टीकरण केले आहे. जसे लाप्लासने नेपोलियनला सांगितले की, विश्वाची उत्पत्ती सिद्ध करण्यासाठी विश्वकर्ता म्हणून कोणी ईश्वर मानण्याची आपल्याला आवश्यकता वाटत नाही. त्याप्रमाणेच बहुधा, कृष्णाला प्राप्त झालेल्या महात्म्यासाठी पारमार्थिक प्रयत्न आवश्यक होते, असे मानण्याची जरूर लोकांना वाटत नसावी. निसर्गरम्य अशी महावने, सरोवरे व पर्वत या ठिकाणी कृष्णाने ध्यानसाधन केले. ईश्वराची भक्ती केली व त्यात पूर्ण यश येऊन त्याला साक्षात्कारही झाला. अशा ईश्वरसाक्षात्काराने प्राप्त झालेल्या सामर्थ्यामुळेच गीतेने त्याला योगेश्वर म्हटले आहे व तो 'योगेश्वर' होता म्हणूनच त्याच्या साह्याने पांडवांना विजय मिळाला. ध्यानसाधनाने आलेल्या आध्यात्मिक सामर्थ्याच्या योगानेच जगातील ऐतिहासिक घडामोडींत मनुष्याचा चढता वाढता प्रभाव पडू शकतो. याच कारणाने कृष्ण केवळ सारथी असतानाही, तो पांडवांच्या पक्षाचा होता, एवढ्यानेच अर्जुनाला व पांडवांना विजय प्राप्त झाला.

गीतेत आलेल्या विश्वरूपदर्शनाविषयी गुरुदेव म्हणतात की, 'विश्वरूपदर्शनाचे संपूर्ण विराट स्वरूप, अर्थातच गीतेत दिसते. कृष्ण म्हणजेच वासुदेव, भगवान व विष्णू असे म्हटलेले आहे. वासुदेव म्हणजे सर्वव्यापकत्व, भगवान म्हणजे सर्वशक्तिमान व विष्णू म्हणजे सर्व तेजस्वी, अशी ही सर्व देवाचीच विशेषणे आहेत. व्यापकत्व, शक्ती व तेज हे ईश्वराचे सारभूत गुण आहेत.'

अशा प्रकारे गुरुदेवांनी श्रीकृष्णाचे एक थोर तत्त्ववेत्ता, आत्मसाक्षात्कार प्राप्त करून घेतलेला साधक, त्रिकालज्ञ, आत्मज्ञानी इत्यादी गुणांनी युक्त असलेले स्वरूप नव्याने अभ्यासकांसमोर आणलेले असून श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वाविषयी वेगळ्या दृष्टिकोनातून पुन्हा एकदा विचार करावयास प्रेरणा दिली आहे.

संदर्भ : १) मराठी संतवाङ्मयातील परमार्थ मार्ग. : अनु. प्रा. कृ. वें. गजेंद्रगडकर.

२) भगवद्गीता-साक्षात्कार दर्शन. : मराठी रूपांतर - ग. वि. तुळपुळे.

**डॉ. सौ. शुभदा शरच्चंद्र कोशे**

इंदिरा सदन, ४२७ कापड बाजार, गणपति मंदिरासमोर,
पनवेल, जि. रायगड, ४१०२०६.

# भारतीय तत्त्वज्ञानातील मानवी मनाचे महत्त्व

**प्रा. प्रभाकर धारवाडकर**

B.Sc.C., Eng., F.I.E., M.A. S.C.E., Structural Design Engineer worked in Mecon Steel Factory at Bihar, Orisa and M.P. Last 9 years Editor of quarterly magazine 'Path way to God', by Acadamy of comparative philosophy and religion established by Shree Gurudeo Ranade.

भारतीय तत्त्वज्ञानामध्ये मानवी मनाचे स्थान अद्वितीयच म्हणावे लागेल. मानवी समाजाच्या अथवा व्यक्तीच्या प्रगतीचे मग ती प्रगती भौतिक असो, अध्यात्मिक असो अथवा ज्ञानांचे उत्तुंग शिखर गांठण्याकरिता केलेली असो वा निरनिराळ्या भौतिक, रासायनिक आदिशास्त्रामध्ये नवनवीन शोध लावण्याकरिता असो मन हे त्या प्रगतीचे प्रमुख साधन आहे. अतिप्राचीन काळी आपल्या ऋषीमुनींना ही गोष्ट ज्ञानाच्या पहिल्या पायरीवर असतानाच समजून चुकली होती. त्यांनी जे ज्ञानाचे अवाढव्य भांडार निर्माण केले ते केवळ मनाची एकाग्रता साधूनच मिळविले. सर्वसंग परित्याग करून, गुहेच्या एकान्तात बसून आपल्याला ज्या वस्तूचे ज्ञान मिळवावयाचे आहे त्या वस्तूवर अथवा ज्या तत्त्वाचा शोध घ्यावयाचा आहे त्या तत्त्वावर मन एकाग्र करून ज्ञान प्राप्त करावयाचे ही पद्धती प्राचीन ऋषीमुनींनी शोधून काढली व वापरली.

त्रेता युगामध्ये प्रभु रामचंद्रांना वसिष्ठ ऋषिनी जो उपदेश (योगवासिष्ठ) केला त्यामध्ये म्हटले आहे, 'सर्वेषु सुखदुःखेषु सर्वासु कलनासुच । मनः कर्तृ मनो भोक्तृ मानसं विद्धि मानवम्॥' हे रामा, सर्व सुखदु:खांचे आणि कल्पनांचे कर्तृत्व व भोक्तृत्व मनाकडेच आहे. ह्यासाठी मन म्हणजेच मनुष्य हे लक्षात ठेव.' समर्थ रामदासस्वामींनी 'मनाचे श्लोक'मध्ये मनाला उद्देशून उपदेश केला. स्वामी विवेकानंदांनी मनाला Real man व शरीराला Apparant man असे म्हटले आहे. ऋषीमुनींनी मनामध्ये खोलवर जाऊन मनाच्या सर्व पैलूंचा अभ्यास केला. व्यक्तीच्या सर्व कृती मनाकडूनच आखल्या जातात आणि मेंदू व नाडी संस्थानाच्या माध्यमातून ज्ञानेंद्रिय-कर्मेंद्रियाकडून करविल्या जातात. एखादी व्यक्ती विद्वान बनते. कुशल व्यापारी, सामाजिक कार्यकर्ता, पुढारी, धर्मपरायण अथवा अपकृत्याकडे प्रवृत्ती असलेली नराधम व्यक्ती बनते ते केवळ मनाच्या इच्छाशक्तीच्या जोरावर होते. मनावर ताबा नसेल तर मन भरकटत राहते व शरीर मनाच्या ताब्यातील कळसूत्री बाहुले बनते. अशा मनुष्याकडून कोणती अवांछनीय कृत्ये घडतील हे सांगता येत नाही.

एखादी व्यक्ती आपल्या विचारात पूर्णपणे गढून गेली असेल तर तिच्या डोळ्यांसमोर ज्या गोष्टी घडतात अथवा कानांवर जे शब्द पडतात त्याकडे तिचे लक्ष नसते हा अनुभव आहे. कारण मनाची त्या त्या ज्ञानेंद्रियांना कार्य करण्याची आज्ञा नसते. इटॅलियन शास्त्रज्ञ आर्किमेडीस टबमध्ये स्नान करीत असता शरीराचे जेवढे आकारमान पाण्यात बुडते तेवढ्या आकारमानाचे पाणी बाजूला होते अथवा टब भरला असल्यास बाहेर सांडते हे त्याच्या लक्षात आले व त्या नवीन शोधाच्या नादातच तो आपल्या लॅबोरेटरीकडे पळत सुटला. आपल्या अंगावर कपडे नाहीत याचे भान त्याला राहिले नाही. कारण त्याचे मन केवळ शोधांच्या विषयांत मग्न होते. ज्ञानेंद्रियांना जागे करण्यास मनाला सवड नव्हती. यातूनच Archimedes's Principle या शोधाचा जन्म झाला. मेंदूच्या माध्यमातून शरीरावर नियंत्रण ठेवणाऱ्या मनाला योगी अरविंद शारीरिक मन (Physical mind) म्हणतात. त्याशिवाय अंतर्मन (Subconsicous mind), उच्चतर मन (Super mind), व मनाची उच्चतम अवस्था (Supramental state) अशा मनाच्या विविध पायऱ्या आहेत.

सर्वसाधारणतः सामान्य माणसाचे मन संसारातील अथवा व्यवहारातील विविध विचारांत गुरफटलेले असते. हे विचार त्याचा अहंभाव आकांक्षा, कामना, निरनिराळी सुखे मिळविण्याकरिता चाललेली धडपड यातून निर्माण झालेले असतात. एखाद्या कठीण प्रश्नाचे उत्तर, अडचणीवर अथवा शत्रूवर मात करण्याचा उपाय किंवा शास्त्रज्ञांचा तत्त्वाचा शोध या सारख्या गोष्टीकरिता इतर सर्व विचार मनातून काढून टाकून मन एकाग्र केल्यानंतर मनुष्य अचूक उत्तरापर्यंत जाऊ शकतो. स्वामी विवेकानंद म्हणतात, 'ज्ञान भांडाराचा दरवाजा मनाच्या एकाग्रतेच्या किल्लीशिवाय उघडत नाही. मग तो एखादा शाळकर विद्यार्थी असो अथवा महान योगी. सर्वांना मनाच्या एकाग्रतेची गरज असते.' ज्यांच्या मनात लहान-सहान विचारांची गर्दी असते अथवा मन सतत भरकटत असते, मनाला उसंत नसते त्यांना एकाग्रता जमत नाही. खूप प्रयत्न करावे लागतात. ऋषी-मुनींनी एकांतात गुहेमध्ये बसून निरनिराळ्या विषयावर मन एकाग्र करून ग्रंथनिर्मिती केली. त्यामध्ये निरनिराळ्या जवाहिरांच्या जाती, औषधी वनस्पतींचे गुणधर्म, विश्वाची उत्पत्ती, लय व विविध अवस्था, मानवी जीवनात घडणारी स्थित्यंतरे इत्यादी भिन्न विषय आहेत.

मनामध्ये असलेले सर्व विचार काढून टाकून एकच विचार ठेवला, तर त्यावर मन एकाग्र होते. मनातील सर्वच विचार काढून टाकून निरभ्र आकाशाप्रमाणे शून्यावस्थेत मनाला नेले असता काय होते याचीपण अनुभूती ऋषीमुनींनी घेतली. त्या अवस्थेत मनाला अनेक दैवी शक्ती प्राप्त होतात. आपल्या पूर्वजन्माचे ज्ञान होते; भविष्यात डोकावून पाहता येते; दूरश्रवण, दूरसंभाषण, दूरदर्शन, अदृश्याचे आकलन इत्यादी. अज्ञात असे काही राहू शकत नाही. अर्थात ही शून्यावस्था किती काळ टिकू शकेल त्यावर वरील सिद्धीचे कालमान पण अवलंबून असते. शून्यावस्था पूर्ण नसून शून्याच्या जवळपास असेल त्याप्रमाणे सिद्धीपण मर्यादित असणार. भौतिक शास्त्राच्या नियमाप्रमाणे एखादा धातू (Metal) absolute zero (-273°C) पर्यंत थंड केला तर त्याचा electrical resistance शून्य होऊन तो सुपर कंडक्टर होतो. तद्वत् मनाच्या शून्यावस्थेत ज्ञान प्राप्त करून घेण्यामधील सर्व अडथळे दूर होतात. मनुष्य सर्वज्ञानी होऊ शकतो. भूत, भविष्य, कालस्थलादी पलीकडे जाऊन ज्ञान मिळवू शकतो. हा ऋषी-मुनींचा अनुभव आहे.

ऋषीमुनींच्या अनुभवाप्रमाणे मनुष्याला चार देह आहेत. स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण. सूक्ष्म देहाचा अनुभव बहुतेक योगी लोकांना आला असतो. कारण देहाचा अनुभव कमी असतो. कारण त्यात वरील दोन्ही देह नसतात. अस्तित्व भाव मात्र असतो. महाकारण देहाबद्दल कोणी बोलत नाहीत. कारण तो देह नसून विलय आहे. अस्तित्वभान देखील विरून जाते. या लेखाकरिता स्थूल व सूक्ष्म या दोन देहांचाच

विचार केला आहे. आदिशंकराचार्यप्रमाणे सूक्ष्म देहदेखील पंचमहाभूतांचा बनला असतो. पण त्यातील घटक सूक्ष्मावस्थेत असतात. स्थूल देहाच्या इच्छा, कामना, अहंभावादी कार्यप्रणालीतून मन जेव्हा मुक्त होते तेव्हा अस्तित्वभाव (Consiousness) सूक्ष्मदेहामध्ये जातो व सूक्ष्मदेहाच्या शक्ती प्राप्त होतात. सूक्ष्मदेहाला स्वप्रकाश असतो. कारण तो उर्जा तत्त्वातून (Charged particles) बनला असतो. कितीही स्थूल अडथळे असले तरी त्यातून पलीकडे जाऊ शकतो, पाहू शकतो, ऐकू शकतो. अस्तित्वभावना परत स्थूल देहाकडे जेव्हा खेचली जाते त्या वेळी सूक्ष्मदेहाच्या शक्ती लुप्त होतात. सूक्ष्म देहात असताना देवादिकांचे दर्शन होते, त्यांच्याशी संवाद साधू शकतो. त्याप्रमाणे जे संत, महात्मे आदी आपल्या मृत्यूनंतर केवळ सूक्ष्म देह धारण करून वावरत असतात त्यांची भेट होऊ शकते. त्यांच्याकडून ज्ञान मिळू शकते. आदिशंकराचार्य, संत ज्ञानेश्वर, गोंदवलेकर महाराज आदींनी व्यासादि ऋषींचे तसेच राम, हनुमान, शिव आदि देवांचे दर्शन घेतल्याचे नमूद आहे. आधुनिक उत्क्रान्तिवादाप्रमाणे (as per modem theory of evolution) मनुष्य हा सर्वात प्रगत व उच्चतम प्राणी आहे. परंतु ऋषीमुनींच्या अनुभूतीप्रमाणे मनुष्याच्या वरील उत्क्रांति स्थितीत केवळ सूक्ष्मावस्थेत वावरणारे आत्मे आहेत. त्याही वरच्या स्थितीत देवादिक व सर्वात वरच्या स्थितीत सर्व शक्तीमान विश्वात्मा शिव आहे. उत्क्रांतिचक्र निर्जीव तत्त्वापासून प्रगत होत होत मनुष्य प्राण्यापर्यंत येऊन थांबत नाही; तर त्याही पलीकडे सूक्ष्म स्थितीत उत्क्रान्ति होत असते व ती परब्रह्म शिवापर्यंत पोहोचते. ह्या सर्व स्थिती ऋषीमुनींनी प्रत्यक्ष अनुभूतीतून सांगितल्या आहेत. एवढेच नव्हे तर त्या अनुभवापर्यंत पोहोचण्याचे मार्गपण सांगितले आहेत.

मनाची शक्ती अमर्याद आहे. भारतीय तत्त्वज्ञानाप्रमाणे मनाला ठराविक अनुशासनातून प्रगत करीत नेले तर मनावर आपले नियंत्रण (Directional control) प्राप्त होते आणि योगिक साधनेतील प्रगतीपथावरील वाटचाल करीत विश्वात्म्याच्या स्थितीपर्यंत (Universal soul) पोहोचू शकतो. हे सर्व एकाच जन्मात साध्य होणार नाही. काही जन्म अथवा बरेच जन्म घ्यावे लागतील. आपण मध्येच दिशाहीन न होता योग्य प्रगतीपथावर राहिलो तर ध्येय निश्चित गाठता येते हे ऋषीमुनींनी दाखवून दिले आहे. मनुष्य ज्या वेळी आपला स्थूल देह सोडतो त्या वेळी त्याचे मन सूक्ष्म देहाने, त्या जन्मात मिळविलेले ज्ञान व अनुभव यांच्यासहीत बाहेर पडते व त्या मनावर आपले नियंत्रण असेल तर आपल्याला अभिप्रेत असलेली प्रगती जेथे साधता येईल अशा ठिकाणीच जन्म घेतला जातो व साधना पुढे चालू राहते.

हे सर्व लक्षात घेऊन पातंजली ऋषीने अष्टांग योगसूत्राची रचना केली. त्यातील पहिली पायरी म्हणजे 'यम' (moral discipline) नीतिमान्, अनुशासन यामध्ये अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह यांचा समावेश आहे. मनाने देखील अहिंसा पाळली पाहिजे. असत्य वचन वा असत्य वागणे आपल्या हातून घडू नये याची काळजी घेतली पाहिजे. जी वस्तू दुसऱ्याची आहे त्याविषयी मनात लोभसुद्धा उत्पन्न होऊ नये हा अस्तेय. ब्रह्मचर्य महत्त्वाचे आहे. कारण मनुष्य वीर्यवान असल्याशिवाय निश्चय अढळ राहू शकत नाही. मज्जासंस्था बलवान होत नाही, कुंडलिनी जागृत होत नाही व अध्यात्मिक दरवाजे उघडत नाहीत. आपल्या जीवनाला आवश्यक वस्तूंचा साठा गरजेपेक्षा जास्त न ठेवणे म्हणजे अपरिग्रह.

दुसरी पायरी म्हणजे नियम (Mental Discipline) यामध्ये शौच्य संतोष, तपस्, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान यांचा समावेश आहे. व्यावहारिक जगतात राहून आपल्या महत्त्वाकांक्षेपर्यंत पोचण्याचा प्रयत्न करीत असतो व काही अडचणी येतात अथवा प्रयत्नांना मर्यादा निर्माण होतात त्या वेळी निरुत्साह न होता नशिबाला दोष न देता समाधानी वृत्ती ठेवून शांत चित्ताने प्रयत्न करीत राहणे म्हणजे संतोष वृत्ती. तपस् म्हणजे आपले ध्येय गाठण्याकरिता शारीरिक, मानसिक व आत्मिक बल या सर्वांची केलेली पराकाष्ठा. मनाला चंचल अथवा विचलित होऊ न देता केलेले प्रयत्न. स्वाध्याय म्हणजे आत्मनिरीक्षण करून आपण योग्य मार्गावर आहोत का नाही याची खात्री करून घेणे. काही कमतरता असेल तर ती भरून काढणे, त्रुटी असल्यास दूर करणे, नकळत योग्य मार्गावरून ढळत असल्यास योग्य तो बदल करणे. ईश्वरप्रणिधान आपल्या मार्गाने जात असता यश अभिप्रेत काळात न मिळणे, प्रयत्नांत खीळ बसणे इत्यादीमुळे व्यक्ती खचून जाते अथवा निराश होऊन मार्ग सोडण्याचा विचार करते, त्या वेळी सर्व शक्तीमान परमेश्वरांवर श्रद्धा ठेवून पुढे जाणे म्हणजे ईश्वर प्रणिधान.

वरील दोन पायऱ्या म्हणजे यम व नियम अंगी बाणल्यानंतर व्यक्तीस प्रथम पात्रता प्राप्त होते. त्यानंतर ३) आसन, ४) प्राणायाम, ५) प्रत्याहार, ६) धारणा, ७) ध्यान, ८) समाधी या पायऱ्या आत्मसात कराव्या लागतात. आसनामुळे आपल्या शरीरातील ग्रंथी (Endocrine glands) योग्य तऱ्हेने काम करू लागतात. प्राणायामामुळे मनावर नियंत्रण प्राप्त होते हा अनुभव आहे. आपल्या मनाला बाह्य जगताकडे भटकण्यापासून व बाह्यसुखाकर्षणापासून परावृत्त करणे म्हणजे प्रत्याहार. मनाची चंचल वृत्ती काढून टाकून आपल्याला अभिप्रेत असलेल्या एकाच विषयावर ते केंद्रित करणे म्हणजे धारणा. एकाच विषयावर मन केंद्रित ठेवण्याचा काल वाढवीत जाणे म्हणजे ध्यान.

समाधी : या अवस्थेत मनातील सर्व विचार काढून टाकून त्याला धीरगंभीर शून्यावस्था प्राप्त करून देणे. अशी अवस्था प्राप्त झाल्यावर स्थूलदेहावरील आस्थेचे पूर्ण निर्मूलन होऊन अस्तित्वभावना (consciousness) सूक्ष्म देहात प्रवेश करते व सूक्ष्म देहाच्या सर्व शक्ती प्राप्त होतात. अथवा आपले मन वैश्विक मनाशी (Universal Mind) जोडले जाते व व्यक्ती omnipresent सर्वस्थ, Ommiscient सर्वज्ञ बनते. परमेश्वरी कृपा असल्यास काही प्रमाणात OmniPotent सर्वशक्तीमान पण बनते.

पातंजली अष्टांग योगाच्या सहाय्याने योगी जन जिवंतपणी स्थूल देहातून सूक्ष्म देहात प्रवेश करतात व दैवी शक्तींचा अनुभव मिळवतात. आपल्या पूर्वजन्मांचे ज्ञान त्यांना प्राप्त होते. तसेच देवादिकांचा व ऋषीमुनींचा संबंध प्राप्त होतो.

व्यक्ती ज्या वेळी यम-नियमांचे व्यवस्थित पालन करीत असते त्याच वेळी ती अध्यात्मप्रवण बनते व तिला तसे अनुभव येऊ लागतात. प्रत्याहार, धारणा, ध्यान तिला सहजगत्या साध्य होतात. म्हणून गुरुदेव रानडे म्हणत असत The Man gets morally liberated. मन हळूहळू उन्नत होत जाते. काही अनुभवस्येऊ लागतात व व्यक्तीला कळून चुकते की आपण योग्य मार्गावर आहोत. आकाशवाणी, दूर प्रदेशातील घटना दिसणे, घटनांची पूर्वसूचना मिळणे इत्यादी अनुभव येतात. पूर्वज्ञान होण्याची प्रक्रिया (Intuition) धारदार (Sharp) होते. अशा वेळी व्यवहारातील अडचणींवर उपाय, प्रश्नांची उत्तरे, शास्त्रज्ञांना त्यांच्या शोध प्रयत्नातील

प्रमेये झटकन सुटू लागतात. योग मार्गावर पुढे जाण्याकरिता सूक्ष्म शरीरात वावरणाऱ्या आत्म्यांकडून सूचना प्राप्त होतात.

ध्यानावस्थेत मनुष्य आपल्या ज्ञानेंद्रियांकडून बाह्यजगतातील सूचना मेंदूपर्यंत पोहोचू नयेत व ध्यानात बाधा येऊ नये म्हणून प्रयत्नशील असतो. ज्ञानेंद्रियांची अंतद्वारे बंद करण्याचा प्रयत्न असतो. ऋषीमुनींना समजले होते की अशी अवस्था निद्रेमध्ये नैसर्गिकरीत्या प्राप्त होत असते. झोपेमध्ये ज्या वेळी मनुष्य स्वप्नावस्थेत असतो त्या वेळी त्याचा देह झोपलेला असतो व मन जागृत असते. आधुनिक मानसशास्त्रात त्याला Paradoxical sleep असे म्हणतात. ज्याचे मन यमनियमादींच्या पालनामुळे शुद्ध झाले असते त्याला ही अवस्था ध्यानावस्थेप्रमाणेच असते. परंतु मन शुद्ध नसेल तर स्वप्नावस्थेत मन अंतर्मनात (Subconscious mind) मध्ये प्रवेश करते व आपल्या अतृप्त इच्छा, आकांक्षा, दुखावलेला अहंभाव इत्यादी संसारिक गोष्टीतच रममाण होते व तशी स्वप्ने आपण पाहतो. शुद्ध मन मात्र स्वप्नावस्थेत आपल्या प्रश्नांची उत्तरे शोधून काढते. देवदेवतांचे दर्शन प्राप्त करून घेते. घटनांची पूर्वसूचना मिळविते इत्यादी. गाढ झोपेत मात्र शरीर व मन दोन्ही निद्रिस्त असतात व आपण पूर्ण अज्ञानात असतो. Paradoxical sleep ला योगनिद्रा असेही म्हणतात कारण मन जागृत असते व देह निद्रिस्त असतो. मन एकाग्र व तत्पर असते. म्हणूनच म्हटले आहे, 'या निशा सर्वभूतांना तस्या जागर्ति संयमी'.

रसायन शास्त्रज्ञ केक्यूले (Kekule) बेन्झीन ($C_6H_6$) चा Structural formula शोधण्याच्या प्रयत्नात होता. परंतु काही सुचेना म्हणून तो विषय सोडून दिला व मध्ये काही दिवस गेल्यानंतर परत नव्याने प्रयत्न करावा म्हणून ठरविले. परंतु रात्री झोपी गेल्यानंतर त्याला स्वप्नामध्ये सहा माणसे हातात हात धरून एका अग्निकुंडाभोवती गोल फिरत आहेत असे दिसले. तो जागा झाला व ताबडतोब बेन्झीनचा Structural formula लिहून काढला व प्रयोगानंतर तो सिद्ध झाला. बाह्य जगतात रममाण न होणाऱ्या शास्त्रज्ञाच्या जागृत मनाने देह निद्रित असताना तो फॉर्म्युला शोधून काढला व चित्ररूपाने त्याच्या मेंदूला दाखविला.




स्वामी सत्यानंदांनी नोंद केल्याप्रमाणे ते त्यांच्या १०/१२ वर्षाच्या शिष्याला योगनिद्रेत काही श्लोक म्हणून दाखवित असत. अर्थात तो झोपलेला असे. ते श्लोक त्याच्या लक्षात रहात असत. जागृतावस्थेत सांगितलेले श्लोक त्याला पाठ करावे लागत असत.

आचार्य अत्रे मधून मधून राममारुती महाराजांना भेटण्यास जात असत. एकदा त्यांनी महाराजांना आपल्या घरी येण्याबद्दल विनंती केली व सांगितले की, 'आपण निरोप पाठवावा म्हणजे मी माझी कार पाठवून देईन.' महाराजांनी होकार दिला. नंतर बरेच दिवस गेले. महाराज काही आले नाहीत किंवा निरोप पाठविला नाही. एक दिवस आचार्य अत्रेंना सकाळी उठता उठता स्वप्न पडले व महाराज बंगल्याच्या गेटमध्ये उभे आहेत असे दिसले. अत्रे धावतच गॅलरीत गेले व पाहिले तर कोणी नव्हते. नंतर १०/११ वाजता महाराज आले. बोलणे झाले. नंतर अत्र्यांनी महाराजांना विचारले, 'आपण निरोप का पाठविला नाही? मी कार पाठविली असती.' महाराज म्हणाले, 'मी तू सकाळी उठता उठताच निरोप दिला होता.' अत्रेंच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला व त्यांनी महाराजांची क्षमा मागितली.

मनाच्या उन्नत अवस्थेची प्रत्यक्ष उदाहरणे आहेत. १९५० सालच्या आसपास एक जर्मन प्रोफेसर हिंदुस्थानात आले होते. त्यांना बौद्धिझमवर पीएच.डी करता प्रबंध लिहावयाचा होता. त्याकरिता ते श्रीलंका, तिबेट आदि देशांचा दौरा करणार होते. मुंबईला त्यांनी हेड क्वार्टर केले होते व प्रत्येक दौऱ्यानंतर मुंबईला येऊन दौऱ्याचा वृत्तान्त Illustrated weeky ला देत असत व तो छापून येत असे. अशाच एका वृत्तांतात त्यांनी लिहिले आहे की ते तिबेटला गेले असताना त्यांना सांगण्यात आले की तेथील गुहेमध्ये लामा ध्यानस्थ वा समाधिस्थ बसलेले असतात. त्यांनी एक गुहा बघितली व आत जाऊ लागले. परंतु कुबट दुर्गंध, कोळीष्टके इत्यादीमुळे त्यांच्या मनात परतावयाचा विचार येत असे. परंतु कोणीतरी पुढे जावयास सांगत आहे असा भास होई. बरेच अंतर पुढे गेल्यानंतर त्यांना एका उंच शिळेवर एक लामा ध्यानावस्थेत दिसला. डोंगरकपारीतून तेथे काही सूर्यप्रकाश आला होता. प्रोफेसर पाहात उभे राहिले. लामाने डोळे उघडले. प्रोफेसरांना तिबेटन भाषा येत नव्हती व लामाला जर्मन भाषा येण्याची शक्यता नव्हती. तसा पाऊण-एक तास गेला असावा. नंतर लामाने परत डोळे मिटले व प्रोफेसरांनी त्याला साष्टांग नमस्कार घातला व परत निघाले. त्यांनी लिहिले आहे की, त्या पाऊण-एक तासात त्यांच्या मनात असलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळाली व प्रबंध गतिमान झाला. लामाने त्यांच्या मनातील सर्व प्रश्न जाणून घेऊन मनाच्या भाषेत (Telepathy) त्यांना म्हणजे त्यांच्या मनाला सर्व उत्तरे दिली. पुढे काही काळानंतर प्रोफेसरांनी बौद्ध धर्म स्वीकारला व आपले जर्मन नाव बदलून 'लामा अंगारिक गोविंद' असे नाव धारण केले.

फ्रेंच भविष्यद्रष्टा 'नॉस्ट्रेडॅमस्' याने पंधराव्या शतकात लिहिलेली जगातील निरनिराळ्या देशाविषयींची भविष्यवाणी म्हणजे त्याच्या सूक्ष्मावस्थेत त्याला दिसलेली दृश्येच होत. कारण त्याने लिहिले आहे की, त्याला दिसलेली युद्धाची व विनाशाची दृश्ये एवढी भयानक होती की, त्याचा त्यावर विश्वासच बसेना. नंतर त्याने ज्योतिषशास्त्राप्रमाणे मेदिनीय कुंडल्या मांडून स्वतःची खात्री करून घेतली व मगच आपली किंचित गूढ भाषेतील किंचित काव्यात्मक अशी दृश्यांची वर्णने लिहिली.

गुरुदेव डॉ. रानडे हे ध्यानयोगीच होते. ते सहज समाधीत जात असत. अलाहाबादला असताना रोज संध्याकाळी संगमावर कारने फिरावयास जात असत. समाधी लागणार असे वाटले म्हणजे ते ड्रायव्हरला खूण करून गाडी बाजूला घेण्यास सांगत असत. समाधी अवस्था संपल्यानंतर परत ड्रायव्हरला पुढे जाण्याचा इशारा करीत असत. गुरुदेव रानडे रोज ११ तास - १३ तास ध्यानावस्थेत (Meditation) घालवीत असत.

भारतीय ऋषीमुनींनी अति प्राचीन कालापासून एखाद्या संशोधन शास्त्रज्ञांप्रमाणे मानवी मनाचा सखोल अभ्यास केला होता. मनाच्या निरनिराळ्या पैलूंचे ज्ञान करून घेतले होते. तदनुसार मानवी जीवनाला योग्य दिशादर्शन केले. जगातील संसारादिक व्यवहार करीत असतानादेखील अध्यात्मिक प्रगती करीत राहण्याची व परमेश्वरापर्यंत पोहोचण्याची जीवनपद्धती दाखवून दिली.

आपल्या शालेय व महाविद्यालयीन शिक्षणक्रमामध्ये इतर ॲकॅडेमिक विषयाबरोबर अध्यात्मिक प्रगतीच्या जीवनपद्धतीचे शिक्षण दिले तर समाजाची प्रचलित कालातील सामाजिक मूल्यांची अवनती कमी होत जाईल व मानव समाज नीती मूल्यावर आधारीत प्रगतीपथावर आरूढ होईल यात शंका वाटत नाही.

**प्रा. प्रभाकर धो. घारवाडकर**
१८८, गुरुवार पेठ, टिळकवाडी, बेळगांव ५८०००६.

# परमपूज्य गुरुदेव ह्यांच्या काही भावपूर्ण आठवणी

**प. पू. गुरुदेवानुदास प्र. म. उपाध्ये**

*बी.ए. प्रथम वर्ग प्रथम, भाऊदाजी व आचार्य पारितोषिक विजेते. एम.ए. (संस्कृत) झाला वेदान्त पारितोषिक, जैन रामायणावर पीएच.डी. प.पू. प्रा. गुरुदेव रानडे यांचा साक्षात संबंध. निंबाळ गुरुदेव रानडे आश्रमाचे अध्यक्ष. संस्कृत, प्राकृत व संत साहित्यावर लेखन. ४२ वर्षे संस्कृत, पाली, प्राकृत भारतीय संस्कृतीचे प्राध्यापक. ५-७ विद्यार्थी पी.एचडी झाले.*

मी बी.ए.च्या वर्गात असताना मला काही भारतीय तत्त्वज्ञानासंबंधी प्रश्नांची उत्तरे हवी होती. माझे त्यावेळचे आयुष्यपण काळोखी रात्र होती. म्हणून मी माझे प्रा. पू. गुरुवर्य बेलसरे यांना त्याप्रमाणे सांगितले. त्यांनी मला एका क्षणात प. पू. गुरुदेव रानडे यांचे नाव घेऊन, पत्ता देऊन माझी माहिती कळविण्यास सांगितले. ते साल १९५२ चे होते. मी पू. श्रींना पत्र लिहिले. त्या वेळी पू. श्रींचा मुक्काम अलाहाबादला होता. मला पत्राचे उत्तर येईल असे वाटले नव्हते. पण काय आश्चर्य? श्रींचे उत्तर आले की, घाबरू नये व अभ्यास करावा. ते ज्या वेळी मुंबईत येतील त्या वेळी प्रत्यक्ष भेटावे. पत्र आल्यावर मला आनंद झाला. ही पत्ररूपाने त्यांची प्रत्यक्ष भेट. ५ जानेवारी १९५३ साली ते मुंबईला आले. मला अडचणी येऊन पण श्रींचे दर्शन घडले. त्याची आता आठवण झाली तरी अंगावर सात्त्विक भाव उमटतात. पू. काकासाहेब तुळपुळे यांनी मला सांगितले की, 'बाळ, तुला पू. श्रींनी नाम देण्यास सांगितले आहे.' मला सर्वच नवीन होते. नकळत मला नामामृताचा स्पर्श झाला. आनंद वाटून प्रत्यक्ष परमात्मा भेटल्याचा आनंद झाला. मला दारिद्र्याशी झगडावे लागत होते. घरगुती अनेक अडचणी होत्या. प्रकृतीपण बरी नव्हती. पण श्रींनी नामामृत दिल्यामुळे माझी त्यांच्यावर भक्ती जडली. अभ्यास करताना नामस्मरण होऊ लागले व मला बी.ए.च्या परीक्षेत संस्कृत विषयात प्रथम वर्ग, प्रथम क्रमांक मिळून भाऊदाजी आचार्य शिष्यवृत्ती मिळाली. लौकीकाचा आधार मिळून प्रसिद्धीपण मिळाली. वर्तमानपत्रांतील बातमी ऐकून पू. गुरुदेवांना आनंद झाला व मला पत्र पाठवून अभिनंदन करून त्यांनी मला निंबाळला येण्यास सांगितले. माझा आनंद गगनात मावेनासा झाला. त्यांच्या बुद्धिमत्तेची उंची हिमालयापेक्षा मोठी, आकाशाहून विशाल व सागरापेक्षाही खोल असूनसुद्धा वाळूच्याकणा इतकी बुद्धी असूनपण त्यांनी मला शाबासकी दिली. हा संत स्वभावच असतो. दुसऱ्याचे अणुगुण पण पर्वत संतप्राय करून टाकतात. प. पू. श्रींनी हेच केले. या कलियुगात पण असा महापुरुष अवतारी महात्मा पुरुष असतो याची प्रचीती सर्वांना येईल.

पू. श्रींचे पत्र म्हणजे मला केलेला अमृतानुभव होय असे आता खात्रीने वाटू लागले आहे. त्या पत्रात 'नेम करण्यावर भर द्यावा, सत्संगती करावी, व अभ्यासपण तितक्याच तीव्रतेने करावा', असा साधा पण करण्यास कठीण असा उपदेश त्यांनी दिला व माझ्या सत्तराव्या वर्षीपण तोच अमर उपदेश पाठीराखा आहे याची मला जाणीव आहे.

त्यांच्या (श्रींच्या) उपदेशाप्रमाणे मी निंबाळला गेलो. तेथे अनेक पाश्चिमात्य विद्वान, भारतीय तत्त्वज्ञानाचे अधिकारी, राजकारणी, विद्याव्यासंगी, मोठमोठ्या हुद्द्यावर असणारे अधिकारी आलेले होते. मला वाटते या मध्ये मी कुठेच बसत नसल्याने माझी विचारपूस तरी कोण करणार? अशी शंका येताच मलाच पू. श्रींनी खुणेने बोलावून 'मला नामामृत कसे देण्यात आले हे सांगा' म्हणून आज्ञा केली. आपोआप माझी अप्रत्यक्षरीत्या सर्वांची ओळख झाली. पू. श्रींचा साधक म्हणून माझी पुढच्या काळात ओळख झाली यात नवल नाही. कारण 'समर्था घरीचे श्वान। त्यास मान देती सर्वजण' या न्यायाने केवळ पू. श्रींच्या कृपाप्रसादाने या मनुष्यरूपी श्वानाला साधकत्व असणारा ही संज्ञा प्राप्त झाली.

यानंतर म्हणजे निंबाळ क्षेत्री दर्शन झाल्यावर माझी वारंवार भेट होऊ लागली. तीसुद्धा माझ्या बौद्धिक अडचणी, शांकर भाष्यांतील शंका, उपनिषदांतील तत्त्वज्ञान यासंबंधी मी पू. श्रींना पत्राने विचारीत असे व निंबाळ क्षेत्री जाऊन त्यांच्याकडून शिकून येई. प्रत्यक्ष बुद्धिसागरच आपल्याशी म्हणजे अज्ञ माणसाशी बोलतो आहे हे समजलेच नाही. आता त्याची खंत वाटते. माझे गुरुबंधु म्हणत असत की, तुम्ही प्रत्यक्षच परमेश्वराशी बोलत आहात पण मला मात्र त्या वेळी, माझ्या दुर्दैवाने तसे भावले नाही हे मला प्रामाणिकपणे कबूल करावे लागेल यात शंका नाही.

मी निंबाळ क्षेत्री असताना पू. श्री. माझ्याकडून ऋग्वेदातील पूषन् सूक्त वाचून घेत. तसे ईशोपनिषदांतील काही मंत्र म्हणवून घेत. त्या वेळी त्यांची 'भावसमाधी' लागलेली असे. मी मात्र आश्चर्यवत पहात बसे. असे दर्शन घडणे हे पण भाग्याचे असते असे मला पू. बेलसरे यांनी वारंवार सांगितले.

मला एम.ए.च्या परीक्षेत आता वेदान्त पेपरला बसण्याची तीव्र इच्छा नव्हती. मला वाटे की, मी त्यासाठी सर्वस्वी अपात्र आहे. परंतु अंतर्ज्ञानी पू. श्रींनी मला बोलावून त्या पेपरला बसण्यासाठी उत्तेजित केले. शांकरभाष्य, मधुसूदन सरस्वतीचे दशश्लोकी वगैरे स्वतः माझ्याकडून वाचून घेतले व जवळ जवळ पूर्ण तयारी करवून घेतली. माझी प्रकृती बरी नसताना, वैद्यकीय सल्ला न जुमानता मी त्या परीक्षेसाठी बसलो व त्यांच्याच कृपाप्रसादाने झाला वेदान्त बक्षीसाचा मानकरी झालो. त्याबद्दल माझे पुनः एकदा त्यांनी अभिनंदन केले. या सर्वांचे श्रेय पू. श्रींनी स्वतः न घेता त्यांचे गुरु. प. पू. भाऊसाहेब महाराजांना दिले हे वैशिष्ट्य होय. माझ्या भावनेने मला तर पू. श्री महाराजच वाटत.

मला नोकरीसाठी एक प्रशस्तिपत्र पाहिजे होते. तेपण त्यांनी आपल्या 'लेटर हेडवर' टंकित करून पाठविले. मला पीएच.डीच्या अभ्यासासाठी उत्तेजित केले. मला प्राध्यापक व्हावयाचे होते म्हणून त्यांनी माझ्याकडून एक व्याख्यान करवून घेतले. स्वतः हजर राहिले व पाठीवर थाप मारून आशीर्वाद मुद्रांकित केला. त्यांनी मला एका पत्रात असे लिहून पाठविले की, You should enter into academic life which is in your interest and welfare.' हे श्रींच्या मुखातील आलेले श्रुतीप्रमाण शब्द आज खरे ठरले आहेत. मला I.A.S. व्हावयाचे होते. मी प्रयत्न पण केला पण त्यात नापास झालो. हे एकार्थी बरे झाले व पू. श्रींची वाणी सत्य झाली व मला सुखी केले यात शंका नाही.

माझ्या विवाहाबाबतीत पण मी पू. श्रींना कळविले. त्यांनी पण आनंदाने होकार दिला व संसार चक्र नीट करवून घेतले. मला पीएच.डी. साठी एक शिष्यवृत्ती देण्यात आली होती पण काही तांत्रिक कारणामुळे ती नाकारण्यात आली. मला पू. श्रींनी विचारल्यावर मी तसे सांगितले. त्यावर ते म्हणाले की, असे होणार नाही. त्यांच्या देवशब्दामुळे मला ती शिष्यवृत्ती मिळाली व मला पीएच.डी. पदवीपण प्राप्त झाली. महाविद्यालयांत संस्कृत-प्राकृत प्रमुख म्हणून माझी नेमणूक झाली व त्या जागेवर मी निवृत्त होईपर्यंत म्हणजे जवळ जवळ ३० वर्षे काम केले. ही सद्गुरु कृपाच होय असे मी मानतो. शैक्षणिक क्षेत्रांत अमाप यश मिळविले. हजारो विद्यार्थी एम.ए. झाले. ५-१० विद्यार्थ्यांना पीएच.डी. पदवी मिळाली. यापेक्षा या देवाजवळ काय मागावे ? शांत राहून ईशसेवा करावी हाच त्यांचा संदेश मी पाठ करणे सार्थ ठरणारे आहे. त्याप्रमाणे मी यथाशक्ती प्रयत्नपण करीत आहे.

ह्या सर्व घटना ऐहिक स्वरूपाच्या आहेत यात शंका नाही. पण पू. श्रींच्या कृपाप्रसादाने काही आध्यात्मिक अनुभवपण येऊ लागले. प. पू. श्री देहात असताना या संबंधी मला थोडाफार स्पर्श झाला होताच पण ते ब्रह्मीभूत झाल्यावर या अनुभवांची कक्षा रुंदावत गेली. काही वेळा मला अशरीरी वाणीने मार्गदर्शन होई तर काही वेळा अनाहत नाद ऐकू येई. अनेक रंग, प्रकाश दिसत. हे सर्व त्यांच्या कृपाप्रसादाचेच फळ आहे असे मानणे श्रद्धावान माणसाला वाटणे स्वाभाविक आहे. माझी इच्छा होती की त्यांच्यासंबंधी मला अंतर्राष्ट्रीय संमेलनांत बोलण्याची संधी मिळावी. ती पण संधी सोमय्या कॉलेजातील अशा संमेलनात मिळाली. मी तृप्त झालो. आपल्या सद्गुरुंची थोरवी पाश्चात्य पंडितांनी ऐकावी तीपण माझ्यासारख्या अज्ञ साधकाकडून ही इच्छा बोलविता धनी वेगळा या न्यायाने पूर्ण केली. संत वाङ्मयाचा अभ्यास करताना पू. श्रींनी दिलेली पूर्णदृष्टी अजूनही विकसित होत आहे. सर्व धर्मांचा अभ्यास करताना एक देव, एक धर्म, एक मानवता हा त्यांचा संदेश पटू लागला. माझ्या हातून तसे लिखाण पण होऊ लागले.

अशा अनेक पू. श्रींच्या आठवणी सांगणे किती अवघड आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. मी अपूर्ण जीव आहे. पू. श्री पूर्ण आहेत. ते मला त्यांच्याकडे नेण्यासाठी मार्ग दाखवीत आहेत. त्या प्रयत्नांत यश देणे सर्वस्वी त्यांच्याच हाती आहे यात शंका नाही.

या आठवणी सांगण्याचे प्रयोजन असे आहे की त्यांच्या या आठवणींतून पू. श्रींचे जीवन साकार होऊन साधकाला अध्यात्माचा जिवंत झराच दिसावा. सत्पुरुषांच्या आठवणी म्हणजे त्यांचे चालते-बोलते चरित्रच होय. प. पू. गुरुदेवांच्या आठवणी म्हणजे त्यांचेच ईश्वररूप असणारे चरित्रच होय. भारताचे भाग्य असे की या विसाव्या शतकांत-विज्ञान युगात असा एक देहधारी नारायण अवतार घेतो व लोकांना ईश्वराकडे जाण्यासाठी उन्मुख करतो. असा हा पू. श्रींचा गुरुदेव रूपाने आलेला अवतार सर्वांना सुखी करो व ज्ञानरूपी ईश्वर असणाऱ्या ज्ञानदेवांनी जे पसायदान मागितले तेच आपण त्यांच्याकडे मागू या ! यातच विश्वाचे कल्याण आहे.

प्रा. डॉ. प्र. म. उपाध्ये
१०, स्नेहवर्धिनी, गोरेगांव (पूर्व), मुंबई ४०००६३.

# आठवणी

**श्रीमती लीलाबाई शिरवळकर**

*गृहिणी, परमार्थाची आवड.*

मला लहानपणापासून धार्मिक गोष्टींची आवड होती. विठ्ठलावर भक्ती होती. त्यानुसार पूजा-अर्चा, पोथ्या-पुराणे, भक्तिविजयातील कथा, संतांच्या गोष्टी इत्यादी वाचन चालू होते.

१९२४ ते २६ सालात देशभक्तीचे वातावरण होते. त्यामुळे बुवाबाजी, अंधश्रद्धा या गोष्टींचा मला तिरस्कार वाटत असे. जसजसे वय वाढत होते तसतसा प्रत्येक गोष्टीचा विचार करायची सवय लागत होती व त्याच वेळेस श्रीरामकृष्ण परमहंस, श्री विवेकानंद ह्यांचे वाङ्मय वाचनात आले व परमार्थाची ओढ वाटू लागली. त्यात सासरचे वातावरण पण ह्या गोष्टीला पोषक होते. पंढरपूरच्या वारकरी घराण्यातलेच आम्ही ! परमार्थाची वाटचाल करण्यासाठी सद्गुरुंची नितांत आवश्यकता आहे. त्याशिवाय तरणोपाय नाही याची खात्री पटू लागली व त्यामुळे सद्गुरुंच्या भेटीची मला तळमळ व ओढ वाटू लागली. माझे यजमान पण परमार्थी श्रीगोंदवलेकर महाराजांचे उपासक व साधक होते.

आणि मग योग घडून आला. १९४७ साली कौशिक व्याख्यानमालेत श्री. रामभाऊ रानडे (त्यावेळेस त्यांना श्री. रामभाऊ म्हणत असत) त्यांचे व्याख्यान एस.पी. कॉलेजमध्ये होते. मोठमोठे विद्वान लोक त्याला हजर होते. श्री. न. चिं. केळकर, श्री. बाळासाहेब खेर, वगैरे. मी त्या लेक्चरला गेले. श्री. रामभाऊ व्यासपीठावर उभे राहिले व त्यांनी भाषण सुरू केले. त्यांचे इंग्रजी भाषण मला काहीच कळत नव्हते. त्यांची भरभर बोलण्याची सवय! पण माझे तिकडे कुठे लक्ष होते? त्यांच्या दृष्टीतले तेज व आवेश ह्यांनी मी खिळून गेल्यासारखी झाले होते. माझे मला भानच राहिले नाही. व मी जणूकाही रामकृष्ण परमहंसानाच बघत आहे असे वाटले ! आणि मी त्या भारलेल्या अवस्थेतच घरी आले. स्वयंपाकात , कामात कशातच लक्ष लागेना व कधी श्रीगुरुदेवांची भेट होते असे मला झाले व ज्यांनी मला त्या व्याख्यानाला नेले त्या श्री. रा. ब. आठवले (श्री. शिरवळकरांचे परमस्नेही) ह्यांना मी भेट घडवून आणण्याची विनंती केली. त्यांनी श्रीगुरुदेवांचे पुण्यातले भाचे प्रो. न. ग. दामले यांच्याकडे जा म्हणून सांगितले. तेव्हा मी व माझे पती आम्ही दोघे त्यांच्याकडे गेलो. प्रो. दामले यांनी सांगितल्याप्रमाणे संप्रदायाचे भजन व नेम इत्यादी गोष्टी मी करीत असे व मग मला १६ ऑगस्ट १९४८ रोजी निंबाळला अनुग्रह मिळाला.

## १९४८ ते १९५७ मधील माझ्या पहाण्यात आलेले निंबाळ

सोलापूर-विजापूरच्या दरम्यान निंबाळ हे एक छोटेसे रेल्वेस्टेशन आहे. स्टेशनपासून अगदी जवळच श्रीगुरुदेवांचा आश्रम आहे. ज्या ठिकाणी आता श्रीगुरुदेवांचे समाधी मंदिर आहे तेथे पूर्वी जुने घर, पलीकडे नवे घर, ध्यानमंदिर अशा छोट्या छोट्या वास्तू होत्या. आजूबाजूला लमाण्यांची वस्ती. बाकीचा परिसर अगदी निर्मनुष्य होता.

त्या वेळेस अगदी मोजकीच माणसे निंबाळला येत असत. तेथील रोजचा दिनक्रम म्हणजे पहाटे ३ ते ६ नेम, मग काकडआरती. भजन, चहा नंतर ८ ते १२ पुन्हा नेम, त्यानंतर फक्त उसळ व ताक मिळत असे. दुपारी २ ते ४ नेम, मग चहा, सायं. ७ वा. भाकरी आमटी. मग रात्री भजन. बाकी काही सोयी नव्हत्या. परंतु श्रीगुरुदेवांचे अस्तित्व व त्यांचे आकर्षण एवढे जबरदस्त होते की, तहान-भूक हरपत असे.

त्यांची सिटींगची घंटा झाली की, ध्यान मंदिरात सर्वजण जमत असत. त्या वेळेस त्यांचे ग्रंथाचे लिखाण, त्यावर विवेचन, श्रीमहाराजांच्या पत्राचे वाचन, आठवणी इत्यादी गोष्टी कितीही वेळ चालत असत. त्या वेळेस आपल्या मनातल्या शंका असल्या तर त्यावर आपोआप उत्तर मिळत असे. कधी कुठल्या बोलण्यातून, कधी वाचनातून, प्रवचन किंवा कुठलाही उपदेश ते कधीही करत नसत. कोणी त्यांना नमस्कार केलेला आवडत नसे. आश्रमात साधकांसाठी ज्या ज्या गोष्टी चालत - जेवणखाण - इतर व्यवस्था सर्व त्यांच्याच खर्चाने होत असत. आम्हा स्त्रियांना त्यांच्यासमोर जाण्याची बिलकूल छातीच नसे. परंतु तुमचे भाव-तुमची भक्ती त्यांना बरोबर समजत असे. इतक्या अडचणी व गैरसोयी होत्या तरी आम्हा शहरवासियांना त्या भासतच नसत. कारण त्यांच्या दृष्टीतच जणू ते आमच्याशी संभाषण करत आहेत असे वाटे. त्या वेळेचा आनंद कसा होता हे सांगूच शकत नाही.

## जोड्याची हकीगत

नाम मिळाल्यानंतर जरी श्री. काकासाहेब तुळपुळे यांनी मला सांगितले होते की, श्रीगुरुदेवांना नमस्कार करून घेणे वा यांच्या जोड्यांना स्पर्श करणे आवडत नाही, तरी मी नेमाला बसण्यापूर्वी मनोमन जोड्यांची पूजा करीत असे.

पुढे १९४९ साली आम्ही घरची मंडळी काशी यात्रेला गेलो होतो - एक रात्र अलाहाबादला श्रीगुरुदेवांच्या घरी मुक्काम केला. दुसऱ्या दिवशी सकाळी निरोप घेताना मी श्रीगुरुदेवांच्या पायातल्या जोड्यांना स्पर्श करून नमस्कार केला. जवळच माझे पती श्री. शिरवळकर होते. श्रीगुरुदेवांना ते आवडले नाही. ह्यांना म्हणाले, 'अहो, त्यांना सांगा' एवढेच म्हणाले. म्हणजे त्याचा अर्थ असे करू नका.

या घटनेनंतर सुद्धा नेमाला बसण्यापूर्वी मनोमनी जोड्यांना स्पर्श करून नमस्कार करण्याचा माझा नाद गेला नव्हता.

पुढे १९५२ साली निंबाळला श्रावण-सप्ताह होता. बरीच पुरुष साधक मंडळी जमली होती. स्त्रीवर्ग फार कमी होता. ध्यानमंदिरात दुपारी सीटींगची घंटा वाजली. आम्ही बायका जुन्या घरांतून ध्यानमंदिरात निघालो. पायऱ्या चढून जाणार तोच पायरीवर श्रीगुरुदेवांचे जोडे दिसले. मी व विद्याबाई कानिटकर दोघींनी हात लावून नमस्कार केला व आत गेलो. मला फार समाधान वाटले. आपणास आज प्रत्यक्ष स्पर्श करता आला म्हणून – पण न जाणो श्रीगुरुदेवांनी दाराच्या फटीतून पाहिले की काय?

दुसरे दिवशी अशीच दुपारी ४ वा. सीटींगची घंटा झाली. आम्ही आत गेलो. पण अजून श्रीगुरुदेव आले नव्हते. आम्ही दोघी दाराजवळच

उजव्या बाजूस बसलो होतो. श्रीगुरुदेव आले व त्यांनी जोडे दाराशीच ठेवले. माझे लक्ष जोड्यांकडे – आज आपणास त्यांच्या पादुकांचा स्पर्श घडला नाही म्हणून रुखरुख वाटत होती. श्रीगुरुदेवांबरोबर श्री. जगन्नाथ लेले होते.

बाहेर झिमझिम पाऊस पडत होता. श्री. नारायण मसलेकर यांचे वाचन चालू होते. श्रीभाऊसाहेब महाराज यांच्या पत्राचे वाचन चालू होते. इतक्यात श्रीगुरुदेवांचे पावसाकडे लक्ष गेले आणि ते म्हणाले, 'जगू, माझे जोडे पावसात भिजत आहेत ते आत आण.' मी दाराजवळच असल्यामुळे चटकन् उठले आणि जोडे आत आणून बाजूला ठेवले. मनोमनी माझे समाधान झाले.

तिसरे दिवशीही दुपारी सीटींगची घंटा झाली. सर्व मंडळी ध्यानमंदिरात जमली. श्रीगुरुदेव आलेले होते पण मला आज त्यांचे जोडे पायरीवर अगर कोठेच दिसले नाहीत. मी मनोमन खट्टू झाले. माझे वाचनाकडे लक्ष लागेना. आज आपणास गुरुंच्या पादुकांची सेवा घडणार नाही.

तेवढ्यात श्रीगुरुदेव कपडे बदलण्यास श्री.करमरकरांच्या खोलीत निघाले व म्हणाले, 'जगन्नाथ, मला ते खिडकीतले जोडे दे बरं !' माझ्या डोक्यावरच खिडकी होती. मी चटकन् उठून जोडे त्यांच्या पुढे ठेवले. माझी इच्छापूर्ती झाली.

जरा वेळाने श्रीगुरुदेव श्री. मसलेकरांना म्हणाले, 'नारायणराव, इचलकरंजीकरांचे ते पत्र वाचा बरं !' आणि त्या पत्रांत पूर्वी एकदा इचलकरंजीकरांनी श्रीगुरुदेवांचे जोडे उचलण्याची सेवा केली होती व त्याचे त्यांना कोणते फळ मिळाले त्याचा उल्लेख होता.

सदर पत्र वाचताच मला मनोमन खात्री पटली की, आपलीही सेवा त्यांचे चरणी रुजू झाली. पुढे हळूहळू माझी नेमाच्या वेळी मनोमनी जोड्यांना स्पर्श वंदन करण्याची क्रिया कमी झाली.

### १९५६ मधील अमृतमहोत्सव

३ जुलै १९५६ रोजी श्रीगुरुदेवांचा अमृतमहोत्सव करण्याचा जमखिंडीच्या राणीसाहेब व तेथील सत्कार समितीने ठरवला. श्रीगुरुदेव सत्कार, सन्मान, समारंभ कुठल्याच गोष्टी करायला तयार नसत. त्यांना ६० वर्षे पूर्ण झाली तेव्हासुद्धा समारंभ करण्यास त्यांनी नकार दिला होता.

परंतु या वेळेस जमखिंडीला त्यांच्या जन्मगांवी हा समारंभ करण्यास ते तयार झाले त्याबद्दल सर्वांना आनंद वाटला. ते करण्यास का तयार झाले हे मागाहून लक्षात आले. कारण हा त्यांचा शेवटचाच वाढदिवस ठरला. (निर्याण ६ जून १९५७). राणीसाहेब व समितीतर्फे सर्व ठिकाणी भारतभर निमंत्रणे गेली. त्यात स्त्रियांना निमंत्रणे नव्हती. निमंत्रण पत्रिकेत फक्त श्री... अमुकतमुक असे होते.

श्रीगुरुदेवांच्या वाढदिवसानिमित्त आम्ही पुण्यातील ४-५ साधकभगिनींनी निंबाळला जाऊन नामस्मरण करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे आम्ही निंबाळला गेलो. निंबाळला त्या वेळेस फारशी मंडळी नव्हती. कारण सर्वजण जमखिंडीला जाणार होती. आम्हाला पाहून सर्वांना आश्चर्य वाटले. आम्ही त्यांना सांगितले की, आम्ही जमखिंडीस येणार नाही. आम्ही येथेच राहून नामस्मरण करणार आहोत. तेव्हा श्रीगुरुदेव म्हणाले, 'वा ! असे कसे? ह्या बायकांना पण तिकडे येऊ द्यात.' तेव्हा आम्हाला खूपच आनंद वाटला. समारंभापूर्वीच २-३ दिवस आम्ही विजापूरमार्गे जमखिंडीस पोहोचलो.

जमखिंडीला गेल्यावर तेथील वर्णन कसे करावे? ज्ञानेश्वरमहाराजांची पालखी गावात आल्यावर जसे गाव आनंदाने ओसंडून वहाते तसेच पताका, तोरणे-फुलांच्या माळा, रांगोळ्या यांनी जमखिंडी शहर शृंगारलेले होते. गावातला प्रत्येक माणूस आमच्या गावचे गुरुदेव म्हणून आनंदित झाला होता.आमच्या गुरुदेवांचे कौतुक आणि मानसन्मान पाहून आम्हाला धन्य वाटत होते.

त्यानंतर तेथील हायस्कूलमध्ये आमची अगदी शाही व्यवस्था झाली. किती सामान्य व यःकश्चित् आम्ही ! परंतु श्रीगुरुदेवांमुळे आमची सर्व व्यवस्था उत्तम झाली.

श्रीगुरुदेवांबरोबर जे अधिकारी-मंत्री मोठाली मंडळी आलेली होती त्यांची व्यवस्था राणीसाहेबांनी रामतीर्थावर व राजवाड्यावर केलेली होती. इतरांची व्यवस्था शाळेत केलेली होती. जो समारंभ होता तो खाली २-३ दिवस थिएटरमध्ये होत होता. भाषणे-प्रवचने-श्रीगुरुदेवांच्या तैलचित्रांचे अनावरण-इत्या. कार्यक्रम होते.

श्रीगुरुदेव समारंभाच्या आदल्या दिवशी आले तेव्हा त्यांचे अत्यंत उत्साहपूर्ण वातावरणात बँण्ड, लेझीम पथकाने स्वागत केले. ते आल्याबरोबर प्रथम गावातील महादेवाच्या देवळात गेले. तेव्हा तेथे खूप समाज जमला होता. देवळातून श्रीगुरुदेव बाहेर आले तेव्हा ते अगदी निराळ्या अवस्थेतच होते. त्यांची ती तेजःपुंज मूर्ती व त्यांची भावावस्था बघून आमचे अष्टसात्विकभाव जागृत झाले.

त्यांच्या प्रमुख समारंभाचे वर्णन मी पामर काय करणार? मोठ मोठी बडी माणसे, तत्त्वज्ञानी, प्रोफेसर ह्यांनी हॉल भरून गेला होता. श्रीगुरुदेवांनी त्यांचे त्या वेळचे शाळेतले संस्कृतचे मास्तर – अगदी वयोवृद्ध झालेले होते त्यांना नमस्कार करून मुद्दाम जवळ बोलावून घेतले होते. त्यांची गुरुजनांवरील निष्ठा, आदर, प्रेम किती? नंतर त्यांनी त्यांच्या भाषणाला सुरुवात केली. त्यांनी एकच वाक्य उच्चारले, 'जो देवाचे गुप्त रूप दाखवतो तो सद्गुरु' आणि मग माईकच बंद पडला. बाकीचे भाषण झाले पण ऐकूच आले नाही. मानवी जीवनाच्या साफल्याची मूळ गुरुकिल्लीच त्यांनी सांगितली. मग बाकीचे भाषण कशाला? मला तर स्वामी विवेकानंदांनी 'शिकागो' ला भाषण करताना 'माझ्या बंधू-भगिनींनो', हे वाक्य उच्चारताच सर्व श्रोत्यांनी टाळ्यांचा कडकडाट केला व त्यांनी ती सभा जिंकली तसेच श्रीगुरुदेवांनी एका वाक्यात सर्व सार सांगितले असे वाटले. त्या कार्यक्रमाला श्री.राधाकृष्णन्, मोठमोठाले संस्थानिक, तत्त्वज्ञानी इ. चे संदेश आले होते. आणि न भूतो न भविष्यती असा सुंदर कार्यक्रम झाला. ३ दिवसांचा अगदी भरगच्च कार्यक्रम संपल्यावर भारावलेल्या अंतःकरणाने हजारो लोक आलेले परतले.

त्यानंतर रामतीर्थावर श्रीगुरुदेवांबरोबर असलेल्या अगदी मोजक्याच माणसांची व्यवस्था होती. श्रीगुरुदेव अजून महिनाभर जमखिंडीस राहणार होते. श्रीभाऊसाहेब महाराजांनी ज्या ज्या ठिकाणी भेट दिली होती त्या त्या ठिकाणी ते जाणार होते. त्यांनी ज्या ठिकाणी अनुग्रह घेतला होता तेथे पण ते जाणार होते. (यंदा तो शताब्दी महोत्सव आहे - वैकुंठ चतुर्दशी १९०१).

तेव्हा त्या वातावरणात आपण काही दिवस राहावे अशी आमची

इच्छा होती. तेव्हा गावात श्री. जगन्नाथ लेले यांच्याकडे रहावे व रामतीर्थावर जे जे कार्यक्रम होणार होते त्याला हजर राहावे असे आम्ही ठरवले. कारण तेथे नेम-प्रवचने, आठवणी इ. कार्यक्रम होणार होते. आम्ही वर गेल्यावर काकूसाहेब रानडे म्हणाल्या, तुम्ही वर-खाली करू नका. येथेच वर राहा. त्याप्रमाणे आम्ही तेथेच वर राहिलो.

श्री. काका कारखानीसांना गुरुदेव म्हणाले, 'गणपतराव, आता पोतडी मोकळी केली आहे. सर्व साधकांना आता सांगा. गणपती मंदिरात सीटींगच्या वेळेस साधकांच्या समोर श्री. काका कारखानीस रोज अनुभव - प्रचिती उघडपणे सांगत असत. श्रीगुरुदेवांनी त्या वेळेस जमखिंडीत ५०० च्या वर लोकांना नाम दिले.

जोपर्यंत आम्ही तेथे होतो, तोपर्यंत आमचा नेम साधन-भजन उत्तम चालत होते. अशा वेळेस माझ्या मनात आले की, सर्वांचा ग्रुप फोटो श्रीगुरुदेवांच्या समवेत निघाला तर किती बरे होईल? त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी फोटोचा कार्यक्रम झाला. मला खूप आनंद झाला.

या सोनेरी क्षणांची आठवण अजूनही नामस्मरण करण्याला उपयुक्त ठरते. गुरुदेवांना त्यांचे गुरु श्रीभाऊसाहेब महाराज म्हणाले होते, 'ह्याच्या पायापाशी राजेरजवाडे येतील, ह्याचा प्रत्यक्ष अनुभव आम्ही घेतलाच. परंतु यापुढे जाऊन मी म्हणते - ते ब्रह्म साम्राज्याचे सम्राट होते आणि असे आमचे गुरुदेव - आम्ही डोळ्यांनी पाहिले - आम्ही देव पाहिला - धन्य झालो !

**श्रीमती लीलाबाई शिरवळकर**
३, ठुबे पार्क, तेजस बंगला, शिवाजी नगर, पुणे ४११००५.

# SHRI GURUDEVA'S PHILOSOPHY OF GOD-REALISATION

**Professor Dr. M. L.Sharma**

*M.A., Ph.D. in 'Absolutism In The East and The West'. Dept. of Philosophy, University of Jodhpur (Retd.)*

It is recognised universally that Gurudeva Professor Ranade stands very high in the ranks of philosophers and mystics of the world. As Shri Gurudeva himself has pointed out, the mystic may be a philosopher, but is not necessarily so. His mystic experience is sufficient for his own elevation to Divinity; but if he philosophises, he may raise thinking humanity into a Divine Kingdom of Ends. The greatness of Professor Ranade lies precisely in the fact that he was a mystic as well as a philosopher. Before Ranade "Rational Mysticism" was regarded as a contradiction in terms. But he showed that Mysticism which "involves a direct, immediate , first-hand, intuitive apprehension of God" can stand up successfully to the test of reason and rigors of logic.

Our cultural heritage is rooted in the mystical insights of the Vedic and Upanishadic seers. The mystical streak in our culture has maintained its prominence in our thought and literature down to the present times. If anything, the mystical lore which remained confined to the cloisters of the ancient seers has reached the doors of common man through the teachings of numerous medieval saints who had used vernaculars of their respective regions rather than Sanskrit or Pali, for the exposition of their experiences and teachings. Professor Ranade, who found affirmation of his own experiences in the songs of these divine musicians, could enter into the spirit of their teachings, discover their philosophical basis and supply the systematic hermeneutics to interpret their language. Professor S.L. Pandey has rightly emphasised in his paper published in Gurudeva Ranade Centenary Souvenir that where as the philosophers of the earlier centuries had neglected medieval Indian Mysticism, "it was left to Professor Ranade to raise it up from its oblivion to the level of a well-thought out philosophical system as it was left for Shankara to raise up the mysticism of the Upanishads to the level of a rigorous system of Advaita Philosophy."

Shri Gurudeva has called his philosophy of God-realisation as 'Beatificism', according to which the Highest Good of human life ought to be the realisation of God and enjoyment of bliss accompanying that realisation, as also to enable others to experience that Divine bliss. He himself was initiated in spiritual life by Shri Bhausahib Maharaj Umadikar at the age of fourteen, and began to have experiences from time to time in worldly matters and subsequently in spiritual matters. His Guru assured him that meditation on the Name could enable him to secure first position in Matriculation Examination also. When he did get highest marks in Matric and was awarded the prestigious Shankarseth Scholarship, his faith in his Guru increased. While watching a game of cricket, he saw myriads of 'spiritons'(bindule) or points of spiritual light filling the whole space before him. When serious illness overtook him in the year 1908, and even renowned physicians of Pune gave up his case as being hopeless, his grieving mother took him to Shri Bhausahib Maharaj and prayed for his grace with tears in her eyes. Shri Maharaj looking at the face of young Ranade remarked that he saw no danger to his life for the next sixty years! Thus faith in his Guru led to further success and victory over problems, and worldly success led to quantum increase in his faith. He topped the list of successful candidates at his M.A. (Philosophy) Examination and was awarded Chancellor's Gold Medal of the University of Bombay. His teachers, especially Professor Woodhouse, were much impressed by his brilliance. Professor Woodhouse wished to enlist him in the fold of Theosophy, and took him to Benaras to introduce him to Miss Annie Basent. But when he showed the photograph of his Guru Bhausahib Maharaj to her , she remarked ,"Ranade, you are in safe hands."

During that visit to Benaras, Shri Gurudeva happened to go to the Math of Shri Shankaracharya where devotees were reciting devotional stotras of Shankaracharya. This raised a knotty problem in his mind as to how could a pure Advaitist like Shankara reconcile Absolutism with Devotionalism. He, therefore, undertook a serious study of both Indian and Western philosophies. His sole purpose as to discover the possibility of spiritual life, and to establish sufficient justification for spiritual life.

Without going into further details of Shri Gurudeva's solution of the problem faced by him, I consider it sufficient to state that he propounded his own doctrine of Beatificism. Beatificism is a Philosophy of God-realisation based on Shri Gurudeva's own spiritual experiences which have the stamp of universality as is evident from his comparative studies of philosophers and mystics ancient, medieval and modern, East and West. He tells us emphatically time and again that "what we feel", "what we experience" should alone constitute our philosophy.

Now I shall come to my own story of my contact with this great philosopher-mystic of Nimbal which goes back to the year 1950. That story is being narrated by me in my series of articles entitled "Eternity Compressed in Time : My Reminiscences of Shrj Gurudeva" published since January 1994 in the "Pathway to God", a quarterly journal issued by the Academy of Comparative Philosophy and Religion, Belgaum, which was founded by Shri Gurudeva himself. I give below some significant portions from those articles which I began writing at the instance of Shri. J. V. Parulekar who himself was a close disciple of Shri

Gurudeva and founder-Editor of the "Pathway to God". In my first article published in the January 1994 issue of the said journal I wrote, "Though I was fortunate to have come in contact with Shri Gurudeva in May 1950 at a relatively young age of 23 years and subsequently visited Nimbal / Allahabad in every summer break and X'mas holidays till 1955, I have not till now tried to put my reminiscences in black and white. All the same, those precious reminiscences have all along been my only life-sustaining ambrosia which I have been continually partaking throughout the last forty-three years. As such the reminiscences in my case are no longer memory traces weakened by the passage of time. They are vivid living experiences occurring in the present in the company of Shri Gurudeva. They exemplify the marriage of Eternity and Time.

"I must make it clear that my first visit to Nimbal Ashrama was not motivated by spiritual considerations. At that time I was studying as a Rajputana University (now Rajasthan University) Research Scholar for my PhD. thesis entitled "Absolutism in the East and the West" under the guidance of Professor V.H. Date , Head of the Department of philosophy, Jaswant College, Jodhpur. Professor Date was an ardent disciple of Shri Gurudeva Ranade Sahib, and his very mission in life was to uplift his students and friends spiritually by advising them to go to Nimbal, where, as he put it, a philosopher-mystic of a rare stature flourished the like of whom comes to this world only after a lapse of thousands of years. He told me, "As your thesis involves a comparative study of Indian and Western currents of Idealism and their evaluation from the view-point of Mysticism, you would be immensely benefited by the guidance of Professor Ranade Sahib." "When I reached Nimbal in the after-noon of the final days of May 1950, I found that Dr. Date with his family was already there. The bell for the "sitting" rang and the disciples hurriedly proceeded to the new house of Shri Gurudeva. Dr. Date took me there, and introduced me to Shri Gurudeva as his Ph.D. student. I bowed reverentially at the feet of the great philosopher-saint who was bubbling with immense spiritual energy, though physically he was lean and thin. His face was aglow with joy, and his beautiful eyes glanced at me with affection. While he busied himself with lighting practically a whole broom of incense sticks, the servant brought a disc-full of burning coal and he placed it before him. Shri Gurudeva took a handful of sandalwood powder mixed with incense material and sprinkled the same over the live coal. And lo! The fragrant smoke spread through the varandah creating a delightfUl setting for the "sitting" which used to be a combination of personal inquiries, reading of spiritual literature, singing of a devotional song or two, serious discussion, reminiscences, and finally Bhajana and Arati. "Then Shri Gurudeva asked me as to how far from Jodhpur was located Merta, the birth-place of Mirabai the renowned princess-saint of Rajasthan. When in reply I told him that Merta was hardly eighty miles from Jodhpur, he directed me to narrate the life-story of Mirabai to the gathered Sadhakas. He further said that I should speak in Hindi even though many in the assembly might find it difficult to understand the language. "But let them learn Hindi which is destined to become our national language," he remarked. Fortunately for me, I had offered Hindi literature along with Philosophy and English literature at my B.A..

The courses in Hindi Literature in part consisted of the poems of medieval saints such as Surdas, Tulsidas, Kabir, Mirabai and Nanak among others. These things were fresh in my mind so that I could narrate adequately Mira's life. In those days Shri Gurudeva was finalising his work on the Paramartha Sopana', the source-book of his epoch-making treatise Pathway to God in Hindi Literature.'The entire manuscript of Paramartha Sopana' containing the Padas and Dohas, their paraphrase in prose, and detailed notes and comments was getting ready for the press. Shri Gurudeva decided that the paraphrase portion be fully revised. So for full three weeks fom morning till night his Hindi knowing students B.R. Kulkarni, Prahlad Kulkarni, Prakash Chandra Sharma, Bhau Nimbargi, Madhu Kumthekar and myself sat at the feet of Shri Gurudeva doing revising work under his guidance. Even during the "sitting" the "Paramartha Sopana"dominated. It was my rare luck that my very first visit to Nimbal brought me in very close personal contact with Shri Gurudeva when I was still a 23 year student.There were moments when in my boyish immaturity coupled with a false sense of my intellectual competence I would argue with him about the interpretation of some word or phrase. He would show anger at my inability to distinguish between the literal and the mystical meanings, but would soon become soft on realising my frightfulness. "During those precious three weeks , I was occasionally asked by Shri Gurudeva to sing a Hindi Pada. I Would sing with great feeling, and a classical touch would automatically embellish my singing. I felt that inspiration was subtly coming from Shri Gurudeva who visibly appreciated my singing. He would then ask Dr. Paripatyadar of Solapur to inquire from me the 'Raga' in which I sang the particular song. Dr. Paripatyadar incidentally revealed that he could not pick up classical music despite his keen efforts.Then he went to Inchgiri Math and sat at the Samadhi of Shri Bhausahib Maharaj crying and fervently praying to the Maharaj to fulfil his desire for attaining profrciency in classical music. Shri Maharaj granted his prayer and the doctor gained command over classical music without any outside assistance.

"The "sittings" were undoubtedly the outer manifestations of the inner richness of the many-sided personality of Shri Gurudeva. His spiritual heights, philosophical depths, intellectual acumen, concern for the welfare of disciples, heartful mercy for all living beings, affection for children, kingly dignity amidst utter simplicity, unsurpassable devotion to his Guru Shri Bhausahib Maharaj, each of these qualities and something eluding any description , found expression during the "sittings".

He would make everybody present feel that he had a special love for him. He had a sixth sense of picking up the unique quality of every individual and praising it, so that one felt one's value in his august presence. His greatness consisted not in making the individual feel dwarfish before him, but in awakening in him the sense of his own dignity.

"The Ashrama cat would invariably drop in while the "sitting" was on, and by his mew, mew would let Shri Gurudeva know how much hungry he was. Howsoever busy he might be in discussing some point, he would tell the servant to bring a plate of rice and a tumbler of milk, and feed his uninvited guest. On one occasion the same cat injured his paw and came limping to Shri Gurudeva and showed him his painful foot. Immediately Shri Gurudeva called for some lotion and cotton to give first-aid to the VIP patient. The clever animal paid regular visits during the "sittings" for treatment of the injury at the hands of Shri Gurudeva.

Shri Gurudeva's love for children was evident from the way he cut jokes with 2-year old grand daughter Nandini whenever she walked in during the "sitting" in a playful mood to attract his attention. While even the elderly sadhakas participated in the "sittings" with all solemnity and a sense of awe in the presence of Shri Gurudeva, Nandini could easily put her grandfather in a very affectionate light-hearted mood and even amidst serious spiritual "sittings" Shri Gurudeva played prank or two with the child, thus showing his affection for the innocent kid. "I remember how much concerned Shri Gurudeva felt about the future of all his disciples. Mr. Bhau Nimbargi had develdped severe myopia in both his eyes. Shri Gurudeva told me with anxiety, "Mohan Lal, this lad wears glasses of -12 and -14 numbers even at this age! What will he do in his life if does not get a suitable job because of this abnormal myopia?" That his concern for Mr. Nimbargi had ensured for the latter a secure future became evident when years later I was informed that he was employed as a high official in a reputed bank.

Mr. Madhu Kumthekar also entered Maharashtra Government Administrative Service and rose to the level of a secretary. Mr. B.R Kulkarni who was affectionately called B.R by Shri Gutudeva became Professor of Philosophy, and subsequently held a key post in the RAW due to former's grace. I too lived entirely on Shri Gurudeva's grace and steadily advanced in my academic career to occupy the Chair of Professor of Philosophy in the University of Jodhpur (now Jainarayan Vyas University), against all odds. As St. Rama Dasa has put it,(जो साधुच्या अंकित जीव झाला । त्याचा असे भार निरंजनाला) i.e. one who has been accepted by a saint is taken care of by God Niranjana."

**Professor Dr. M. L.Sharma**
115, Malviya Nagar, Jodhpur - 342011.

# गुरुदेवांच्या मुखातला शब्द म्हणजे ईश्वरानुमतीने ओघळलेले तत्त्वज्ञान

**सौ. मीनाताई शिंत्रे**

*श्रीगुरुदेवांचे लेखनिक कै. दत्तात्रय परशुराम शिंत्रे यांना त्यांचा सहवास, सद्गुरु बोध व कृपेचाही लाभ मिळाला. सौ. मिनाताई शिंत्रे यांनी आपले श्वशुर तात्यासाहेब शिंत्रे यांची आठवण लिहिली आहे. शिंत्रे घराणे श्रीगुरुदेवांचे अनुग्रहित आहेत. तात्यासाहेब यांनी अखेरपर्यंत नामस्मरण आणि श्रवण केले. जीवनधन्य केले.*

दि. १० डिसेंबर हा दिवस आम्ही माझे सासरे दत्तात्रय परशुराम शिंत्रे यांचा जन्म स्मृतिदिन म्हणून एक छोटासा नेमाचा कार्यक्रम करून साजरा करतो. यंदाही त्या दिवशी नेम, भजन, वाचन अशाच स्वरूपात करायचे योजले होते. त्या दिवशी गुरुदेवासंबंधीच्या एका पुस्तकाचे वाचन चालले होते. एक संवाद वाचताना एकदम मी थांबले.

शिष्य : 'जीवनाचे अंतिम ध्येय काय असावे?'

गुरु : 'परमेश्वर प्राप्ती हेच जीवनाचे अंतिम ध्येय असावे.'

मला वाटले पण अंतिम ध्येयाप्रत जाण्यासाठी मार्गदर्शन तरी कोणाचे हवे? अर्थात सद्गुरुचे ना !

आणि माझ्या डोळ्यांसमोर तात्यांच्या (द. प. शिंत्रे यांच्या) जीवनातला काही काळ तरळू लागला.

## गुरुभेटीची तळमळ

इंडिया सिक्युरिटी प्रेस, नासिक रोड येथील नोकरी स्टेनोग्राफरची ! पत्नी, मुले, मुली असा जरा मोठाच प्रपंच ! खाऊन पिऊन सुखी, कष्टाळू कुटुंब. तात्यांचा मूळचा पिंड पारमार्थिकतेचा ! तात्यांच्या मनात नेहमी हा विचार यायचा की परमेश्वर प्राप्तीचा, जीवन सार्थ होण्यासाठी मार्ग दाखवणारा सद्गुरु मला भेटेल का? कसा? याबद्दल सासूबाईनी सांगितलेली एक घटना अशी !

दोघेही पती-पत्नी नरसोबाच्या वाडीला गेले होते. जरूरीपुरते कपडे व भांडी जवळ होती. एक छोटीशी खोली भाड्याने घेतलेली होती. तेथे रहात होते. पहाटे नदीवर जाऊन स्नान करायचे. देवदर्शन घेऊन खोलीवर यायचे. आसनावर बसून थोडा वेळ ध्यान करायचे व 'श्रीगुरुचरित्राची पोथी' वाचायला बसायचे. संपूर्ण पोथी वाचून व्हायला रात्रच व्हायची. त्यानंतर थोडासा अल्पोपहार घेऊन स्तोत्र म्हणत चटईवर पडायचे व डोळा लागायचा. पुन्हा पहाटे उठून नित्यक्रम सुरू ! असे ओळीने सात दिवस करून सात पारायणे केली ! 'मनी एकच आस - सद्गुरुंचा ध्यास !'

असेच दिवस चालले होते. प्रत्येक गोष्टीला योग यावा लागतो असे म्हणतात ना !

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरचा काळ. काँग्रेसचे अधिवेशन होते. त्यानिमित्ताने काही लोकांनी एक प्रवास यात्रा ठरवली होती. थोडा प्रवास झाला आणि अचानक नद्यांना पूर आल्याची बातमी पसरली आणि या मंडळींना मार्ग बदलावा लागला. अलाहाबादला मुक्काम झाला.

## गुरुदेवांचे 'अमृतबोल'

अलाहाबादचा परिसर पाहण्याचे भाग्य लाभले आणि इतरांशी बोलताना समजले की, अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे व्हाईस चॅन्सेलर, तत्त्वज्ञानी, संत साक्षात्कारी, विद्याविभूषित अशी (श्रीगुरुदेव) रामचंद्र दत्तात्रय रानडे ही व्यक्ती येथून जवळच राहते. ती. तात्यांनी त्यांचा पत्ता शोधून काढला व ते श्री.रानडेसाहेबांना भेटायला गेले.

एकमेकांचा परिचय, थोडे बोलणे झाल्यावर 'तुम्ही एकदा निंबाळला या, मग ठरवू !' असे रानडे साहेबांचे अमृतबोल ऐकले व तात्यांना मानसिक समाधान जाणवले. 'माझा मार्गदर्शक मला मिळणार' या जाणिवेने ते सुखावले.

श्रीरानडे साहेब अलाहाबादहून उन्हाळ्याच्या सुट्टीत निंबाळला गेल्याचे कळले व तात्यांचा निंबाळच्या प्रवासाचा बेत ठरला.

नाशिकरोडहून मनमाडला गाडी बदलायची. तेथून पुढे दौंड मार्गे सोलापूरला जायचे. पुन्हा गाडी बदलायची व मग सोलापूर-विजापूर मार्गावरील निंबाळ स्टेशन येणार ! हा तसा जवळ जवळ १४/१५ तासांचा प्रवास ! पण शीण जाणवणार नव्हता तात्यांना कारण मनीचा ध्यास. सद्गुरु सहवासाचे भाग्य लाभणार होते.

[Nimbal], 'निंबाळ' ही स्टेशनवरची पाटी पाहिली आणि तात्या फलाटावर उतरले. बरोबर वळकटी त्यात अंथरूणाचे-पांघरायचे कपडे. एका बॅगेमध्ये वापरायचे दररोजचे कपडे, बॅटरी, काडेपेटी, मेणबत्ती, सुईदोरा, साबण, ब्रश, पेस्ट, लोटी भांडे, कपबशी, २/३ छोटी पातेली, स्टोव्ह वगैरे सर्व आवश्यक ते लागणारे सामान !

## निंबाळ परिसर

गाडी पुढे गेली आणि तात्यांनी सभोवर पाहिले ! परिसर न्याहाळताना लक्षात आले की पश्चिमेला निंबाळ खेडेगाव साधारण एक-दीड मैलांवर आणि पूर्वेला सात-आठ लमाण्यांच्या झोपड्या, गुरुदेवांचे (रानडे) यांचे जुने घर, नवे घर या मोठ्या वास्तू आणि सांगलीकरांचा वाडा, ध्यानमंदिर या छोट्या वास्तू अशा मोजक्याच होत्या. जेथवर दृष्टी पोचू शकते तेथवर सगळीकडे माळरान ! ना शेते ना मळे ! ना दुकाने ना हॉटेले, ना शाळा ना कॉलेज, ना डांबरी रस्ते ना रस्त्यावर झाडे, ना लाईटचे खांब ना काही ! मग येथे होते तरी काय? या सर्व 'ना' वर मात करणारे साक्षात्कारी संतांचे वास्तव्य आणि श्रीसद्गुरु भाऊसाहेब महाराज उमदीकर यांचेकडून दिव्य नाम मिळालेला त्यांचा लाडका शिष्य 'रामचंद्र'. याने नामावर नाम चढवून रचलेल्या राशी, नामस्मरणाने तेजःपुंज आणि पुनीत झालेला वातावरणातील कण न् कण.

'निंबस म्हणजे तेज, प्रभा' यामुळे इतर 'ना' 'ना' वर केलेली मात ! नाहीची जाणीवच नाहीशी झालेली. होता मिळणार सद्गुरुचा सहवास ! नामाची कास !

तात्यांनी भक्तिभावे नमस्कार केला व ते जुन्या घराकडे वळले.

तात्यांच्या मनीचा मानस सफल होणार असे शुभशकूनच जणू त्यांना होत होते. आणि तात्या पुनः पुन्हा निंबाळला येऊ लागले.

तात्या निंबाळला आले की रानडे यांच्या जुन्या घरातील खोलीत सामान ठेवायचे. गुरुदेवांचे दर्शन घ्यायचे.

प्रातःकाळी नेमाला उठायचे. साडेपाचला काकडआरती करायची. मग प्रातविर्धीसाठी माळरानावर जायचे, येताना विहिरीवर स्नान उरकायचे. कपडे धुवायचे, खोलीवर येऊन कापूर लावणे, नेम करणे व्हायचे. गुरुदेवांची आज्ञा होईल त्याप्रमाणे इतर साधकांसमवेत गुरुदेवांच्या प्रासादिक दृष्टीने पावन झालेले भाजी, आमटी, भात, भाकरी, डाळीची चटणी, ताक असे साधे पण रुचकर जेवण जेवायचे. वेळ मिळेल तेव्हा नेम, भजन, वाचन करायचे. सायंकाळी वाटीभर ताक आणि मूग, चवळी या प्रकारची उसळ वाटीभर असा मिताहार मिळायचा.

घरापेक्षा संपूर्ण वेगळे पण चैतन्यपूर्ण वातावरण ! सर्व साधकांची ही दृढ श्रद्धा होती की आपण येथे संतसंगतीसाठी, नामस्मरणासाठी व जीवनाच्या ध्येयपूर्तीसाठीच्या मार्गदर्शनासाठी आलेले आहोत.

## लेखन कसे व्हायचे?

तात्या स्टेनो टायपिस्ट होते. गुरुदेवांच्या पुस्तक लेखनाच्या मदतीसाठी गुरुदेवांनी तात्यांना बोलावले होते. तात्यांना नोटस् घेण्यासाठी सकाळी, दुपारी, पहाटे, रात्री केव्हाही गुरुदेवांना स्फूर्ती येईल तेव्हा ते गड्याकरवी निरोप देत. निरोप आला रे आला की टोपी डोक्यावर ठेवायचे, चपला पायात सरकवल्या की भरभर चालत वही,पॅड,पेन सांभाळत गुरुदेवांच्या नव्या घरातील, गुरुदेव असतील त्या खोलीत जायचे. जणू जय्यत तयारीतच ते असत.

गुरुदेव सांगू लागले की त्यांच्या विचारांचा ओघ कधी धबधब्यासारखा, कधी प्रचंड लाटांसारखा घोंघावत असे. तात्या झरझर लिहून घ्यायचे. हे धबधबे, ह्या लाटा सहन करण्याची ताकद हळूहळू तात्यांना जमू लागली, हे सामर्थ्यही गुरुदेवांचेच !

'मी सांगत असताना मला मधे अडवायचे नाही, प्रश्न विचारायचा नाही, अं ! काय? हा शब्द काय, ऐकू आला नाही, पुन्हा सांगा वगैरे काहीही मधे मधे बोलायचे नाही. जेवढे कळेल तेवढे लिहून घ्या, जसे कळेल तसे लिहा', अशी सक्त ताकीद गुरुदेवांनी दिलेली होती. त्यामुळे खाली मान घालून फक्त लिहिणेच ! गुरुदेवांचा शब्द म्हणजे परमेश्वराच्या परवानगीने परिप्लुत होऊन ओघळलेला ! तो अडवण्याचे सामर्थ्य येरागबाळ्याचे नव्हेच !

एकदा सर्व सांगून झाले की गुरुदेव ते टाईप करायला लावत ! गुरुदेवांचाच रेमिंग्टन कंपनीचा टाइपरायटर होता. त्यावरच काम केले जाई. पुन्हा गुरुदेवांचा निरोप येई तेव्हा आधी झालेल्या भागाचे वाचन होई. गुरुदेव त्यात सुधारणा सांगत. मग ते पुन्हा टाइप केले जाई. गुरुदेवांना स्पेलिंगची झालेली बारीकशी चूक तर खपत नसेच नसे पण एखादा शब्द लेखनात पुन्हा अगदी जवळच्याच मजकूरात येता कामा नये यासाठी ते कटाक्षाने जागृत असत ! जी विधाने केली जायची, दाखले दिले जायचे, त्याची सत्यता चार लोकांशी शहानिशा करूनच पडताळून पहायचे.

अशा प्रकारे लेखन, टायपिंग, वाचन, सुधारणा, दुरुस्त्या पुन्हा टायपिंग, वाचन असे काम चाले. कधी कधी तीनदा-चारदा सुद्धा टायपिंगचे काम चाले. तात्याही न कंटाळता अगदी तत्परतेने काम करत. गुरुदेवांच्या पसंतीस उतरेपर्यंत काम करायचे. तपश्चर्याच जणू ती त्यांची !

1) Parh way to God In Hindi Literature

2) Bhagwat Gita - Philosophy of God Realisation

या दोन्ही पुस्तकांच्या वेळी तात्यांनी काम केले आहे. पुस्तकाच्या या कामाच्या निमित्ताने तात्या कधी निंबाळला तर कधी अलाहाबाद येथेही जायचे. गुरुदेवांचे जीवन त्यांना जवळून पहायला मिळाले. थोडा सहवासही मिळाला.

सुमारे ४९/५० सालापासून गुरुदेवांकडे जायला लागलेले तात्या मधून मधून घरी येत काम नसेल तेव्हा !

## घरात परमार्थ 'रुजला'

ते घरी नाशिकला आले तरी मनाने ते गुरुदेव असतील तेथेच असायचे. सतत निंबाळ-अलाहाबाद येथीलच गप्पा-आठवणी ! घरी पहाटेची काकड आरती, सर्व भजने म्हणणे, दासबोध वाचन या बाबत त्यांचा कटाक्ष असे.

घरातील सर्वांना त्यांनी नामाची महती सांगितली व नाम घ्यायला लावून सन्मार्ग दाखवला. गुरुदेवांच्या दर्शनाचाही लाभ घ्यायला प्रवृत्त केले. ही खरी पारमार्थिक कृपा तात्यांचीच.

नाशिकरोडचा घर प्रपंच माझ्या सासूबाई समर्थपणे सांभाळत होत्या. कोणत्याही गोष्टीची झळ किंवा काळजी तात्यांना जाणवू देत नव्हत्या. अर्थातच त्यामुळे तात्या निर्धास्तपणे गुरुदेवांकडे कामात मन एकाग्र करू शकले होते. तात्यांच्या प्रपंचातील चिंतांचा भार कमी करण्यासाठी गुरुदेवांची कृपादृष्टी होती ही खात्री तात्याही मनोमनी जाणून होते.

गुरुदेवांचा उणापुरा सात-आठ वर्षांचा सहवास पण तात्यांना तो कृतार्थ वाटला. जीवन बदलवणारा वाटला.

एकोणीसशे सत्तावन्नसाली जूनमध्ये श्रीगुरुदेवांच्या निर्याणाच्या वेळीही तात्या निंबाळलाच होते. त्यामुळे त्यांनी गुरुदेवांचे अंत्यदर्शनही त्यांच्या नेत्रसंपुटात समाविष्ट करून ठेवले होते.

नाशिकरोडला तात्या आपल्या प्रपंचात अगदी 'पद्मपत्रमिवांभसा' या वृत्तीने रहात होते. नामस्मरणात जास्तीत जास्त काळ व्यतीत करत होते.

तात्यांचे अपेंडिक्सचे ऑपरेशन झाले होते. अशक्तपणा खूप होता; पण घरातल्या घरात हिंडाफिरायचे. थकले की निजून रहायचे. कोणताही त्रास इतरांना न देण्याची वृत्ती शांतताप्रेमी व्यक्तिमत्त्व असेच काही दिवस गेले.

## नामाचे स्मरण व श्रवणही

नोव्हेंबर महिना, चार तारीख, सदुसष्ट साल. (४।११।१९६७) दुपारी साडेचारचा सुमार. अचानक पोट दुखते म्हणून कण्हायला लागले. पाणी गरम करून पिशवीत घालून शेकायला द्यावे म्हणून मी स्वयंपाकघरात

कळले. वेदना जास्त जाणवू लागल्या तेव्हा लगेच हे डॉक्टरांकडे धावले. मी हातात पिशवी घेऊन उभी तर मला भास होऊ लागला की तात्यांचे मस्तक उशीवरून खाली खाली घसरते आहे. डोळे निस्तेज झाले आहेत. सासूबाई त्यांच्या जवळच होत्या. तात्यांच्या मानेला हात देऊन सारखं म्हणत होत्या, 'अहो, असं काय करतांय? ते बघा गुरुदेव आलेत, त्यांच्याकडे बघा, गुरुदेव बघताहेत त्यांचा फोटो तरी बघा!'

जवळ जवळ 'गुरुदेव' हा शब्द त्याक्षणी तात्यांच्या कानावर पंधरा-वीस वेळा तरी पडला असेल. अंतर्यामी काय वेदना-यातना असतील न कळे पण कानांत 'गुरुदेव' शब्द नक्कीच गुंजन घालीत असेल. अखेरचा श्वास 'गुरुदेव' हे नाम ऐकतच त्यांनी सोडला असेल.

सारे कळून चुकले होतेच ! एवढ्यात डॉक्टर आले. तात्यांच्या हाताची नाडी पाहिल्यासारखे केले आणि लगेच बाहेर पडले. वातावरण शोकाकूल झाले ! डोळ्यांतले पाणी टिपता टिपता माझ्या मनात विचार आला,

'अखेरच्या क्षणीही गुरुदेवांचे नाव ऐकवणारी पत्नी आणि कदाचित त्या सामर्थ्याने गुरुदेवांना पाहून सद्‌गती लाभलेला पती. दोघेही धन्य !'

याचसाठी त्यांनी अट्टाहास केला होता ना !

की परमेश्वर प्राप्ती या अंतिम ध्येयाकडे जायला मार्गदर्शन करणारा सद्‌गुरू लाभून शेवटचा दिस गोड व्हावा !

**सौ. मीनाताई शिंत्रे**
'आशिश' कुबेर कॉलनी, मोटवानी फॅक्टरी समोर, नाशिक रोड, ४२२१०१, दूरभाष - ५६३०३५

# सद्गुरु भेटले हो, त्यांनी धरियेले करी

**प्रा. मधुसूदन नरहर देशपांडे**

*लोकमान्य टिळक व महात्मा गांधी प्रणीत देशप्रेम, स्वदेशी व भक्तीचे कुटुंबीय वातावरणात जन्म. संशोधन विषय 'श्वेतांबर जैन-जैनधर्म ग्रंथांचे (Canronical Literature) पुरातात्विकाचे आधारे भारतीय संस्कृती व इतिहास, १९४६-७८ भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण विभागात नोकरी. महानिर्देशक म्हणून निवृत्त. १९५६ मध्ये निंबाळ येथे अनुग्रह. विशेष लेखन - गुहा स्थापत्य व कला. निवृत्तीनंतर देश वा परदेशांत अभ्यास व संशोधन. भारतीय विद्यापीठांत अतिथी प्रोफेसर.*

श्रीगुरुदेव रा. द. रानडे, निवृत्त व्हाईस चान्सेलर, अलाहाबाद विद्यापीठ व तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर यांचे प्रथम दर्शन १९४७ साली, सर परशुराम कॉलेजमध्ये कौशिक व्याख्यानमालेत झाले. कै. बाळासाहेब खेर मुंबई प्रांताचे मुख्यमंत्री अध्यक्षस्थानी होते व प्रो. गुरुदेव रानडे व्याख्याते असा मणि-कांचन योग होता. आपल्या प्रास्ताविक भाषणात श्रीगुरुदेवांना उद्देशून श्री. खेरांनी जे विधान केले ते मला आठवते. ते असे होते, 'पूर्वी जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्तीचा अर्धा वाटा तुमचेबरोबर मला मिळाला हे खरे पण आता तुमच्या पारमार्थिक धनाचा अर्धा वाटा मला मिळेल काय?' हे वाक्य ऐकिल्यावर सभेत उत्स्फूर्त टाळ्यांचा कडकडाट झाला. त्या वेळी मला अंधुकशीसुद्धा कल्पना नव्हती की, पुरातात्त्विक उत्खनन करणारा मी कधीकाळी आपल्या अंतःकरणात उत्खनन करून 'अमोलिक वस्तू' मिळविण्याची शोध-प्रक्रिया शिकण्यासाठी श्रीगुरुदेवांचे चरणी जाईल काय? उत्खनन शिकण्यासाठी मी प्रसिद्ध तक्षशीला विद्यापीठात गेलो होतो पण निंबाळ येथील अभिनव विद्यालयात जिचे वर्णन 'अध्यात्म विद्या विधानाम्' असे भगवद्गीतेत वर्णन केले आहे ती 'अध्यात्म विद्या' शिकण्यास जाईन व तेथे मला नेण्यासाठी एक ख्रिश्चन मित्र मिळेल व त्याची योजना त्या विद्यापीठाचे प्राचार्यच करतील हे कसे मला समजणार?

१९५५ साली म्हणजे – श्रीगुरुदेवांना प्रथम पाहिले, त्यानंतर सुमारे आठ वर्षांनी. माझी बदली १९५१ साली नवीन उघडलेल्या वेस्टर्न सर्कलमध्ये, औरंगाबादमध्ये झाली. १९५१ पर्यंत हैद्राबाद संस्थानातील मराठवाड्यातील प्राचीन स्मारके औरंगाबाद येथील सर्कलमध्ये आली व तेथे अधिक्षक म्हणून मी गेलो. अजंठा, वेरूळ, पिवळखोरा व खुद्द औरंगाबादेतील बौद्ध, हिंदु, जैन लेणीसमूह, त्यांचा अभ्यास व संरक्षण-दुरुस्ती माझ्यावर सोपवली गेली. पुस्तकी अभ्यास व प्रत्यक्ष पाहून अभ्यास करणे यात जमीनअस्माना इतके अंतर असते. पहिल्याच आठवड्यात चीन देशातून सांस्कृतिक शिष्टमंडळ येणार होते. मी रात्रंदिवस त्या सर्व प्राचीन वस्तू एकाग्र होऊन पाहिल्या. मध्यंतरीच्या आठ वर्षात गुजरात, राजस्तान, बंगाल, ओरिसा, आसाम येथील अनेक स्मारके अभ्यासली होती. इंडियन म्युझियम (कलकत्ता) येथील कलापूर्ण शिल्पादी वस्तूंचा व इतर स्मारकाचा तसेच मथुरा, सांची, सारनाथ क्षेत्रीय कलाकेंद्रांचा अभ्यास केला असल्यामुळे अजंठा, वेरूळ समाधानपूर्वक दाखवू शकलो. जैन धर्माचा अभ्यास मी डेक्कन कॉलेजमध्ये केला होता. आता बौद्ध कलेबरोबर त्या धर्माचा सखोल अभ्यास सुरू केला व एक दिवशी औरंगाबादच्या रोटरी क्लबमध्ये 'अजंठाची कला' या विषयावर व्याख्यान दिले. रोटरीचे अध्यक्ष डॉक्टर ख्रिश्चन यांनी आभार मानताना जाहीर केले की, पुढील महिन्याचे व्याख्यान ते स्वतः देतील व विषय असेल, 'Spritual message of the Art of Ajanta (अजंठा कलेचा अध्यात्मिक संदेश). त्यांचे व्याख्यान खरोखरीच चांगले झाले. मला एका वैद्यकीय डॉक्टरने असे माहितीपूर्ण व्याख्यान द्यावे याचा हेवा वाटला. परंतु डॉक्टरांच्या मनात, वागण्यात बिलकूल अहंकार वा स्पर्धेचा मागमूस नव्हता. आमच्या परिचयाचे मैत्रीत रूपांतर झाले हे समजलेच नाही. आमचे परस्पराकडे जाणे-येणे वाढले. डॉक्टर एक 'विश्व चि माझे घर' अशा उदार वृत्तीचे, अध्यात्म जगणारे, सर्वधर्म समानता मानणारे, निष्कपट व करुणासागर होते. ते आपल्या परीने योगाचा अभ्यास नियमाने करीत असत. त्यांच्या प्रत्येक भेटीत ईश्वरभेटीची व त्यासाठी गुरू मिळावा अशी तळमळ दिसे व ही तळमळ माझ्या मनात स्फुरावी असा सहज प्रयत्न ते करीत व जसजसा माझा कैलास व इतर लेण्यातील शिल्पांचा अभ्यास वाढू लागला तसतसा मी अध्यात्मिक वाङ्मय वाचू लागलो. डॉक्टर मूळचे हिन्दू, तमीळ व नंतर शैव-नायन्मार, संतांची पदे, संस्कृत स्तोत्रे वाचीत व अश्रूपूर्ण नेत्रांनी संतांच्या पदाचे अर्थ मला सांगत. वज्रेश्वरीचे संत नित्यानंद यांचे तसेच शिर्डीचे साईबाबांचे मंदिरात दर्शनास जात असत. मराठी संतांचे अभंग आवडीने अभ्यासत, मुस्लीम सूफी संतांची स्थानेही त्यांना पूज्य वाटत. एक दिवशी ते १०-८-५६ ते माझेकडे आले, तर हातात काही पुस्तके, निर्णयसागर प्रेस प्रकाशित बृहत्स्तोत्ररत्नाकारः याचे दोन भाग ललितासहस्र नामाच्या दोन प्रती. थोड्याच प्रास्ताविक बोलण्यानंतर ललितासहस्र नामातील एकओळ 'अव्याज करुणा मूर्ति अज्ञानध्वांत दीपिका' दाखवून म्हणाले की, 'श्रीशंकराची शक्ती, 'ललिता' स्वभावतः करुणामूर्ती असून अज्ञानांधकार नाशीशी करणारी प्रकाशदीप आहे. आपण या देवीच्या सहस्र नामाचे पारायण रोज सकाळ-संध्याकाळ करू या. ही करुणामय देवता आपणाला गुरु देईल व आपले पारमार्थिक भाग्य उजळेल.' आणि खरोखर रोज सकाळ-संध्याकाळ ते सहस्र नामाचा पाठ करीत व मीसुद्धा करतो की नाही याची चौकशी करत व जर का आळसाने वा काही कारणाने केला नसेल तर घरी येऊन करवून घेत.

काही दिवस गेले, सर्व काही मजेत व सुखात चालले होते. सुशील पत्नी, मुलेबाळे असा सुखी संसार, समाजात मान, व्यवसायात प्रशंसा सर्व कसे समाधानी. एवढ्यात एका दिवशी दिवाळीचे अगोदर एकाएकी पत्नी तापाने फणफणली व तीव्र तापाने बेशुद्धावस्थेत बडबडू लागली. एकाच वेळी गुलाबी-लालसर लावण्ययुक्त सुंदर चेहरा पण बेशुद्धपणाने ओळख विसरलेली. वातात बडबडणारी जिवंत पण जीवनज्योत मावळलेल काय अशा अवस्थेत. मी हादरून गेलो. डॉक्टर ख्रिश्चन आले. त्यांनी औषधोपचार

सुरू केला. गोळ्या व इंजेक्शन दिले. घामाघूम होऊन ताप उतरला. थोड्याच वेळात पुन्हा तीव्र ताप असे चक्र चालू झाले. डॉक्टरांना त्यांच्या सिव्हिल सर्जन म्हणून रिटायर झालेल्या भावाचे पत्र त्यांना स्वप्नात मिळाले. मजकूर असा, 'I understand that Mrs. Deshpande is unwell. She will be on her feet day-after tomorrow, Give her this medicine' आणि त्यांनी डॉक्टर ख्रिश्चनांना त्यांच्याच बॅगमधील औषध दाखविले व ते दिल्यावर खरोखरी पत्नीचा ताप ओसरला. तेथील सिव्हिल सर्जन जे परगांवी गेले होते ते आले व त्यांनी निदान केले की माझे पत्नीला मूतखड्याचा आजार आहे व त्यांना खडा कोठे अडकला आहे हे जाणण्यासाठी हैद्राबादेतील गांधी मेडिकल कॉलेजच्या दवाखान्यात जावयास हवे. त्या काळात ललिता सहस्र नामाची पारायणे आम्ही केली. हैद्राबाद येथील डॉक्टरांनी ऑपरेशनची जरुरी नसून औषधाने खडा पडेल असे सांगितले व खरेच थोड्या दिवसांत या सकाम भक्तीचा परिणाम म्हणून तिची तब्येत पूर्ववत झाली. इकडे डॉक्टर ख्रिश्चन यांना साधनेत कुंडलिनी गळ्यापर्यंत चढल्याचा भास (?) होऊन प्राण कंठाशी आला असे वाटू लागले व ते अस्वस्थ झाले. सिव्हिल सर्जनांचे मित्र व हृदयरोगाचे मुंबईचे तज्ज्ञ व प्रख्यात डॉ. टी. एच. तुळपुळे यांचेकडे नेण्याचा सल्ला दिला. इतकेच नव्हे तर तेही मुंबईस जाण्यास तयार झाले. लवकरच डॉ. ख्रिश्चन, सिव्हिल सर्जन डॉ. कुलकर्णी व मी मुंबईस जाण्यास मोटरने निघालो. व वाटेत वज्रेश्वरीसही गेलो. तेथे ख्रिश्चनांनी नित्यानंद स्वामींची संमती मिळवून आम्ही आषाढी एकादशीचे एक दिवस अगोदर मुंबईस पोहोचलो. दुसरे दिवशी एकादशीचे दिवशी डॉ. तुळपुळ्यांनी तपासणी केली व दुसऱ्या दिवशी डॉ. ख्रिश्चनांचा पुनःश्च प्रश्न विचारून व त्यांच्या कुंडलिनी योगाबद्दलच्या वेळी जो त्रास होतो तो लक्षात घेऊन सांगितले ते या शब्दांत : I am not your doctor you have no heart trouble Go to Dr. R.D. Ranade of Nimbal. He will cure you.

यानंतर डॉ. माझ्या मागे लागले व म्हणू लागले की, 'तुम्ही तुमच्या स्मारकांच्या कामासाठी विजापूरला जाता तर मला वाटेत निंबाळला पोचवा.' मी हे कबूल केले व आम्ही दोघे रेल्वेने तेथे रविवारी पोहोचलो. निंबाळचा आश्रम म्हणजे श्रीगुरुदेवांचे जुने घर (१९२५) व १९४२ मध्ये बांधलेले नवे घर, व जवळच ध्यान मंदिराची लहान खोली व त्याला लागून दोन खोल्यांची अतिथींसाठी बांधलेली वास्तू. आम्ही प्रथम त्या अतिथि निवासात गेलो व तेथे श्री. निवासराव दाबडे भेटले. त्यांनी आणि श्रीगुरुदेवांना आम्ही आल्याचे कळविले. १५ मिनिटांत एका सडसडीत बांध्याच्या, मध्यम उंचीच्या, आखूड धोतर व गुल्कीचा साधा सदरा व हिरव्या रंगाची शाल पांघरलेली व एका हातात पिकदाणी व दुसऱ्यात छत्री घेतलेल्या व्यक्तीस वाऱ्यासारख्या जलद चालीने येताना पाहिले व आमच्या खोलीत सुस्मित चेहऱ्याने प्रवेश केला तेव्हाच आम्ही मनोमन जाणले की हेच गुरुदेव असले पाहिजेत. उठून त्यांचे चरणी नमस्कार करतो आहोत तोच त्यांनी आमच्या होल्डाल वगैरे सामानामध्ये आमच्यासह बसून आमचा परिचय करून घेतला. लगेच डॉक्टर साहेबांना मेंदूच्या रचनेबद्दल व मला पुरातत्त्व, शिलालेखा विशेषतः निंबाळ गावातील शिलालेखाबद्दल विचारले. रावबहादूर श्री. के. एन. दीक्षित, निवृत्त पुरातत्त्व विभागाचे डायरेक्टर जनरल यांच्याबद्दल मला विचारले व पुन्हा भेटण्याचे आश्वासन देऊन श्री. श्रीनिवासराव दाबडे यांना आमची काळजी घेण्यास सांगितले.

यानंतर आम्ही अंघोळीस आश्रमापासून दोन फर्लांग दूर असलेल्या ओढ्यावर गेलो. तेथे एका अडवलेल्या पाण्याच्या लहान डोहापाशी गेलो. तेथे २०-२५ लोक स्नान आवरत होते. त्यांनी आमची चौकशी केली व नाम घेण्यास निंबाळला आलात काय असे विचारले व आपणही याचसाठी दूर दूर ठिकाणांहून आल्याचे सांगितले. येथे माझ्या मनात प्रबल विचार आला की, 'वेड्या तू नुसता सोबती (escort) म्हणून इथं आलास, डॉक्टर ख्रिश्चन नाम घेण्यासाठी आलेत आणि तू कोरडाच राहणार?' तेव्हा मी ठरविले की आपणही नाम घ्यायचे पण आपल्याला श्रीगुरुदेवांचा अनुग्रह मिळेल का? डॉक्टरांची आर्तता, साधना व प्रयत्न आपल्यात नाहीत. आपले जीवन आगमाचे, ईश्वर प्राप्तीसाठी निष्काम प्रयत्न केलेला नाही. मनात खळ, मळ, लोभ, ईर्षा, वासना आहेत. मग एकदम विचारांची दिशा बदलली. इथं आपण अशी अंघोळ करू या की, बाह्यांगाऐवजी अंतरंग धुवून काढू. ही निंबाळची गंगा मला अंतरबाह्य निर्मळ करील. असा विचार करून मी निःशब्द, पण एका दृढ निश्चयाने पाण्यात उतरलो. श्रीगुरुदेवांना मनोमन प्रार्थना केली व अंतरंग धुऊ लागलो. खरोखर त्या स्नानानं मी निराळा झालो. वाटू लागले की, श्रीगुरुदेव आपल्यावर कृपा करतील. आम्ही आश्रमाजवळ येत होतो. एवढ्यात विजापूरच्या ऑफिसमधील दोन कर्मचारी येताना दिसले. त्यांना मी पूर्वी कळविले होते की दुसरे दिवशी सकाळी येथून निघून मी तेथे सल्लागार म्हणून बोलावलेल्या मुंबई राज्यातील चीफ इंजिनियर यांची भेट घेईन. पण आमच्या कर्मचाऱ्यांनी सांगितले की सल्लागार म्हणून आलेल्या अधिकाऱ्यांना दुसऱ्या कामासाठी लवकर जावयाचे आहे व म्हणून सकाळी ७॥ वाजता संयुक्त भेट शक्य आहे, या कारणाने आजच आपण विजापूरला चलणे सोयीचे होईल. मला हे पटले व त्याच दिवशी दुपारचे गाडीने मी निघालो. पुन्हा शंकांचे वादळ सुरू झाले. डॉक्टर ख्रिश्चन निंबाळला राहिलेत, त्यांना नामानुग्रह मिळेल, पण तू नामानुग्रहणापासून वंचित राहणार. मनात पुन्हा खळबळ झाली. पुन्हा गुरुदेवांकडे मनःपूर्वक याचना सुरू झाली.

विजापूरचे काम सकाळी १०-११ पर्यंत पार पडले व मी दुपारी १ चे रेल्वेगाडीने निघालो तो ३ वाजता निंबाळ आश्रमात पोचलो. श्रीगुरुदेवांच्या घरातून शिष्यगण बाहेर येत होते. प्रत्येकजण मला विचारीत होते की, तुम्ही नाम नाही घेतलंत, डॉक्टरांनी नाम घेतलं. कुठं गेला होतात? मला एकाने सांगितले की प्रत्यक्ष नाम देण्याचे काम श्री. काकासाहेब कारखानीस करतात व ते आत आहेत. त्यांना मी ओळखत होतो व मी धावत जाऊन त्यांना गाठले. मला पाहून त्यांना आनंद झाला. मी त्यांना कामासाठी विजापूरला गेल्याचे सांगितले. ते लगेच श्रीगुरुदेवांकडे गेले व मी आल्याचे कळविले व नाम आता देऊ का असे विचारले. काकासाहेब बहिरे असल्यामुळे ते जोराने बोलत. मी दाराबाहेरून त्यांचे संभाषण ऐकत होतो. श्रीगुरुदेवांनी हात वर करून 'हो' म्हणून सांगून ते नामस्मरण करण्यासाठी माडीवरील खोलीमध्ये गेल्याचे सांगितले. मग निवांतपणे श्री. काकासाहेबांनी नाम माहात्म्य, श्वासोच्छवासात कसे नाम घ्यावयाचे हे सांगून गुरुमंत्र दिला व तेथे म्हणजे श्रीगुरुदेवांच्या चहाच्या खोलीत नामस्मरण करीत बसण्यास

सांगितले. निंबाळचा ओढा गंगेइतकाच पवित्र आहे व तेथे आंघोळ करणे हे 'महत् भाग्य' आहे. ते महान तीर्थस्थान आहे.

१९५९ साली माझी बदली दिल्लीला मुख्यालयात झाली. तत्पूर्वी श्री. ब्रिजवासी लाल माझे वरिष्ठ विजापूरला आले असता त्यांनीही नामानुग्रह घेतला. दिल्लीत मला त्यांचे घराजवळ सरकारी जागा मिळाली व १९६० पासून एकत्र ध्यान, प्रत्येक रविवारी सुरू झाले ते शक्य तितक्या काटेकोरपणे चालू आहे. सुरुवातीपासून अनेक साधकबंधू जसजसे नोकरी वा कामानिमित्त दिल्लीस येत असत, या साप्ताहिक नामस्मरणासाठी एके ठिकाणी जमत असतात. ज्येष्ठ नामधारक कै. श्री. गणपतराव तुळपुळे, काकासाहेब कारखानीस, रामण्णा कुलकर्णी, मनोहरपंत देशपांडे, दादासाहेब देशपांडे जेव्हा जेव्हा येत तेव्हा तेव्हा त्यांच्या भेटीत आम्हाला त्यांच्या अनुभवाचा लाभ मिळे. श्री. बी. आर. कुलकर्णी व कै. नगरकर यांचा दीर्घ निवास आम्हाला फार उपयोगी आला. अगदी अलीकडे १५ साधकमंडळी अलाहाबाद व दिवाळीत दिल्लीत आली. तेव्हा आमची दिवाळी नामधारकांच्या सहवासात गाजली. श्रीगुरुदेवांच्या कृपेने इथं इतक्या दूर असूनही दिल्लीत निंबाळ गाजत आहे व 'एकमेका साह्य करू, अवघे धरू सुपंथ' या संतोक्तीचा लाभ दुणावत आहे.

माझ्या जीवनाची फुलबाग बहरली आहे. याला कारणं दोन – एक सतत सामुहिक व व्यक्तिगत नामस्मरण व श्रीगुरुदेवांच्या कृपेचा पाऊस. व्यवसायही परमार्थाने उजळला. श्रीगुरुदेवांच्या सर्व ग्रंथांतून तत्त्वज्ञान व अनन्य भक्तीचे जे रसायन मिळते त्यामुळे स्मारकातील शिल्पे, भित्ती चित्रे, प्रत्यक्ष वास्तु, मंदिरे, गुहा, मस्जिद, व चर्च यांचे महत्त्व व त्यांची प्रतिकात्मक (Symbolism) समजू लागली. वेरूळचे कैलास लेणे अद्वैत भक्तीचे प्रतिक आहे हे समजले. श्रीगुरुदेवांनी संकलित केलेल्या ज्ञानदेवांच्या अमृतानुभव या अमोल ग्रंथातील एका ओवीने - 'देव देऊळ परिवारू कीजे कोरूनी डोंगरू । तैसा भक्तीचा व्यवहारु का न व्हावा ॥' शंकराचार्यांच्या जीवनात अद्वैत भक्तीचा सुगंध श्रीगुरुदेवांना प्रतीत झाला. अनुभवला त्यांच्या वाराणसी येथील आश्रमात जेव्हा त्यांनी 'भजगोविंदम् भजगोविंदम्' चा घोष तेथील संन्यासी करत असताना ऐकले तेव्हा. कैलास हे एकसंध (Monolithic) लेणे, ज्यात मंदिर, गर्भगृहातील शिवलिंग, शिल्पे, भक्त सर्व जणू एकरूप झाले आहेत जसे 'जळ जैसे जळी'. हा अद्वैत भाव 'सर्व खलु ब्रह्म' एकाश्म लेणीत साकारला आहे.

श्री. गुरुदेवांच्या 'भगवद्गीता - as a philosophy of God Realisation' या ग्रंथात प्रो. रुडाल्फ ओटो या जर्मन तत्त्वज्ञानाच्या एका सिद्धांताचे विवरण व जोरदार समर्थन केले आहे. भव्योदात्त व दिव्य या भावाची प्रचिती जेव्हा आपण भव्य मंदिरे, चर्च, वा तत्सम वास्तू पाहतो तेव्हा होते व तेव्हा आपले 'कर तेथे जुळतात'. सत्यम् शिवम् व सुंदरम् आणि भव्योदात्त व दिव्य मग ते वास्तूत असो, निसर्गात असो वा भगवद्गीता सारख्या ग्रंथात वा कोणत्याही उदात्त (Sublime) विचारांत, संगीतात, कल्पनेत.

जयगुरु जयगुरु जयगुरु.

**प्रा. मधुसूदन नरहर देशपांडे**
डी २५, प्रेस एनक्लेव्ह, साकेत, न्यूदिल्ली ११००७६.

# श्रीगुरुदेव आठवण - साठवण

**सौ. शालिनी गोखले**

*बी.ए. (ऑनर्स). मराठी व संस्कृत. स्फुट लेखन व कविता.*

एकोणीसशे चोपन सालची गोष्ट आहे. महिना नक्की स्मरत नाही. मी कॉलेजमधून घरी आले तर घर उत्साहाने भरून गेलेले. तेवढ्यात आमचे तात्या, म्हणजे माझे वडील समोर आले. त्यांच्या आनंदाला तर नुसतं उधाण आलं होतं. ते म्हणाले, 'गुरुदेव रामभाऊ रानडे आता आपल्याकडे येणार आहेत.' त्या दिवसाचे प.पू. गुरुदेवांचे दर्शन अजून डोळ्यांसमोर आहे. पगडी, उपरणे, कोट, धोतर, डोळे तेजस्वी पण अनंतात कुठेतरी दृष्टी असावी. चेहऱ्यावर करारीपणात झाकलेली प्रसन्नता. 'दर्शनमात्रे मनकामना पूर्ती' असे शब्द आपण देवाच्या आरतीत वापरतो. पण हे गुरुदेवांचे दर्शन मनकामना पूर्तीच्या पलीकडील काहीतरी मला पुढील आयुष्यात देऊन गेले.

माझे वडील बरेचदा त्यांच्या नावाचा रामभाऊ म्हणून उल्लेख करीत. त्याचे एक कारण म्हणजे, पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमधील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक श्री. न. ग. दामले हे माझ्या वडिलांचे शाळासोबती. ते सांगलीला आमच्या घरी वरचेवर येत. गुरुदेव रानडे हे त्यांचे मामा. त्यामुळे त्यांच्या बोलण्यात गुरुदेवांचा उल्लेख 'रामभाऊ' म्हणून होत असे.

१९०९ साली पुण्यास गुरुदेव जास्त आजारी होते. तेव्हा माझे वडील मॅट्रीकच्या अभ्यासाकरिता पुण्यास राहिले होते व श्री. दामल्यांच्या सांगण्यावरून ते वरचेवर गुरुदेवांकडे जात. थोडीफार शुश्रुषा करण्याचे भाग्य त्या वेळी त्यांना लाभले. तेव्हा पुढे हेच आपले पारमार्थिक सद्गुरु होणार असल्याची पुसटशी भावनाही त्यांच्या मनात उद्भवली नव्हती. परंतु संतसंग, संतसेवा वाया थोडीच जाणार ! वयाची साठ वर्षे प्रपंचाचा गाडा ओढल्यावर १९५५ साली आमच्या तात्यांना नाम मिळाले. त्याचीही हकिगत माझे वडील मोठ्या रंगांत येऊन सांगत. श्रीअंबुराव महाराज असेपर्यंत श्रीगुरुदेवांनी कोणास नाम दिले नाही. परंतु त्यांच्या पश्चात श्रीगुरुदेव नाम देत असत ते श्री. काका कारखानीस अथवा काकासाहेब तुळपुळे यांच्या करवी. आमचे तात्या, माझे वडील जेव्हा नाम मिळावे म्हणून निंबाळला गेले. तेव्हा सकाळी तयार होऊन निघाले असताना प. पू. गुरुदेव दारात उभे असलेले त्यांना दिसले. श्रीगुरुदेवांनीही खूण करून त्यांना बोलावून घेतले व सांगितले की रोज जी रामनामाची धून तुम्ही म्हणता त्यातीलच एक छोटे नाम तुम्हाला दिले आहे. प्रत्यक्ष गुरुदेवांनीच नाम दिल्याची ही पावती मिळाल्याने ती. तात्यांना कृतकृत्य वाटले.

पुढे माझ्या वडिलांच्या जीवनात अनेक चढउतार आले. जिवावरच्या, ब्रेन ट्यूमरसारखे निदान झालेल्या दुखण्यातून ते गुरुकृपेने बरे झाले. त्याची हकीगतही नवलाईचीच आहे. सांगलीजवळील मिरजेच्या मिशन हॉस्पिटलमध्ये ब्रेन ट्यूमरचे निदान झाल्यावर माझ्या वडिलांना वेलोरला न्यावे लागले. माझे मोठे तीन भाऊ व आई त्यांच्याबरोबर गेले. परका प्रांत, परकी भाषा त्यात ट्रीटमेंट ज्यांची घ्यायची तो मोठा डॉक्टर मायदेशी इंग्लंडला रजेवर गेलेला. तीन आठवडे असेच गेले. तो आल्यावर त्याने तपासून ऑपरेशन लगेच करणे जरूर आहे, असे सांगितले. त्या काळी म्हणजे १९५७ मध्ये मेंदूच्या ऑपरेशनमधून बरे होणाऱ्या लोकांची संख्या ४ टक्के असे. माझी आई मनातून खूप घाबरली होती. हॉस्पिटलमधील खोलीत तिच्याशिवाय कोणास थांबण्यास परवानगी नव्हती. रात्री परमेश्वराची प्रार्थना करत होती आपल्या सौभाग्याकरिता. दुसरे दिवशी सकाळी ऑपरेशन. रात्री जरासा तिचा डोळा लागला व प. पू. गुरुदेव स्वप्नात आले व म्हणाले, 'बाई, काळजी करू नये. आपल्याला चांगले घरी जायचं आहे. सांगलीला.' आणि तिला जाग आली. तिचा आनंद गगनात मावेना. झोपेची गोळी देऊन झोपवलेल्या वडिलांना तिने हलवून हलवून सांगितले 'सदगुरु सारखा असता पाठीराखा'. आश्चर्याची गोष्ट अशी की सर्व प्रक्रिया होऊन ऑपरेशन टेबलवर घेतल्यावर डॉक्टरांचा निर्णय फिरला. I have to think again for this old man म्हणून डॉ. चांडीनी त्यांना परत खोलीत पाठविले व पुढे नुसत्या औषधी योजनांवर, ऑपरेशन करावे न लागता माझे वडील बरे झाले. ही १९५७ च्या जूनमधील हकिगत. चार दिवसांत प. पू. गुरुदेव सद्गुरुचरणी विलीन झाल्याचे पत्र सांगलीच्या घरी आले होते. माझ्या वडिलांच्या पारमार्थिक जीवनाचा पुढे उत्कर्षच होत गेला. त्या वेळी प. पू. गुरुदेव देहाने नसले तरी आपल्या या शिष्याला त्यांनी अनेक अनुभव देऊन समृद्ध केले. दररोज सकाळी कापूर लावून 'जयगुरु जयगुरु' म्हणत तात्यांचे तल्लीन होणे त्यांच्या नातवंडांच्याही अजून स्मरणात आहे. अनुग्रहानंतर त्यांना मिळालेले सर्व आयुष्य गुरुसेवा म्हणून अध्यात्म विद्या मंदिराचे काम करण्यात व आपल्या पारमार्थिक साधनेत व्यतीत करून आमचे तात्या वयाची १०० वर्षे पूर्ण करून मोठ्या आनंदात श्रीगुरुचरणी विलीन झाले.

आतापर्यंत आठवणींच्या रूपाने प. पू. गुरुदेवांचे साहचर्य देणाऱ्या चार प्रमुख व्यक्ती माझ्या जीवनात आल्या. माझ्या पूर्वायुष्यात माझे वडील व त्यांचे मित्र प्रो. दामले, श्री. तात्यासाहेब दामले बरेचदा सांगलीला आमच्या घरी यायचे ह्याचा वर उल्लेख आलाच आहे. प. पू. गुरुदेवांचा कष्टाचा नेम, त्यांचा अलाहाबाद युनिव्हर्सिटीने केलेला गौरव, प्रकृती कधीच बरी नाही पण नेम कधीच चुकला नाही अशी त्यांची वृत्ती, त्यांचा तत्त्वज्ञानाचा अभ्यास अशा संबंधी बऱ्याच गोष्टी ते सांगत. त्यातली कायम माझ्या लक्षात राहिलेली हकिगत म्हणजे एम.ए.च्या परीक्षेत परीक्षकांनी त्यांच्या पेपरवर Examinee knows better than examinar (परीक्षा देणाऱ्यास परीक्षकांपेक्षा जास्त समजते आहे.) असा शेरा लिहिला. अर्थात् त्या परीक्षेत गुरुदेव पहिल्या श्रेणीत पहिल्या नंबराने पास झाले हे सांगणे नकोच. हे लक्षात राहण्याचे मुख्य कारण म्हणजे मी त्या वेळी बी.ए.ची परीक्षा देत होते. परीक्षेसाठी मराठी (Hons) व संस्कृत असे विषय घेतले होते. परीक्षेला महिना असताना माझी प्रकृती ढासळली. मला रोज ताप येऊ लागला. १५ दिवस असेच गेले. अभ्यास झाला असला तरी

आत्मविश्वास ढासळला. संस्कृतला आम्हाला पूर्ण भगवद्‌गीता अभ्यासाला होती. प्रो. दामले त्या वेळी आमच्याकडे आले होते.

तेव्हा ते म्हणाले, 'तू गुरुदेवांचे गीतेवरील पुस्तक वाचले आहेस का?' अर्थात्‌ त्यावेळेचा माझा गीतेचा अभ्यास परिक्षार्थीच होता तेव्हा माझा नकारच होता.'हरकत नाही. तू तीन शब्द लक्षात ठेव. Detachment Dedication & devotion (अनासक्ती, विरक्ती आणि भक्ती) हे तीन शब्द केंद्रबिंदू ठेवून सर्व प्रश्नांची उत्तरे लिहावयाची. प. पू. गुरुदेवांच्या तत्त्वज्ञानाचे सुवर्णकण गवसल्याचा आनंद पुढे केव्हातरी माझ्या लक्षात आला.

प. पू. गुरुदेवांच्या The constructive survey of the Upanishadas या त्यांच्या ग्रंथाने जगातल्या सगळ्या तत्त्वज्ञान्यांची दृष्टी भारताच्या या सुपुत्राकडे खेचली गेली. त्या वेळी आपल्या प्रकृतीच्या कारणास्तव प. पू. गुरुदेवांनी डी.ई.सोसायटीच्या पदाचा राजीनामा दिला होता. तेव्हा अलाहाबाद विश्वविद्यालयाचे कुलगुरु व प्रसिद्ध संस्कृतज्ञ डॉ. गंगानाथ झा यांच्या वाचनात वरील ग्रंथ आल्यावर ते त्या ग्रंथावर इतके भाळले की आपल्या विद्यापीठात प्रो. रानडे यांना आणावयाचेच असा त्यांनी दृढ निश्चय केला. त्यांनी श्रीगुरुदेवांना अनेक विनंतीपत्रे पाठविली व शेवटी असे कळविले की आपण एकही व्याख्यान नाही दिले तरी आमच्या विद्यापीठाच्या यादीवर आपले नांव पाहिजे. त्याने विद्यापिठाचा मान वाढणार आहे. आपल्या प्रकृतीला अलाहाबादची हवा मानवेल किंवा नाही, एवढाच प्रश्न गुरुदेवांनी उपस्थित केला होता. पण अन्तःप्रेरणा मिळाल्यावर श्रीगुरुदेवांनी होकार कळविला. अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे भाग्य उजळले आणि महाराष्ट्र मात्र एका तत्त्वज्ञ संताला काही वर्षासाठी तरी मुकला. श्रीगुरुदेवांच्या 'हिंदी संतांचा साक्षात्कार मार्ग' या पुस्तकात एक दोहा घेतलेला आहे.

*'हरिदरिया सुभर भरा । साधोका घटपीस ॥*
*तामे मोती निपजे । चढे देशावर दीप ॥*

(परमेश्वर रूपी समुद्र चोहोकडे भरला आहे. त्यात साधूंचे अंतःकरणरूपी शिंपला असून त्यात (साक्षात्काराचा) मोती निर्माण होतो पण त्याचे मोल मात्र अन्य देशांत होते) असो.

प. पू. गुरुदेवांच्या जीवनाचे अनेक पैलू उकलून दाखवणारी तिसरी व्यक्ती म्हणजे त्यांचे चरित्रकार डॉ. शं. गो. तुळपुळे. माझ्या वडिलांचे मित्र श्री. तात्यासाहेब पाटणकर यांच्याकडे शुक्रवारी सत्संगासाठी अनेक गुरुदेवप्रेमी मंडळी जमत. त्यांत डॉ. तुळपुळे पण येत असत. आम्ही पुण्यात आल्यावर माझ्या गाठी असलेल्या माझ्या वडिलांच्या पुण्याईने व गोखल्यांच्या नामाभिधानाने मला ह्या सत्संगासाठी बरेचदा हजर रहावयास मिळाले. त्या वेळी डॉ. तुळपुळे, गुरुदेवांचे तत्त्वज्ञान, त्यांनी दिलेले नाम, निंबाळच्या श्रावण सप्ताहाची प्रथा व तेथील कट्टाचा नेम, भजन वगैरे संबंधी मोठ्या आत्मीयतेने बोलत असत. त्यातल्या काही आठवणी मनात रुजल्या. ऐन तरुण वयात गुरुदेवांना क्षयाची बाधा झाली. प्रकृती खूपच ढासळली. तरी त्यांची आई त्यांना पहाटे उठवे व सांगे, 'रामू नेमाची वेळ चुकवू नको. थोडा नेम झाल्यावर पुन्हा झोप.' गुरुदेव पुढे बरेचदा सांगत. म्हणे की माझ्या आईने माझ्या परमार्थाची जास्त काळजी केली. गुरुदेव मातृभक्त होते. तसेच कोणी तत्त्वज्ञानासंबंधी नुसतेच जास्त प्रश्न विचारू लागल्यास ते सांगत, 'हा कडबा कशाला चघळता. त्यापेक्षा नाम घ्या.' अशा अनंत छोट्या-मोठ्या गोष्टी. एकदा प. पू. गुरुदेव अलाहाबादहून निंबाळला जाताना पुण्यात उतरले होते. गाडी रात्री १० वा. ची होती. ९॥ च्या सुमारास त्यांनी डॉ. तुळपुळ्यांना एक औषध आणावयास सांगितले. सर्व दुकाने बंद झालेली. ह्यांनी ओळख काढून दुकान उघडावयास लावून औषध आणून गाडीवर पोहोचविले. प. पू. गुरुदेव म्हणाले, 'वा ! छान ! पण औषधाने दुखणी बरी होत नसतात' म्हणून बाटली बाजूस ठेऊन दिली. शिष्याच्या गुरुसेवेविषयीची तत्परता पाहिली असणार.

ह्या सर्व त्यांच्या लौकिक जीवनातील आठवणी. परंतु खरे गुरुदेव, त्यांची गुरुभक्ती, त्यांचा नेम, त्यांची नामनिष्ठा, त्यांना झालेला साक्षात्कार, त्यांचे अनुभव, ह्या सर्व गोष्टी त्यांच्या मतितार्थासह आमच्या पर्यन्त पोहोचल्या त्या कै. पू. बाबा बेलसरे यांच्या प्रवचनांतून. सद्‌गुरु ब्रह्मचैतन्य महाराज गोंदवलेकर यांचे प्रा. के. वि. उर्फ बाबा बेलसरे हे अंतरंग शिष्य. प. पू. श्रीमहाराजांनीच ती. बाबांना मुद्दाम गुरुदेवांकडे भेटावयास पाठविले होते. त्यांच्या प्रवचनात गुरुदेवांच्या तत्त्वज्ञानाचा, नामनिष्ठेचा उल्लेख झाला नाही असे क्वचितच घडे. इतकेच काय आपल्या साधनास सुद्धा गुरुदेवांच्या नामनिष्ठेचा उपयोग झाला असे ते सांगत. कट्टाचा नेम म्हणजे गुरुदेवांना काय अभिप्रेत आहे हे ती. बाबांनी बरेचदा प्रवचनांतून विषद केले. सद्‌गुरुंकडून मिळालेले नाम याला प. पू. गुरुदेव 'सबीज' नाम म्हणत. कारण साधन व गुरुकृपा यांच्या योगे अशाच नामाचा उपयोग परमार्थवृक्ष वाढण्यासाठी होतो व अशाच नामाने देवाची प्रचिती येते. म्हणून या नामाचे अखंड व सतत स्मरण करणे हेच खरे साधन होय. प्रत्येकाने रोज कमीत कमी तीन तास नेम (नाम घेणे) करावा व शक्यतो वेळ ठराविक असावी. माळेने नेमाला मदत होत असेल तर ती जरूर वापरावी. ज्या आसनावर बसले असता नामस्मरण उत्तम होईल ते आसन वापरावे वगैरे गोष्टी नवीन साधकांसाठी प. पू. गुरुदेवांनी स्पष्टपणे सांगून ठेवल्या.

माझ्या माहेरी गुरुदेवांनी दिलेल्या नामाची उपासना होती, आहे. त्यायोगे श्रीगुरुदेवांचे दर्शन झाले. त्या दर्शनाचे फळ म्हणून सद्‌गुरुंची उपासना असणारे सासर मला मिळाले. श्रीसद्‌गुरु ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांची उपासना आज चार पिढ्या आमच्या गोखले घराण्यात सुरू आहे. गुरुदेवांची चुलत बहीण यमनाक्का म्हणजे माझ्या चुलत सासुबाई अर्थात मी त्यांना प्रत्यक्ष पाहिलेले नाही. 'मोठ्या वहिनी' म्हणून आमच्या घरी त्या ओळखल्या जात. माझे वडील व माझ्या माहेरची केळकर कुटुंबीय मंडळी जितक्या प्रेमाने निंबाळला जातात तितक्याच प्रेमाने गोंदवल्यास येतात. दोन्ही पंथातील नामनिष्ठाच याला कारण आहे. आमचे महाराज म्हणत 'गुरुतत्त्व एकच आहे, फक्त नामे निराळी.'

प. पू. गुरुदेव व माझे सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य महाराज दोघे माझ्या आयुष्यात आले. किंबहुना श्रीगुरुदेवांनी मला श्रीमहाराजांच्या स्वाधीन केले ही माझी पूर्वजन्माची कमाई की पितृवारसा काही असो पण त्यांनी दिलेला नामाचा वसा वाढता राहो हीच माझ्या सद्‌गुरुंच्या चरणी व श्रीगुरुदेवांच्या चरणी नतमस्तक होऊन प्रार्थना.

**सौ. शालिनी गोखले**
धरती अपार्टमेंट, प्रभात रस्ता, पुणे ४११००४.

# गुरुकृपा उषा उजळली

**श्री. वामनराव कुलकर्णी उपळेकर**

*१९५३ साली गुरुदेवांकडून नामोपदेश, परमार्थामार्गावर वाटचाल - साधक*

'दि कन्स्ट्रक्टिव्ह सर्वे ऑफ उपनिषदिक फिलॉसफी' या नावाचा प. पू. गुरुदेव आर. डी. रानडे यांचा एक ग्रंथ १९२६ साली प्रसिद्ध झाला. त्या ग्रंथाचे मराठी भाषांतर १९५३ साली 'उपनिषद् रहस्य' या नावाने माझ्या वाचनात आले. विषय अवघड असूनही सुरस व सुलभ लेखन शैलीमुळे मला तो ग्रंथ फार आवडला. त्याच वेळी ग्रंथ प्रसिद्धीच्या सुमारास छापला गेलेला वरील इंग्रजी ग्रंथावरील अभिप्राय जुन्या केसरीत वाचावयास मिळाला. अभिप्राय केसरीचे संपादक साहित्य सम्राट न. चिं. केळकर यांनी लिहिलेला होता. तो खालील प्रमाणे होता -

'लोकमांन्यानी गीतारहस्य लिहून आर्यांच्या अध्यात्ममूल नैतिक जीवनाची ओळख पाश्चात्यांना करून देण्याची सोय करून ठेवली आहे. ज्या आधुनिक, ऐतिहासिक पद्धतीकडे व दृष्टीकडे गीतारहस्याचे मातृत्व आहे त्याच पद्धतीकडे व दृष्टीकडे प्रो. रानडे यांच्या उपनिषद रहस्य या ग्रंथाचे मातृत्व आहे. पाश्चात्यांच्या तत्त्वज्ञानाचे उत्कृष्ट अध्ययन करून त्यांच्याच प्रक्रियेत व परिभाषेत उपनिषदांच्या तत्त्वज्ञानाची मांडणी करणारा लेखक यशस्वी होऊ शकेल. प्रा. रानड्यांसारख्या तात्त्विक कारागिराने उपनिषदाच्या खाणीत इतस्ततः विखुरलेल्या सत्त्वरूपी अभिजात रत्ने, हिरे, मोती, माणिक वगैरेतून पाश्चात्यांच्या नयनाला भुरळ पाडील अशी चित्ताकर्षक वाग्वैजयंती निर्माण केली. ही गोष्ट महाराष्ट्राला जितकी अभिमानास्पद तितकीच हिंदुस्तानची मर्यादा ओलांडून याचा परिमल जगात पसरविण्यास कारणीभूत होईल...''

'विधायक समालोचना म्हणून या ग्रंथाला संबोधले आहे. स्वतःचे अनुकूल किंवा प्रतिकूल ग्रहापासून समालोचना अलिप्त राहावी म्हणून उतारे देऊन स्वतंत्र ग्रंथरचना केली आहे. परंतु तसे करताना ग्रंथकर्त्याचे उपनिषदाच्या रहस्याबद्दल काय मत आहे या विषयी वाचकांना संदेह राहू नये असे रचनाकौशल्य दाखविले आहे.'

'त्यामुळे पानांआडून जशी कळी, आंब्याचे डहाळीमागून जसे कोकिल कूजित, दाराआडून जसे बालकाचे रम्य वदन, ढगाआडून ज्याप्रमाणे चांदोबा किंवा क्षितिजाआडून ज्याप्रमाणे रविबिंब त्याप्रमाणे तीनशे पानाच्या या वाङ्मयाआडून लेखकाचे आत्मानुभूतीचे विधायक तत्त्वज्ञान डोकावते....'

'श्री. रानडे यांची लेखनशैली ओजस्वी असून परिभाषेवर प्रभुत्वही अप्रतिम आहे. उपनिषदे आधीच काव्यमय आहेत व त्यात पाश्चात्त्य काव्यातील उताऱ्याची मार्मिक भर घातली आहे. मधून मधून तुलनात्मक तत्त्वज्ञानाची शीतल झुळूक मनास उल्हसित करते. आधीच उपनिषदाचे अवीट अमृत व तेही सुवर्णाचे पानातून वाढल्यामुळे त्याची गोडीच काही निराळी झाली आहे.'

वरील अभिप्राय वाचल्यानंतर व ग्रंथ वाचनानंतर माझ्या मनात पू. गुरुदेवांच्याबद्दल नितांत आदर निर्माण झाला व त्यांच्या दर्शनाची अतीव उत्कंठा निर्माण झाली. माझे मेव्हणे (पत्नीचे बंधू) श्री. बापुराव कुलकर्णी निंबाळास जात असत. त्यांच्याकडून मला निंबाळची माहिती ऐकावयास मिळत असे. परंतु प्रत्यक्ष दर्शनाचा योग अद्याप आला नव्हता.

१९५३ च्या श्रावण सप्ताह समाप्तीस मी प्रथम निंबाळास गेलो. संपूर्ण श्रावण महिना निंबाळास राहून महिनाभर साधन करण्यासाठी सोलापूरचे बरेच साधक जात असत. श्रावणात महिनाभर रोज पहाटे ३ ते ५॥, सकाळी ८ ते १२, दुपारी २॥ ते ४ व सायंकाळी ७ ते ८ असा कमीत कमी नऊ तासांचा अत्यावश्यक नामस्मरणाचा कार्यक्रम सर्वांनी एकत्र बसून चालत असे. त्याशिवाय पहाटे काकड आरती, भूपाळ्या व सकाळ, दुपार आणि रात्री दासबोध व मनाच्या श्लोकाचे वाचन व नंतर भजन या प्रमाणे चार वेळा सर्वांनी मिळून करण्याचा कार्यक्रम चालत असे. दिवसातून केव्हा तरी एकदा किंवा दोनदा प. पू. गुरुदेव सर्वांना बोलावून घेत. त्या वेळी संतांची पदे म्हणणे, श्री. भाऊसाहेब महाराजांची पत्रे वाचणे वगैरे चर्चा चालत असे.

प. पू. गुरुदेवांचे दर्शन घ्यावे व भाग्यवशात मिळाल्यास नामोपदेश घ्यावा या हेतूने श्रावणसप्ताह समाप्तीच्या सुमुहूर्तावर जाण्याचे ठरवून गेलो. एका चौसोपी वाड्यात संतसभा भरली होती. चारी सोपे संतमंडळींनी भरून गेले होते. मधल्या चौकातही दाटीदाटीने मंडळी बसली होती. बैठकीत बसलेल्यांपैकी बरेच जण संपूर्ण श्रावण महिना राहून साधन, सत्संग व सद्गुरुसानिध्य यांचा आनंद घेतलेले होते. बरीच गर्दी असल्यामुळे मी दाराशीच पिशवी ठेवून बसलो.

समोर उत्तराभिमुखी भिंतीत काचेच्या कपाटात प. पू. भाऊसाहेब महाराज यांचा फोटो होता. तसाच फोटो खाली चौरंगावर होता. व मध्ये पू. श्री. अंबुराव महाराज यांचा फोटो भिंतीवर बसवला होता. प. पू. गुरुदेवांचा फोटो कोठेच नव्हता. फोटोच्या उजव्या बाजूला भगव्या कपड्यात एक संन्यासी बसले होते. त्यांच्या शेजारी पांढरा शुभ्र सदरा व धोतर अशा पोषाखात प. पू. गुरुदेव बसले होते. सदऱ्याच्या गुंड्या लावलेल्या नव्हत्या. भिंतीला न टेकता पुढेच मांडी घालून बसले होते व त्यांच्या उजवीकडे सांगलीचे युवराज सुटात अदबीने बसले होते.

प. पू. गुरुदेवांची गौर काय शरीरयष्टी कृश व किरकोळ असली तरी एकंदर हालचालीत उत्साह व चापल्य होते. भपका, दांभिकपणा मुळीच नव्हता. अतिशय नम्र पण तेजस्वी असे ते व्यक्तिमत्त्व होते. विनोदी व आनंदी वातावरण ठेवण्याकडे त्यांचा कटाक्ष होता. त्यांच्या प्रत्येक शब्दात, दृष्टीत व कृतीत त्यांचे अध्यात्मिक तेज ओसंडत होते. त्यावरून तेच गुरुदेव असले पाहिजेत हे मी ताडले.

मधल्या चौकात बसलेले तुकाराम सुतार नावाचे प. पू. भाऊसाहेब महाराजांचे शिष्य एक पद म्हणत होते. ते पद असे होते –

*सद्‌गुरुचरण वंदुनि शीरि । सद्‌गुरुकृपा वृढ धरी ।*

*मज दाखविले गुरुदेव हरी ॥धृ.॥१॥*

*नामस्मरण ठरवुनि मनी । झणझण झणझण वाजे हरी ॥२॥*

*अंतरी ध्यान बाहेरी रूप । दृश्यांतीत दिसे हरी ॥३॥*

*ज्योतिप्रकाशे नाचत आहे । भानुप्रकाशे खेळे हरी ॥४॥*

*माझ्या दारी नवलग झालो । झगमग झगमग डोले हरी ॥५॥*

*सगुण मूर्ति समा दृष्टी । भक्तांची वाट पाहे हरी ॥६॥*

*विठ्ठल रखुमाई स्थापुनि मूर्ति । उमदीवासी भजन करी ॥७॥*

ते पद प. पू. भाऊसाहेब महाराजांच्या एका शिष्यानेच रचले होते. महाराजांसंबंधीच होते. महाराजांनी ऐकलेले होते व गाणारी व्यक्ती महाराजांना पाहिलेली होती. त्यामुळे गुरुदेव त्या व्यक्तीला श्री महाराजांसंबंधी अनेक प्रश्न आतुरतेने व उत्सुकतेने विचारत होते. महाराज गाय कोठे बांधत असत? महाराज रानात नेमास कोठे कोठे जात असत? ज्या ठिकाणी महाराजांनी १८ वर्षे उभे राहून रात्री १२ ते २ वाजेपर्यंत नेम केला ती जागा कोणती? असे एक ना दोन. अनेक प्रश्न विचारताना गुरुदेवांचा चेहरा आनंदाने फुलत होता. आपल्या सद्‌गुरुंबद्दल किती विचारू, किती ऐकू असे त्यांना झाले होते. सर्व संतमंडळी सर्वांगाचे कान करून व सद्‌गुरुमय झालेल्या गुरुदेवांचा चेहरा हृदयात साठवीत ऐकत होती. गुरुदेवांचे डोळे मधून मधून आनंदाश्रुंनी भरून येत होते.

मला नारदाची आठवण झाली. नारदाने भगवंताला विचारले, 'देवा तुमचा मुक्काम कोठे असतो?' भगवंतांनी उत्तर दिले, 'नाहं वसामि वैकुंठे । योगिनां हृदये रवौ । मद्‌भक्ताः यत्र गायन्ति । तत्र तिष्ठामि नारद ॥' नारदा, मी वैकुंठात नसतो. योग्यांच्या हृदयात नसतो. सूर्यावर नसतो पण जेथे माझे भक्त गुणगान करतात तेथे मी उभा असतो. येथे तर प्रत्यक्ष सद्‌गुरुचा महिमा वर्णिला जात होता. सद्‌गुरु देवापेक्षाही श्रेष्ठ.

*गुरु गोविंद दोऊ खडे । कांके लागू पाय?।*

*बलिहारी गुरु आपकी । गोविंद दिया दिखाय ॥*

कबीर म्हणतात, गुरूने देव दाखविला म्हणून गुरु देवापेक्षाही श्रेष्ठ होत. एकंदर वातावरण स्वर्गीय होते. स्वर्ग जर भूतलावर कोठे असेल तर तो येथेच. येथेच येथेच असे मिर्झा गालीब याने म्हटले आहे.

*अगर फिर्दोष बरुये जमीनस्त ।*

*हमीनस्त, हमीनस्त हमीनस्त । हा शेरही आठवला.*

*ऐसी संतांची महिमा । बोलिजे तितुकी उणी उपमा ।*

*जयांचे नि मुख्य परमात्मा । प्रगट होय ॥* दासबोध

वरील तुकाराम सुतार यांनी म्हटलेले पद ऐकिल्यावर माझ्या देवाबद्दलच्या व परमार्थाबद्दलच्या कल्पनांना धक्का बसला. माझी भक्तीची कल्पना काय होती? माझ्या लहानपणी, आमच्या घरी, खेडेगावात, रात्री, कामधाम जेवण आटोपून शेतकरी मंडळी पोथी ऐकण्यास येत असत. आमच्याकडे रामविजय, हरिविजय, भक्तिविजय, पांडवप्रताप, नवनाथ भक्ती कथासार वगैरे बऱ्याच सर्व पोथ्या वाचल्या जात. मी स्वतः दहा वर्षांचा असताना रामविजयाचे पारायण तीन दिवसांत करून तिसऱ्या दिवशी रात्री स्नान करून पोथी उशास घेऊन झोपत असे व पोथीत लिहिल्याप्रमाणे मला स्वप्नात मारुती दर्शन होत असे. आमच्याकडे हस्तलिखित ज्ञानेश्वरी होती. आमच्या पणजोबांनी हाताने लिहिलेली. ती मला समजत नसे. माझे काका फलटणचे कै. गोविंद महाराज उपळेकर यांना भेटण्यास गेल्या वेळी त्यांनी मागितल्यावरून ती ज्ञानेश्वरी त्यांना नेऊन दिली. ते ज्ञानेश्वर भक्त होते. त्यांनी ज्ञानेश्वरीच्या प्रत्येक अध्यायावर एक स्वतंत्र पुस्तक लिहिले आहे. या शिवाय इतर अनेक भक्तिग्रंथ लिहिले आहेत. निंबाळास जाण्यापूर्वी मी पू. काकांचे दर्शन घेतले व मी निंबाळास प. पू. गुरुदेवांकडे जाणार असल्याचे सांगितले. त्यांना आनंद झाला. 'जरूर जा.' ते म्हणाले. 'मलाही त्यांच्याकडे एकदा जावयाचे आहे' असेही म्हणाले. तात्पर्य पोथी-पारायणे, उपास-तापास हीच माझी भक्तीची कल्पना होती.

पदातील कल्पना काय होत्या? मी सद्‌गुरुंना शरण गेलो. त्यांची कृपा संपादन केली. त्यांनी मला देव दाखवला. माझ्या मनात दिव्यनाम रुजवले. मी अंतरात ध्यान करत होतो पण देव मला बाहेर दिसत होता. तो दृश्यातीत होता. ज्योतिरूपाने नाचत होता. भानुप्रकाशात खेळत होता. माझ्यापुढे झगझगाट आहे. मला देवाचा झणत्कार ऐकू येत आहे. सगुण रूपातील देव सद्‌गुरु रूपाने देवाचे समसमान रूप पहात. भक्तांची संतमंडळी वाट पहात आहे व उमदीकर महाराज विठ्ठल रखुमाईची मूर्ती स्थापून निंबर्गी महाराजांच्या समाधीपुढे भजन करीत आहेत. असा प्रत्यक्ष अतिंद्रिय अनुभव संतमंडळी अनुभवत होती.

पद म्हणून झाले. नंतर भजन झाले. आरती झाली. प्रसाद वाटण्याचे काम चालू होते. मला प. पू. गुरुदेवांना भेटणे जरूर होते. मी एकटाच आलो होतो. माझी त्यांच्याशी ओळख करून देण्यास कोणीच नव्हते. श्री. बापूराव कुलकर्णी, आर. एम. एस. खात्यात नोकरीवर गेले होते. त्यांच्या प्रेमानेच मला निंबाळास आणले होते. पण आज ते माझ्याबरोबर नव्हते. आता काय करायचे? Fools rush in where Angels fear to trade अशी इंग्रजी म्हण आहे. 'जेथे जाण्यास देवता भितात तेथे मूर्ख बेधडक घुसतात.' मी ठरवले ! अज्ञानामुळे जर फायदा होत असेल तर शहाणपण दाखवणे हा वेडेपणा आहे. Where ignorance is blissed it is folly to be wise मी उठलो. मनातल्या मनात प. पू. गुरुदेवांची प्रार्थना केली. क्षमा मागितली व सर्वांमधून जावून समोरच्या सोप्यावर असलेल्या प. पू. भाऊसाहेब महाराजांच्या फोटोला साष्टांग नमस्कार घातला व प. पू. गुरुदेवांच्या पायांवर डोके ठेवले. त्यांनी हातानी खूण करून अभय दिले, आशिर्वाद दिला. गुरुमाऊली रागावली नाही. अन्यथा त्यांना नमस्कार केलेला आवडत नसे. ते रागावत. महाराजांना नमस्कार करा. मला करू नका असे म्हणत. पण मला रागावले नाहीत. प्रथमच माझ्याकडून त्यांनी महाराजांना नमस्कार करून घेतला होता. मी त्यांच्या जवळच बसलो. मला प्रेमाने जवळ येऊन म्हणाले,

'तुम्ही नाशिकचे शिंत्रे का?'

नाशिकचे शिंत्रे नावाचे एक वृद्ध गृहस्थ त्यांच्याकडे स्टेनोचे काम करत असत व मी त्यांचाच मुलगा असे त्यांना वाटले असावे.

मी म्हणालो, 'नाही. मी कुलकर्णी. सोलापूरचा आहे.'

'तुम्ही इकडे कसे काय आलात?' त्यांनी विचारले.

'माझे मेव्हणे इकडे येतात.' त्यांनी मला सांगितले.

'कोण तुमचे मेव्हणे? कुमठेकर का? मसलेकर का? अग्निहोत्री का? औरंगाबादकर कां?' अशी ५/६ नावे फटाफट घेतली.

मी म्हणालो, 'नाही. त्यांचे नाव बापूराव कुलकर्णी आहे.' त्यावर विचारात पडल्यासारखे करून म्हणाले, 'कोण बरे हे बापूराव कुलकर्णी? माझ्या काही लक्षात येत नाही.' इतके झाल्यावर सभा संपली व सर्वजण उठले.

माझ्या लक्षात आले की नाम देण्याबद्दल आपण गुरुदेवांना काहीच कसे विचारले नाही?

***तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।***
***उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥४/३४.***

त्या ज्ञानाचा मार्ग तुला सेवाबळाने विनयपूर्वक तत्त्वदर्शी लोकांपासून मिळविता येईल असे गीता सांगते. पण मी फक्त प्रणिपात केला. परिश्रम म्हणजे आडवळणाने प्रश्न विचारून घेण्याचे मला सुचले नाही. देवाची इच्छा काय असेल बरे? दासबोधातील समर्थांची ओवी आठवली. 'साधक भावे नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली । सुगमपंथे नेऊन घाली । जेथील तेथे ॥' याचा अनुभव आला. सोलापूरचे श्री. व्ही. बी. जोशी माझ्याकडे आले व 'तुम्ही नाम घेणार का?' म्हणून विचारू लागले. मी ताबडतोब होकार दिला. त्यावर तुमच्या इष्ट देवतेचे नांव सांगा म्हणजे त्याप्रमाणे गुरुदेवांना कळवावयाचे आहे.' असे म्हणाले. मी दोन अक्षरी नाम सांगितले. आमच्याकडे नाम गुप्त ठेवतात. नामस्मरणदेखील गुप्तपणे मनातल्या मनात करावयाचे असते. त्यामुळे केव्हाही कोठेही इतरांना न कळत साधना चालू ठेवता येते.

अर्ध्या-पाऊण तासाने श्री. काकासाहेब कारखानीस यांनी मला बोलावून घेतले. ते ध्यानमंदिरात बसले होते. त्यांचेकडे निंबरगीमहाराज, भाऊसाहेब महाराज बाबा व गुरुदेव यांचे फोटो असलेले फोल्डर होते. मला पाहाताच म्हणाले, 'तुम्हाला गुरुदेवांनी हे नाम दिले आहे.' असे म्हणून एक चिठ्ठी मला दिली. त्यावरील नाम तीन अक्षरी होते. मी मागितलेल्या नामाच्या मागे 'श्री' लावून तीन अक्षरी केले होते. ऐहिक व पारलौकिक कल्याणाचे ते द्योतक होते. मला आनंद झाला.

श्री. काकांनी फोल्डर समोर ठेवून कापूर लावला. आरती केली. दिलेले नाम प्रत्येक श्वासात व उच्छ्वासात साठवावयाचे. दृष्टी नासिकाग्री ठेवावयाची. अंतर्मुख होऊन मन श्वासावर व नामावर केंद्रित करावयाचे असे सांगून करून दाखविले. माझ्याकडून करून घेतले. व असेच चालू ठेवा म्हणून सांगितले. नंतर म्हणाले, 'तुम्ही आता नामधारक झालेले आहात. नामधारकाला परधन व परस्त्री वर्ज आहे. त्याज्य आहे. 'परधन व परस्त्री पासून मी अलिप्त राहीन अशी शपथ तुम्हाला सद्गुरुं पुढे घ्यावयाची आहे.' मी 'बरे' म्हणून मनातल्या मनात शपथ घेतली व 'सद्गुरु राया, मला शपथ पाळण्याची शक्ती द्या.' अशी करूणा भाकली.

पूर्वायुष्यात हातून घडलेल्या ईशसेवेमुळे म्हणून की काय सद्गुरुंनी मला नामोपदेश देऊन माझा उद्धार केला. माझ्यावर कृपा केली. मला नामस्मरणाचा बुद्धियोग दिला. प्रेरणा दिली. बुद्धीला दिशा दाखविली. ईश्वरप्राप्तीचा योग्य मार्ग दाखविला. प. पू. गुरुदेवांनी लिहिलेल्या 'कन्नड संतांचा परमार्थ मार्ग' या ग्रंथात 'गुरुता तोसिद्' या पदावर भाष्य करताना ते म्हणतात, 'माझ्या गुरुंनी मला कोणता मंत्र जपावा हे सांगितले. त्यांनी मला खुण दिली. व म्हणाले, 'माझ्याकडे जे होते ते सर्व मी तुला दिले आहे. तुला हवे असणारे सर्व काही मी तुला दिले आहे. आता माझे काम संपले आहे. परमार्थ मार्गावर वाटचाल करून परमार्थ प्राप्ती आता तुझी तू स्वतः कष्ट करून घ्यायची आहे. आता मागे फिरू नकोस.' तोच संदेश मला माझ्या सद्गुरुंनी दिला. मी धन्य झालो. 'पूर्वजन्मी सुकृते थोर केली । ती मज आजि फळासी आली । परमानंदु आजि मानसी । भेटी झाली या संतासी ।'

त्या दिवशी पस्तीस लोकांना नामोपदेश मिळाला. त्यात माझ्या ओळखीचे सोलापूरचे एस. एल. रानडे नावाचे सत्तर वर्षांचे वृद्ध वकील हे होते. सायंकाळच्या बैठकीत बसलो असताना प. पू. गुरुदेव माझ्यासमोर येऊन बसले व म्हणाले, 'तुमचे मेव्हणे कोण हे आता माझ्या लक्षात आले. तुम्ही येथे राहा. काही दिवस नामस्मरण करा.' मला नोकरीमुळे राहता येणे शक्य नव्हते. तथापि मी एक दिवस राहिलो. दुसऱ्या दिवशी प. पू. गुरुदेवांच्या उपस्थितीत त्यांच्याच सांगण्यावरून श्री. काकासाहेब तुळपुळे यांचे 'गीतेतील ध्यानपद्धती' या विषयावर प्रवचन झाले. भगवद गीतेवर पुस्तक लिहिण्याचे प. पू. गुरुदेवांचे काम चालूच होते. तोच विषय काकासाहेबांनी मराठीत सांगितला. नामोपदेश मिळाल्यानंतर ध्यानपद्धतीवर झालेले प्रवचन अत्यंत उपयुक्त व योग्य वेळी झाले.

निंबाळच्या दोन दिवसांच्या पहिल्याच मुक्कामात माझे जीवनच बदलून गेले. प. पू. गुरुदेवांसारख्या तत्त्वज्ञ संतश्रेष्ठांच्या कृपाप्रसादाने मी पावन झालो. मला सद्गुरु मिळाले. अंतर्मुख डोळस नामसाधन, नैतिक आचरण, सद्गुरुवरील प्रेम याचे महत्त्व समजले.

**श्री. वामनराव कुलकर्णी उपळेकर**
७५/२, रेल्वे लाईन्स, देशकवाडी, सोलापूर, ४१३००१.

# जीवन पथदर्शक गुरुदेव

**प्रा. वसंतराव विनायक अकोलकर**

*एम.ए. (तत्त्वज्ञान). १९३८-१९६९ धारवाड, अहमदाबाद, अमरावती, नागपूर शासकीय महाविद्यालयांत प्राध्यापक. महाराष्ट्र समाज कल्याण संचालित प्रशिक्षण संस्था, पुणे विद्यापीठ, नौ.वाडिया कॉलेज या ठिकाणी सेवानिवृत्तीनंतर मानसशास्त्राचे अध्यापन. अमेरिकेत ड्यूक विद्यापीठात डॉ. जे. बी. ऱ्हाईन यांचे आमंत्रणावरून परामानस शास्त्रीय प्रयोगशाळेत व्हिजिटींग रिसर्च फेलो १९६३. अखिल भारतीय तत्त्वज्ञान परिषद १९५९ व अखिल भारतीय दर्श परिषद १९६३ मानसशास्त्र विभागाचे अध्यक्ष. मराठी विश्वकोष व मराठी तत्त्वज्ञान महाकोशाचे अभ्यागत संपादक. परामानसशास्त्र, मानसशास्त्र, तर्कशास्त्र यांवर मराठी, इंग्रजी, गुजराथी मध्ये ग्रंथलेखन. दूरदर्शनवर Country Wide Class Room मध्ये Science of Para Parapsycology चर्चात्मक मुलाखत. मनोविकृती विज्ञान पुस्तक १९९६.*

***प्रा. वसंतराव अकोलकर यांनी कथन केलेल्या गुरुदेवांच्या आठवणी आम्ही शब्दांकित केल्या आहेत –***

'आम्ही नाशिकला राहात होतो. १९३७ साली नाशिक मुक्कामी श्री गुरुदेव आले होते. त्यांना भेटावयास मी व माझे वडील गेलो होतो. ती माझी पहिली भेट होय. जिना उतरताना वडिलांनी गुरुदेवांना म्हटले, 'काहो या मुलाचं काय होणार आहे?' त्यावेळेला मी एम.ए. फिलॉसॉफी घेऊन पास झालो होतो. गुरुदेव म्हणाले, 'तत्त्वज्ञानाचे खुपण घातलेले आहे. पीक चांगलेच येईल.' गुरुदेवांचा तो आशिर्वादच मी मानतो.

आचार्य कालेलकरांच्या बोलावण्यावरून मी वडील बंधूंसह महात्माजींना भेटावयास वर्ध्याला गेलो होतो. त्यांना भेटून नाशिकला परत आलो. त्यावेळी मला जे स्वप्न पडले ते मला महत्त्वाचे वाटते. मी माझ्या वडिलांच्या सन्मुख बसलेलो आहे. आम्हा दोघांच्या मध्ये अग्नी पेटलेला आहे. मी वडिलांना विचारले, 'माझ्या जीवनाचे कशाने सार्थक होईल?' वडील संस्कृतमध्ये म्हणाले, 'न सेवयः.' मी पुन्हा तोच प्रश्न वडिलांना केला. वडील म्हणाले, 'न ध्यानेन.' तिसऱ्यांदा मी तोच प्रश्न विचारला असता वडील म्हणाले, 'ज्ञानेन.' स्वप्नात वडिलांच्या रूपाने मला माझा जीवनमार्ग सूचित केला असे मला वाटले. मला जे वाटले त्याला पुष्टी ७ वर्षांनी अलाहाबाद येथे गुरुदेवांच्या तोंडून मिळाली.

१९३८ साली मी धारवाडला कर्नाटक कॉलेज मध्ये होतो. प्रा.त्र्यं.कृ. देवळालकर यांचे बरोबर निंबाळला गेलो. बरीच मंडळी जमलेली होती. चर्चा चालू असताना गुरुदेव अचानक उठून आंत निघून गेले. मला त्या गोष्टीचे काहीसे आश्चर्य वाटले. परंतु त्याचा उलगडा पुढे अलाहाबाद मुक्कामी आला. त्याचा उल्लेख पुढे येईलच.

१९४४ साली मी लखनौला अखिल भारतीय तत्त्वज्ञान परिषदेला गेलो होतो. परिषद संपल्यानंतर मी पत्नीसह अलाहाबादला गुरुदेवांना भेटावयास गेलो. गुरुदेवांच्या घरी दोन दिवस मुक्काम होता. गुरुदेवांजवळ एक विद्यार्थी नेहमी लिहून घेण्यासाठी असे. तो मजकडे येवून गुरुदेवांनी गप्पा मारण्यासाठी या म्हणून बोलाविल्याचे सांगितले. मी गुरुदेवांच्या खोलीत गेलो. इकडचे-तिकडचे बोलणे झाल्यावर मी त्यांना प्रश्न केला, 'योग हा प्रोग्रेस की रिग्रेस असतो?' त्यांना प्रश्नाचा रोख व अर्थ लक्षात आला नाही. म्हणून मी स्पष्ट करू लागलो. मी म्हटले, 'पांतजल योगामध्ये 'प्रतिप्रसव' सांगितलेला आहे व तो 'प्रतिप्रसव' पंचमहाभूतापासून मागे मागे नेत महत् तत्त्वापर्यंत न्यावयाचा असतो. तेव्हा हा 'प्रतिप्रसव' लक्षात घेता योगामध्ये रिग्रेशन ही प्रक्रिया असते. या अर्थाने मी प्रश्न केला आहे. माझ्या प्रश्नाने ते इतके उत्साहित झाले की ते विद्यार्थ्याला म्हणाले, 'अरे टिपून घे. टिपून घे. गेले २० वर्षांत कितीतरी लोक माझेकडे आले, परंतु हा प्रश्न कुणी विचारला नाही.' आमचे बोलणे चालूच होते. गुरुदेव म्हणाले, 'अकोलकर सर्व मार्ग अंती एकाच ठिकाणी जातात. तुमचा मार्ग ज्ञानमार्ग आहे.' माझ्या ३७ सालच्या स्वप्न संदेशाला गुरुदेवांच्या मुखाने पुष्टी मिळाली.

स्वतःचा अनुभव सांगताना गुरुदेव म्हणाले, 'मी व्हाईस चॅन्सेलर असल्यामुळे वेळेवर ऑफिसला जाणे हे तर प्राप्त असतं. कारण ते कर्तव्यच आहे. पुष्कळ वेळेला मी पोषाख करून विद्यापीठात जाण्याच्या तयारीत असतो. परंतु त्याच वेळी आतून ध्यानाची अशी काही ओढ लागते की विद्यापीठात जावू नये असे वाटते.' १९३८ साली निंबाळच्या बैठकीतून ते अचानक उठून गेले याचे मला जे आश्चर्य वाटले होते त्याचा उलगडा अलाहाबादला गुरुदेवांनी सांगितलेल्या स्वानुभवामुळे आला.

गुरुवर्य सोनोपंत दांडेकरांनी सांगितलेली गोष्ट मला आठवते. सोनोपंतांनी गुरुदेवांना एकदा विनंती केली होती की, तुम्ही ध्यानास बसता तेव्हा तुमच्या समवेत मलाही तेथे बसण्याची इच्छा आहे. परंतु गुरुदेवांनी त्यांना नको म्हणून म्हटले. ते म्हणाले, 'त्या वेळेस शरीराच्या अवस्थेबाबत जे घडते ते पहाण्यासारखे नसते.'

त्यांचा आहार म्हणजे गंगाजल व निरनिराळ्या प्रकारचा चहा असा होता. आठवड्यातून १-२ वेळा १ चतकोर भाकरी खात असत.

स्वप्ने निरर्थक नसतात किंवा अर्थशून्य नसतात. ती प्रतिकात्मक असतात व त्या प्रतिकांचा अर्थ लावावा लागत असतो. कांही स्वप्ने परामानस शास्त्रीय स्वरूपाची असतात. काही स्वप्नांवरून तर मरणोत्तर अस्तित्व असावे असे वाटू लागते. या संदर्भात अमरावती मुक्कामी प्रा. डी. बी. कुलकर्णी यांनी मला प्रा. व्ही. के. गोकाकनां पडलेले स्वप्न सांगितले. ते असे - 'पहाटे ४ च्या सुमारास प्रा. गोकाकनां स्वप्न पडले. स्वप्नात गुरुदेव त्यांना भेटले व म्हणाले, 'आम्ही आता जातो.' नेमके त्याच वेळेला गुरुदेवांचे प्राणोत्क्रमण झाले होते.

जीवन पथदर्शक असे जे मी शीर्षकांत म्हटले ती भावना मनात अद्यापही आहे.

**प्रा. वसंतराव विनायक अकोलकर**
स्वरमाला सोसायटी, अभिनव हायस्कूल शेजारी,
कर्वे रस्ता, पुणे ४११००४.

# गुरुदेवांच्या आठवणी

**श्री. मोरेश्वर भाऊराव मोकाशी**

*सहकारी बँकेत नोकरी. १८ वर्षे गुरुदेवांच्या सहवासांत.*

श्री. मोरेश्वर भाऊराव मोकाशी, वय वर्षे ९५ यांनी लिहून दिलेल्या गुरुदेवांच्या आठवणी देत आहोत.

'गुरुवर्य प्रा. सोनोपंत दांडेकर हे श्रीगुरुदेवांचे एम.ए.चे विद्यार्थी होते. पुण्याच्या शिक्षण प्रसारक मंडळीच्या एस.पी. कॉलेजचे ते प्रिन्सीपॉल होते. ते निवृत्त होणार असल्याचे वर्तमान पत्रात छापून आले असता श्रीगुरुदेवांचे नजरेस सहज म्हणून कोणीतरी ही बातमी आणली. तेव्हा गुरुदेवांनी निंबाळहून टेलिग्राम पाठविला, तो असा 'Do not retire, continue'. नंतर ४-५ दिवसांनी टेलिग्राम बाबत उल्लेख केला गेला असता श्रीगुरुदेव म्हणाले, 'शुद्ध चारित्र्याचा प्रोफेसर अधिक काळ विद्यार्थ्यांसमोर असावा.'

श्रीगुरुदेव राजकारणात कधीच पडले नाहीत. तरीसुद्धा त्यांची चोहोकडे दृष्टी असे. स्वातंत्र्यानंतर भारत सरकारने भाषावार प्रान्त रचनेच्या मागणीसाठी जस्टीस दार यांचे अध्यक्षतेखाली नेमलेल्या समितीने भारतभर दौरा करून प्रतिनिधींचे अंदाज घेतले. कमिटीचा दौरा संपताना श्रीगुरुदेवांनी त्यांना तार पाठविली. 'Do not recommend language wise provinces' त्याप्रमाणे झाले नाही व भाषावार प्रान्तरचना मान्य झाली. गेल्या ५० वर्षात भाषावार प्रान्तरचनेचे काय परिणाम झाले व होत आहेत ते देशाच्या अनुभवास येतच आहे.

माझे शिक्षक विजापूरचे श्री. कारखानीस व पुण्याचे श्री. लिमये (गुरुदेवांचे एम.ए.चे वाचक) यांच्यामुळे मला गुरुदेवांच्याकडे जाण्याची ओढ निर्माण झाली. १९३९ साली मी निंबाळला गेलो होतो. त्या वेळेस माझी प्रकृती बरी नसते असे मी गुरुदेवांना म्हटले. त्यावर गुरुदेव म्हणाले, 'ज्या नामस्मरणामुळे भवसागर तरून जाता येतो त्याला प्रापंचिक अडचणी व प्रकृती सुधारणे काय अशक्य आहे.' या वयात सुद्धा माझी प्रकृती चांगली आहे. माझा नामस्मरणावर विश्वास बसावा अशी त्यांची इच्छा होती. सन १९२१ साली देशात स्वातंत्र्याची चळवळ जोमात सुरू झाली. म. गांधींनी गुजराथच्या लोकांना उद्देशून प्रश्न केला की, 'देशाच्या स्वातंत्र्यासाठी तुम्ही वडील नागरिकांनी कोणता भाग घेतलाअसे तुमचे मुलांनी विचारल्यास काय उत्तर देणार?'

त्या वेळी आपल्या सांप्रदायाचे थोर भक्त अहमदाबादला होते. त्यांनी गुरुदेवांना लिहिले की, 'आम्ही चळवळीत भाग नको का घ्यायला?' श्रीगुरुदेवांनी त्यावर उत्तर दिले, 'मी आज जे करीत आहे त्यानेच भारताचे कल्याण होणार आहे, असा माझा विश्वास आहे. हेच मी जन्मभर करणार त्यातच भारताचे कल्याण आहे'

श्रीगुरुदेवांची प्रत्येक बाबतीत एक विशिष्ट पद्धती होती. ते कोणासही त्यांच्या शिष्यांनाही मुद्दाम म्हणून उपदेश शिकवत नसत. त्यांच्या सततच्या दैनंदिन कार्यक्रमावरून सर्वांनी शिकावे असे त्यांचे धोरण होते.

**श्री. मोरेश्वर भाऊराव मोकाशी**

एम ९, गिरीराज हाऊसिंग कॉम्प्लेक्स, बिजली नगर, चिंचवड.

**श्रीगुरुदेव 'भागवता'चे वर्णन करताना म्हणतात की शिष्यातील त्रिगुणांची माहिती अशी मिळते.**

1. **शिष्याला प्रथम दुःख व शेवटी सुख असल्यास - तो 'सत्व' गुण.**
2. **प्रथम सुख, शेवटी दुःख असल्यास - तो 'रजो' गुण.**
3. **प्रथम व शेवटी व्यामोह असल्यास दुःख होतें - तो 'तमो' गुण**

**नामस्मरण -- अध्यात्म शक्तीयुक्त देवाच्या नामाचे स्मरण.**

# सद्‌गुरु श्रीगुरुदेव : कांगारूप्रमाणे सांभाळकर्ते

श्री. मंगेश रंगराव रेगे

*जुने आणि श्रेष्ठ साधक. श्रीगुरुदेवांशी खूप जवळून संबंध. श्रीगुरुदेवांच्या भक्तीमार्गाकडे लोकांना नेण्यात बहुमोलाचा वाटा. आठवणींच्या अनेक नोंदी दैनंदिनीत आहेत. त्यातील काही आठवणी*

माझा श्रीगुरुदेवांशी संबंध केव्हा? कुठे? व कसा आला? याबद्दल त्रोटक माहिती देत आहे.

मी त्या वेळी श्री. काडादी यांच्या ब्लॉकमध्ये रहात होतो. डॉक्टर आरोसकर माझे शेजारचे ब्लॉकमध्ये रहाण्यास आले. ते निंबाळचे गुरुदेवांचे नामधारक होते. माझी त्यांची चांगली ओळख होती. आले त्या दिवशीच रात्री ९ वा. त्यांचेकडे १५-१६ साधक बंधू भजनासाठी जमले व १ तास भजन, आरती करून लांब राहणारे साधक तेथेच झोपले. मला व पत्नीस परमार्थाची पहिल्यापासूनच आवड होती म्हणून मी मुलांना घेऊन भजनास गेलो. सर्व कार्यक्रम फारच आवडला. त्या १४-१६ मंडळीपैकी ८-९ जण माझे पूर्वीपासूनच ओळखीचे झाले होते. त्यामुळे जास्तच आनंद वाटला. ही गोष्ट सप्टेंबर १९५५ मधील. पहाटे ३ वा. सर्वजण उठले. चहा घेऊन आरती केली. १०-१५ मिनिटे उभ्याने नामस्मरण केले. मग बसून ६॥ पर्यंत नामस्मरण करून काकड आरती केली. ६ वा. सर्व कार्यक्रम संपला. मनाला आनंद, उत्साह वाटला. आळस-झोप आली नाही.

## निंबाळ आश्रमात जाण्याचा योग

दिवाळीच्या पाडव्यास निंबाळला जाण्याचा सर्वांचा बेत ठरला. तोपर्यंत गुरुदेव अलाहाबादहून परत आले होते. पाडव्यास सकाळी १७-१८ जण व मी कुटुंबासहीत (पत्नी व ५ मुले) गेलो. ऋषींचा आश्रम म्हणजे जवळ नदी, मागे डोंगर, झाडी असे दृश्य डोळ्यांसमोर होते. परंतु येथे सर्व ओसाड ४-२ घरे, ७-८ लमाणांच्या झोपड्या, विहिरीचे पाणी, जवळून रेल्वेचा रस्ता. दुपारी जेवणे झाल्यावर प. पूज्य गुरुदेवांचे घरात (नवा वाड्यात) प्रवचन (सीटींग) सुरू झाले. समोर पू. गुरुलींग जंगम महाराज, पू. भाऊसाहेब महाराज व पू. अंबुराव महाराज यांचे फोटो. समोर चौरंगावर धुपाटणे, कापूर, उदबत्त्यांचे पुडे वगैरे ति. पू. काकासाहेब तुळपुळे व ति. पू. काकासाहेब कारखानीस हे दोघे गुरुदेवांचे गुरुबंधू प्रवचन करीत व महाराजांनी सांगितलेले देवाचे नाव 'नाम' देत. त्या नामाचा जप श्वासात करावयाचा मोठ्याने (वैखरीने) करावयाचा नाही. त्या दिवशी गुरु हा आपल्या शिष्यांचे संकटाचे वेळी रक्षण करतो.

गुरु हा आपल्या शिष्यांचे संकटात धावून येऊन त्याचे 'कांगारू' प्राण्याप्रमाणे रक्षण करतो. 'कांगारू कोणी पाहिलं का?' असा प्रश्न प. पू. गुरुदेवांनी विचारताच मी मुंबईस पाहिला, असे सांगून राणीच्या बागेचा पत्ता सांगितला. त्या रात्री सांगलीचे राजेसाहेब सपत्नीक आले. रात्री पुन्हा दुपारचेच प्रवचन झाले व प. पू. गुरुदेव म्हणाले, 'रेगे राजेसाहेबांना मुंबईस कांगारु कोठे आहेत तो पत्ता सांगा.' मी उभे राहून पत्ता सांगितला. अशा रीतीने पहिल्याच भेटीत त्यांच्या कृपादृष्टीचा अनुभव आला. पुढे एका पाठोपाठ पत्नी व मुलांनाही नाम मिळाले. माझ्या शेवटच्या २ मुली १०-१२ वर्षांच्या होत्या. त्यांना पुढे पाहू म्हणताच एकीच्या डोळ्यात पाणी आले. ते पाहून त्यांचे मन द्रवले व मला म्हणाले त्या मुलीला नेऊ नका नाम देतो. पुढे एकदा सीटींगमध्ये साधकांना म्हणाले, तुम्ही कधी नामासाठी रडला का? ह्या मुलीचे अश्रू पाहून कणव उत्पन्न झाली व मी नाम दिले. शेवटच्या मुलीस पुढे १ वर्षांनी त्यांनी बोलावून नाम दिले. अशा रीतीने सर्वांना गुरुपदेश मिळाले. त्यांच्या कृपने माझी मुलेच नव्हे तर नातू, नाती आतापर्यंत तरी नेम, आरती करतात. निंबाळला फेरी मारतात. हा फायदा केवढा मोठा आहे, त्याची कल्पना कोणास येणार नाही. सर्व आयुष्य त्यांच्या कृपेने व आशिर्वादाने उत्तम चालले आहे.

## निंबाळ स्थानाचे ऐश्वर्य महत्त्व

सांगावे तेवढे थोडेच आहे. प. पूज्य गुरुदेव कधी स्वतः चमत्कार करीत नसत. परंतु ते पुण्यमार्गाने वागत असल्यामुळे त्यांचे देवाशी एकरूपत्व झाले होते. ते म्हणतील ते देवास द्यावे लागत असे. डी.ए.व्ही. व संगमेश्वर कॉलेजचे ७, ८ प्रोफेसर मंडळी दर सुट्टीला एके ठिकाणी जमून परमार्थाबद्दल वाचन, चर्चा चाले. त्यात ज्ञानेश्वरी मुख्य असे. ते रविवारी निंबाळला येत त्या वेळी सीटींग (प्रवचन) मध्ये काकासाहेब कारखानीस प्रवचन करीत. समोर गुरुदेव बसत. बाजूला मंडळी बसत. १ तास प्रवचन चाले. ते संपल्यावर प. पू. गुरुदेव काही शंका असल्यास विचारा म्हणून प्रोफेसरांना विचारीत. परंतु सर्वांच्या शंका आपोआप संपून त्यांनाच आश्चर्य वाटे. ज्ञानेश्वरी हातात घेऊन महाराजांची परवानगी घेऊन जे पान समोर निघेल त्यावर प्रवचन होई, असे अनेक वेळा घडले आहे.

गुरुदेव म्हणत असत, देवाला काही मागावे लागत नाही. आपण नित्य रोज नेम करावा म्हणजे देवाला आपल्या भक्ताची काळजी लागते व तो सर्वज्ञानी भक्ताची इच्छा पुरी करतो.

आपण कोणाचे वाईट चिंतू नये. शुद्ध अंतःकरणाने नेम करावा. भक्ती वाढवावी म्हणजे देवसुद्धा आपले चांगलेच करतो.

गुरु हा शिष्याला देवाचे गुप्त रूप दाखवितो तो खरा गुरु. आपणाला ते लवकर कळत नाही. आपण कुलदैवत म्हणून देव, देवीच्या प्रतिमेचे तसेच आवडत्या देवाचे फोटो, बाण, तांदळे, शंख, चक्र वगैरे आपल्या पूजेत ठेऊन मनःपूर्वक त्यांची पूजा करतो हे वाईट आहे असे नव्हे. 'परंतु गुरु मंत्राचे सतत स्मरण केल्यामुळे खऱ्या देवाचे दर्शन होते.' खरा देव म्हणजे आत्माराम. आपला आत्मा बाहेर काढून त्याला डोळ्यांनी पहावे व नमस्कार करावा असे सर्व संतांचे सांगणे असते. 'पहावे आपणासी आपण' असे दासबोधात म्हटले आहे. स्वतः स्वतःचे रूप पहा, तोच 'देव' आहे.

उपास, व्रत, वैकल्य त्यासाठी निरनिराळे खाद्यपदार्थ वगैरेंची जरूरी नाही. फक्त अंतःकरणपूर्वक नाम घेत राहावे म्हणजे झाले.

*आवडीनें भावे हरीनाम घेती ।*
*तुम्ही चिंता त्यासी सर्व आहे ॥*
*सद्गुरु वांचोनी सापडेना सोय ।*
*धरावे ते पाय आधीं आधीं ॥*

*गुरु बिन कौन बतावे बाट*
*बडा बिकट यम घाट ॥*

## शरणागतीला फार महत्त्व

शरण आलेल्या शिष्याला देव सर्व सहाय्य करून तारून नेतो. एकदा का आपणाला, देव असा भार घेतो याची अनुभूती आली की आपला नेम वाढतो, भक्ती, प्रेम, भाव वाढतो. एके ठिकाणी स्वस्थ बसून नेम करणे उत्तमच; पण इतर वेळी चालता, बोलता, काम करताना नाम घेत राहावे. त्याचा फायदा होतो. एकट्याने नेम करण्यापेक्षा सांघीक ५-६ जणांनी नेम केल्यास अनुभव लवकर येतात.

## देव म्हणजे काय? देव कसा ओळखावा

नेमात व इतर वेळीसुद्धा बिंदू दर्शन होणे, निरनिराळ्या तऱ्हेचे आवाज येणे, अंगावर रोमांच उठणे, सुवास येणे, निरनिराळे रंग दिसणे, लहान मुलांचे दर्शन होणे, मन आनंदीत, उत्साही होणे वगैरे अनुभव येऊ लागतात. दिवसा नक्षत्रे तारे, चंद्र, सूर्य दर्शन, शेषाचे दर्शन व रात्री सुद्धा स्पष्ट दर्शन होते हे सर्व देवकृपेचे आविष्कारच होत.

संकटाचे वेळी, आजारीपणात हे अनुभव जोरात प्रगट होतात. शेवटी अमृताचासुद्धा अनुभव येतो. हे अनुभव नित्य रोज नेम करावा म्हणजे त्यात वाढ होते.

## प.पूज्य गुरुदेवांचे चमत्कार

त्यांना भूत-भविष्य सर्व समजत असे. कोणा शिष्यावर संकट येणार असेल तर ते त्याला सूचना देत परंतु शिष्याला कळत नसे. उदा : ४-५ सरकारी ऑफिसर्स निंबाळला जीप मधून आले. दर्शन, भेट, बोलणे संपले. परत जाण्यास निघाले तो, एका शिष्याला तुम्ही आज रहा बाकीच्या मंडळींना जाऊ दे म्हणाले. ते गृहस्थ जरूरीचे घरी काम असल्यामुळे जाण्यास फारच उत्सुक होते. नाईलाजाने राहिले. बाकीची मंडळी जीपने परत गेली. वाटेत जीपला अपघात झाला. सर्वांना मार लागला. पण वाचले. मग शिष्याला गुरुंचा महिमा कळला. १३.१.५७ आम्ही सोलापूरकर मंडळी निंबर्गीहून परत येताना आमचा ट्रक कालव्यामध्ये पडणार होता. १५-२० फुटांवर ट्रक थांबला. समोरून गुरुदेवांची मोटार मागे वळून आली. त्यांच्या मोटारच्या उजेडामुळे ड्रायव्हरला कालवा दिसला. आमच्या ट्रकचे ब्रेक फेल झाले होते तरी ट्रक थांबला. निंबाळला रात्री ९ वाजता आलो तोपर्यंत प.पू. गुरुदेव वाट पहात होते. आजचा दिवस वाईट होता. म्हणाले तोच ड्रायव्हर म्हणाला, दोन्ही ब्रेक फेल झालेमुळे ट्रक थांबेना परंतु गुरुंचा महिमा तेव्हा समजला. असे अनेक प्रकार घडले परंतु ते त्यांच्या नामस्मरणाचे पुण्याईमुळे देवास निभावणे भाग पडले.

## गला कळलेला स्वभाव

सर्व शिष्यांबद्दल त्यांच्या मनामध्ये प्रेमभाव, देवाबद्दल एकनिष्ठता, काया, वाचा, मन, सदा ईश्वराकडे लावणे, ईश्वर सर्वत्र भरलेला आहे अशी श्रद्धा त्यामुळे सर्वांभूती भगवत्‌भाव, अंतरी अगर्वता, निरीच्छपणा, संतोष, प्रपंचापासून निवृत्ती, ईश्वरावर सर्व भार टाकून त्याचेबद्दल दृढ भक्तीभाव, तन, मन, बुद्धी सर्व ईश्वरावर टाकून, त्याचे अखंड चिंतन करीत. देव सर्वत्र भरला आहे असा त्यांना दृष्टांत होऊन, रात्रंदिवस त्याची भक्ती करीत राहणे, संपत्ती, शरीर, मन, वैभव सर्व देवावरून ओवाळून टाकणे आणि भक्तिच्या, प्रेमाच्या उत्साहाने त्याला पूजा, द्रव्य अर्पण करणे. आपल्या योगक्षेमाची चिंता न करिता ते सर्व देवावर सोपवून आपण देवाच्या अखंड ध्यानात, तहानभूक आणि सर्व विषय विसरणे. आत्मा हेच जीवन सर्वस्व इतर सर्व तुच्छ या उत्कट भावनेने आपले सर्व जीवन देवाला उकते विकून टाकणे, जीवनाला देव हेच नाव ठेऊन, इतर काहीच प्रिय न वाटणे, प्रपंचाकडे परतून मागे न पाहाणे इत्यादी सद्‌गुण भक्ताच्या ठिकाणी वाढल्यावर ईश्वरास तो प्रिय होणार नाही का? मग त्याला अशा प्रेमळ भक्ताचा भार घ्यावा लागतो. सारांश अनन्य भक्ती, अव्यभिचारी प्रेम, एकांतिक भाव, पूर्ण शरणागती हे सर्व सद्‌गुण भक्तांच्या लक्षणाचा मूळ गाभा आहे. अशा भक्तांची काळजी देवाला करावी लागते. हे सर्व गुण प. पू. गुरुदेवांचे ठाई वसत होते म्हणून ते गुरुपदास जाऊन पोहोचले.

## नेम नामाचे स्मरण

आमच्या सांप्रदायात प्रत्येक नामधारकाने रोज तिन्हीत्रिकाळ एका आसनावर बसून नामस्मरण करणे. निंबाळ येथे ७-८ तास नेम करावा लागतो. शिवाय काकड आरती, सकाळ, दुपार, रात्रीचे भजन करावे लागते. निंबाळ आश्रम म्हणजे भक्तीची बाजारपेठच होय. ठरलेल्या वेळीच नेमास बसल्यास फायदा होतो. देव माझा भक्त अजून का आला नाही म्हणून वाट पहात असतो. नाम सावकाश, स्पष्ट, मोठ्याने उच्चार न करिता, श्वासात श्वास घेताना, सोडताना घ्यावे. वैखरीने नाम घेऊ नये. ज्याच्या त्याच्या प्रकृतीप्रमाणे त्याला ३-४ तास नाम देत असत. माळेचे मणी ओढून भरभर नाम घेऊन प्रत्येक नाम बेंबीपर्यंत पोहोचले पाहिजे. नामस्मरणास बसले की मनात खूप शंका येण्यास सुरुवात होते. त्या वेळी ६-७ मिनिटे नामावर नाम घ्यावे मध्ये अंतर ठेऊ नये. अगर दीर्घ श्वास घेऊन थोडा वेळ नामस्मरण करावे. सवयीने सर्व जमून येते.

आसन : स्वच्छ घोंगडी अगर जाड सतरंजी चौपदरी घालावी. त्यावर स्वच्छ धोतर चार पदरी घालून बैठक करावी. शक्य तो टेकून बसू नये. लगेच झोप येते. नेमाचे वेळी दृष्टी नासिकाग्र ठेवावी अगर भ्रूमध्ये (दोन्ही भुवयांचे मध्ये नजर ठेवून पहावे) समोर गुरुंची तसबीर असल्यास उत्तम. नेमास मधून मधून देवाची भक्तीपर पदे म्हणण्याची परंपरा आहे. गुरुदेव म्हणत उपास करण्यापेक्षा देवाजवळ १-२ तास नेम जास्त करावा. त्याचा फायदा होतो.

प. पूज्य गुरुदेव गोरेपान होते. त्यांचे डोळे पाणीदार असून डोळ्यांत एक प्रकारचे तेज होते. डोळ्यात मार्दवता असून त्यांनी नुसते पाहिले की,

मनाला समाधान वाटे. शरीरयष्टी किडकिडीत असून, चालणे झपाट्याने असे. आम्ही तरुण असूनही ते आमचेपुढे चालत जात. त्यांना स्तुती, लाळघोटेपणा आवडत नसे. स्वच्छ धोतर, साधा शर्ट, (सदरा) काळा अगर पिवळा कोट, लाल पगडी, उपरणे, हातात दिवसा, रात्री छत्री असे. त्यांना वारा सहन होत नसे म्हणून छत्रीचा रात्री उपयोग करीत. बुद्धी अत्यंत तल्लख, स्मरणशक्ती विलक्षण तीव्र, बोलणे, जलद, स्पष्ट, गोड असे. फार बोलत नसत. सर्व कामे झटपट उरकत. साधकांवर अपार प्रेम असे. बुद्धी तीक्ष्ण, आळस, निद्रा ठाऊकच नाही. स्नान करताना अतिशय कढत २ बादल्या पाणी लागे. स्नान करून बाहेर येताना अत्यंत तेजस्वी मुद्रा दिसे. धुपाटण्यातील अंगारा लावून नेमास बसत. १५-२० मिनिटांनी बाहेर येऊन ओसरीवर प. पू. गुरुलींग जंगम महाराजांची वचने, दासबोध वगैरे त्यांचे ठरले की त्यांचे वाचन होई. त्यानंतर दुपारचे भजन, आरती करून जेवणास बसत. जेवणात भाजी, आमटी, पापड सर्व लागे. परंतु खाताना मात्र १/४ भाकरीच खात. पोळी-भाजीचा रस आवडीने घेत. ज्या भाकरीवर देवाचे दर्शन होई त्याचाच १/४ तुकडा खात व ३/४ भाकरी साधकांना प्रसाद म्हणून वाढत असत. फळामध्ये संत्री त्यांना फार आवडत. गोड पदार्थ, पेढा, साखर कमी असलेला आवडे. त्यांना ७-८ भाषा येत होत्या. त्यांना देवाबद्दल निरनिराळ्या संतांनी रचलेली भक्तीगीते आवडत व ती साधकांकडून म्हणवून घेत. त्यात आमच्या तिन्ही मुली अशी पदे म्हणत असतात. अजूनही गुरुसेवा म्हणून एखादे पद म्हटल्याशिवाय निंबाळहून परत येत नाहीत.

आजारपण नेहमी सोबती पण निजून राहात नसत. नेम चुकवत नसत. औषध कधी घेत नसत. नाम हेच औषध. व्यवहार चोख. शिष्यांस काहीही मागत नसत व दिले तर घेत नसत. प.पू. भाऊसाहेब महाराजांवर अत्यंत भक्ती, प्रेम, श्रद्धा होती. त्यांच्या आठवणी निघताच डोळ्यांतून पाणी निघे. त्यांनी १९०१ साली जमखंडी येथे पू. भाऊसाहेब महाराजांकडून नाम घेतले. ९-१० सालापासून प्रचिती येण्यास सुरुवात व १९२० साली नामास नाम झाले. दुसऱ्यांवर नाम देण्याचा अधिकार प्राप्त झाला तरी पू. अंबुराव महाराज असे पर्यंत त्यांनी नाम दिले नाही. अंबुराव महाराजांच्या निर्याणानंतर श्रीगुरुदेवांना दृष्टांत झाला व श्रीमहाराजांनी सांगितल्यावर नाम द्यायला सुरुवात केली. आतापर्यंत सुमारे ४००० लोकांना नाम दिले असून सध्या त्यांच्या समाधीवर चिठ्ठया टाकून नाम घेतात. अशांची संख्याही ३ हजारांपर्यंत गेली आहे.

**श्री. मंगेश रंगराव रेगे**

द्वारा : डॉ. गो. ना. कानगो, १७ यशोधन अपार्टमेंट, ८१ रेल्वे लाईन्स, डफरिन चौक, सोलापूर.

***अनुसंधान : श्रीसद्‌गुरुंकडून मिळालेल्या नामाचा श्वास प्रश्वासाबरोबर केलेले नामस्मरण.***

***साक्षात्कार : प्रत्यक्ष देवाचे दर्शन, अनुभुती, स्पर्शन, संभाषण, नाद, तेज, अनुभवाचे वैविध्य !***











# 'नामस्मरण करिता यमें, बाधिजेना'

**सौ. शशिकला मनोहर खांडेकर**

*बी.ए., राष्ट्रभाषा कोविद व संगीत विशारद. श्रीगुरुदेव रानडे यांचेकडून १९४५ साली नामानुग्रह*

प. पू. श्रीगुरुदेव रानडे विशेषांकासाठी अनेक जाणत्यांचे उत्तमोत्तम विद्वत्ताप्रचुर लेख येणार, त्यात 'म्या पामरें' काय बरे लिहावे?

'विवेक (ज्ञान) मूलक, नीतीप्रधान, आत्मसाक्षात्कार पर्यवसायी नामस्मरणात्मक भक्तीयोग' ही श्रीनिंबरगी संप्रदायाची प्रो. न. ग. दामले यांनी केलेली सुस्पष्ट व्याख्या या संप्रदायातील सर्व जुन्या व जाणत्या साधकांच्या अंतःकरणात वेदवाक्याप्रमाणे ठसून राहिली आहे. प. पू. श्रीगुरुदेवांच्या मते भक्ती ही सर्वश्रेष्ठ सद्‌गुण असून भक्तीच्या केंद्रबिंदूभोवती इतर सद्‌गुण त्याच्या आधाराने वावरत असतात. भक्ती ही अनन्य हवी, एकविध हवी, एकनिष्ठ हवी, अव्यभिचारी हवी. ईश्वराप्रत जाण्याचे सर्व मार्ग सारखेच असे म्हणत, 'आज इथे तर उद्या तिथे' अशी निरनिराळ्या ठिकाणी धाव घेणाऱ्या, अनेकविध भक्ती करणाऱ्यांच्या भक्तीला प.पू. श्रीगुरुदेवांनी श्रीज्ञानदेवांप्रमाणे 'व्यभिचारी भक्ती' असे संबोधले आहे. 'व्यभिचारी भक्ती देवाला आवडत नाही', असे प. पू. श्रीगुरुदेवांनी गंभीरपणे म्हटल्याचे माझ्या वडिलांकडून मी लहानपणी ऐकलेले मनात कोरून राहिलेले आहे. किती तास नेम केला, यापेक्षा नेम करताना (नेम म्हणजे नामस्मरण) भक्तीभाव किती तीव्र आहे याचे फार महत्त्व आहे. 'It's not the quantity that matters, it's the quality that matters' असे श्रीगुरुदेवांचे नेमाबद्दलचे सांगणे होते.

माझे वडील ती. डॉ. न. श्री. पारिपत्यदार व आई ती. सौ. सरस्वतीबाई पारिपत्यदार हे उभयतां प. पू. श्रीगुरुदेवांचे गुरुबंधु व प. पू. श्रीअंबुराव महाराज उर्फ 'बाबा' यांचे अनुग्रहित. प. पू. श्रीबाबांच्या निर्याणानंतर माझ्या आई-वडिलांनी प. पू. श्रीगुरुदेवांनाच गुरुस्थानी मानले. उभयतांची भक्ती अनन्य होती. एकनिष्ठ भक्तीचे 'बाळकडू' मला माझ्या आई-वडिलांकडून मिळाले. हा वारसा फार मोलाचा आहे असे मी मानते.

आमच्या संप्रदायात साक्षात्काराला महत्त्व आहे; चमत्कारांना नाही. पण म्हणून चमत्कार घडले नाहीत किंवा घडत नाहीत. असे मुळीच नाही. **'आपण महंती न करती । परि सर्वत्र चमत्कार होती । का ते पुण्यमार्गे चालती । म्हणोनिया ॥'** – या श्रीसमर्थोक्तीचा प्रत्यय प्रत्येक साधकाला आपल्या आयुष्यात केव्हा ना केव्हा काहींच्या बाबतीत अनेक वेळा आलेला आहे असे म्हणणे अतिशयोक्तीचे होणार नाही. यास्तव ज्यायोगे वाचणाऱ्याच्या अंतःकरणात भाव-जागृती होईल अशा श्रीसद्‌गुरुकृपेने माझ्या जीवनात घडलेल्या काही सत्य घटना या लेखांत देत आहे.

१) १९४० साली माझ्या वडिलांची सोलापूर येथील म्युनिसिपल दवाखान्यात मेडिकल ऑफिसर म्हणून नेमणूक झाल्याने आम्ही हडपसरहून सोलापुरास आलो. इथे आल्यावर श्रीगुरुदेवांचे वास्तव्य उन्हाळ्याच्या सुट्टीत निंबाळला असल्याचे कळल्याने आई-वडिलांना खूपच आनंद झाला. शक्य होईल तेव्हा निंबाळला जाणे सुरू झाले.

सोलापुरात आल्यानंतर लवकरच माझे वडील खूपच आजारी पडले. खूप ताप असायचा, उतरायचा नाही. नवज्वर असावा ! आम्ही सर्व मुले लहान. आई फारच काळजीत होती. तिच्या मनात आले की निंबाळचा अंगारा आला तर त्यांचा ताप उतरेल.

एक दिवस सकाळी पांढरा लेंगा व शर्ट घातलेला एक सुमारे १८ वर्षांचा तरुण मुलगा आला व त्याने निंबाळच्या अंगाऱ्याची पुडी आईच्या हाती दिली. आईने तो अंगारा पाण्यात कालवून वडिलांना पाजला. वडिलांचा ताप उतरला ! बाहेरच्या हॉलमध्ये माझ्या आत्याबाई श्रीमती रमाबाई पित्रे व इतर मंडळी संथित बसली होती. त्यांना आईने ताप उतरल्याचे सांगितले व त्या मुलाची चौकशी केली. त्यावर 'इथे कुणीही आले नाही', असे आत्याबाईनी सांगितले !

प्रत्यक्ष लेखिकेच्या जीवनात सद्‌गुरु कृपेने ३ वेळा मृत्यूयोग टळला आहे.

१) मी सुमारे वर्ष-सव्वा वर्षाची असताना दात येण्याच्या वेळी पाण्यासारखे जुलाब सतत होऊन मरणप्राय स्थिती झाली होती. मूळची सशक्त व बाळसेदार असूनही अशी अवस्था झाली. सर्व शरीर गार पडले. वडील डॉक्टर असल्याने सर्व तऱ्हेचे उपचार चालू होते. शरीरात ऊब यावी म्हणून गरम पाण्याच्या पिशव्यांवर गरम कपड्यात गुंडाळून ठेवले तरी काही उपयोग होईना. त्या वेळी माझ्या वडिलांनी त्यांचे गुरु प. पू. श्री'बाबा' यांच्या फोटोपुढे कापूर लावून, 'आपले नाव घेऊन शेवटचे इंजेक्शन देतो ! आपली इच्छा असेल तर मुलगी वाचेल' असे म्हणून मला शेवटचे इंजेक्शन दिले. त्यानंतर मला धुगधुगी आली ! प. पू. श्री 'बाबांच्या' कृपेनेच मृत्यूयोग टळला याबद्दल त्यांची खात्री झाली.

इथे यापूर्वीची एक महत्त्वाची घटना सांगायला हवी. माझा जन्म १९३३ सालचा. प. पू. श्री 'बाबा' लवकरच 'देह ठेवणार' अशी वार्ता कानी आल्याने माझे आई-वडील, माझा मोठा भाऊ डॉ. अरविंद - वय १। वर्षे व मी - वय १५,२० दिवसांचे - अशा दोन्ही मुलांना त्यांच्या पायावर घालण्याकरता त्यांच्याकडे हडपसरहून जेजुरीला गेले. तेव्हा श्री 'बाबा' जेजुरीला आलेले होते. मला पाहून ते कळवळ्याने म्हणाले, 'रंगूबाई (माझ्या आईचे माहेरचे नाव) एवढ्या लहान लेकराला घेऊन इतक्या लांब कशाला ग आलीस? देव इथे आहे आणि तिथे नाही का? देवाचे लक्ष सगळीकडे असते बरे !'

२) १९४६ साली जोडभावी पेठ म्युनिसिपल दवाखान्यातून सोलापूर कँपमधील 'दाराशा' डिस्पेन्सरीत माझ्या वडिलांची बदली झाली. (आता रस्तारुंदीकरणप्रत ती इमारत नामशेष झाली आहे) त्या वेळी माझे वय १३. इंग्रजी ४ थी म्हणजे हल्लीच्या ८ वीत मी शिकत होते. शाळेतील पहिली टर्म चालू असल्याने आधीच्याच शाळेत म्हणजे 'सरस्वती मंदिर' मध्येच जात होते. (दुसऱ्या टर्मला हरिभाई देवकरण हायस्कूलमध्ये दाखल झाले.) ही शाळा घरापासून बरीच लांब होती. पण मी चालतच शाळेत जात-येत असे.

एके दिवशी माझ्या घशात दुखायला लागले. गिळताना त्रास वाटू लागला. दुसऱ्या दिवशी हा त्रास वाढल्याने मी वडिलांना तसे सांगितले. त्यांनी माझा घसा पाहिला व 'आज शाळेत जाऊ नकोस', असे सांगितले. पण नुसता घसाच दुखतोय, तर शाळा कशाला बुडवायची? असे वाटून मी शाळेत गेले. पण दुपारनंतर अंगात ताप भरू लागला. बघता बघता

वाढला. पाठीत खूप दुखायला लागले. शाळेत बसणे अशक्य झाले. शाळेपासून पाच मिनिटांच्या अंतरावर माझ्या आत्याबाई रहात असत. त्यांच्या घरी जाऊन दोन आणे घेतले व मेकॅनकी चौकात जाऊन बसची वाट बघत उभी राहिले. साधारणतः १० मिनिटांच्या अंतराने तिथे कँपमध्ये जाण्यासाठी बस असे. पण त्या दिवशी मात्र जवळ जवळ पाऊण तास बस आली नाही. डोळ्यावर झापड येऊ लागली होती. नामस्मरण करण्याचा प्रयत्न चालू होता. बस आली. कशीबशी आत चढले व घरी येऊन पोहोचले. आल्यानंतर साहजिकच शाळेत गेल्याबद्दल वडील रागावले. मी कॉटवर झोपले. तेव्हा मिटलेले डोळे दोन दिवसांनी उघडले. या दोन दिवसांत मी बेशुद्धावस्थेतच होते.

मला 'घटसर्प' झाला होता. श्वासनलिका जवळ जवळ बंद होत आली होती. घटसर्पाचे जंतू घशात जाळं विणत जातात. श्वासनलिका अशा जाळ्याने बंद झाली की मृत्यू ठरलेला ! माझ्या वडिलांच्या पाहण्यातील घटसर्पाची माझी पहिलीच केस होती. सकाळी घसा पाहून त्यांना संशय आला होता म्हणून त्यांनी मला शाळेत जाऊ नकोस असे सांगितले होते. दुपारी वैद्यकीय ग्रंथ वाचून त्यांनी त्याबद्दल खात्री करून घेतली होती. साहजिकच ते घाबरले. धावाधाव करून सोलापुरातील २-३ मोठ्या डॉक्टर्सना त्यांनी घरी बोलावून घेतले. मला तपासून त्यांनी इंजेक्शन्स वगैरे जे काही उपचार करायचे ते केले. पण 'आजची व उद्याची रात्र पार पडली तर ही मुलगी जगेल', असे त्यांनी एकमताने सांगितले. दोन दिवसांनी मी पूर्ण शुद्धीवर आले. वरील सर्व हकीकत ती. सौ. आईने मला नंतर सांगितलेली.

आता या लेखाच्या विषयानुरूप घडलेली घटना पुढीलप्रमाणे --

त्या रात्री तशा बेशुद्धावस्थेत मला पुढील दृश्य स्पष्टपणे दिसले. मी कॉटवर झोपलेली पायथ्याशी सुमारे आठएक फूट उंचीचा एक काळाकभिन्न दणकट पुरुष पाहिला. पांढरा शर्ट, पांढरे लुंगीसारखे वस्त्र व डोक्याला पांढराशुभ्र रूमाल गुंडाळलेला तो 'यम' आहे हे मला त्या अवस्थेतही जाणवले. त्याने उजवा हात माझ्याकडे पसरला. त्या हाताची पाचही बोटे जवळ करून तो माझे प्राण खेचून घेत आहे असे मला जाणवल्याने मी अत्यंत घाबरून मनात जोरजोराने नामस्मरण सुरू केले. तेव्हा तो नाहीसा झाला. नामापुढे कधी कळीकाळही टिकू शकत नाही, संतवचनाचा जाणत्या वयात प्रत्यय आला.

वरील घटना मी शुद्धीवर आल्यावर आईला सांगितली. त्यानंतर मला काय झाले होते ते तिच्याकडून कळले. त्यानंतर डॉक्टरांच्या सल्ल्यानुसार तीन आठवडे संपूर्ण 'बेड-रेस्ट' मला घ्यावी लागली. आज ५४ वर्षांनंतरही ते दृश्य माझ्या मनःचक्षुंपुढे तितकेच स्पष्ट दिसते आहे.

३) ३ मे १९५५ रोजी माझा विवाह श्री. मनोहर नारायण खांडेकर (बी.ई.मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल) यांच्याशी झाला. सासरे तीन वर्षांपूर्वीच गेलेले. ती. सासूबाईही आजारीच होत्या. त्या तीन वर्षातच कॅन्सरने गेल्या. घरात ५ लहान दीर व पुढे आमची २ मुले - अशा ७ जणांची आई होण्याचा प्रसंग आला. मिळवते फक्त आमचे 'हे'. सदोदित विवंचना व मानसिक ताण. जोडीला अत्यंत भावनाप्रधान स्वभाव. यामुळे आम्ल-पित्त व त्यामुळे पोटदुखीचा विकार जडला. अल्सरवरचे उपचार चालू होते. थंड दूध घेणे, तिखट-तेलकट खाणे टाळणे, antacids घेणे इ. पोट खूपच दुखायचे. दुपारपासून दुखणे वाढत जायचे ते संध्याकाळी दुखण्याची परिसीमा गाठत असे. नाडीसुद्धा मंद होत असे. बऱ्याच वेळा एक्सरेज काढले पण त्यात अल्सरचा मागमूस आला नाही. त्रास तर होतच राहिला. उपाय म्हणून ऑफिसमधले लोक 'ह्यां'ना सल्ला देत. 'गणपतीला अमुक अमुक एकादशण्या करा', 'अमक्या मठात जा.' इ. त्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून प. पू. श्री. गुरुदेवांनी दिलेले नाम घट्ट धरून राहिले. ऑफिसमधील एकजण होमिओपॅथिक डॉक्टर होते. त्यांचीही औषधे घेत राहिले. पण गुण येईना. एकदा ते म्हणाले, 'वहिनी, अमक्या अमक्या मठात जा व अमक्यांना भेटा. तुम्हाला नक्की बरे वाटेल.' त्यांना ठामपणे सांगितले 'मी दुसरीकडे कुठेही जाणार नाही. माझे सद्‌गुरु समर्थ आहेत; तेच मला बरे करतील.'

याच सुमारास आमच्या एका नातेवाईकांनी एका उत्तर हिंदुस्थानी वैद्यराजांची शिफारस केल्यामुळे त्यांच्याकडून आयुर्वेदिक भस्मेही काही महिने घेतली. काही उपयोग होत नाही, असे सांगितल्यावर वैद्यराजांनी मात्रा दुप्पट वाढवून घेण्यास सांगितले. तसे औषध घेतल्यावर मी चक्क कोसळले ! त्या रात्री मागीलप्रमाणे यमसजांचे दर्शन पुन्हा झाले. जोरजोराने नामस्मरण करू लागल्यावर तो नाहीसा झाला !

शेवटी या पोटदुखीचे कारण शोधून काढायचेच, या जिद्दीने 'ह्यां'नी एक दिवस रजा घेतली. एक्सरे स्पेशालिस्ट डॉ. साबूर यांच्याकडे जाऊन, 'पोटाचे जेवढे एक्सरे काढता येतील तेवढे काढा. पण दुखण्याचा शोध लागू दे.' असे त्यांना सांगितले. त्यांनी बेरियम मिल्क देऊन वेगवेगळ्या कोनांनी सात एक्सरेज् काढले. संध्याकाळी रिपोर्ट देताना ते म्हणाले, 'ड्यूओडीनल अल्सर आहे. इतका वाढलेला असताना कुठल्याच डॉक्टरांना कसा समजला नाही?'

ते 'क्ष' किरण फोटो घेऊन डॉ. रा. ह. करमरकरांकडे गेलो. ते फोटो पाहताच त्यांचा चेहरा एकदम उतरला. 'आता ऑपरेशन करायला पाहिजे.' असे ते म्हणाले. थोडा विचार करून त्यांनी डॉ. घारपुरे यांना चिठ्ठी दिली व त्यांच्याकडून 'गॅस्ट्रिक ॲनॅलिसिस' करून घ्यायला सांगितले. 'त्याचा रिपोर्ट आल्यानंतर ऑपरेशनचे काय ते ठरवू.' असे ते म्हणाले.

त्या रात्री मी प. पू. श्रीबाबांच्या फोटोपुढे धरणे धरून बसले. (हा पूजेतला फोटो माझ्या वडिलांनी लग्नानंतर प्रथम सासरी जाताना दिला होता.) 'यापूर्वी लहानपणी मला मरणाच्या दाढेतून दोनदा वाचवलेत. आता मी संसारात पडलेली आहे. मुले लहान आहेत. मला कुणाचीही मदत नाही. कृपा करून मला वाचवा. उद्याचा गॅस्ट्रिक ॲनॅलिसिसचा रिपोर्ट निगेटिव्ह येऊ दे. मला ऑपरेशन नको' अशी विनवणी करत राहिले. आश्चर्य म्हणजे तो रिपोर्ट निगेटिव्ह आला ! डॉ. करमरकरांनाही हायसे वाटले. पण त्यांनी मला बजावून सांगितले की ६ आठवडे हॉस्पिटलमध्ये असल्याप्रमाणे बेड-रेस्ट घ्यायची. 'आरे'च्या 'होल' दुधाच्या बाटल्या फ्रीजमध्ये ठेवून ते थंडगार दूध दर दोन तासांनी ४ औंस घ्यायचे. दुसरे काहीही अन्न घ्यायचे नाही. रात्री झोपण्यापूर्वी २ टेबलस्पून ऑलिव्ह ऑईल घ्यायचे ! त्याप्रमाणे पथ्य पाळले. अगदी जरूर तेवढेच काम करायचे व जास्तीत जास्त पडून रहायचे. नामस्मरण करण्याचा प्रयत्न करायचा. असे सहा आठवडे केले. त्या वेळी अशक्तपणा इतका आलेला की झोकांड्या जायच्या ! पण प.पू. श्रीबाबा व प. पू. श्रीगुरुदेवांच्या कृपेने हेही मोठे संकट टळले ! ही घटना १९६५ सालची.

आज माझे वय ६७ वर्षे पूर्ण आहे. फार तिखट अथवा लागोपाठ तेलकट पदार्थ टाळून मी रोजचे जेवण व्यवस्थित घेत आहे.

**सौ. शशिकला मनोहर खांडेकर**
११,१२ आविष्कार सहनिवास, ३ महन्त रोड,
विलेपार्ले (पूर्व), मुंबई-४०००५७

# श्रीगुरुदेव रानडे यांच्या आठवणी

**श्रीमती विजया बापट (पूर्वाश्रमीचे नांव सुशीला भालचंद्र पटवर्धन)**

*बी.एससी. (ऑ.) बी.टी.बी.एड. शैक्षणिक क्षेत्रात विविध स्तरांवर ३६ वर्षे नोकरी. १९८६ साली सेवानिवृत्त. सामाजिक संस्थांच्या कार्यात सहभाग - ज्येष्ठ नागरिक संघ बिबवेवाडी इ. भारतातील ऐतिहासिक व तीर्थक्षेत्रांना भेटी व युरोप प्रवास. अध्यात्मिक ग्रंथांचे वाचन.*

आमचे पटवर्धन घराणे मूळचे जमखिंडीचे. या संस्थानातील मुत्तूर खेडेगावी आमची वडिलोपार्जित शेती होती. सरकारी नोकरी करायची नाही म्हणून माझे वडील धारवाडला वकिली करत असत. परंतु पुढे त्यांच्या वडिलांच्या इच्छेखातर व त्या वेळचे जमखंडी संस्थानचे राजेसाहेब यांच्या बोलावण्यावरून १९३९ ते १९४७ या कालावधीत जमखंडी येथे सरन्यायाधीश या हुद्द्यावर काम करत होते.

माझ्या वडिलांचे पूर्ण नाव – श्री. भालचंद्र रामचंद्र पटवर्धन असे होते. त्यांना आम्ही 'दादा' म्हणत असू. गुरुदेवांशी त्यांचा कसा परिचय झाला व त्यांना कोणते अनुभव आले ते त्यांच्याच शब्दात पुढे देत आहे. मी व रामभाऊ दोघेही जमखंडीचे. ते शंकरशेट शिष्यवृत्ती मिळवून १९०३ साली मॅट्रिक झाले व कॉलेज शिक्षणासाठी पुण्यास गेले. त्या वेळी मी हायस्कूलमध्ये प्रवेश घेतल्यामुळे जमखंडीतच त्यांची प्रत्यक्ष ओळख व्हायचा योग आला नाही. मात्र ते खूप हुशार विद्यार्थी आहेत हे मी इतरांकडून ऐकले होते. मी १९१० साली मॅट्रिक होऊन पुढील शिक्षणासाठी पुण्यास गेलो. तेव्हा माझे आतेभाऊ श्री. जोशी (गुरुदेवांचे स्नेही) यांनी माझी ओळख गुरुदेवांशी करून दिली. या ओळखीमुळे मी बरेच वेळा गुरुदेवांचे घरी जात असे. त्यामुळे त्यांचा व त्यांच्या कुटुंबियांचाही माझेशी परिचय वाढला. श्रीगुरुदेवांची प्रकृती पहिल्यापासूनच थोडी नाजूक होती. त्यात त्यांना मलेरियाचा त्रास होऊ लागला. तेव्हा त्यांच्या मनाला विरंगुळा वाटावा म्हणून मी त्यांच्या आवडीचे साहित्य (अभंग वगैरे) वाचून दाखवत असे. तेव्हा मला त्यांच्या सुस्वभावाचा चांगला अनुभव आला व सत्संगही वाढला. त्यांची असामान्य बुद्धिमत्ता, दुसऱ्यांच्या दोषांपेक्षा गुणाकडे लक्ष देऊन त्यांचे कौतुक करण्याची वृत्ती, साधी राहणी यामुळे मी प्रभावित झालो.

आम्ही कॉलेजात शिकत होतो तेव्हा देश-विशेषतः महाराष्ट्र लोकमान्य टिळकांच्या चळवळीने भारलेला होता. तरुण कॉलेज विद्यार्थी या स्वातंत्र्य संग्रामात हिरिरीने भाग घेत असत. त्याप्रमाणे या राजकीय चळवळीत भाग घेऊन देश स्वतंत्र करणे हे माझे व माझ्या मित्रांचे ध्येय बनले होते. गुरुदेव रानड्यांच्या गूढ मार्गाचे आम्हाला पुरते ज्ञान नव्हते. त्यामुळे आम्ही मित्रमंडळी त्यांची टिंगल करीत असू. 'रामभाऊ, नुसते एका जागी बसून ध्यान काय करतात? त्याने काय मिळणार आहे?' असे आपसात आम्ही मित्र चर्चा करायचो.

आमच्यापेक्षा ते ५।६ वर्षांनी मोठे होते. त्यामुळे आमचा मित्रपरिवार त्यांना 'रामभाऊ' म्हणे. ते एम.ए.च्या परीक्षेत पहिले आल्याबद्दल त्यांना डिग्रीबरोबर चन्सेलर्स गोल्डमेडल मिळायचे होते. त्यामुळे आम्हा सर्वांना खूप आनंद झाला होता. तेव्हा त्यांनी गाऊन घालून व मेडल हातात घेऊन आमचे बरोबर एक फोटो काढावा असे आम्ही मित्रमंडळींनी त्यांना सुचवले. पण आमचा विचार त्यांना पटला नाही. शेवटी आमच्या आग्रहाखातर त्यांनी नेहमीच्या पोशाखात (कोट, पगडी घालून) आमच्या बरोबर फोटो काढून घेतला. (हा फोटो जमखंडीच्या घरात वडिलांच्या खोलीत लावलेला बरीच वर्षे मी पाहिलेला आहे.)

मी. बी.ए. झाल्यावर मुंबईला जाऊन शिकवण्या किंवा नोकरी करून एल.एल.बी. होण्यासाठी मुंबईला निघालो. वाटेत पुण्यास उतरलो तेव्हा रामभाऊ डेक्कन कॉलेजमध्ये नोकरीला आहेत असे कळले म्हणून त्यांना भेटायला गेलो. 'आता पुढे काय करणार?' असे त्यांनी विचारल्यावर मी एल.एल.बी. होण्याचा माझा बेत सांगितला. परंतु त्यांनी मला एल.एल.बी.ऐवजी एम.ए. होण्यास सांगितले. 'मला दरमहा खर्चासाठी ५० रु. तरी लागतील त्याची कशी तरतूद होणार?' असे मी विचारल्यावर त्यांनी मला नोकरीचे आश्वासन दिले व धारवाड येथील व्हिक्टोरिया हायस्कूलचे संस्थापक श्री. हुकेरीकर यांना तार केली. कारण त्या शाळेत एका गणित शिक्षकाची जरुरी होती. त्यांनी मला शाळेत हजर करून घेतले व मी मुंबईला जाण्याऐवजी धारवाडला रहायला गेलो. पुढे एम.ए. व एल.एल.बी. होऊन मी वकिली करण्यासाठी धारवाडला स्थायिक झालो. गुरुदेवांच्या कृपेने माझे कल्याण झाले व तेथे माझा जम चांगला बसला.

१९२७ साली ते कर्नाटक कॉलेजमध्ये व्याख्यानासाठी धारवाडला आले असताना ते त्या वेळी लिहीत होते ते 'Mysticism in Maharashtra' हे पुस्तक छापून घ्यायची जबाबदारी त्यांनी माझ्यावर सोपविली. या पुस्तकाच्या छपाईच्या कामाबद्दल चर्चा करण्यासाठी मला गुरुदेवांना वारंवार भेटावे लागत असे. गुरुदेवांचे निंबाळला एक जुने घर होते व ते वस्तीपासून तसे दूर होते. तेथे गुरुदेव अलाहाबादहून उन्हाळ्याच्या सुट्टीत येऊन रहात असत व जास्तीत जास्त वेळ परमार्थ साधनात घालवत असत. त्या वेळी त्यांचे एक टायपिस्ट फक्त त्यांचे बरोबर रहायचे. मी एका मे महिन्यात निंबाळला रामभाऊंना भेटायला गेलो होतो. त्या वेळी आम्ही तिघेच त्या घरात होतो. श्रीगुरुदेव ध्यान करत होते व मी प्रुफे तपासत बसलो होतो. एकाएकी 'नारायण, नारायण' असा तालबद्ध घोष ऐकू येऊ लागला. मी उठून गुरुदेव बसले होते तेथे जाऊन पाहिले तर गुरुदेव त्या नामघोषात अगदी तल्लीन झाले होते. अलाहाबाद युनिव्हर्सिटीतील एक विद्वान प्रोफेसर देहभान हरपून नामगजर करताहेत हे प्रत्यक्ष पाहिल्यावर माझा त्यांच्या परमार्थसाधनेबद्दलचा ग्रह बदलला व कॉलेजमध्ये असताना आम्ही त्यांची या मार्गाबद्दल टिंगल करायचो याचा विषाद वाटला व ते एक थोर संत आहेत याची खात्री पटली. संध्याकाळी त्यांचेबरोबर फिरायला गेलो तेव्हा त्यांना मी सकाळच्या नामघोषाची हकीकत सांगितली व मला अनुग्रह द्या अशी त्यांना विनंती केली. कारण त्या प्रसंगाने मी खूप भारावून गेलो होतो. पण तेव्हा ते इतरांना अनुग्रह देत नसत म्हणून त्यांनी मला इंचगेरी येथे जाऊन श्रीअंबुराव महाराजांकडून नाम घेणेस सांगितले. माझा व अंबुराव महाराजांचा परिचय नसल्याने मी तिकडे गेलो नाही व नाम घ्यायचे राहून गेले. मात्र या वेळी गुरुदेवांनी स्वाक्षरी करून दासबोधाची एक प्रत मला दिली. (माझे वडील बरेच दिवस हाच दासबोध वाचत असत. आता ही प्रत माझी धाकटी बहीण कमला रामदासी हिचेकडे आहे.)

आयुष्यात चांगली संधी एकदाच येते आणि तिचा लाभ आपण तेव्हाच घ्यायला हवा. श्रीअंबुराव महाराजांसारख्या अधिकारी व्यक्तीकडून मी नाम घेतले नाही याची मला नंतर रुखरुख लागली. परंतु पुढे त्यांचे

# काय वाचावे? कल्पना कशी टाकावी? गुरुदेवांनी सहजपणाने केलेला बोध

**श्री. नी. रा. जेऊरकर**

*ज्येष्ठ साधक, दासबोधवाचन, पदगायन उत्तम रीतीने करण्यात हातखंडा, श्रीगुरुदेवांशी खूप संबंध.*

## सहज बोलणे हितउपदेश

निंबाळास मंडळी जमली म्हणजे श्रीगुरुदेव सर्वांना दिवसातून एकदा तरी एकत्रित भेटत. कधी कधी ते ध्यानात वा त्यांच्या लिखाणाच्या कामात व्यग्र असले म्हणजे हा नियम पाळला जात नसे. दोन दोन, चार चार दिवस त्यांची व आलेल्या मंडळींची भेटही होत नसे. पण असे प्रसंग क्वचित. अशा भेटींना त्या वेळी रूढ झालेला शब्द म्हणजे (Sitting) सीटींग हा होता. अशा सीटींग श्रीगुरुदेव घेणार आहेत हे निंबाळास जमलेल्या मंडळींना कळावे म्हणून मोठी झांज किंवा घंटा सीटींगपूर्वी वाजविली जाई. पाच-दहा मिनिटांत सर्व मंडळी एकत्र जमत.

जमलेल्या मंडळींत विद्वान, थोर साधक, निष्ठावंत भक्त, उच्चपदस्थ वगैरे मंडळी असत. साहजिकच अशी उच्च श्रेणीतील मंडळी श्रीगुरुदेवांच्या सन्निध बसत. हा कोणताच गुण प्रकर्षाने नसलेली माझ्यासारखी तरुण व इतर वयोगटातील मंडळी श्रीगुरुदेवांपासून बरीच लांबवर बसत. त्यामुळे आपल्याकडे श्रीगुरुदेवांचे लक्ष जाईल का नाही अशी दूर बसलेल्या मंडळींच्या मनात निष्कारण शंका येई. ह्यातून मार्ग काढावयाचा म्हणजे घंटा केव्हा होते याकडे लक्ष ठेवून, घंटा झाली रे झाली की पळत सीटींगच्या ठिकाणी प्रवेश मिळवावयाचा. सीटिंगच्या ठिकाणी श्रीगुरुदेव आधीच जाजम वगैरे अंथरून एकटेच येऊन बसलेले असत. पळत पळत जाऊन प्रवेश घेतल्या घेतल्या श्रीगुरुदेवांना लांबूनच वाकून नमस्कार करावयाचा व त्यांच्यापासून लांब अंतरावर बसावयाचे. तोपर्यंत सीटिंगच्या ठिकाणी दुसरे कोणीच हजर नसल्यामुळे श्रीगुरुदेव त्यांच्या अपार भक्तवत्सलतेमुळे आमच्यासारख्या सामान्यांची विचारपूस करावयाचे. त्या वेळी तो क्षण परम भाग्याचा वाटावयाचा.

असाच एकदा मी सीटींगसाठी पळत श्रीगुरुदेवांच्या नवीन घराकडे निघालो. तेवढ्यात दारातच साधारण माझ्याच वयाचा माझा एक साधक मित्र मला भेटला व त्याने माझ्या हातात एक पुस्तक दिले. व तो त्याच्या कामास बाहेरच्या बाहेर निघूनही गेला. पुस्तक माझ्या हातात राहिले. माझी धडपड व लक्ष सर्वांत आधी सीटींगच्या ठिकाणी प्रवेश मिळविणे याकडे पूर्णपणे केंद्रित झालेले होते. त्यामुळे ते पुस्तक कसले वगैरे ह्या गडबडीत मी पाहिलेदेखील नाही. हातात पुस्तक घेऊन मी सीटींग ठिकाणी प्रवेश मिळविला. दुरूनच त्यांना नमस्कार केला व लांब जाऊन बसलो. त्या वेळी त्या ठिकाणी श्रीगुरुदेव व मी असे दोघेच होतो.तोपर्यंत इतर कोणीच मंडळी आत आलेली नव्हती. त्यामुळे सहजच श्रीगुरुदेवांचे लक्ष माझ्याकडे गेले. माझ्यासारख्या सामान्य तरुणाशी ते कोणत्या विषयावर बोलणार? मला बोलते करण्यासाठी जणूकाही त्यांनी मला एक सामान्य प्रश्न विचारला. ते म्हणाले, 'तुझ्या हातात कसले पुस्तक आहे?' मित्राने माझ्या हातात दिलेले पुस्तक कसले आहे हे मी तोपर्यंत पाहिलेदेखील नव्हते. पुस्तक उघडून पाहतो, तो ती कादंबरी ! झाले, मला ती कादंबरी आहे हे सांगण्याचे धाडस होईना. खरे तर ती कादंबरी एका श्रेष्ठ साहित्यिकाची होती. ते कधीही छचोर लिखाण करीत नसत, हे मला माहीत होते. तथापि ती कादंबरी आहे ही गोष्ट लपविण्यासाठी त्या श्रेष्ठ साहित्यिकाचे नुसते नाव सांगून त्यांचे ते पुस्तक आहे, असे मोघम उत्तर मी दिले. ते श्रेष्ठ साहित्यिक श्रीगुरुदेवांचे चांगले परिचितही होते. त्यामुळे तेथेच हा विषय संपणार असे मला वाटले. पण माझे उत्तर ऐकून श्रीगुरुदेव एकदम गंभीर झाले व माझ्याकडे वळून जोरात म्हणाले, 'असली पुस्तके वाचत जाऊ नकोस.' तेवढ्यात सर्व मंडळी आत येऊन स्थानापन्न झाली व सीटिंग सुरू झाले व माझ्या विषयावर आपोआप पडदा पडला.

पण ती घटना व श्रीगुरुदेवांनी ठासून उच्चारलेले 'असली पुस्तके वाचीत जाऊ नको' हे वाक्य माझ्या स्मरणात कायमचे घर करून राहिले. असे वाचन टाळण्यात मी पूर्णपणे यशस्वी झालो नसलो तरी चुकून माकून असे वाङ्मय मी जेव्हा वाचीत असे तेव्हा अपराधाची सूक्ष्म बोच मनास होई. अशा कमी अधिक यशस्वी प्रयत्नांमुळे जो थोडा का होईना वेळ शिल्लक उरे तो मी आता श्रीगुरुदेवांचे श्रेष्ठ वाङ्मय वाचण्याकडे देऊ लागलो. श्रीगुरुदेवांची पुस्तके माझ्या संग्रही असून तोपर्यंत वेळ नाही या लंगड्या सबबीस पुढे करून मी ती पुस्तके वाचण्याचे टाळीत होतो. तरुण वयात दिवसभराच्या दगदगीमधून फारच थोडा 'मोकळा वेळ' असे. आता असे मोकळे क्षण पकडण्याकडे मी जास्त जास्त लक्ष पुरवू लागलो. दिवसाकाठी मोकळ्या मिळणाऱ्या दहा पंधरा मिनिटे, क्वचित अर्धा-एक तास या काळात श्रीगुरुदेवांचे एखादे पुस्तक घेऊन त्यातील अर्ध्या पानापासून एक-दोन पानापर्यंत वाचन मी करू लागलो. यापेक्षा जास्त वाचन रोज होत नसे.पण असे नियमित वाचन, अगदी थोडा वेळ का होईना केल्यामुळे माझ्यासारख्या सामान्य माणसास श्रीगुरुदेवांचे एखादे पुस्तक वर्षभरात संपविता येत असे !

श्रीगुरुदेवांनी एके ठिकाणी म्हटले आहे की कोणतेही मोठे काम लहान लहान कामे एकत्र करून होत असते. म्हणून रोज एखादे पान जरी लिहिले तरी एका वर्षात ३६५ पानांचा एक ग्रंथ तयार होईल व आतापर्यंत तुमच्याकडे हेटाळणीच्या दृष्टीने पाहणाऱ्या लोकांना तुमची ही निर्मिती पाहून आश्चर्य व आदर वाटू लागेल.

सध्याच्या दृश्य व श्राव्य करमणूक प्रधान वातावरणामुळे न कळत आयुष्याचा किती अमूल्य वेळ फसव्या आनंदाच्या विघातक मार्गाने वाया जात आहे हे सांगण्याची गरज नाही. अशा प्रकारची जाणीव ज्याला होईल त्याने जर श्रीगुरुदेवांच्या वरील उपदेशाचे चिंतन केले व त्याप्रमाणे वर्तन

ठेवण्याचा यथामति प्रयत्न केला तर दुःखाचा स्पर्श नसलेल्या व सतत वाढत जाणाऱ्या आनंदाच्या पाउली चालण्याचे भाग्य त्याला निश्चित लाभेल असे माझ्या अल्पमतीस वाटते.

## निर्विकल्पासी कल्पावे । कल्पना मोडे स्वभावे ॥

१९५० च्या सुमाराचा काळ असावा. काही व्यावहारिक अडचणींमुळे मी बराच त्रस्त झालो होतो. श्रीगुरुदेवांकडून अनुग्रह घेतल्यापासून नामस्मरणाने दुःखाचा परिहार होतो ते सतत मनावर बिंबले होते. ह्याबरोबरच आपल्या अडचणी श्रीगुरुदेवांच्या कानांवर घातल्या म्हणजे त्यातून मुक्तता मिळते ह्या कृतीवरही श्रद्धा होती. त्यामुळे तडक निंबाळ गाठले.

सुदैवाने त्याच वेळी श्रीभाऊसाहेब महाराजांचे (श्रीगुरुदेवांचे गुरु) एक वृद्ध, निष्ठावान, साधनिक शिष्य, श्री. राजाराम होमकर हे निंबाळास आलेले होते. निंबाळच्या नव्या घरातील श्रीगुरुदेवांची जी निर्याणाची खोली आहे, जेथे सध्या श्रीगुरुदेवांच्या पादुका स्थापन केलेल्या आहेत तेथे सकाळी ८ ते १२ साधक नामस्मरणास बसत. मध्यभागी भिंतीस श्री. राजाराम होमकर बसत. त्यांच्या दोन्ही बाजूस साधक बसत. मीही त्यांच्यासमवेत जाऊन नामस्मरणास बसलो. दुपारचे १२ वाजले की घंटा होई. नंतर एक मोठी वाटी उसळ व ताक दिले जाई. त्याप्रमाणे सर्व मंडळी १२ वाजता उठली. मी मात्र तसाच त्या खोलीत बसून राहिलो. वाटले खूप खूप नामस्मरण करावे व आलेले संकट नामस्मरणाने परतवून लावावे. दुपारचा एक वाजला. माझे फक्त शरीर त्या खोलीत होते. मन इतस्ततः भटकत होते. नामस्मरण होत नव्हतेच. अशा नुसत्या मारून-मुटकून बसण्याचा देहाला कंटाळा येणारच. तसा अगदी कंटाळून विमनस्क स्थितीत खोलीच्या बाहेर पडण्यासाठी मंद गतीने चालत खोलीच्या दरवाजापर्यंत आलो. त्याच खोलीत एका कोपऱ्यात एक मोरी होती. त्या मोरीत येण्यासाठी नेहमीप्रमाणे अत्यंत वेगाने श्रीगुरुदेव त्या खोलीच्या दारात शिरण्यास व अत्यंत मंद गतीने मी खोलीच्या दारातून बाहेर पडण्यास एकच गाठ पडली. एकदम श्रीगुरुदेवांनी माझ्याकडे बघितले व ते मला जरा जोरातच म्हणाले, 'नुसता बसतोस. १५-१५ मिनिटांनी पदे, अभंग म्हणावेत.' येवढे बोलून श्रीगुरुदेव वेगाने त्या कोपऱ्यातील मोरीकडे गेले देखील. या एकदम घडलेल्या प्रसंगाने मी चांगलाच भांबावलो. विचारांची मालिका सुरू झाली. वाटले, श्रीगुरुदेवांनी सांगितलेला उपाय तातडीने करून पहावा. एकाग्रतेने नामस्मरण करण्याला तो निश्चित उपकारक असणारच.

मला अभंग, पदे म्हणण्याची सवय नव्हती. अभंगही पाठ येत नव्हते. त्या वेळी निंबाळास डॉ. कानडे म्हणून एक वृद्ध डॉक्टर येऊन राहिले होते. त्यांना तुकारामांचे बरेच अभंग येत होते. अभंग कोणत्या पद्धतीने म्हणावेत हेही त्यांना थोडेफार माहीत होते. त्यांच्याकडून विनाविलंब काही अभंग मी विचारून लिहून घेतले. ते चालीत म्हणण्यासाठी त्यांचे मार्गदर्शनही घेतले. पुढे पुढे मी अभंग व पारमार्थिक पदांचा संग्रह करण्यास सुरुवात केली. याबाबतीत सोलापूरचे श्रीगुरुदेवांचे एक निष्ठावान शिष्य डॉ. पारिपत्यदार यांचा मला फार उपयोग झाला. ते आपल्या सुरेल व भक्तिपूर्ण आवाजात श्रीगुरुदेवांना पारमार्थिक पदे म्हणून दाखवित असत.

याचा परिणाम असा झाला की निंबाळास सीटिंगच्या वेळी कोणी पदे म्हणणारे नसल्यास व अशा वेळी माझा मुक्काम निंबाळास असल्यास, श्रीगुरुदेव मला पारमार्थिक पदे म्हणण्यास सांगत. त्यामुळे पदे म्हणण्याचा आत्मविश्वास व सभाधीटपणाही मला आला. अशी पदे मी नामस्मरणास बसल्यावेळी मधून मधून काही वेळांच्या अंतरा अंतराने म्हणण्याचा परिपाठही ठेवला. अवांतर विचारांना पायबंध घालण्यास हा एक उत्कृष्ट उपाय आहे हे अनुभवास येत गेले.

या संदर्भात श्रीगुरुदेवांचे गुरुबंधू, श्रीअंबुराव महाराज यांची एक आठवण मार्गदर्शक आहे.

नामस्मरणाच्या वेळी कल्पना येऊ लागल्या तर 'निर्विकल्पासी कल्पावे । कल्पना मोडे स्वभावे ॥' निर्विकल्प म्हणजे नाम असे श्रीअंबुराव महाराज सांगत असत. एक नामच निर्विकल्प आहे, असे स्पष्टीकरण ते करीत.

परंतु नाम घेता येत नाही म्हणून निर्विकल्पाची कल्पना करावयाची. मग निर्विकल्प याचा नामच असा अर्थ केला तर नामाची कल्पना कशी करावयाची? नाम घेता येत नाही, ही तर अडचण; म्हणून निर्विकल्प म्हणजे काय? असे एकाने श्रीगुरुदेवांना विचारले. त्यांनी उत्तर दिले, 'निर्विकल्प म्हणजे देवाशी संबंधित असलेली कोणतीही गोष्ट. उदा. देवाचे गुण, देवाची लक्षणे, देवाचे भक्त, देवाची स्थाने, भक्तांची स्थाने, काय वाटेल ते.' निर्विकल्प या शब्दाचा या अर्थाच्या स्पष्टीकरणाच्या कल्पना दूर करण्यास फार उपयोग होतो.

ह्या बाबतीत श्रीगुरुदेवांनी फार खात्रीचा पण सहज लक्षात न येणारा एक उपाय सांगितला आहे. तो असा :

जास्त वेळ नेम (नामस्मरण) करताना, कंटाळा, झोप आली असता ती घालविण्यासाठी मध्ये काही काळ दुसरे काम केल्यास, पुनः नामस्मरणास जोराने बसता येते; त्यात तोटा नाही.

तसेच नामस्मरणास बसल्या वेळी कल्पना येऊ नयेत म्हणून श्रीगुरुदेव आणखी एक खालील मार्ग सुचवितात –

'वाचण्यासाठी आपणास आवडतील असे उतारे लिहून ठेवावेत. रात्री वाचलेला विषय पहाटे नेमास बसल्यावेळी मनात आणावा व त्यावर चिंतन करीत नेम करावा म्हणजे इतर विचार त्रास देणार नाहीत. आपणास आवडणारी पदेच नामस्मरणास बसल्या वेळी म्हणावीत.'

**श्री. मी. रा. जेऊरकर**
५६०/३५, दक्षिण सदरबझार, सात रस्ता,
विनायक को.ऑ.हौसिंग सोसायटी, सोलापूर ४१३००३.

| ***साधूंची पंचवेध लक्षणे :*** | ***ब्रह्म :*** |
|---|---|
| ● ***मौन*** | ***'आठव तो ब्रह्म'*** |
| ● ***नम्रता*** | ***नाठव*** |
| ● ***समता*** | ***तो*** |
| ● ***प्रपत्ती (शरणागती)*** | ***भवभ्रम*** |
| ● ***परोपकार*** | |

# श्रीगुरुदेवांच्या आठवणी

**श्री. मुकुल मधुसूदन रानडे**

*श्रीगुरुदेवांकडून अनुग्रह, एक साधक.*

माझे वडील १९४९ च्या सुमारास सांगलीला गेले असता श्री. तुळपुळे यांच्या बरोबर निंबाळला श्रीगुरुदेवांना भेटण्यास गेले व त्यांच्याकडून नाम घेतले.

बांधकाम व्यवसायात असताना माझ्या वडिलांचा मुक्काम बेल्लारी (कर्नाटक राज्य) येथे होता. तेथून ते श्रीगुरुदेवांना भेटण्यास वरचेवर निंबाळ येथे जात असत. त्या वेळची त्यांची एक आठवण ! त्यांच्याबरोबर एक गृहस्थ होते. त्यांनी त्यांच्या गुरुंकडून नाम घेतले होते. त्यांच्या गुरुंनी त्यांना जपमाळ वापरण्यास सांगितले होते. माझ्या वडिलांबरोबर तेही श्रीगुरुदेवांना भेटण्यास आले होते. दोघेजण गप्पा मारत बसले असता पाठीमागून श्रीगुरुदेव कधी येऊन उभे राहिले ते दोघांनाही कळले नाही. त्यावेळी माझ्या वडिलांच्या मनात आपणही जपमाळ वापरावी म्हणजे आपले नामस्मरणाकडे लक्ष लागेल असे विचार चालू होते. सदरच्या गृहस्थांची विचारपूस केल्यावर त्यांनी जपमाळ वापरतो असे सांगितले. 'फार छान ! असेच चालू दे.' असे श्रीगुरुदेवांनी त्यांना उत्तर दिले. ते ऐकून माझ्या वडिलांना असे वाटले की, हे आपल्याला परस्पर उत्तर मिळाले आहे व आपणही तसेच करावे. हा विचार मनात यावयाचा अवकाश श्रीगुरुदेव वडिलांकडे वळून म्हणाले, 'हे तुमच्यासाठी नव्हे बरं का? तुम्हास सांगितलेले तुम्ही चालू ठेवा.'

२३ मे १९५४ हा माझ्या आयुष्यातला भाग्याचा दिवस म्हणावा लागेल. त्यादिवशी श्रीगुरुदेव बहुधा अलाहाबादहून निंबाळला जाण्यास पुण्यात आले होते व ते श्री. रा. रा. तात्यासाहेब दामले (श्रीगुरुदेवांचे भाचे) यांच्याकडे उतरले होते. वडील त्यांच्या दर्शनास गेले असता आमच्या घरी येण्याची विनंती केली. त्या दिवशी माझी मुंज असल्याने वडिलांनी श्रीगुरुदेवांना तशी विनंती केली. त्याप्रमाणे श्रीगुरुदेव दुपारी घरी आले व मला जवळ बसवून घेतले व पाठीवरून हात फिरवला ! श्रीगुरुदेवांनी कोचावर बसून घरच्यांची विचारपूस केली. वडील त्यांच्या पायाशी बसून होते. ते तसे का बसले याचा उलगडा त्या वेळी झाला नाही ! पण आज कळते. कदाचित मी तसे करण्याची संधी घालवली. नंतर घरात येवून कापूर लावला.

त्यानंतर थोड्याच दिवसांत मी निंबाळला गेलो. ती. रा. रा. काकासाहेब तुळपुळे यांचे मार्फत श्रीगुरुदेवांनी मला नाम दिले !

अध्यात्मिक प्रगती किती झाली हे मला ठाऊक नाही; पण व्यावहारिक जगात श्रीगुरुंच्या कृपेचा वारंवार अनुभव येतो. श्रीकृपेने आज घरातील सर्वजण त्यांच्या कृपाछत्राखाली आहेत. माझी पत्नी, मुलगा व सून सर्वांनीच त्यांच्याकडून नाम घेतले आहे !

आध्यात्मिक अनुभव माझ्या वडिलांना बरेच होते. असाच एक अनुभव सांगून सदरचे विवेचन पूर्ण करतो.

माझे वडील रोज पहाटे ५॥ ला. ती. रा. रा. तात्यासाहेब दामले यांचेकडे नेमास बसण्यास जात असत. एक दिवशी असेच नेमास बसले असता चाफ्याच्या फुलांचा घमघमाट येऊ लागला ! नेमात बसणे अशक्य झाले. म्हणून तसेच उठून खाली अंगणात आले व आजूबाजूस चाफ्याचे झाड आहे का? ते बघून आले ! पण तसे काही न सापडल्याने परत नेमास बसले. नेम झाल्यावर ती. रा. रा. तात्यासाहेब दामल्यांनी त्यांना थांबवून घेतले व इतर मंडळी गेल्यावर त्यांचा तो अनुभव खरा असल्याचे सांगितले. त्यादिवशी तो अनुभव फक्त या दोघांनाच आला होता !

**श्री. मुकुल मधुसूदन रानडे**

पर्वती दर्शन, डेक्कन जिमखाना, पुणे ४११००४.

# श्रीगुरुदेवांच्या सहवासातील आठवणी

**डॉ. इंदुप्रकाश सिंग**

*एम.ए., तत्त्वज्ञान, पीएच.डी. (तत्त्वज्ञान) इंडियन फॉरिन सर्व्हिस. श्री. अटल बिहारी वाजपेयी परराष्ट्र मंत्री असताना व इंदिरा गांधी पंतप्रधान असताना डिप्लोमॅट म्हणून अनेक महत्त्वाच्या पदांवर नेमणूक. स्पेनमधील ॲबेसडर म्हणून निवृत्त.*

प्रा. प्रभाकरपंत धारवाडकर यांना जानेवारी १९९८ च्या बेळगांव मुक्कामी डॉ. इंदुप्रकाश सिंग, नवी दिल्ली यांनी संभाषणात सांगितलेल्या श्रीगुरुदेवांच्या आठवणी आम्ही शब्दबद्ध केल्या आहेत. प्रा. धारवाडकर यांनी त्या पाठविल्या आहेत.

मी अलाहाबाद विद्यापीठात एम.ए. (फिलॉसॉफी) घेऊन शिकत असताना श्रीगुरुदेव रानडे विद्यापीठाचे उप कुलगुरु होते. रोज सायंकाळी गुरुदेवांच्या बंगल्यावर त्यांच्या खोलीत २०-२५ लोक जमत असत. काहीजण तत्त्वज्ञानातील कठीण शब्द-वाक् प्रचारांचा अर्थ समजून घेण्याकरिता येत असत. काहीजण आपल्या कुटुंबातील वेबनाव समाप्त करण्याकरिता उपाय विचारण्यासाठी येत असत. श्रीगुरुदेव सर्वांचे प्रश्न शांतपणे ऐकून त्या सर्वांना हसत हसत उत्तरे देवून त्या सर्वांचे समाधान करीत असत. अशा गोष्टी रोज होत असत. मी एका कोपऱ्यात बसून सर्व ऐकत असे.

एकदा श्रीगुरुदेव फिरावयास जात असताना त्यांनी पाहिले की एक गाय एका खड्ड्यात पडली आहे व तिला वर येता येत नव्हते. श्रीगुरुदेवांनी आजूबाजूच्या लोकांना बोलावून तिला वर काढले. ती गाय वर आल्यावर असे पाहिले की तिच्या एका पायाचे हाड मोडले आहे. आता काय करणार? त्यांनी एका पशुवैद्याला बोलावून तिच्या पायाला मलमपट्टी, प्लास्टर जोडून झाल्याचे पाहिल्यानंतर श्रीगुरुदेव पुढे गेले.

माझी एम.ए. फायनलची परीक्षा झाली. निकाल लागावयाचा होता. विद्यापीठात गेलो असताना अचानक श्रीगुरुदेवांची भेट झाली. श्रीगुरुदेवांनी मला विचारले, 'तुला फिलॉसॉफी मधील निबंध कसा लिहावयाचा माहीत आहे की नाही?' मी हे ऐकून चाट पडलो. प्रश्न विचारला त्या अर्थी माझा पेपर त्यांनी पाहिला असणार अशी खात्री झाली. माझ्या मनात मेरीटमध्ये येऊन विद्यापीठात अध्यापक म्हणून सुरुवात करण्याची इच्छा होती. तसेच पीएच.डी. करण्याचा विचार होता. ते आता काही जमणार नाही असे वाटले. म्हणून मुंबईच्या एका नातेवाईक गृहस्थांना नोकरी पहाण्यास सांगितले. त्याने लगेच नोकरी शोधून मला मुंबईला बोलावून घेतले. माझी नोकरी सुरू झाली. दोन महिन्यांनी परीक्षेचा निकाल लागला. लगेच घरून तार आली की, मी मेरीटमध्ये आलो आहे. लवकरच अलाहाबादला ये.

घरी गेल्यावर दुसरा एक प्रश्न उभा राहिला. माझ्या आई-वडिलांचे मनात मी आय.ए.एस. किंवा आय.एफ.एस. परीक्षेला बसावे अशी इच्छा होती. माझ्या मनात विद्यापीठात अध्यापक म्हणून नोकरी करावी अशी आकांक्षा होती. त्या वेळी श्रीगुरुदेवांना भेटावयास गेलो व त्यांचा सल्ला विचारला. श्रीगुरुदेवांनी घरच्या मंडळींप्रमाणे सल्ला दिला. त्याप्रमाणे मी इंडियन फॉरिन सर्व्हीस परिक्षेला बसलो व पास झालो. लंडनच्या हायकमिशनर ऑफिसमध्ये शिकाऊ उमेदवार म्हणून माझी नेमणूक झाली. श्रीगुरुदेवांना ही बातमी सांगितली. त्यावर ते म्हणाले, 'हे बघ, मी तुला दोन पत्रे देतो. एक ओळखीच्या व्यापारी सेठ करिता, तो तुझी राहण्याची, जेवणाची सोय करेल. दुसरे पत्र केंब्रिज विद्यापीठाच्या तत्त्वज्ञानाच्या अध्यापकांना देतो. त्यांची माझी चांगली ओळख आहे. तो तुला पीएच.डी.साठी प्रवेश देईल. इंडियन फॉरिन सर्व्हिस शिकाऊ तास संपल्यानंतर जो वेळ मिळेल त्या वेळात विद्यापीठ वाचनालयात जाऊन अभ्यास कर.'

त्याप्रमाणे मी इंडियन फॉरीन सर्व्हिसचे शिकाऊ शिक्षण पूर्ण केले. पीएच.डी.चा पण प्रबंध लिहून झाला. गाईडनी तो पसंतपण केला. परंतु शिकाऊ अभ्यासाच्या नियमाप्रमाणे मला माझा प्रबंध केंब्रिज विद्यापीठात सादर करता आला नाही. पुढे तोच प्रबंध अलाहाबाद विद्यापीठात सादर केला. त्या विद्यापीठाकडून मला पीएच.डी. पदवी मिळाली. हे सर्व घडल्यानंतर माझ्या ध्यानात आले की, श्रीगुरुदेवांनी दोन पत्रे देण्याचा खटाटोप का केला. त्या दोन वर्षांत शिकावू शिक्षण व पीएच.डी. अभ्यास यामुळे पाश्चिमात्त्य रहाणीचा माझेवर परिणाम होण्यास वेळ मिळाला नाही व सहीसलामत पाश्चिमात्त्य संस्कृतीपासून दूर राहिलो.

यामुळे पुढील सर्व जीवन एक कार्यकुशल अधिकारी म्हणून काम करता आले.

श्रीगुरुदेव त्यांना भेटणाऱ्या खेडवळ लोकांकडून त्यांच्यामध्ये प्रचलित असलेल्या कबीर, तुलसीदास आदी संतांची भजने, गीते इत्यादीविषयी माहिती काढून घेवून त्याच्यावर नोटस् तयार करत असत. नंतर त्याचा आपल्या संशोधनात व ग्रंथ लेखनात उपयोग करीत असत.

**डॉ. इंदुप्रकाश सिंग**
दिल्ली.

# 'काय वानूं तया संतांचे उपकार ।'

डॉ. श्रीमती कमल बा. वैद्य

श्रीगुरुदेव रानडे यांच्या सहधर्मचारिणी पूज्य ती. काकीसाहेब उर्फ ती. मनुताई या माझ्या चुलत नणंद ! माझे सासरे पूज्य डॉ. श्री. म. वैद्य यांनी लिहिलेल्या 'प्रणवोपासना', 'साधुसंतांचा देवयान पंथ' आणि 'षट्चक्रदर्शन व भेदन' या तिन्ही ग्रंथांना पूज्य श्रीगुरुदेव रानडे यांनीच प्रस्तावना लिहिलेल्या आहेत.

श्रीगुरुदेव रानडे सांगलीत आले की त्यांचा मुक्काम नेहमी सांगलीचे राजेसाहेब यांच्या विश्रामबाग येथील गेस्टहाऊसवर असे. ते सांगलीत आले आहेत असे कळले की श्री. महादेव विष्णुपंत वैद्य (श्रीगुरुदेवांचे मेहुणे) ज्यांना आम्ही 'भाऊकाका' म्हणत असू ते नेहमी माझ्या यजमानांना येऊन भेटत; (डॉ. बा. श्री. वैद्य यांना) आणि श्रीगुरुदेवांना केव्हा सांगलीहून इस्लामपूरला घेऊन यावयाचे हे निश्चित ठरवत असत. त्याप्रमाणे दिवस निश्चित ठरला की त्या दिवशी सकाळी ती. भाऊ काका (डॉ. श्री. नरेंद्र कुंटे यांचे सासरे) आमच्या घरी येत असत व आमच्या गाडीतून ते, मी, माझा मुलगा रमेश (वय वर्ष ३/४) व आमचा ड्रायव्हर अशी सर्व इस्लामपूरहून निघून सांगलीस श्री. राजेसाहेबांच्या गेस्ट हाऊसवर पूज्य श्रीगुरुदेवांच्या दर्शनास जात असू. ती. सौ. मनुताई मला आपल्याजवळ बसवून घेत व प्रेमाने विचारपूस करीत.

तेव्हा मला इतके आश्चर्य वाटे की पूज्य श्रीगुरुदेव नुसता कोरा चहा तोसुद्धा अगदी थोडाच पीत असत. त्यांच्याकडे भेटीसाठी माणसांची रीघ लागलेली असे. पण आम्ही गेल्यावर तासाभरात ते व सौ. मनुताई आमच्याबरोबर आमच्या गाडीने इस्लामपूरला जाण्यास निघत असत. गाडीत ड्रायव्हरच्या मागे मी बसे, माझ्या शेजारी सौ. मनूताई आणि त्यांच्या पलीकडे श्रीगुरुदेव बसत असत. पुढे ड्रायव्हरच्या शेजारी चि. रमेश, त्याच्या शेजारी ती. भाऊकाका व बरोबर श्रीगुरुदेवांचा कुणी भक्त बसलेला असे. भगवंताच्या नामाचा जयजयकार करून प्रवासास सुरुवात होई. प्रवासात सतत भजन चालू असे आणि मला इतके आश्चर्य वाटे की १५-२० मिनिटे झाली की, श्रीगुरुदेव नेसलेले वस्त्र धोतराचा आडोसा करून बदलत. ते गाडीतच हातांनी दोन्हीकडून आम्ही कुणीतरी धरून वाळवत असू. परत १५/२० मिनिटे गेली की, परत वस्त्रं बदलत ! अजून ते दृश्य माझ्या डोळ्यांपुढे तरळते आहे! असे कां करीत याचा उलगडा अजूनही झालेला नाही !

इस्लामपूरला पोहोचलो की आमच्या घरापुढेच गाडी थांबे. ब्राह्मण आळीचा बोळ अत्यंत अरुंद असल्याने ती. भाऊकाकांच्या घरापर्यंत गाडी जाणे अशक्यच होते! ते व सौ. मनुताई आमच्या घराशी उतरून सर्व घरांतून एकवार फिरून येऊन परत गाडीशी येऊन चालतच ती. भाऊकाकांच्या घरी जात ! त्या वेळी त्यांचे पाय घराला लागले हेच समाधान फार मोठे होते ! पण ते चहा किंवा इतर काहीही घेत मात्र नसत !

एक वर्षी ते इस्लामपूरला आले असता मी मुद्दाम ती. भाऊकाकांच्या घरी त्यांच्या दर्शनास गेले आणि माझे श्रीसद्गुरु स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती यांनी 'श्रीरामचरित मानसा'चा केलेला समवृत्त-समच्छंद मराठी अनुवाद श्रीगुरुदेवांना दाखविला. त्यांनी सर्व ग्रंथ चाळून पाहिला व 'फारच छान ! हं, हे वाच पाहूं !' असे म्हणून त्यातील विशिष्ट पान उघडून मला वाचायला सांगितले. तो भाग होता अरण्यकांडांतील खर दूषण युद्धाचा (अरण्यकांड दो. २०) ! त्याची छंद रचना तोटक, तोमर या वृत्तांत असून त्यात युद्धवर्णनच आहे ! चौपाई, सोरठा, दोहा यांना सुंदर चाली आम्ही लावायचो; पण ही दोन वृत्तं अशी आहेत की त्यांना सुंदर चाली लावताच येत नाही ! पण श्रीगुरुदेवांनी जे पान काढून दिले तेच वाचणे भाग होते ! म्हणून मी त्या वेळी जरा नाखुशीने तो सबंध दोहा वाचला ! दोहा २० (क) (ख) संपताच ते म्हणाले, 'छान ! पुरे !' म्हणताच वाचन थांबवले !

त्यांनी हाच दोहा का वाचावयास सांगितला असावा याचा उलगडा पुढे खूप वर्षांनी मला झाला ! कारण या दोह्यात 'देखहिं परसपर राम करि संग्राम रिपुदल लरि मर्‍यो ॥४॥' अशी छंदाची शेवटची ओळ असून दोह्यांत 'राम राम कहि तनु तजहिं पावहिं पद निर्बान । करि उपाय रिपु मारे छन महुँ कृपानिधान॥' असा या प्रकरणाचा शेवट गोस्वामी तुलसीदासांनी केला आहे ! यात 'राम' नावाचा प्रभाव वर्णन केला असल्यानेच श्रीगुरुदेवांनी आपल्याकडून हा भाग वाचून घेतला हे जेव्हा लक्षात आले; त्या वेळी जो आनंद झाला तो कसा वर्णन करणार? म्हणूनच 'काय वानूं तया संतांचे उपकार । मज निरंतर जागविती' हेच खरे !

पूज्य श्रीगुरुदेवांच्या चरणी सादर सप्रेम शतशः प्रणाम !

**डॉ. श्रीमती कमल बा. वैद्य**
ब्लॉक क्र. ५, प्रोफेसर्स क्वार्टर्स, गव्हर्मेंट मेडिकल कॉलेज,
मिरज ४१६ ४१०.
फोन : (०२३३) २२२०९१ (Extn.) १८

**● आत्मज्ञान ●**

'आत्मजीव' म्हणजे 'पहावे आपणासी आपण' हेच 'ज्ञान' - 'आत्मज्ञान' हेच 'अंतिम सत्य'!

**● नेमातील आनंद ●**

मन नामाशी किती काळ एकरूप होते व ती वेळ 'वाढणे' म्हणजेच नेमातील स्थिरावस्था, मग आनंद होतो.

**● नामस्मरणाचा उद्देश ●**

मन नामाशी एकरूप करून काळाचा जितका अंश 'ब्रह्म होता येईल तितका काळ ब्रह्मरूपता' होता येते.